पुण्यश्लोक

# छत्रपति शिवाजी

## भाग तिसरा

पुणें येथे शके १८८२ मध्ये बाळशास्त्री हरदास यांची
छत्रपति शिवाजी महाराजांवरील तिसऱ्या
व्याख्यानसत्रांत झालेलीं
व्याख्यानें

— लेखक —

साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास



मूल्य आठ रुपये

# प्रकाशकाचें निवेदन

साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास यांची पुण्यास पुण्यश्लोक छत्रपति श्रीशिवाजी महाराज यांच्या चरित्रावर शके १८८२ (सन १९६०) मध्ये तिसरी व्याख्यानमाला झाली. या व्याख्यानमालेंत छत्रपति शिवाजी महाराज यांनी साकार केलेल्या स्वराज्यावर मुसलमानी सत्तांनी जे घणाघाती आघात केले होते त्याची माहिती आली असून महाराजांनी त्या सर्व आपत्तींतून स्वराज्य कसें वांचविलें व शेवटीं दक्षिणदिग्विजय करून हिंदुपदपादशाही कशी स्थापन केली याचें. वर्णन आलें आहे. शून्यांतून स्वराज्याचें ब्रह्माण्ड निर्माण करणाऱ्या या महापुरुषाच्या सर्व कृत्यांना बंडखोरीचीं कृत्यें असें नांव त्या वेळची भोवतालचीं शत्रुराज्यें देत असत; म्हणून या स्वराज्यास वैध शासनाचें अधिष्ठान प्राप्त करून देण्याकरिता महाराजांनी राज्याभिषेक करवून घेऊन ते सिंहासनाधीश्वर झाले, व दक्षिण भारत पादाक्रान्त करून एकटचा मोगली सत्तेचें आव्हान स्वीकारण्यास सिद्ध झाले. महाराजांचा हा जीवनपट या तिसऱ्या व्याख्यानमालेचा विषय असून शिवचरित्राचा तिसरा भाग या रूपाने तो प्रसिद्ध होत आहे. महाराजांनी हिंदुराष्ट्र कसें निर्माण केलें होतें याची साक्ष देणाऱ्या घटनांचा विचार पुढील वर्षी होणार आहे.

सध्याच्या संकटमय काळांत बाळशास्त्री हरदास यांनी हिंदुराष्ट्राच्या पुनरुत्थानार्थ चालविलेल्या प्रयत्नांना हें शिवचरित्र मार्गदर्शक व प्रेरक राहील यांत शंका नाही.

शिवजयंती
शके १८८२ } **प्रकाशक**

# पुण्यश्लोक छत्रपति शिवाजी

## भाग तिसरा

## अनुक्रमणिका

चाळीस हात लांब उडी मारतो अशा भीतीने संरक्षणाची केलेली व्यवस्था; खुद्द दरबारांत दोन हजार सशस्त्र योद्ध्यांचें औरंगजेबाभोवती संरक्षक कडें; महाराज येतांच त्यांनी औरंगजेबाच्या सिंहासनासमोर नमन करून स्वतःचा नजराणा सादर केला; बादशहाचा संकेत, व महाराजांची तृतीय श्रेणीच्या सरदारांच्या रांगेंत दूर ठिकाणी रवानगी; तेथे जसवंतसिंगाला पाहून व त्याच्या खाली आपला क्रम पाहून महाराजांचा संताप अनावर झाला; ते गर्जना करूं लागले, कटयार मागूं लागले, मूर्च्छित पडले; त्यांस समजावण्याचा प्रयत्न, महाराजांनी दरबारची शोभा नाहीशी केली; त्यांस परत घेऊन जाण्याची औरंगजेबाची आज्ञा; दरबार खलास झाला; महाराजांवर सूड घेण्याचे प्रयत्न सुरू झाले; शिवाजीची भेट घेण्यास औरंगजेबाचा नकार; त्याजभोवती पोलादखानाचा पाहारा बसला; शिवाजीचा आग्र्यास निकाल लागणार व त्याच्या त्रासांतून आपण सुटणार म्हणून इंग्रजांना झालेला आनंद; महाराजांनीं निरवानिरव करण्यास सुरवात केली; बरोबरचें सैन्य व माणसें परत पाठविलीं; आजारी पडण्यास सुरवात.



महाराज आजारी पडले; औषधोपचार सुरू; शेवटच्या दानधर्मास सुरवात; काजी, हकीम, सरदार, वज़ीर यांस भेटी, मेवा पाठवण्यास सुरवात; पेटाऱ्यांची प्रथम कडक तपासणी; रोजच्या प्रकारामुळे तपासणींत पुढे ढिलाई; हिरोजी फर्जंद याला आपल्या जागीं निजविलें व आपण व संभाजी पेटाऱ्यांत बसून निघून गेले; दोन कोसांवर नेल्यावर बाहेर पडून एकांत स्थळीं गेले; तेथे निराजी रावजी, दत्ताजी त्रिंबक व राघो मित्रा वाट पाहात होते. सर्वांनी अंगाला राख फासून बैरागी बनून मथुरेस प्रयाण केलें; दुसरे दिवशीं दुपारीं हिरोजी

सुरू केले; दक्षिणेंतील मुसलमान राजांची शिवाजीविरुद्ध एकजूट करण्याचा व्यंकोजीचा प्रयत्न; अहेरीजवळ सेनापति हंबीरराव मोहिते यांच्या सैन्यावर व्यंकोजीचे हल्ले; व्यंकोजीचा पराभव व तंजावरकडे पलायन; शिवाजीचा व्यंकोजीला उपदेश; महाराजांच्या दक्षिणदिग्विजयाचा पाश्चात्त्य वखारवाल्यांवर परिणाम; बेलवडी गढीच्या देसाईणीचा पराक्रम; तिची विटंबना करणाऱ्या सेनानीचे महाराजांनी डोळे काढून त्यास कैदेंत ठेवलें; दक्षिण भागाची व्यवस्था लावली, त्या कामीं रघुनाथपंत हणमंते यास नेमिलें.



महाराजाचें ध्येय हिंदूचें धर्मराज्य स्थापन करणें हेंच होतें; दक्षिण दक्षिणियाच्या हातीं राहावी हा केवळ एक राजकीय पवित्रा होता; महाराजांनी १६७६ मध्ये व्यंकोजीला पाठवलेलें पत्र; महाराजाचा ध्येयवाद या पत्रावरून स्पष्ट होतो.



# पुण्यश्लोक छत्रपति शिवाजी

## भाग तिसरा

### प्रकरण पहिलें

## सुरतेवर स्वारी

शिवछत्रपतींच्या पस्तीस वर्षांच्या राजकीय जीवनाचें समालोचन करतांना हें जीवन पांच कालखंडांत विभागतां येईल असें मीं प्रस्तुत ग्रंथाच्या दुसऱ्या भागांत दिग्दर्शित केलें आहे. त्यांतील सन १६४५ ते १६५५ पर्यंतचा क्रांतीच्या सिद्धतेचा कालखंड व सन १६५६ ते १६५८ चा क्रांतिमय उत्थानाचा कालखंड यांचें संपूर्ण समालोचन करून सन १६५९ ते १६६८ पर्यंतचा जो संरक्षक व आक्रमक युद्धाचा कालखंड, त्याचें सन १६६३ पर्यंतचें म्हणजे शाहिस्तेखानाच्या पराजयापर्यंतच्या कालखंडाचें समालोचन दुसऱ्या भागांत पूर्ण झालेलें आहे. पुण्यश्लोक शिवछत्रपतींच्या विभूतिमत्त्वाचे सर्व पैलू पहावयाचे, म्हणजे या पांचही कालखंडांचें समालोचन आवश्यक आहे. त्यांतील हा तिसरा कालखंड तर त्यांच्या अलौकिक सेनापतित्वाचा व प्रतिभासंपन्न राजनीतिज्ञतेचा परिचय करून घेण्याच्या दृष्टीने सर्वाधिक महत्त्वाचा आहे.

शाहिस्तेखानाच्या पराभवाचा बादशहा औरंगजेबाला जितका धक्का बसला, त्याहीपेक्षा अधिक त्याला त्याचा राग आला. शाहिस्तेखानाला शिक्षा व्हावी म्हणून, त्याने बंगालच्या प्रांताधिपतीच्या जागीं त्याची नियुक्ति केली. बंगालचा प्रांताधिप होणें म्हणजे प्रत्यक्ष नरकवास आहे, असें औरंगजेब स्वतःच म्हणत असे. तो प्रांत म्हणजे केवळ नरक, तेथे केवळ खाण्यापिण्याची तेवढी सोय आहे,

असें स्वत: औरंगजेबाचेंच वाक्य आहे. अशा या नरकांत जाण्यापूर्वी आपल्या सर्वसत्ताधीश भाच्याची भेट घेण्याची शाहिस्तेखानाने अभ्यर्थना केली. पण औरंगजेबाने त्याचें तोंडसुद्धा पाहण्याचें नाकारलें. दु:खी व अपमानित झालेला शाहिस्तेखान लज्जेने काळें ठिक्कर झालेलें तोंड घेऊन बंगालकडे निघाला. त्याच्या स्थानीं औरंगजेबाने आपला पुत्र शाहजादा मोअज्झम् याची दक्षिणचा प्रांताधिपति म्हणून नियुक्ति केली. शाहिस्तेखानाला त्याच्या भोंगळपणाविषयी शिक्षा होणें आवश्यक असलें तरी त्याच्या स्थानीं औरंगजेबाने जी नियुक्ति केली, ती पूर्णपणें अयोग्य होती. राजपुत्र मोअज्झम् हा केवळ सुखविलासांत वेळ घालविणारा, अयोग्य मनुष्य होता. केवळ राजपुत्र असणें, यावाचून या स्थानीं येण्यायोग्य त्याच्यांत कांहीच नव्हतें. त्याच्या साह्यासाठी महाराणा जसवंतसिंग याला पुण्याला ठेवण्यांत आलें होतें. पण या राजपुत्राने जसवंतसिंगाच्या सूचनेनुसार वागावयाचें नसून जसवंतसिंगाने त्याच्या आज्ञेंत राहावयाचें असल्यामुळे त्याचा कांही उपयोग नव्हता.

दक्षिणेंतील प्रांताधिपतीची औरंगजेब ही व्यवस्था करतो न करतो, तोंच शिवछत्रपतींनी मोगल साम्राजशाहीच्या हृदयालाच हात घालणारें असें एक विलक्षण साहस केलें कीं, त्यामुळे महाराजांच्या कीर्तीइतकीच, किंबहुना त्याहूनही अधिक औरंगजेबाची अपकीर्ति जगांत पसरली. तें साहस म्हणजे मोंगलांच्या वैभवश्रीचें विलासमंदिर असणाऱ्या गुजराथेंतील सुरत बंदरावर त्यांनी केलेलें आक्रमण होय. पण या आक्रमणापूर्वी ते कांही स्वस्थ बसलेले नव्हते. शाहिस्तेखानाच्या विटंबनेनंतर अवघ्या एकाच आठवड्याने दहा सहस्त्र पायदळ व चार सहस्त्र अश्वदळ बरोबर घेऊन राजापूरचे त्यांचे अधिकारी रावजी सोमनाथ यांच्यासह त्यांनी तळ कोंकणांत कुडाळवर स्वारी केली. महाराज नुसते कुडाळ प्रांतांत आले, एवढें कळतांच तेथे एकच गडबड उडाली. गोव्याच्या पोर्तुगीज व्हॉइसरायने त्यांच्याशीं संधि करण्यास्तव आपला राजदूत पाठविला. त्याच्याजवळ या व्हॉइसरॉयने जें पत्र दिलें त्यावरून

शाहिस्तेखानाच्या घटनेनंतर शिवछत्रपतीच्या नांवाचा केवढा धाक सर्वत्र उत्पन्न झाला होता, याची कल्पना येते. हा व्हॉइसरॉय आपल्या पत्रांत लिहितो, 'आपण वेंगुर्ल्यास येऊन पोहोचला अशी वार्ता नुकतीच येथे गोव्यांत येऊन पोहोचली. आपलें मोगलांवरील विजयाविषयी अभिनंदन करण्याकरिता येथून रामाजी शेणवी कोठारी यांस मी हेतुत: पाठवीत आहें. त्याच रामाजी शेणव्यास आपल्या बरोबर दुसऱ्या गोष्टीबद्दल संधि करण्याचा अधिकार देऊन पाठवीत आहें. आपल्याकडून लवकर उत्तराची वाट पाहत आहोंत. आपण जर तह केला तर तो दोघांच्याही फायद्याचा होणार आहे.'

महाराजांचें नुसतें नांव ऐकतांच पळापळीला प्रारंभ झाल्याचा उल्लेख पाश्चात्यांच्या पत्रव्यवहारांतून आहे. कोकणातील त्यांच्या या पदन्यासाचा उद्देश कुडाळ मुक्त करणे, वाडीकर सावंतांच्या हालचालींना पायबंद घालणे, व तेथील पाश्चात्य उपद्व्यापी वखारवाल्यांच्या मनांत धाक उत्पन्न करणें हा होता. विजापुरी सत्तेवर हें आक्रमण होतें. कांही ठिकाणी गुप्तपणें राजकारणांत भाग घेणाऱ्या या वखारवाल्यांनाही त्यांनी पेचांत टाकलें आहे. वेंगुर्ल्याला डचांची एक वखार होती. शिवाजी हें नाव ऐकतांच त्यांच्या रेसिडेंटची घाबरगुंडी उडून तो पळून जाण्याचा विचार करू लागला. महाराजांनी त्याला एक गमतीचा प्रश्न पत्रद्वारें विचारला. तो असा की, 'वेंगुर्लें घ्यावें असें आमच्या मनांत आहे. आपलें या संबंधांत काय मत आहे तें कळवावें.' ह्या प्रश्नानें रेसिडेंटची चांगलीच तिरपीट उडाली. होकारार्थी उत्तर द्यावें, तर शिवाजी परत गेल्यावर विजापूरचा अदिलशहा आपलें काय करील, हें त्याला उघड दिसू लागलें; व नकारार्थी उत्तर द्यावें तर आजच छातीवर पाय ठेवून मृत्यूसारखा शिवाजी पुढे उभा! त्याने असें उत्तर दिलें की, 'आम्ही व्यापारी असल्यामुळ राजकारणसंबंधांत आम्ही कांही सांगू शकत नाही.'

कोकणांतील या स्वारीच्या वेळीं शिवाजी महाराजांना प्रत्यक्ष सैन्य पाठवून हुसकून लावण्याची शक्यता विजापूरच्या

अदिलशाहला नव्हती. त्यांचीं आपसांत विलक्षण भांडणें चालू होतीं. दिनांक २९ जुलै १६६१ च्या डचांच्या पत्रांत या यादवीचा उल्लेख असून ११ जून १६६३ च्या पत्रांत त्याचा पुनरुच्चार आहे. तो असा '(१) विजापुरांत यादवी वाढत असून परिस्थिति अशीच चालू राहिली तर विजापूरचा नाश जवळ आला असें म्हटलें पाहिजे. (२) विजापूरच्या राज्यांतील यादवी अद्यापि बंद पडली नाही. त्यामुळे विजापूरच्या सुलतानांनी कोकणांतील आपल्या अधिकाऱ्यांना शिवाजीला हुसकून लावण्याची आज्ञा देणारीं राजपत्रकें पाठविणें, व आपल्या राजसभेंतील महत्त्वाच्या अधिकाऱ्यांना कोकणांतील प्रदेशांच्या सनदा देऊन त्यांनी ते प्रदेश शिवाजीकडून घ्यावे असें त्यांना सांगणें, एवढेंच धोरण ठेवलें.' त्यांतील कांहींनी महाराजांना धमकावणी देणारीं पत्रेंहि पाठविलीं. पण अशक्तांच्या धमकावण्यांना जगांत कोण भीक घालणार? दिनांक २० जुलै १६६३ च्या एका इंग्रजी पत्रव्यवहारांत असलेला कांही घटनांचा निर्देश या गोष्टींवर प्रकाश पाडतो. तें पत्र असें : ' राजापूर व खारेपाटण हीं दोनही शहरें आता आदिलशहाने महंमदखान ऊर्फ खानखाना (इखलासखानाचा वडील मुलगा) यास दिलीं आहेत. त्यामुळे तीं आपल्या ताब्यांत घेण्याकरिता त्यानेही आपल्या सैन्यास विजापुराहून चाल करून येण्यास कळविलें आहे. अदिलशाहाने दाभोळ व चिपळूण हीं अफजलखानाचा मुलगा फाजलखान याला दिलीं आहेत. फाजलखानावर अदिलशहाची चांगली कृपा आहे. शिवाजीलाही बऱ्या बोलाने हीं शहरें सोडून द्यावीं नाहीतर प्रायश्चित भोगावें असें त्याने लिहिलें आहे.'

पावसाळा येईपर्यंत महाराज कोकणांत राहिले आणि कुडाळ प्रांतावर स्वराज्यांतील पहिला प्रांताधिप म्हणून रावजी सोमनाथाची नियुक्ति करून आणि त्याच्याजवळ दोन सहस्र सैन्य ठेवून ते राजगडावर परतले. इंग्रजी नवसंवत्सराच्या पहिल्याच महिन्यांत त्यांनी राजगडाहून सुरतेवर अद्‌भुत साहसी आक्रमण केलें. सतत तीन वष औरंगजेबाने आपल्या सरदारांकरवी स्वराज्याच्या

प्रदेशाची जी राखरांगोळी केली होती व शेकडों लोकांचा जो संहार केला होता, त्याचा महाराजांना सूड घ्यावयाचा होता. हीं मोगलांचीं आक्रमणें परतवून लावण्यासाठी सारा स्वराज्याचा धनकोश रिता झालेला होता, तोही भरून काढण्याची आवश्यकता होती. सागरावर व भूमीवर स्वराज्य स्थिरपद करण्यासाठी अनेक नवीन योजना आखणें व पार पाडणें आवश्यक होतें. त्यासाठी धनराशी आवश्यक होत्या. एकाच ठिकाणीं प्रयत्न करून अगणित धनराशीचा लाभ पदरांत पाडून घेण्यासारखा आहे काय हें पाहण्यासाठी महाराजांनी आपल्या चाणाक्ष गुप्तचरांना आज्ञा दिली, व सुरतेचें स्थान त्यांच्या मनांत भरलें. स्वराज्याच्या हानीची भरपाई, धनाचा लाभ व औरंजेबाच्या अत्याचारांचा सूड या तिन्ही गोष्टी एकदम साधण्यासारखें सुरत हें एकच स्थान होतें. सूर्याचें नगर अथवा मक्केचें प्रवेशद्वार म्हणून या नगराची ख्याति असून सतराव्या शतकाच्या उत्तरार्धांत मोगल साम्राज्याच्या अत्यंत महत्त्वपूर्ण अशा बंदरांपैकी तें एक होतें. तें भारतांतील सर्वांत महत्त्वाचें व्यापारी केंद्र असून पर्शियन, अरेबियन, इजिप्शियन, आफ्रिकन, चिनी व युरोपियन व्यापाऱ्यांचा मोठा व्यापार तेथून चालत असे. गुजराथ पासून मलबारपर्यंतच्या व पाटणा, आग्रा, लाहोर, काश्मीर, गोवळगोंडा, विजापूर व कर्नाटकांतील महत्त्वपूर्ण व्यापारी पेठांतील मालाची निर्यात या बंदरांतूनच होत असे. त्या वेळीं भारतांत एकही असें बंदर नव्हतें की, जें श्रीमंती, समृद्धि, संस्कृति व दळणवळण या दृष्टींनी सुरतेची बरोबरी करूं शकेल. कोटयवधि रुपयांचा व्यापार या नगरांतून प्रत्यहीं चालत असे. केवळ जकातीचेंच तेथील उत्पन्न वार्षिक बारा लक्ष रुपये मोगल सम्राटाला मिळत असे. मक्केच्या यात्रेला जाणारे मुसलमान प्रवासी येथूनच जात असल्यामुळे मुसलमानांच्या दृष्टीने या नगराला धार्मिक महत्त्वही होतें. या शहराचा सुदृढ दुर्ग, तापी नदीच्या दक्षिण तीरावर समुद्रापासून बारा मैलांवर होता. नगराला मात्र असावी तशी संरक्षक तटबंदी नव्हती. अनेक नवकोटनारायण तेथे आपले

भव्य वाडे बांधून नांदत होते. नगराची लांबीरुंदी चार चौरस मैल असून, लोकसंख्या दोन लक्ष होती. बहिर्जी बोरा, हाजी सय्यद बेग, हाजी कासम, सय्यद शहीद बेग, मुल्ला अब्दुलजाफर हे तेथील नवकोट नारायण म्हणून सुरतेंत प्रवेश करण्यापूर्वीच महाराजांना माहीत झाले होते. शिवाय, डच व इंग्रजांच्या मोठ्या वखारी तेथे असून औरंगजेब बादशहाला या शहरांतून कराच्या रूपाने कोटच्यवधि रुपये मिळत असत. हिरे, मोतीं, सोनें, जवाहीर यांनी खच्चून भरलेल्या या नगरांत उंची कापड, मसाल्याचे पदार्थ, केशर व कस्तुरी, चंदन, अत्तर, रेशीम, जर, हस्तिदंत, गालिचे, इत्यादींचाही व्यापार फार मोठ्या प्रमाणावर चालत असे. लावण्यवती स्त्रिया व गुलाम यांचाही व्यापार तेथे चाले.

अशा या लक्ष्मीचें निवासस्थान असलेल्या नगराला संरक्षण मात्र कांहीच नव्हतें. केवळ इंग्रज व डच वखारींना तटबंदी होती, व तेथे चारसहा तोफा, आणि कांही बंदुका यांचा संग्रह होता. पण एखाद्या आक्रमणासमोर या साहित्याचा काय पाड? तेथील मोगल अधिकारी इनायतखान हा असून त्याच्या नेतृत्वाखाली पांच सहस्र सैन्य असल्याचा बादशहा औरंगजेबाला विश्वास होता. पण वस्तुस्थिति याहून पूर्णपणें वेगळी होती. इनायतखान हा भ्याड, अप्रामाणिक, स्वार्थी व मूर्ख मनुष्य होता. पांच सहस्र सैन्याचें वेतन औरंगजेबाजवळून घेऊन प्रत्यक्ष केवळ एक सहस्रच सैनिक त्याने ठेवलेले होते. सुरतेंतील प्रमुख नागरिक पूर्णपणें भित्रे व सामान्यतः अहिंसक प्रवृत्तीचे होते. त्यांचें वर्णन करतांना ॲबे कॅरे ( Abbe Carre ) या तत्कालीन फ्रेंच प्रवाशाने असें लिहिलें आहे की :—

Surat was without defence which might stop an army and certainly the valour ( vertue ) of its inhabitants did not take the place of ramparts. The merchants of whom it was full, besides their little experience in the act of warfare, being each anxious for the preservation of his own merchandise, were not capable of contributing anything except weakness to the

good order of the public affairs which sacrifices sometimes the interests of individuals. Also in Surat, many of the Indians have, by the ideas of their moral, approaching in this respect to that of Pythagoras, so great a horror of shedding blood that they would not kill even the vilest animal, far less massacre men, a sentiment which would be very good if all the world had it. See how Shivaji conducted his enterprise.' —( Shivaji the great by Dr. Balkrishana vol. 1 Part II page 230)

(एखाद्या आक्रमक सैन्याचा प्रतिकार होऊं शकेल असें संरक्षण सुरतेला नव्हतें. सुरतेची खरी वस्ती व्यापारी लोकांची होती. त्यांना युद्धकलेचें कोणतेंही ज्ञान नव्हतें. हे लोक मूळचेच धनलोभी असल्याने धनसंपादनाशिवाय इतर कोणत्याही गोष्टीकडे त्यांचें लक्ष नव्हतें. समाजजीवनांत सामर्थ्यहीनतेशिवाय दुसऱ्या कशाचीही भर ते घालूं शकत नव्हते. पुष्कळसे लोक (जैन) तर असे होते की, सर्प, विंचू इत्यादिकांना मारलें तरी जीवहत्या होते, या कल्पनेने त्यांच्या अंगावर रोमांच उठत. ते मनुष्यहत्येची कल्पना तरी कशी करणार? आपल्या खर्चाने स्वसंरक्षणासाठी कांही करण्याची कल्पनाही या व्यापाऱ्यांच्या मनास शिवत नव्हती. त्यांचें अहिंसेचें सूत्र सगळ्या जगानेच स्वीकारलें, तरच तें लाभदायक. शिवाजीला या सर्व गोष्टींचा चांगलाच उपयोग झाला.)

सुरतेची खडान् खडा माहिती मिळवून महाराजांनी आपली योजना आंखली. ही योजना अत्यंत धाडसी होती. राजगडापासून सुरत दीडशे कोस अंतरावर होतें. पुण्यापासून सुरतेपर्यंत मोगली सत्ता पसरलेली होती. या कानाचें त्या कानाला कळूं न देतां त्यांना सारा प्रवास ससैन्य संपवावयाचा होता. मार्गशीर्ष महिन्यांत आठ सहस्र निवडक घोडेस्वार बरोबर घेऊन शिवछत्रपतींनी राजगडाहून प्रस्थान केलें.

त्यांच्या समवेत सेनापति नेताजी पालकर होता. या वेळीं औरंगजेबाचा विख्यात सेनापति महाराणा जसवंतसिंग हा आपल्या हटेल, राजपूत सैन्यानिशी, कोंडाण्याला वेढा घालून बसला होता. त्याच्यापासून अवघ्या सहा मैल अंतरावरून महाराज ससैन्य गेले तरी त्याला तें कळलें नाही. महाराज प्रथम त्र्यंबकेश्वरला गेले. तेथे पौष शु. द्वादशीला (३१ डिसेंबर १६६३) उपाध्याय घेरगे शास्त्री यांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी महेश्वराची पूजा केली. मोगलांची वैभवश्री स्वराज्यांत आणण्यासाठी देवाधिदेव शंभु महादेवांचा ते जणूं आशीर्वादच घेत होते. तेथे त्यांनी अशी वार्ता उठविली की, आपण औरंगाबादेला जात आहोंत. औरंगाबाद येथे या वार्ता पोंचल्या. तेथे मोंगलांचा दक्षिणेचा प्रांतपति राहत होता. त्याने प्रतिकाराची सर्व सिद्धता केली. पण महाराजांना तेथे जावयाचेंच नसल्याने प्रश्नच नव्हता. दिनांक ४ जानेवारी १६६४ ला ते घणदेवीला आले. हा सारा प्रवास अत्यंत गुप्तपणें चालू होता. कोणालाही त्यांच्या येण्याची चाहूल सुद्धा लागू शकली नाही. त्यांच्या प्रवासाचें वर्णन करतांना ॲबे कॅरे म्हणतो :—

‘ He did not travel except at night, in order to conceal his march and to avoid the heat. In the day he retired into the hidden places of the wood, which protected him from the heat of the sun. There his soldiers reposed at their ease, and the horses refreshed themselves in the rivers, the banks of which gave them abundance of forage, which cost the soldiers neither trouble nor danger. He was master of the plain and was soon at the gates of Surat, which did not dream in the least that it would have to guard itself from a sack.’ —(Shivaji the Great By Dr. Balkrishna Vol. I, Part II, page 230 ).

शिवछत्रपतींनी हा सारा प्रवास उष्णतेचा त्रास होऊं नये म्हणून रात्रीं केला. दिवसां ते दाट झाडींत राहत. तेथे त्यांच्या स्वारांना

व घोड्यांना पूर्ण विश्रांति मिळे. महाराज घणदेवीला येतांच तेथे एकदम पळापळीला प्रारंभ झाला. पण त्यांनी अशी वार्ता प्रसृत केली की आम्ही औरंगजेबाचेच सरदार असून या ठिकाणीं महाबतखानाच्या बोलावण्यावरून आलेले आहोंत, व येथून आम्ही अहमदाबादला जात असून, तेथून पट्टणचें बंड मोडण्यासाठी पुढे जाणें हें आमचें उद्दिष्ट आहे. मंगळवार दिनांक ५ जानेवारी १६६४ ला महाराजांनी सुरतेपासून अवघ्या सव्वा दोन कोसांवर मुक्काम केला. इनायतखानाला त्यांच्या आगमनाची वार्ता कळली, तेव्हा त्याला ती प्रथम खरीच वाटेना. व्हालकार्ड व्हर्सन याने या घटनांचा प्रत्यक्ष पाहून लिहिलेला वृत्तान्त महाराजांच्या हालचालीं-वर व सुरतेंत पोंचलेल्या अकस्मात् वार्तेने उडालेल्या गोंधळावर उत्कृष्ट प्रकाश पाडणारा आहे. तो पुढीलप्रमाणें :—

'In the year 1664, on the 5th January, about 9 a. m. the Mogul's Governor, "Enachat Chan" (Inayat Khan), received tidings in the town (Surat) from one of his sergeants who was quartered about two miles off, that a great army was on the march, the leader of which refused to give his name except as a servant of the Great Mogul, and that he intended to go to the town of Ahmedabad with 10,000 men. The sergeant however, found out from the troops that their General was said to be the free booter, Shivaji, though many of them refused to believe it. The Governor was not a little alarmed and ordered the bridges to be demolished. However, most of them were in bad repair and very dry and there were nowhere any guns for defence. He sent to the Dutch and English to entreat them to give him a helping hand in this danger. It appeared strange to us that a Governor, whose duty it was to preserve a town and protect the foreigners in it, should

himself ask help from foreigners. However, since our factories had only a force of 40 men, each factory took 70 to 80 Moors into its service for purposes of defence. When next day news came that the army was at the village of Utena, a mile and a half from Surat, the Governor sent one of his most important ministers to Shivaji to beg him, since he was the King's servant and, as he said, sent by "Amoran" or Duke "Mober Chan" to put down the tumult arisen in "Patan" not to approach this town because the inhabitants having evil suspicions of his intentions were taking to flight, to a fact which the Great Mogul would take ill. Shivaji takes no heed, keeps prisoner the Minister who had met him, on the way and suffers no answer to be returned. The Dutch also sent two servants in order to learn the condition of the army. These two were captured, but released in the evening. They returned to the factory without their weapons, and brought word that the leader was certainly the freebooter, Shivaji" —(Shivaji the Great—By Dr. Balkrishna Vol. I, Part II page 194).

'५ जानेवारी १६६४ ला सकाळीं नऊ वाजतां सुरतेच्या मोगल अधिकाऱ्याला, त्याच्या शिपायांनी असें येऊन सांगितलें की, येथून दोन मैलांवरून एक मोठें सैन्य जात असून त्याचा सेनापति स्वत:चें नांव सांगत नाही. आपण औरंगजेबाचे सरदार आहोंत, एवढेंच तो सांगतो. तो दहा सहस्र सैन्य घेऊन अहमदाबादेकडे जात असल्याचें बोलतो. या शिपायाने त्याच्या सैन्यांत फिरून शोध केला असतां तो सेनापति म्हणजे प्रसिद्ध लुटारू शिवाजीच आहे असें त्याला कळलें. त्याने हें इनायतखानाला सांगितलें तरी सुरतेंतील अनेकांना तें खरें वाटेना.

इनायतखान मात्र घाबरला. त्याने पूल वगैरे तोडून टाकावयास सांगितलें. ते असूनही उपयोग नव्हता. कारण ते फारच वाईट स्थितींत होते. शहराच्या संरक्षणासाठी बंदुका वगैरेही साहित्य नव्हतें. त्याने डच व इंग्रज वखारवाल्यांना या संकटांत स्वतःला साहाय्य करण्याविषयी विनविलें. या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटतें. ज्याच्यावर या नगराच्या संरक्षणाचा व तेथे व्यापाराच्या निमित्ताने राहणाऱ्या लोकांच्याही संरक्षणाचा खरा भार, त्याने परकीय लोकांजवळ आपल्या सरक्षणासाठी मदत मागावी, हें आश्चर्यकारकच नाही काय? या स्थितींत आमच्या वखारीत केवळ चाळीस लोक होते. या संकटांत संरक्षण व्हावें म्हणून ७० ते ८० देशी माणसें आम्ही आमच्या नोकरीस ठेवली. दुसऱ्या दिवशी अशी वार्ता आली की सुरतेपासून अवघ्या ४ मैलांवर आक्रमक येऊन पोंचला आहे. इनायतखानाने तो औरंगजेबाचाच सरदार आहे, अशा समजुतीने त्याच्याकडे आपला वकील पाठवला व असा निरोप पाठवला की, तुमच्या इतक्या जवळ येण्याने सुरतेंतील लोक अत्यंत घाबरलेले असून येथे पळापळीला आरंभ झालेला आहे. तरी तुम्ही शहरांत येऊ नये. तुमचें हें कृत्य जर बादशहाला कळलें तर त्याचा तुमच्यावर राग झाल्याशिवाय राहणार नाही. शिवाजीने या माणसालाच पकडून ठेवलें आणि कोणतेंही उत्तर पाठविलें नाही. डच वखारवाल्यांनी आपलीं दोन माणसें शोधासाठी पाठविलीं होतीं; त्यांनाही पकडण्यांत आलें होतें. पण पुढे त्यांचीं शस्त्रें काढून घेऊन त्यांना परत पाठवण्यांत आलें. त्यांनी येऊन तो निश्चित शिवाजीच असल्याचें सांगितलें.)

सुरतेंत शिवाजी हें नांव कळतांच एकदम पळापळीला आरंभ झाला. लूट म्हणजे काय असतें याचा सुरतेंतील लोकांनी सात वर्षांपूर्वी अनुभव घेतलेला होता. गुजराथेचा तत्कालीन प्रांताधिकारी शाहजादा मुरादबक्ष आपल्या भावाशीं लढून दिल्लीचें सिंहासन घेण्यासाठी दिल्लीला जात असतां, त्याने सुरतेची लूट केली होती. लोकांच्या ती चांगलीच स्मरणांत होती. महराजांनी

प्रत्यक्ष सुरतेंत प्रवेश करण्यापूर्वी इनायतखानाकडे आपला दूत पाठवून असा निरोप दिला की, ‘हाजी सय्यद बेग, बहिर्जी बोहरा व हाजी कासीम या तीन प्रसिद्ध श्रीमंत व्यापाऱ्यांना घेऊन सुरतेंतून घ्यावयाच्या दंडाचा आकडा ठरविण्यासाठी उद्या जातीने महाराजांना भेटावें; हें न झाल्यास सुरतेची लूट व जाळपोळ करणें आम्हांस क्रमप्राप्त ठरेल.’ पण या त्यांच्या निरोपाप्रमाणे कोणीही आला नाही. स्वतः शिवाजी महाराजांनी सुरतेबाहेर बऱ्हाणपूर द्वाराजवळ पूर्वेकडील बागेंत तळ दिला होता. त्यांचें सैन्य एका हातांत खड्ग व दुसऱ्या हातांत मशाली परजीत दिनांक ६ ला सुरतेंत घुसलें. सुभेदाराने व तेथील श्रीमंत व्यापाऱ्यांनी काय केलें असेल ? इनायतखानाने आपल्या एक सहस्र सैन्यासह पळून जाऊन किल्ल्यांत आश्रय घेतला. ज्या अत्यंत धनिक व्यापाऱ्यांनी त्याला भरपूर लांच दिली होती, त्यांनाच केवळ त्याने किल्ल्याच्या आंत घेतलें; व सारें शहर असहाय स्थितीत सोडून दिलें. या वेळीं ॲबिसिनियाचा एक वकील तेथील शहाकडून बादशहा औरंगजेबाला नजराणा देण्यासाठी तेथे आलेला होता. तो तेथील एका धर्मशाळेंत उतरलेला असून लवकरच दिल्लीला जाणार होता. शहरावरील या संकटांत प्रमुख अधिकारी असा पळून जात असतां, हा वकील स्वाभाविकच घाबरून किल्ल्याच्या दाराशीं आला, व त्याने आपल्यालाही आंत घेण्याविषयी इनायतखानाला प्रार्थना केली. पण त्याच्याजवळ इनायतखानाला देण्यासाठी पैसे नसल्यामुळे त्याला आंत घेण्यांत आलें नाही. तो पुन्हा पळत पळत आपल्या धर्मशाळेंत आला. महाराजांच्या सैनिकांनी हें संरक्षणशून्य नगर दिनांक ६ ते ९ जानेवारी असे चार दिवसपर्यंत सावकाशपणें लुटून व जाळून पोळून उद्ध्वस्त करून टाकलें. कुठेही पळून न जातां आपल्याच ठिकाणीं ठाण मांडून जर कोणी राहिले असतील तर ते केवळ डच व इंग्रज वखारवालेच होत. या वेळीं सर जॉर्ज ऑक्झेंडन हा इंग्रज वखारीचा मुख्य होता. त्याने मोठ्या धैर्याने वखारीचें संरक्षण करावयाचा निर्णय घेतला. लोकांच्यांत धैर्य

उत्पन्न व्हावें म्हणून, सुभेदार ससैन्य किल्ल्यांत पळून गेला असतां, या गोऱ्या व्यापाऱ्याने आपले दोनशे इंग्रज व पन्नास एतद्देशीय नोकर बरोबर घेऊन साऱ्या शहरांतून संचलन केलें. वस्तुत: इंग्रजांना पळून जातां येणें शक्य होतें. पण वखारी सोडून पळून जाण्याचा भ्याडपणा इंग्रज व डच या दोघांनीही दाखविला नाही. सर जॉर्ज ऑक्झेन्डननें आपल्या कौन्सिलची बैठक बोलावून वखार लढविण्याचा निश्चय केला. त्याच्याजवळ सहा तोफा व कांही बंदुका होत्या. आपल्या गलबतावरील खलाशी, व इतर लोक मिळून दोनशे दहा सशस्त्र लोक त्याने एकत्र केले. या इंग्रज वखारीच्या जवळच हाजी सय्यद बेग या श्रीमंत व्यापाऱ्याचा भक्कम वाडा होता. इंग्रजांनी आपल्या वखारीच्या भिंतीवर तोफा चढविल्या व चोहो बाजूचें आक्रमण रोखून ते उभे राहिले. मुख्य दरवाज्याच्या मागच्या बाजूस तोफा सुसज्ज ठेवून वखारींत जाण्याचा रस्ता त्यांनी अडवून धरला. तेवढ्या गडबडींतही अन्नपाण्याची जेवढी सामग्री त्यांना एकत्रित करतां आली, तेवढी त्यांनी एकत्र केली. कित्येकांनी शिसें गाळलें व उरलेल्यांनी त्याचे तुकडे पाडून गोळ्या तयार केल्या. या वखारीच्या एका बाजूस भव्य मंदिर व दुसऱ्या बाजूस मशीद होती. या दोन्ही जागा घेऊन बाहेरूनही इंग्रजांनी विशेष बंदोबस्त केला. या वेळेपर्यंत महाराजांच्या सैनिकांनी धडाधड वाडे पेटवावयास, आंतील संपत्ति लुटावयास, व चिरेबंदी वाडे भुईसपाट करावयास प्रारंभ केला. दोन हिंदु व्यापारी नदीपार होऊन, आपली संपत्ति घेऊन पळून जात होते. त्यांना मराठ्यांनी पकडलें. त्यांच्याजवळ तीस पिपें सोनें मिळालें. सुरतेच्या जकात घरावर आक्रमण करून सारी जकात महाराजांच्या पुढे नेण्यांत आली. तेथे इंग्रजांचाही माल पडला होता. तो मराठ्यांनी लुटला. धन न देणाऱ्या व्यापाऱ्यांना पकडून आसुडांनी बडवीत व भाल्यांनी टोचीत महाराजांच्यासमोर आणण्यांत येई, व हात तोडण्याच्या शिक्षेपर्यंत सारे दंडभेदाचे प्रयोग करून त्यांच्याजवळून धनराशि घेण्यांत येत. डचांच्या

वखारीजवळ बहिर्जी बोहऱ्याचा चिरेबंदी वाडा होता. हा ८० लक्षांचा मालक म्हणून गाजलेला होता. त्याचा वाडा लुटून तो भुईसपाट करण्यांत आला. तेथे चाळीस शेर वजनाचीं हिरे माणकें हातीं लागलीं. त्याशिवाय तेथे शिवछत्रपतींना चांगलीं टपोरीं, सारख्याच आकाराचीं व वजनाचीं अठ्ठावीस शेर मोत्यें मिळालीं. हाजी सय्यद बेगचाही वाडा असाच लुटण्यांत आला. तेथील धर्मशाळेंत उतरलेल्या ॲबिसिनियाच्या वकिलाने औरंगजेबासाठी म्हणून आणलेला नजराणा शिवाजी महाराजांनाच देऊन आपली सुटका करून घेतली. किल्ल्यावरून कोणत्याही प्रकारचा उपसर्ग पोहोचू नये म्हणून तेथे मराठा सैन्याची एक तुकडी हल्ला चढविण्यास गेली. किल्ल्यावरून प्रतिकारार्थ तोफा डागण्यांत आल्या-पण त्या तोफांनी शिवाजीमहाराजांचें कांही नुकसान होण्याऐवजीं शहराचीच नासधूस अधिक प्रमाणांत झाली. अँथेनी स्मिथ या नांवाचा एक इंग्रज वखारीकडे परत जात असतां त्याला शिवाजी-महाराजांच्या सैनिकांनी पकडलें. महाराजांना वखारवाल्यांशी प्रत्यक्ष लढण्यांत कालक्षेप करावयाचा नसला तरी धमकावणीने पैसे मिळाल्यास त्यांना हवेच होते. त्यांनी अँथेनी स्मिथला आपल्या स्वाराबरोबर इंग्रजांच्या वखारीत पाठवून तीन लक्ष रुपयांची मागणी केली. पण इंग्रजांनी महाराजांना असें कळविलें की, आम्ही व्यापारी असल्यामुळे आमच्याजवळ पैसा नाही. हवें तर आम्ही तुम्हांला मसाल्याचे पदार्थ पाठवूं शकतों. महाराजांना इंग्रजांच्या या निरोपांतील लबाडी स्पष्ट दिसत होती. पण ते औरंगजेबाच्या प्रजेला लुटावयाला आलेले होते; पाश्यात्य वखार-वाल्यांना नव्हे. त्यामुळे त्यांनी त्यांच्यावर केवळ धमक्यांचाच प्रयोग केला. प्रत्यक्ष लढण्याचा प्रसंगच येऊं दिला नाही. इंग्लिशांच्या वखारीकडे त्यांनी निकोलस कॅलोस्ट्रा ह्या नांवाचा एक ग्रीसचा रहिवासी पैशाची मागणी करण्याकरतां पाठविला. त्याने डचांना व इंग्रजांना भेटून असा निरोप सांगितला की, 'मला माझ्या घरांतून ओढून तुम्हांला व इंग्रजांना असा निरोप सांगण्याकरिता

सांगितलें आहे, की 'शहासुजा (औरंगजेबाचा सर्वांत धाकटा भाऊ) आता शिवाजीमहाराजाबरोबर राहत असून त्याने शिवाजीला सुरत शहर दिलें आहे. शिवाजीला सैन्याच्या खर्चाकरिता पैसा पाहिजे आहे. तुम्ही कांही रक्कम द्यावी. न दिल्यास तो सर्व शहर जाळून टाकील.' (शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्रमांक ९३८) डचांच्या वखारीच्या डायरेक्टरनें इंग्रजांप्रमाणेच महाराजांना असें उत्तर पाठविलें, की आम्ही व्यापारी लोक आपल्या जवळ पैसा ठेवीत नाही; चालत असेल तर कांही कापड व मसाल्याचा नजराणा पाठवू. वेंगुर्ल्याच्या वखारीला तुम्ही त्रास न देतां अद्यापपर्यंत स्नेहानें वागविलें आहे; तसेंच येथेही चालवावें. तुमच्या माहितीशिवाय कोणी आम्हांला त्रास देऊं पाहील, तर त्याच्या विरुद्ध बंदोबस्तासाठी आम्ही हुशारीनें आहोंत.

डचांच्या वखारीजवळ असलेलें वीरजी व्होरांचें घर जेव्हा पेटविण्यांत आलें, त्या वेळी डचांची वखार पेटण्याचा संभव निर्माण झाला होता, पण वाऱ्याने उलटी दिशा पत्करल्यामुळे त्यांच्यावरील तें संकट टळलें. हाजी बेगचें घर पेटविलें असतां इंग्रज वखारीवरही हीच आपत्ति कोसळली होती. पण तेही त्यांतून या कारणानेंच वांचले. इंग्रज वखारवाल्यांनी व विशेषत: सर जॉन ऑक्झेन्डनने या वेळी फारच बाणेदार वर्तन केलें. मराठे वखारीजवळ आले असतां त्याने बाहेर येऊन दोन तीनदा चढाई केली व त्यांचे दोन सैनिक व एक घोडा ठार करून दोन सैनिक पकडूनही नेले. शिवाजी महाराजांच्या धमकयाच्या निरोपाला त्याने मोठ्या बाणेदारपणें उत्तर दिलें. इंग्लिश पत्रव्यवहारांत लिहिलें आहे, 'मध्यंतरीं ॲंटनी स्मिथ स्वारीहून परत येत असतां त्याला कैद करून शिवाजीपुढे नेण्यांत आलें आणि तीनशे रुपये दंड घेऊन दुसऱ्या दिवशी आम्हाला धमकी देण्याकरिता पाठविण्यांत आलें. परंतु एका इंग्रजाला अडकवून ठेवणें, आमच्या तबेल्यांतून घोडा घेऊन जाणें, आणि जकात घरापुढील इंग्रजांचा माल लुटणें या गोष्टी शत्रुत्वाच्या द्योतक असल्यामुळे यापुढे

तुमच्यावर विश्वास न ठेवतां पुन्हा बोलणें करण्यास येईल त्याला आम्ही ठार मारूं असें प्रेसिडेंटने उलट कळविलें.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह पत्र क्रमांक ९७५)

सुरतेच्या समुद्रांत सुखरूप उभ्या असलेल्या इंग्रजांच्या जहाजांची लूट करण्यासाठी शिवाजी महाराजांचीं लढाऊ गलबतें येत आहेत, अशी वार्ता या वेळीं आल्यामुळे मात्र इंग्रज वखारवाले घाबरले होते. महाराजांनी हे वखारवाले सोडून साऱ्या शहरभर दिनांक ६ पासून जो लुटालुटीस प्रारंभ केला होता, त्यांतून कोणीही सुटलें नाही. शहराबाहेर ते स्वतः झाडाशीं बांधलेल्या एका जाड कापडाच्या छायेंत उभे होते. संपत्तीच्या व रत्नांच्या राशी त्यांच्यासमोर ओतल्या जात होत्या. पैसे न देणाऱ्या अनेक धनिकांना पकडून त्यांच्यासमोर कैद्यांची रांगच्या रांग उभी करण्यांत आली होती. आसुडाचे फटके, हात तोडणें इत्यादि शिक्षा भराभर देण्यांत येत होत्या. घडत असलेल्या प्रकारासंबंधी या गोष्टी प्रत्यक्ष पाहणाऱ्या लोकांनी लिहून ठेवलेली माहिती अत्यंत उद्‌बोधक आहे. पाश्चात्य लेखकांनी मानवतेच्या भूमिकेवरून महाराजांना दोष देण्याचाही प्रयत्न केला आहे. त्यांतील कांही परिच्छेद पुढीलप्रमाणे :—

'आमचा एक हेर शहरांत फिरून आला. त्याने लुटीची हालहवाल सांगितली. पांच सहा जणांच्या टोळ्या करून लुटणें, घरें पाडणें हें मराठ्यांचें काम चालू होतें. मोठी घरें सर्व पार नाश पावलीं. हेर शहराच्या बाहेर शिवाजीच्या छावणीपर्यंत गेला होता. शिवाजीच्या डोक्यावर विनकनातीचें फक्त एक पाल होतें. लोक लूट घेऊन एकसारखे त्याच्यापुढे ओतीत होते. सोनें व रुपें बाजूला काढून ठेवून बाकीचे जवळ उभे राहणाऱ्यांना तो लगेच वाटून टाकीत असे. छावणी हलणार किंवा कसें हें समजण्यास कांही मार्ग नव्हता. कारण एकसारखी दाटीच होती. स्मशानभूमीपासून शहाबेगमच्या बागेपर्यंत मराठा छावणी पसरली असून

एकही तंबू दिसत नव्हता. पुन्हा संध्याकाळीं लुटारूंची हालचाल व जाळपोळ जोरांत चालू झाल्याचें दिसलें.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्रमांक ९७८)

'सकाळीं निराधार झालेले लोक भटकतांना दिसले. जाळ चेतविण्याची युक्ति मराठ्यांनी अशी काढली की, तेल्यांच्या दुकानांतून तेल घेऊन तें भिंतींवर, दारांवर व खिडक्यांवर ओतून व तेलाच्या बाटल्या जमिनीवर उभ्या ठेवून ते त्यांना आग लावून देत.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र ९६९)

'शिवाजीची हालचाल समजून घेण्याकरिता एक शिपाई फकिराचा वेष घेऊन डचांना सांगून गेला होता. तो कोणालाही संशय न येतां फिरून आला. शिवाजी तंबूंत बसला नसून एका झाडाला एक कापड टांगून सूर्यकिरणांपासून त्याच्याकरिता आडोसा तयार केला होता. त्याच्यापुढे त्याच्या लोकांनी आणलेली लूट पाहून तीपैकी कांही स्वतःकरितां ठेवून बाकीची तो वाटून टाकी.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. ९६९)

स्मिथने शिवाजीबद्दल पुष्कळ माहिती दिली. 'शिवाजीचे लोक सांगतात त्यावरून ते १० हजार आहेत. दोन राजे येऊन मिळाल्यामुळे सैन्य पुष्कळच मोठें झालें असावें यांत संशय नाही. त्यांचे घोडे चांगलेच होते (हें आम्हीही प्रत्यक्ष पाहिलें होतें.) द्रव्यांच्या राशी पडल्या होत्या त्यावरून २०–२५ लाखांची तरी लूट शिवाजीला मिळाली असावी. शुक्रवारीं सकाळीं प्रत्येकजण दोन दोन पिशव्या घेतलेले असे ३००० हमाल आले होते. त्या पिशव्यांपैकीं कांही पिशव्या तर केवळ मोहरांनीच भरलेल्या होत्या. २८ शेर मोठे मोती होते. (४० शेर = ३७ पौंड वजनीं). हिरे, माणकें पुष्कळच होतीं. वीरजी व्होरा ८० लाखांचा मालक म्हणून नांवाजलेला होता, त्याच्याच घरांत त्यांना एवढें मिळालें. पैशाकरिता फटके, धमक्या, शिरच्छेद, हस्तच्छेद असे अनेक निर्दयपणाचे प्रकार तो करतो. आपण होऊन प्रामाणिकपणें सांगावयास

जाणाऱ्या एका व्यापाऱ्याजवळ पैसा नव्हता म्हणून त्याचा हात मोडून शिवाय त्याचें कापड जाळून त्याने त्याला हाकलून दिलें.'

— (शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. ९७७)

महाराजांच्या निर्दयपणाविषयीं त्यांना दोष देणाऱ्या एस्कालियट प्रभृति पाश्चात्य लेखकांनी आपापल्या देशांचे इतिहास तपासले तर त्यांना शिवछत्रपतींना दोष देण्याचें कारण उरणार नाही. दुसऱ्याच्या स्वातंत्र्यावर घाला घालून आपली धनतृष्णा शमविण्यासाठी अंगावर रोमांच उत्पन्न होतील, अशीं क्रूर कृत्यें इंग्रजांनीही या देशांत केलेलीं आहेत. शिवाय इतर पाश्चात्यांचाही इतिहास याहून वेगळा नाही. ज्या शत्रूच्या प्रदेशांत महाराज ही लूट करीत होते, त्या शत्रूने तर त्यांच्या प्रदेशावर याहूनही अधिक मोठें क्रौर्याचें व अत्याचाराचें थैमान चालविलेलें होतें. अशा स्थितींत शत्रूला समजेल अशा परिभाषेंत त्या प्रकारांचें उत्तर दिल्याशिवाय त्याच्या दुष्ट कृत्यांना महाराज तरी पायबंद कसा घालूं शकणार होते? त्यांचा लढा हा दुसऱ्यांच्या स्वातंत्र्याच्या अपहारासाठी नसून दुसऱ्यांनी बळाने दास्यांत ओढलेल्या आपल्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यासाठी होता. हें स्वातंत्र्य लढल्याशिवाय मिळणारें नव्हतें, त्याचे अपहारक म्हणून सुरतेच्या यवनांना दंड देणें त्यांना प्राप्तच होतें. पण तेथील जे हिंदु धनिक होते, तेही आपल्या राष्ट्राच्या मुक्ततेच्या कार्याला कोणत्याही प्रकारें साहाय्य न करतां उलट शत्रुपक्षाला साहाय्यभूत होऊन आपल्या धनकोशांनी यवनांचीच सत्ता बळकट करीत होते. त्यामुळे सहजासहजीं न मिळूं शकणारा त्यांचा पैसा हिसकावून घेऊन शिवछत्रपति त्यांच्या संबंधांतलें आवश्यक तें कर्तव्यच पार पाडीत होते. जर त्यांनी आसूड व खड्गाचें टोंक दाखविलें नसतें तर अन्य कोणत्याही उपायांनी त्यांच्या धर्मकार्याला सुद्धा आवश्यक तें धन त्यांना मिळूं शकणार नव्हतें. स्वदेशाचें स्वातंत्र्य संपादन करणें व स्वधर्माला स्वाभिमानाचें तेजस्वी जिणें प्राप्त करून देणें, हें जर उदात्त ध्येय

असेल, तर तें प्राप्त करून घेण्यासाठी विशिष्ट परिस्थितींत आवश्यक म्हणून पत्करण्यांत येणारे हे मार्ग अपरिहार्य म्हणून शेवटीं नैतिक, धर्म्य व समर्थनीयच ठरतात. म्हणून भारतीय राजनीतिशास्त्रज्ञांनीं ह्या भूमिकेवरून या गोष्टीचें समर्थन केलें आहे. शिवछत्रपतीनी या मार्गाचा अवलंब करतांना सुद्धा मानवतेच्या मूल्यांचें परिपालन केलें आहे असें आढळून येईल. त्याची कांहीं उदाहरणेंच आम्ही येथे देतों; व तीही आमच्या शब्दांत न देतां त्यांना नांवें ठेवणाऱ्या पाश्चात्य लेखकांच्याच शब्दांत देतो. सुरतेच्या या लुटींत स्त्रिया, मुलें, वृद्ध, फकीर, गरीब, मशिदी, दर्गे, अग्याऱ्या, धार्मिक वस्तु, व्यक्ति व धार्मिक वास्तु यांना कोठेंही स्वराज्य सैनिकांनी धक्का लावलेला नाही. मॉंमियर डी. येवेनॉट या समकालीन फ्रेंच प्रवाशाने लिहिलेलें पुढील वृत्त या दृष्टीनें पाहण्यासारखें आहे. तो लिहितो :—

'All the rest of the town was plundered except monastery of the Capuchins. When the plunderers were in front of their Convent, they passed by, and they had orders from their Chief to do likewise, because, on the evening of the very first day, father Ambrose who was their superior, moved with pity for the poor Christians inhabiting Sourat, went to see this Raja, to speak to him in their favour, and to beg him at least to do no violence to their persons. Sivagy had respect for him. He took him under his protection, and granted him what he wanted for the Christians.' —( Shivaji the Great – By Dr. Balkrishna Vol. I part II page No. 226–227 )

(सुरतमधील कॅप्यूसिन ख्रिश्चनांचें निवासस्थान सोडून सर्व नगर लुटण्यांत आलें होतें. लूट करणारे सैनिक या मठाजवळ आले व कोणताही उपद्रव न देतां शांतपणें तेथून निघून गेले. त्यांच्या नेत्याची त्यांना तशीच आज्ञा होती. कारण शिवाजी

आल्याच्या पहिल्याच दिवशीं या मठाचा प्रमुख फादर अँब्रास हा शिवाजी राजाकडे गेला व त्याने गरीब ख्रिश्चनांना व त्यांच्या या मठाला त्रास देऊं नये अशी महाराजांना प्रार्थना केली. महाराजांना त्याच्याविषयी आदर वाटला व त्यांनी त्याला संरक्षण देऊन त्याची इच्छा पूर्ण केली. दुसरें उदाहरण बर्नियरने याहीपेक्षा अधिक औदार्याचें दिलें आहे. तो म्हणतो :—

'He spared also the house of deceased Delale (Hindi dallal) or Gentile broker, of the Dutch, because assured that he had been very charitable while alive.'

—(वरील ग्रंथ पृ. २३२)

शिवाजी महाराजांनी डचांची दलाली करणाऱ्या एका दलालाच्या वाड्याला व त्याच्या कुटुंबीयांना कोणताही उपसर्ग दिला नाही. वस्तुत: तो या वेळीं जिवंत नव्हता. पण त्याने जिवंतपणीं गोरगरिबांची सेवा करून पुष्कळ दानधर्म केला म्हणून त्यांनी त्याच्या संबंधांत हें धोरण स्वीकारलें. टॅव्हरिनीअर या लेखकाने या दलालाचें नांव मोहनदास परेख असें दिलें आहे.

केवळ सद्गुणांवर लुब्ध होऊन छत्रपति शिवाजी महाराज सोडून दुसऱ्या कोणी या पद्धतीचें औदार्य दाखविलें आहे? कोणालाही असें दुसरें उदाहरण कोणत्याही जयशाली योद्ध्याच्या इतिहासांत दाखवून देतां यावयाचें नाही. तिसरें उदाहरण तर याहूनही अधिक आश्चर्यजनक आहे. एस्कालियट् आपल्या वृत्तान्तांत लिहितो :—

'Mr. Smith further tells us, that on Thursday there came a young fellow with some condition from the Governor which pleased Sevagee not at all, soe that hee asked the fellow wheather his master being now by him cooped up in his chamber, thought him a woman to accept such conditions. The fellow imediately returns, 'and we are not women; I have some what more to say to youe;" drawes his daggere

and runs full at Seavagee's breast; a fellow that stood by with a sworde redy drawn, strikes between him and Sevagee and strikes his hand almost of, soe that (it) hung but by a pece of flesh; the fellow haveing made his thrust at Sevagee with all his might, did not stop, but ran his bloody stumpp against Sevagees breast, and with (such) force (that) both Sevagee and he fell together, the blood being seen upon Sevagee, the noise run through the camp that hee was killed and the crye went, kill the prisoners. whereupon some were miserably hacked; but Sevagee haveing quitted himself and hee that stood by haveing doven the fellows scull, comand was given to stay the execution, and to bring the prisoners before him wich was immidiately done, and Sevagee according as it came in his minde caused them to cutt of this mans head, that mans right hand, both the hands of a third. It comes to Mr. Smiths turn, and his right hand being comanded to bee cutt of, hee cryed out in Indostani to Sevagee rather to cutt of his head, unto which end his hatt was taken of, but Sevagee stop execution and soe praised be God hee escaped.'

—(The works of Sir Thomos Browne Vol. 1 page 426 to 437.)

(गुरुवारीं सकाळीं सुभेदाराकडून तडजोडीचें बोलणें करण्यास आलेल्या तरुण माणसाला शिवाजी बोलला कीं, 'ह्या अटी मान्य करायला आम्हीं बायका आहोंत असें सुभेदाराला वाटलें कीं काय?—त्यावर—'आम्हीं पण बायका नाही; हें घे,—'असें उलट बोलून तो तरुण शिवाजीच्या अंगावर खंजीर घेऊन धावला. त्याच्या खंजिराचा हात वरच्यावर दुसऱ्याने छाटला असतांही तो त्या भरांत शिवाजीच्या अंगावर आदळून दोघेही कोलमडून पडले व शिवाजीच्या

अंगावर दिसणाऱ्या त्या खुनी माणसाच्या रक्तामुळे शिवाजी मेला अशी एकच हाकाटी होऊन सर्व कैद्यांचीं डोकीं मारावीं अशी हूल उठून कांही थोडे कैदी प्राणाला मुकलेच. पण तितक्यांत शिवाजीने कत्तल थांबविण्याचा हुकूम दिला, व कैद्यांना समोर आणून उभें केलें, आणि मर्जीप्रमाणे कोणाचे हात, पाय, डोकें तोडण्यास हुकूम देण्याचा सपाटा चालविला. जेव्हां स्मिथची पाळी आली, व त्याचा उजवा हात कापण्याची तयारीही झाली तेव्हां तो हिंदींत मोठ्याने ओरडला 'त्यापेक्षा माझें डोकेंच उडवा! – शिवाजीने तें मान्य करून त्याची टोपीही डोक्यावरून काढून ठेवली गेली. पण शिवाजीला काय वाटलें कोणास ठाऊक, त्याने एकाएकी कत्तल थांबवली व स्मिथ वांचला. तोंपर्यंत ४ डोकीं व २४ हात कापले गेले होते.)

तैमुरलंग, नादिरशहा यांसारख्या योद्धयांवर हे प्रसंग आले असतां त्यांनी काय केलें हें पाहिलें म्हणजे शिवछत्रपतींच्या उपर्युक्त वागणुकीचें महत्त्व ध्यानांत येतें. तैमुरलंग हिंदुस्थानांत आला त्या वेळी त्याच्याजवळ असणाऱ्या गुलामांची संख्या १ लक्ष होती. दिल्लीवरील स्वारींत त्यांचा उपद्रव होईल अशा नुसत्या कल्पनेने त्याने त्या सर्व लोकांचीं खांडोळी केलीं. नादिरशहाने जेव्हा दिल्लींत प्रवेश केला तेव्हां त्याच्या अत्याचारामुळे संतापून दिल्लीच्या कांही नागरिकांनी त्याच्या कांही शिपायांची खांडोळी केलीं. त्यामुळे चिडून जाऊन नादिरशहाने काय केलें असेल? फ्रेझर म्हणतो, की त्याने एक लक्ष पन्नास हजार लोकांचा संहार केला. हा आकडा फारच मोठा असला तरी तीस सहस्र लोकांचा संहार तिथे झाला या संबंधांत दुमत नाही. शिवाजी महाराजांनी, सैनिकांवर नव्हे तर प्रत्यक्ष त्यांच्या स्वतःवरच कपटी हत्येचा हा प्रयोग झाल्यावर संतापून जर साऱ्या सुरतेंतील लोकांना जरी नव्हे तरी पकडलेल्या कैद्यांना कंठस्नान घातलें असतें तरी त्यांना दोष द्यावयास जागा नव्हती. पण त्यांनी तसें केलें नाही, त्यांच्यावर निष्ठा असलेल्या त्यांच्या अंगरक्षकांनी व सैनिकांनी आपला थोडा फार हात चालविला असतां सावध होतांच त्यांनी ती गोष्ट सुद्धा थांबविली.

समकालीन इंग्रजी पत्रव्यवहारांतून इंग्रजांनी स्वतःचें शौर्य दाखविल्यामुळे भिऊन शिवाजीमहाराजांनी त्यांच्या वखारींना हात लावला नाही, असें म्हटलें आहे. पण या त्यांच्या फुशारकींत अर्थ नाही राजापूरची वखार खणून काढून ज्यांनी तेथे नव्वद सहस्र रुपयांची लूट नेली, इतकेंच नव्हे तर शत्रूशीं आंतून कारस्थान करणारे म्हणून ज्यांनी राजापूरच्या इंग्रज अधिकाऱ्यांना रायगडच्या तुरुगांत डांबून ठेवलें, ते शिवाजी महाराज आठ दहा सहस्र अश्व-स्वारांसह सुरतेच्या केवळ दोनशे लोक असलेल्या इंग्रज व डच वखारींना धुळीस मिळविण्याची इच्छा धरते तर हे मूठभर गोरे लोक त्यांचें काय करूं शकणार होते? इंग्रजी देशभक्ति व मर्दुमकी यांना योग्य तो सन्मान देणें जसें अवश्य आहे तसेंच त्यांचा अहं-कारीपणा एका मर्यादेंत असावा, म्हणून त्यासंबंधी स्पष्ट लिहणेंही आवश्यकच आहे. महाराजांना सुरतेच्या या लुटींत एक कोटी रुपयांचें जडजवाहीर मिळालें असें समकालीन पाश्चात्यांनी लिहून ठेविलें आहे. 'फॉरेन बायॉग्रफीज ऑफ शिवाजी'मध्ये महाराजांना सुरतेस मिळालेल्या संपत्तीचा पुढीलप्रमाणे निर्देश केला आहे.

It is believed at Surat that this Raja carried away in jewels gold, silver to the value of about thirty French millions, for in the house of one Bania, he found twenty two lbs. weight of strung pearls besides a great quantity of others that were not yet pearced. (F. B. S. pre. XXI)

(सुरतेच्या लोकांचा असा अंदाज आहे की शिवाजीने जवाहीर, सोनें, चांदी तीन फ्रेंच कोटि किंमतीची नेली. एका बनियाच्या घरांत बावीस पौंड वजनाचीं भोकें पाडलेलीं मोतीं त्यास सांपडलीं. यांशिवाय भोकें न पाडलेलीं मोतीं सांपडली तीं निराळींच.)

महाबतखानाचें सैन्य सुरतेवर येत आहे, अशी महाराजांना १० जानेवारीला वार्ता कळली. त्याबरोबर महाराजांनी पांचशे सैनिक मागे ठेवून सुरतेहून राजगडाकडे प्रयाण केलें. हे मागें ठेवलेले पांचशे सैनिकहि लवकरच त्यांना येऊन मिळाले. स्वराज्याच्या

धनकोशासाठी सुरतेहून आणलेलें हें अपरंपार द्रव्य योग्य वेळीं राजगडावर येऊन पोहोचलें. संतापून महाबतखान सुरतेला यावयास निघाला, तो महाराज निघून गेल्यावर आठ दिवसांनी दि. १७ जानेवारी १६६४ ला तेथे येऊन पोहोचला. मोगलांच्या वैभव-नगरीची उडालेली धूळदाण त्याने पाहिली. सुरतेचा भ्याड अधिकारी इनायतखान हा महाबतखान आल्यावर किल्ल्यांतून बाहेर पडला. त्याला पाहतांच सुरतेच्या त्या नागविलेल्या नागरिकांचा संताप इतका वाढला, की ते त्याला शिव्या देऊं लागले. इतकेंच नव्हे, तर लोकांनी त्यास शेणमार करावयासहि कमी केलें नाही. इनायतखानाच्या मुलाने या प्रकारामुळे चिडून बाणाने रस्त्यांत एका व्यापाऱ्याची हत्या केली. इंग्रज वखारीचा मुख्य सर जॉर्ज ऑक्झिडेन हा महाबतखानाला भेटावयास आला असतां खानाने त्याचा मोठा गौरव करून उंची पोशाख व उत्कृष्ट खड्ग व एक सुंदर घोडा शौर्याबद्दल पारितोषिक म्हणून दिला. पण सर जॉर्ज ऑक्झिड्डनने तें पारितोषिक साभार नाकारून आपल्या व्यापारी कंपनीसाठी जकातीची माफी असावी, एवढीच याचना केली. याचें नांव राष्ट्राभिमान!

महाराजांनी सुरतेवर जी स्वारी केली, ती तें केवळ धनाढ्य शहर होतें म्हणून नव्हे, तर औरंगजेबाच्या अत्याचारांचा सूड म्हणूनच केली. त्यांचेच उद्गार समकालीन पाश्चात्य लेखकांनी, प्रत्यक्ष महाराजांशीं संवाद झाला असता त्याचें वृत्त म्हणून जे लिहून ठेवले आहेत, ते या गोष्टीची साक्ष द्यावयास पुरेसे आहेत. इस्कालियट्च्या वृत्तान्तांत म्हटलें आहे :—

'Sevagee told that he was not come to doe any personall hurts to the English or other merchants, but only to revenge himself of OramZeb— (the great Mogol), because hee had invaded his country, had killed some of his relations.

—( The Works of Sir Thomas Browne Vol. 1)

(शिवाजीने असें सांगितलें, की इंग्रज अथवा अन्य व्यापाऱ्यांना त्रास देणें हा आपला उद्देश नसून औरंगजेबाने आपल्या प्रदेशाची जी नासाडी केली, व आपल्या माणसांना जें ठार मारलें, त्याचा सूड घेणें हा उद्देश आहे.)

इव्हरसनच्या वृत्तान्तांत शिवाजीच्या तोंडचे सुरत सोडतांनाचे म्हणून जे उद्‌गार दिले आहेत ते महाराजांच्या मनांत औरंगजेबासंबंधाने किती राग होता याचे पूर्ण प्रातिनिधिक आहेत. ते असे :—

I have long wished to pull Aurangzeb's beard and now my wish is fullfilled for the rich and beautiful town of Surat has been called by the Mogul the king's or Mogul's beard by reason of its charm and grace.

('मी औरंगजेबाची दाढी ओढून आज माझी पुष्कळ दिवसांची इच्छा पूर्ण केली आहे, असें शिवाजीने म्हणण्याचें कारण हें होतें की, मोगली वैभवाच्या रुबाबदारपणाचा जो आविष्कार सुरतेंत दृष्टोत्पत्तीस येत होता, त्यामुळे या शहराला मुसलमान लोक बादशाहाच्या दाढीची उपमा देत असत.)

केवळ लुटीसाठी म्हणून नव्हे तर औरंगजेबाचा सूड म्हणूनच शिवरायांनी सुरत जाळून टाकलें, असें इंग्लिश वखारीचा मुख्य सर जॉर्ज ऑक्झिडेन यानेही म्हटलें आहे. तो आपल्या वृत्तान्तांत लिहितो :—

The greatest part of the towne lyes now in ashes; for his designe was not altogether riches but a revenge upon this king. —(Factory Records Surat Vol. 86)

(या शहराचा बराच भाग जाळून टाकलेला आहे. कारण लूट मिळविणें हा शिवाजीचा उद्देश नसून औरंगजेबाचा सूड घेणें हा त्याचा खरा उद्देश होता.)

महाराजांचा हा उद्देश पूर्णपणें सफल झाला. बादशहा औरंगजेब नुकताच काश्मीरहून परतला होता. जातांना त्याने शाहिस्तेखानाच्या पराभवाची व विटंबनेची वार्ता ऐकून शिवाजी महाराजांना चिरडून टाकण्याची मनाशीं प्रतिज्ञा केली होती. पण खानाच्या विटंबनेपेक्षाही सुरतेची चपराक त्याच्या वर्मी झोंबली. विलक्षण अपकीर्तीच्या कल्पनेने त्याला धक्का बसला. एकंदरींत त्या वर्षीची काश्मीर सहल बादशहाला अतिशय महाग पडली, यांत शंका नाही.



प्रकरण दुसरें

## जयसिंगाची स्वारी

शिवाजी महाराजांनी सुरत शहर लुटून औरंगजेबाचा स्वराज्यावर जो अत्याचार चालू होता त्याचा सूड घेतला. याचा उल्लेख मागच्या प्रकरणांत केलाच आहे. मिळालेली लूट घेऊन महाराज राजगडावर आले तोंच त्यांना एक अत्यंत अशुभ वार्ता कळली. ती म्हणजे त्यांचें पितृछत्र हरपलें ही होय. महाराजांचे वडील शहाजी राजे यांचा हिंदवी स्वराज्याच्या उभारणींत केवढा महत्त्वाचा भाग होता याचा उल्लेख प्रस्तुत ग्रंथाच्या प्रथम भागांत सविस्तरपणें केलेला आहे. हिंदवी स्वराज्याचे सारे प्रयत्न विफल झाले तरी शहाजीराजांनी आपल्या या 'देवाचें देणें' असलेल्या पुत्रास त्याच्या वयाच्या बाराव्या वर्षापासूनच या कार्यासाठी सर्वतोपरी साहाय्य केलें. शहाजी राजांच्या मुळेच कान्होजी जेध्यांच्या सारखीं नररत्नें शिवछत्रपतींना मिळालीं. राजे शहाजी दूर बेंगरूळला राहून आपल्या या पुत्राचें कौतुक करीत असत. अशा

या पित्याच्या निधनाचा महाराजांना केवढा धक्का जाणवला असेल !

कर्नाटकांत होदिगेरे येथे शहाजी राजांचा तळ पडला असतां मृगया करण्यासाठी म्हणून ते आपल्या हातांत भाला घेऊन जवळच्या अरण्यांत शिरले. सावजाचा पाठलाग करीत असतां महाराज शहाजी असावध होते. त्यांचा घोडा वेगांत असता, त्याचा पाय रानवेलीच्या जाळींत अडकला व घोडा आणि स्वार दोघेही फेकले गेले. राजे खालीं पडतांच मूर्च्छित झाले, व त्याच अवस्थेंत त्यांचें प्राणोत्क्रमण झालें. त्यांचे धाकटे पुत्र एकोजी उपाख्य व्यंकोजी राजे जवळ होते. हे महाराजांचे सावत्र बंधु. त्यांनी सर्व क्रिया-कर्मांतरें केली. शहाजी राजे यांची समाधि होदिगेरे येथे आहे.

माघ शु. ५ शके १५८५, दि. २३ जानेवारी १६६४ हा शहाजी राजांचा निधनदिन होय. ही दुर्दैवी वार्ता महाराजांना राजगडावर कळतांच त्यांनी फार शोक केला. सती जिजाबाईनी आपला हा जीवन सहचर गेल्याची वार्ता ऐकतांच भारतीय धर्माप्रमाणे सती जाण्याचें ठरविलें. आई म्हणजे महाराजांचें काय नव्हतें? त्यांनी तिच्या कंठास मिठी मारून आपल्या अश्रूच्या सरींनी तिचे पाय भिजवून टाकले व पितृछत्र गेलें तरी आपलें मातृछत्र जाऊं दिलें नाही. महाराजांनी शहाजी राजांच्या स्मरणार्थ विपुल दान-धर्म केला. त्यांनी शहाजीराजांसंबंधीं जे उद्‌गार काढले त्यांचा निर्देश करतांना सभासद म्हणतो : ‘मजसारख्या पुत्राचा पराक्रम महाराज पहाते तरी उत्तम होते. आपण आपला पुरुषार्थ कोणास दाखवावा? मागे अफजलखान मारिला व शास्ताखानास शास्ति केली, पराभवाते पावविला; कितेक गड घेतले, व शहरें मारिली आणि पागा शिलेदार, लष्कर चाळीस हजार केलें. असे पराक्रमाचे वर्तमान ऐकून महाराज संतुष्ट जाले. समाधान पत्रें आपणास वरचेवर येत होतीं, तैशीच अलंकार पत्रें पाठवीत होते. या उपरि त्यामागें आपणास आता कोणी वडील नाही.–’ (सभासद बखर पृष्ठ ६५)

शिवछत्रपतींसारख्या राष्ट्रकार्यार्थ जीवन वाहिलेल्या पुरुषांना कौटुंबिक दुःख केवढेंही झालें तरी त्यांत अधिक वेळ गुंतून राहतां येणें शक्य नसतें. या वेळीं दक्षिणेंत शाहजादा मोअज्झम हा सुभेदार असल्याचा निर्देश मागच्या प्रकरणांत केलेलाच आहे. हा सुभेदार चैनी व सुखलोलुप असल्यामुळे त्याचा सगळा वेळ विलासांतच जात असे. त्याचें सेनापतित्व महाराजा जसवंतसिंगाकडे होतें, व शाहिस्तेखान प्रकरणांत तो शिवछत्रपतींना मिळाला असल्याची अपकीर्ति पसरल्यामुळे या वेळीं त्याने सिंहगडच्या वेढ्याचें काम नेटाने चालविलें होतें. त्याच्या शेजारून महाराजांचें सैन्य सुरतेला गेलें तरी त्याची त्याला दाद नव्हती, याचा उल्लेख मागच्या प्रकरणांत केलेलाच आहे. असा हा सावध (!) सेनानी वेढा घालून तो जिंकण्याची इच्छा करीत होता. सहा महिने तो वेढा घालून बसला, परंतु त्याचा कांही उपयोग झाला नाही. शेवटीं अविचाराने दि. १४ एप्रिल १६६४ ला त्याने सर्व सिद्धतेनिशी गडावर निकराची चढाई केली. पण सिंहगडावर असलेल्या महाराजांच्या सैनिकांनी ती चढाई मोडून काढली. त्याच वेळीं अचानकपणें खालून एक सुरूंग उडून त्याने जसवंतसिंगाचा सारा बारूदखाना पेटविला व त्या प्रलयांत शेंकडो सैनिकांचा नाश झाला. पराभव झाल्यावर एकमेकांवर त्याचें दायित्व ढकलून भांडत बसणें हा मनुष्यस्वभावच आहे. जसवंतसिंगाचा मेव्हणा भावसिंग हाडा व जसवंतसिंग हे दोघेही परस्परांशीं कोणामुळे पराभव झाला, या मुद्द्यावर भांडत बसले व शेवटीं तें भांडण विकोपाला जाऊन दि. २८ मे १६६४ ला दोघेही वेढा उठवून व सैन्य घेऊन औरंगाबादेला निघून गेले.

महाराजांनी दक्षिणच्या सुभेदाराची व त्याच्या सेनापतींची ही अवस्था पाहून मोगली प्रदेशांवर एकामागून एक जोराचे आघात करावयास प्रारंभ केला. त्यांचा सेनानी नेताजी पालकर याने मोंगली प्रदेशांत धुमाकूळ घातला. स्वतः महाराजांनी भर पावसाळ्यांत अहमदनगर दुसऱ्यांदा लुटून धुऊन काढलें. महाराजांचा

नौदलप्रमुख दर्यासारंग याने समुद्रावरही महाराजांच्या नांवाचा धाक उत्पन्न केला. महाराजांचें सागरी बळ या वेळीं शत्रूंना कसें भयप्रद वाटत होतें, हें डचांच्या पत्रव्यवहारावरून कळून येतें. दि. ३ ऑगस्ट १६६४ च्या पत्रांत असें म्हटलें आहे कीं 'शिवाजीजवळ गलबतांची संख्या भरपूर असल्यामुळे तो सहज रात्रीं छापा घालून गलबत घेईल. म्हणून जमिनीपेक्षा पाण्यावरच त्याचें भय अधिक बाळगलें पाहिजे.'

याप्रमाणे महाराज मोगली प्रदेशांची दाणादाण उडवीत असतां दक्षिणेंतील मोंगलांचे सरदार मात्र आपण शिवाजीला धाक उत्पन्न केल्याच्या खोटचा वार्ता औरंगजेबाला कळवीत होते. या सरदारांची थट्टा करणारें एक पत्र नीलप्रभु यांच्या हस्तें महाराजांनी मोगल अधिकाऱ्यांना पाठविलें. ते पुढीलप्रमाणे :—

'आज तीन वर्षे बादशहाचे मोठमोठे सल्लागार व योद्धे आमचा प्रदेश काबीज करण्यासाठी चालून येत आहेत, हें तुम्हां सर्वांस माहीत आहेच. बादशहा हुकूम फर्मावितात 'शिवाजीचे किल्ले व मुलूख काबीज करा.' तुम्ही जबाब पाठवितां आम्ही लौकरच काबीज करितों.' आमच्या ह्या कठीण प्रदेशांत नुसता कल्पनेचा घोडा सुद्धां नाचविणें कठीण आहे. मग तो प्रदेश काबीज करण्याची गोष्ट कशाला! भलत्याच खोटचा बातम्या बादशहाकडे लिहून पाठविण्यास तुम्हांला लाज कशी वाटत नाही! कल्याणी व बेदरचे किल्ले उघडचा मैदानांत होते, ते तुम्ही काबीज केले. आमचा प्रदेश अवघड व डोंगराळ आहे. नदीनाले उतरून जाण्यास वाट नाही. अत्यंत मजबूत असे माझे साठ किल्ले तयार आहेत. पैकी कांही समुद्रकिनाऱ्यालगत आहेत. बिचारा अफजलखान जावळीवर फौज घेऊन आला आणि नाहक मृत्युमुखीं पडला, हा सर्व प्रकार बादशहास कां कळवीत नाही! अमीरूअुमराव शाइस्तेखान आमच्या या गगनचुंबी डोंगरास व पातालास नेणाऱ्या खोऱ्यांत तीन वर्षे सतत खपत होता. 'शिवाजीचा पाडाव करून लौकरच त्याला काबीज करतों' असें बादशहाकडे लिहून थकला. ह्या खोडसाळ वर्तनाचा परिणाम

त्याला भोंवला. तो परिणाम सूर्यासारखा स्वच्छ सर्वांच्या डोळ्यां-समोर आहे. आपल्या भूमीचें संरक्षण करणें माझें कर्तव्य आहे आणि तुम्ही बादशहाकडे कितीही खोट्या बातम्या लिहून पाठविल्या तरी मी आपलें कर्तव्य बजावण्यास कधी चुकणार नाही.' (शिव-कालीन पत्रसारसंग्रह पत्र क्र. ९८२)

महाराजांच्या घणाघाती आघातासमोर व विशेषत: कोंकणांत विजापूरकरांचें त्यांनी जे प्रदेश घेतले होते त्यामुळे विजापूरचा सुलतान त्यांच्यावर अगदी चिडून गेला होता. कोकणांतील आपल्या अधिकाऱ्यांना एकत्रित करून शिवाजी महाराजांविरुद्ध चढाई करावी, म्हणून त्याने महंमद इकलासखान या नांवाच्या सरदारास त्यांच्यावर पाठविलें. त्याचा फारसा उपयोग झाला नाही, म्हणून सिद्दी अजीझखान याची निवड झाली. पण तो दिनांक १० जून १६६४ ला एकाएकीं मृत्यु पावला. शिवाजीने त्याला विषप्रयोग केला अशी वार्ता प्रसृत झाली होती. त्यामुळे अली अदिलशहाने फार मोठी सिद्धता करून खवासखान नांवाच्या नामवंत सेनानीला तळ कोकणांत पाठविण्याचा निर्णय घेतला. त्याच्या समवेत शेख मिरान, सिद्दी सरवर इत्यादि नामवंत यवन योद्धे असून भोसल्यांचे हाडवैरी बाजीराजे घोरपडे हेही त्यांत होते. बाकी सर्व सेनानी खवासखानाबरोबरच निघाले. बाजीराजे घोरपडे हे त्या वेळीं मुधोळला होते. ते मागाहून सैन्यानिशीं खवासखानाला मिळणार होते. खवासखान शाही आज्ञा होतांच सैन्य घेऊन कोकणांत कुडा-ळच्या जवळ असलेल्या डोंगरी भागांत उतरला व एका अडचणीच्या जागीं त्याने आपला तळ दिला. महाराजांना हें कळतांच तेही सैन्यासह तडक निघाले. त्यांना बाजी घोरपडे मुधोळला असल्याचें कळलें; व प्रथम घोरपड्यांना शासन करावयाचा त्यांनी निर्णय घेतला.

बाजी घोरपडे हे वस्तुत: भोसल्यांच्याच वंशाचे, व रक्तमांसाचे होते. भोसले वंशाच्याच थोरल्या पातीला घोरपडे हें नांव कां व कसें मिळालें याचें विवरण आम्ही प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागांत

केलें आहे. असें असूनही घोरपडे हे भोसल्यांचे मनापासून वैर करीत असत. त्यांनी शहाजी महाराजांशींही दुष्टाव्याचें वर्तन केलें होतें व शिवाजी महाराजांशीं तर त्यांचा उभा दावाच होता. कर्नाटकांत मुस्ताफाखानानें वंचना करून शहाजी राजांवर जो अनपेक्षित छापा घातला, त्यांत बाजी घोरपडे अग्रेसर होते. त्या वेळच्या युद्धांत राजे शहाजी मूर्च्छित होऊन पडले असतां बाजीराजे घोरपडे यांनीच त्यांच्या पायांत लोहशृंखला अडकवल्या. शहाजी राजांचा या घोरपड्यांवर तेव्हांपासूनच राग होता. अफजलखानानें विजापूरच्या राजरस्त्यांतून त्यांना अपमानित अवस्थेंत मिरविलें म्हणून त्याच्यावर जसा शहाजी राजांचा राग होता, तसाच वंचनेंत अग्रेसर राहिले म्हणून बाजी राजे यांच्यावरही त्यांचा राग होता. शिवछत्रपतींनी अफजलखानाचें उदर विदीर्ण करून आपल्या वडिलांचें एक ऋण फेडलें होतें. दुसरेंही फेडावें अशी राजे शहाजी यांची महाराजांना आज्ञा होती.

महाराजांनी वडिलांच्या अपमानाचा सूड घ्यावा म्हणून अकस्मात् मुधोळवर चाल केली. मोठें भयंकर रणकंदन होऊन त्यांत त्यांनी बाजी घोरपडे यांना तर द्वंद्वयुद्धांत ठार मारलेंच पण त्या रात्रीं मुधोळांत असणारे घोरपडे वंशीय ठार करून त्यांनी मुधोळ उद्ध्वस्त करून टाकलें. वस्तुतः त्या वेळीं घोरपड्यांचा निर्वंशच व्हावयाचा. पण घोरपडे यांची पत्नी आपल्या मुलांना घेऊन त्या वेळीं माहेरीं गेली असल्यामुळे वंश तेवढा वांचला. पित्याच्या अपमानाचा सूड घेऊन शत्रूच्या रक्तानें पितृतर्पण करण्याची चाल भारतांत महापराक्रमी भार्गवरामापासून आहे. महाराजांनी तिचेंच अनुकरण केलें व विश्वासघातकी धर्मद्रोह्यांना याप्रमाणे उग्र शासन केलें.

यानंतर त्यांनी कुडाळ प्रांतांत खवासखानाचा पराभव करून त्याला उधळून लावलें, व वाडीकर सावंतांनाही उग्र शासन करावयास ते प्रवृत्त झाले. वाडीकर सावंत हेही घोरपड्यांच्या प्रमाणेच भोसल्यांच्या कुळांतले होते. महाराजांनी आपल्या पराक्रमाची

चुणूक दाखवितांच ते घाबरून शरण आले. त्यांना स्वराज्यांत समाविष्ट करून घेण्यांत आलें. मातुःश्री जिजाबाईंना महाराजांनी या संबंधांत पाठविलेल्या एका विस्तृत पत्रांत या सर्व घटनांचें उत्कृष्ट चित्रण आहे. तें स्वतः महाराजांच्याच शब्दांत असल्यामुळे त्या पत्राचें महत्त्व विशेष आहे. तें पत्र पुढीलप्रमाणे :—

श. १५८६
स. १६६४–६५

'वडिलांचे शेवेसी शिवाजी राजे याणी चरणावरी मस्तक ठेवून विज्ञापना ऐसी जे. बाजी घोरपडे मुधोळकर याणी स्वधर्मसाधणता सोडून यवन दुष्ट तुरूक हाचे कृत्यास अनुकूल होऊन दगाबाजीचे हुनरे करून विज्यापुरास येणे घडले. तेथे गुजरला प्रकार निर्वाणचा तो तुम्ही समजला आहां. तोहि प्रसंग श्री तुमचा मनोरथ सिद्धीस नेणें व स्वधर्म राज्यवृद्धि करणे म्हणोन पार पडला. साप्रंत पुन्हां दुर्बुद्धि धरून खवासखान विजापुराहून फौजेसुद्धा रवाना झाले. त्यांची हरोळी बाजी याणी व लखम सावंत व खेम सावंत याणी प्रतिज्ञापूर्वक जत(न) करून सेनासमवेत निघाले. ते तिकडे येत आहेत. तुम्हास श्री सांब व अंबे यश देणार पूर्ण आहे. ये समयीं त्यांचे वेढे घ्यावे. आण आमचे मनोदय सेवटास नेणार तुम्ही सुपुत निर्माण आहां, म्हणोन आज्ञा केली. त्यास बाजी घोरपडे पुढे मुधोळास घरीं कांही जमेतीनसी आले. हें कळतांच फौजेनिशी आम्ही तेच क्षणी स्वार केली. त्यांचा प्रांत लुटून तळपट जान करून ठाणियास जेरदस्तींत आणिले. हे जाणोन त्यांणीं सर्व जमेतीनसी लढाईस निघाले. युद्ध तारफेचें जहालें. बाजी मारिले व कितेक खासे लोक पडले. या प्रकारे तो प्रसंग करून लुटून फस्त केले. मत्ता बहूत लागली. पुन्हां आपलेसे करून मुधोळ पंचमहाल आपलासा करून स्थापिले. यानंतर खवासखान पुढे आला पाहून त्याजवर चाल केली. ते मारीत लुटीत गर्दी केली. खटा होऊन पळूं लागले; ते विजापुरास

पावविले. यानंतर सावंताचा निशाच करावा म्हणोन त्या प्रांतांत शिरलों. तेहि येऊन पावले. मुलूख तळपट करीत चाललों. ठाणी, किले तमाम घेतले. सावंत दमोन गेले. गोमंतकराचा आश्रय निघोन फोंड्याचा किल्ला भांडू लागला. त्यास सुरंग लावून बुरूज उडवून बळाने घेतला. याप्रमाणें एकंदर तें संवस्थान घेतलें. यानंतर फिरंगी याजवर शह देऊन त्याचा प्रांत मारीत चाललो. त्याणी तह करून तोफा नजराणा पाठविला. सावंत यास तेथे दम न निघे. टोपीकार यास धार न पडे. त्याजवरून पितांबर शेणवी कारभारी वकील पाठविले. आपण सावंत भोसले कुळीचे आपले पुत्र आहों. सर्फराज करून देसगतीच्या वतनाची सेवा घेऊन प्रांताचा ठराव निमे ऐवज फौजेनिशी चाकरी करितो; त्यास निमे ऐवज व निमे ऐवज सरकारांत वसूल घ्यावा ऐसे करून घेतले. त्याप्रमाणें स्वामीचें पुण्यप्रतापें करून आज्ञेप्रमाणें घडून आलें. तें कळावें म्हणून लि॥ हे विज्ञापना. मोर्तब.'

—(शिवकालीन पत्र-सारसंग्रह)

यानंतर महाराजांनी विजापूरकरांचा फोंडा किल्ला तेथील किल्लेदार महाबतखान याचा पराभव करून घेतला. याच गडाचे दुसरें नांव मर्दनगड असें होतें. तेथील गडकरी अतिशय शौर्याने लढला. महाराजांनी त्याचा सन्मान करून त्याची विजापुराकडे पाठवणी केली. तेथून महाराज मालवणला आले व त्यांनी तेथे सिंधुदुर्ग बांधला. हा सिंधुदुर्ग महाराजांच्या प्रतिभेची व वैभवाची साक्ष देत आजही उभा आहे. सुरतेच्या लुटींत मिळविलेला सारा धनकोश महाराजांनी येथे ओतला. सिंधुदुर्गांत आजही महाराजांचें हस्ततल चिन्ह व पदचिन्ह पाहावयास सांपडतें. सिंधुदुर्गामागोमाग आदिलशाही सीमेंतील खुदावंतपूर व त्या मागोमाग हुबळी महाराजांनी लुटली. हुबळी हें श्रीमंत नगर होतें. तेथे त्यांना बराच लाभ झाला. तेथून तळ कोंकणांत जाऊन त्यांनी वेंगुर्ल्यावर स्वारी केली. व तेथील पाश्चात्यांच्या वखारीही त्यांनी लुटल्या. सरकारांनी असें म्हटलें आहे: 'या वेळच्या शिवाजीच्या हालचाली

इतक्या जलद व यशस्वी होत होत्या की, त्यायोगे त्याचा दरारा फारच वाढला. त्याच्यांत कांही दैवी शक्ति आहे, कुठेही जाणें व कोणताही प्रांत सर करणें त्याला अशक्य नाही. किंबहुना अनेक रूपांनी, अनेक ठिकाणीं तो एकाच वेळीं हजर असतो, अशी सर्वत्र समजूत पसरलेली होती. द्रव्य, सत्ता, मनुष्यबळ, फौज व पराक्रम या सर्व बाजूंनी मराठ्यांचा या वेळीं सारखा उत्कर्षच होत होता.' --(शिवाजी व शिवकाल, पृ. ७७)

महाराजांचा धाक या वेळीं सर्व ठिकाणीं कसा बसला होता व त्यांच्यासंबंधीं चमत्कारिक अफवा सर्वत्र कशा पसरलेल्या होत्या याचें प्रतिबिंब सुरतेहून कारवारला गेलेल्या दिनांक २६ जून १६६४ च्या एका इंग्रजी पत्रांत उत्कृष्ट रीतीने पडलें आहे. तें असें : 'विलक्षण धाडसी असा दरोडेखोर म्हणून शिवाजीची इतकी ख्याति झाली आहे की लोकांनी त्याचें शरीर हवामय असून त्याला पंखही आहेत असें उठविलें आहे. एरव्हीं तो एकाच वेळीं अनेक ठिकाणीं प्रकट होतो ह्या बातम्या शक्य तरी कशा होतात? आज तो एका ठिकाणीं आहे असें खात्रीलायक समजावें, तर एक दोन दिवसांत तो दुसऱ्या ठिकाणीं आहे असें कळतें, तर लगेच दूर दूर असलेल्या पांचसहा ठिकाणीं एकामागून एक अशा तऱ्हेने अप्रतिहतपणें लुटालूट व जाळपोळ करतांना तो आढळतो! यावरून त्याचें नांव सर्वतोमुखीं झालें असून त्याला भीमाचें (हर्क्युलिस) सामर्थ्य आहे असें लोक मानतात.' --(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. ९९६)

असो. शाहिस्तेखानाचा पराभव आणि सुरतेची लूट या दोन घटनांमुळे आपण ज्याला डोंगरांतील उंदीर म्हणतो, तो वनराज आहे व आता त्याची उपेक्षा केल्यास त्याच्या सामर्थ्यशील नखांचा आघात मोगलशाहीला प्राणघातक ठरेल याची बादशहा औरंगजेबाला पूर्ण कल्पना आली. या प्रकरणामुळे महाराजांच्या कर्तृत्वाच्या कीर्तिदुन्दुभीने जसे दिग्कोन दुमदुमविले त्याचप्रमाणे औरंगजेबाच्या अपकीर्तीलाही पारावार उरला नाही. या वर्षीची

त्याची काश्मीरसहल त्याला अत्यंत अपशकुनी ठरली. तो काश्मीरला जात असतां शाहिस्तेखानाच्या पराभवाची वार्ता त्याला कळली व काश्मीरहून परततांना लाहोरला पाय ठेवतो न ठेवतो तोंच सुरतेच्या वैभवश्रीच्या अपहरणाची वार्ता त्याच्या कानावर येऊन आदळली. तो संतापाने वेडा झाला. त्याने शिवाजीचा समूळ काटा काढून टाकावयाचा निश्चय केला. प्रथमतः स्वतः औरंगजेबच या कृत्यासाठी आपल्या सर्व सामर्थ्यानिशी दक्षिणेंत उतरणार अशी वार्ता सर्वत्र पसरली होती. डच रेकॉर्डमधील पुढील वर्णन पहा :—

'The following advice is received in matters of government. King Arangcha has returned from Casmir to Lahor and intends to distroy the rebel Shivaji entirely.'

—(15th Jan. 1664, P. 17)

'The great Mogol is somewhere in Dilly or Siasainabath (Shahjahanabad) and sends more troops to the Deacan everyday to destory the robber Sivaji and will come down there himself with his whole court. The new governer of Suratte is excepted within 8 or 10 days' —(23rd Sept. 1664 P. 37.)

—[ Shivaji the great - By Dr. Balkrishna Vol. I part II Page 233 ]

(बादशहा औरंगजेब काश्मीरहून लाहोरला परतला असून शिवाजीचा सर्वनाश करण्याची त्याची इच्छा आहे. बादशहा दिल्लीला किंवा शहाजहानाबादला असून दक्षिणेकडे अधिकाधिक सैन्य तो पाठवीत आहे. लुटारू शिवाजीला नष्ट करणें हा त्याचा उद्देश आहे. स्वत. औरंगजेब आपल्या सर्व सामर्थ्यानिशी शिवाजीला चिरडून टाकण्यासाठी येईल असा संभव आहे. आठ किंवा दहा दिवसांत सुरतेचा नवा सुभेदार येथे येऊन पोहोचेल.)

औरंगजेबाने शिवाजी महाराजांना चिरडून टाकण्याचा निर्णय घेण्याचीं पुढील कारणें होतीं :—

(१) शाहिस्तेखानाची विटंबना, मक्केच्या यात्रेचें प्रवेशद्वार असलेल्या सुरतेची लूट, अहमदनगरची लूट, मराठ्यांनी मोगलांच्या दक्षिण प्रांताची राजधानी असलेल्या औरंगाबादेच्या प्रवेशद्वारापर्यंत मारलेली धडक, पश्चिम समुद्रावरील मक्केच्या यात्रेकरूंचीं जहाजें लुटण्याचा त्यांचा विक्रम, शहाजादा मोअज्झम व महाराजा जसवंतसिंह यांची उडालेली त्रेधा यांनी औरंगजेबाची अपकीर्ति सर्वत्र पसरली होती.

(२) बादशहा औरंगजेब हा विलक्षण धर्मवेडा होता हें प्रसिद्धच आहे. मक्केच्या यात्रेकरूंचीं जहाजें लुटलीं जाणें ही गोष्ट त्याच्या मनाला अत्यंत चीड आणणारी ठरली. आपण दुसऱ्याच्या धर्माचा अपमान केला तरी दुसऱ्याला तसा अधिकार नाही अशी त्याची साळसूद समजूत असावी.

(३) शहाजी राजांच्या मृत्यूनंतर शिवाजी महाराज स्वत:ला राजा ही पदवी लावून आपल्या नांवाने नाणीं पाडूं लागले होते. हेंही औरंगजेबाच्या संतापाचें एक कारण म्हणून एल्फिन्स्टन व ओवेन (Owen) यांनी दिलें आहे.

(४) स्वतंत्र व सार्वभौम हिंदु सत्ता उत्पन्न झालेली पाहणें त्याच्या दृष्टीने मरणप्राय दु:खाचें होतें आणि त्यामुळे शिवाजीला नष्ट करणें त्याला आपलें कर्तव्य वाटावें यांत कांही आश्चर्य नव्हतें. पण शिवाजीचा पराभव करणें ही सामान्य गोष्ट नव्हती. अफझलखानासारखे प्रथम श्रेणीचे सेनानी महाराजांनी यमसदनाला पाठवले होते व शाहिस्तेखानासारख्यांची त्यांनी फटफजिती केली होती. त्यामुळे यावनी विजयोन्मादाला दक्षिणेंत मूठमाती देण्यासाठीच शिवाजीचा प्रादुर्भाव झाला आहे अशी सर्वसामान्य जनतेची धारणा होऊं लागली होती. त्यामुळे त्याने आपल्या पदरच्या अमोघ सामर्थ्याची शिवाजीवर योजना करावयाचें ठरविलें. तें त्याच्याजवळचें महान् सामर्थ्य म्हणजे त्याचा महान् सेनानी मिर्झा राजा जयसिंग हा होय.

मिर्झा राजा जयसिंग हा कछवा घराण्यांतील विख्यात सूर्यवंशी राजपूत होता. हें घराणें रामचंद्रांचा ज्येष्ठ पुत्र जो कुश त्याच्यापासून चालत आलें आहे अशी समजूत होती. वयाच्या अवघ्या बाराव्या वर्षी मोगल बादशहा जहांगीरच्या सैन्यांत मिर्झा राजा जयसिंगाने नोकरी पत्करली. तेव्हापासून स्वपराक्रमाने तो वाढतच गेला. मध्य आशियापासून तर दक्षिणेंत विजापूरपर्यंत व पश्चिमेस कंदाहारपासून तर पूर्वेस मोंघीरपर्यंत अनेक भयंकर युद्धांत त्याचें खड्ग तळपलें होतें. बादशहा शहाजहानच्या काळांत त्याच्या कार्यक्षमतेने त्याला मोगलांच्या राजसभेंत शहाजाद्यांच्या बरोबरीचा मान मिळून तो अग्रगण्य सामंत समजला गेला होता. हिंदुस्थान बाहेरच्या मोगलांच्या स्वाऱ्यांत तो अग्रगण्य सेनानी असे. त्याच्या शौर्यापेक्षाही राजनीतिपटुत्वाने तो अधिक प्रसिद्ध होता. कोणत्याही बिकट व नाजूक प्रसंगीं त्याची योजना होत असे. राजपूत असूनही सहिष्णु, धोरणी व शांत डोक्याचा म्हणून तो प्रसि होता. मुसलमानांच्या दरबारी पद्धतीचा तो मोठा ज्ञाता असून तुर्की, इराणी, उर्दू व डिंगल या भाषांचा तो पंडित होता. अतिशय गोड बोलणारा असून आपल्या वाणीने कोणालाही भुरळ पाडण्यांत तो निष्णात होता. सेनापति म्हणून त्याचें एक वैशिष्टच होतें. मोगलांच्या ध्वजाखाली पठाण, तुर्क, रजपूत व हिंदुस्थानी असें मिश्र सैन्य एकत्रित झालें होतें. या मिश्र सैन्यावर अधिकार गाजवून तें आपल्या अधीन ठेवणें हें एक अत्यंत दुष्कर काम होतें. जयसिंग या गोष्टींत पूर्णपणें कसाला उतरला होता. अशा या विख्यात सेनानीची शिवाजी महाराजांवर पाठवणी करावयाचें औरंगजेबाने ठरविलें. या वर्षी औरंगजेबाचा सत्तेचाळिसावा वाढदिवस दिनांक ३० सप्टेंबर १६६४ ला होता. त्या दिवशींच औरंगजेबाने जयसिंगाची या नव्या कामगिरीवर नियुक्ति केली. त्याच्या बरोबर मोठें सैन्यही द्यावयाचें ठरविलें.

जयसिंग व औरंगजेब यांचा नात्यागोत्याचाही संबंध होता. जयसिंगाच्या वडिलांनी व आजोबांनी आपल्या मुली व बहिणी

औरंगजेबाच्या वडिलांना व आजोबांना दिल्या होत्या. परमेश्वर समजून मोगल बादशहाला भजण्याइतका जयसिंग हा निष्ठावंत दासमनोवृत्तीचा होता. कुलाच्या अब्रूची पताका असलेल्या मायबहिणी यवन बादशहांच्या अंत:पुरांत भोगदासी म्हणून ठेवण्यांत ज्यांना दूषणाऐवजीं भूषण वाटत असे त्या दासांच्या स्वामिनिष्ठेचा आणखी दुसरा पुरावा शोधण्याची आवश्यकताच काय? असा हा शहानशहा औरंगजेबाचा अगदी जवळचा नातलग व त्याचा एक प्रकारें उपकारकर्ताही होता. दिल्लीच्या साम्राज्यसिंहासनाच्या दाराशिकोह व औरंगजेब यांच्या लढ्यांत जयसिंग जर औरंगजेबाऐवजी दाराचा साह्यकारी झाला असता तर औरंगजेब बादशहा न होतां दाराच त्या सिंहासनावर बसला असता. दारा जसवंतसिंहाच्या आश्रयाला आला असतां मिर्झा राजानेच त्याचें मन दाराविषयी कलुषित करून त्याला परागंदा व्हावयास लाविलें. असा हा आपला खास हितचिंतक, महान् पराक्रमी व पराक्रम आणि राजनीतिज्ञता या दोहोंतही अग्रगण्य असलेला सेनानी औरंगजेबाने, शिवाजी महाराजांना सदाचें नष्ट करून टाकण्याच्या हेतूने प्रेरित होऊन, पाठविण्याचा निर्णय घेतला. या वेळीं जयसिंग वृद्ध होता. त्यामुळे कै. यदुनाथ सरकारांनी त्याला भीष्माची उपमा दिलेली आहे. ते म्हणतात, 'त्या वेळच्या मानाने जयसिंग प्रतिभीष्मच असून त्याच्यापुढे शिवाजी म्हणजे अर्जुनासारखा शोभत होता. गेल्या १०–१५ वर्षांतच शिवाजीने पराक्रम गाजवून जगाला आश्चर्यचकित केलें. विजापूर दरबारला तर त्याने अगदी हतवीर्य करून टाकलें व दिल्लीच्या मोगलांनाही खडे चारले. म्हणून या अर्जुनाचा रेच उतरविण्यासाठीं औरंगजेबाने जयसिंग या भीष्माची इंद्रप्रस्थाहून रवानगी करून दिली.

—(शिवाजी व शिवकाल पृ. ८०.)

यदुनाथ सरकार यांनी स्पष्टपणें लिहिलें नसलें तरी असत् पक्षाचा कैवार घेणें हेंही एक साम्य या भीष्माच्या उपमेंतून ध्वनित होण्यासारखें आहे.

जयसिंगाबरोबर बादशहाने दाऊदखान कुरेशी, राजा रायसिंह शिसोदिया, एहतेशामखान, शेखजादा, कुबेदखान, राजा सुजनसिंग बुंदेला, मुल्ला याहिआ नवायत, जबरदस्तखान, बादिल बरवा, बरकंदाजखान, राजा नरसिंह गौड, पूरणमल बुंदेला व त्याचा स्वतःचा मुलगा किरत्तसिंह कछवाह हे सेनानी, चौदा सहस्र सैन्य व अपार साहित्य दिलें. हें चौदा सहस्र सैन्य पुढे सागरासारखें विशाल व्हावयाचें होतें. याशिवाय इटालींतील व्हेनिसचा रहिवासी निकोलाय मनुची हा तोफखान्यावरील अधिकारी म्हणून त्याच्या सैन्यांत होता. औरंगजेब हा महान् पाताळयंत्री असून कोणताही हिंदु मनुष्य हा कितीही जवळचा असला तरी त्याला त्याचा विश्वास वाटत नसे. कदाचित् जयसिंग व शिवाजी हे एक होतील व आपल्याला अधिक भयानक संकटाशीं संघर्ष करावा लागेल, अशा कल्पनेने औरंगजेबाने दिलेरखान या आपल्या आणखी एका विश्वासांतल्या सेनापतीला त्याच्या बरोबर पाठविलें. वरून दिसायला तो जयसिंगाचें साहाय्य करणार होता व आंतून जयसिंगाच्या हालचालीवर तो लक्ष ठेवणार होता. जयसिंग दिलेरखानाच्या नियुक्तीचें कारण जाणून होता. पण त्याला त्या गोष्टीला उघडपणें विरोध करतां येण्याची शक्यता नव्हती. जयसिंग झपाट्याने निघाला. त्याने दि. ९ जानेवारी १६६५ ला हंडिया येथे नर्मदा नदी ओलांडली आणि मोठमोठ्या मजली मारून दि. १० फेब्रुवारीला तो औरंगाबादेला येऊन पोहोचला. तेथे दक्षिणेचा सुभेदार शहाजादा मोअज्झम याची भेट घेऊन व बोलणें करून दि. ३ मार्चला तो पुण्याला आला. या वेळीं पुण्याला शिवछत्रपतींच्या हातून पराभव पावून महाराजा जसवंतसिंह स्वस्थ बसलेला होता. त्याची भेट घेऊन जयसिंगाने त्याच्या हातून अधिकार स्वतःकडे घेतले व जसवंतसिंह दिल्लीकडे निघून गेला. जयसिंगाच्या येण्याची वार्ता महाराजांना आधीच कळलेली होती. जयसिंग ज्या वेळीं बऱ्हाणपूरला आला (दि. १९ जानेवारी) त्या वेळींच महाराजांना अशी वार्ता कळली की, 'जयसिंग मिर्झाराजा

ऐंशी हजार स्वार, बरोबर दिलेरखान पठाण, पांच हजार पठाण ऐसी फौज येत आहे.' महाराजांना मोंगली फौजेच्या मंदगतीची कल्पना होती व औरंगाबादेला जाऊन जयसिंग स्वराज्यावर लोटेपर्यंत आणखी एक प्रकरण निकालांत काढण्याची शक्यता होती. म्हणून त्यांनी कारवारच्या दक्षिणेला असलेल्या बसनूरवर स्वारी करावयाची योजना निश्चित केली. ते मालवणला आले. तेथून आपल्याबरोबर ८५ लहान व तीन मोठीं गलबतें घेऊन त्यांनी बसनूरवर स्वारी केली. तेथे त्यांना अपार लूट सांपडली. या त्यांच्या दक्षिणेवरील स्वारीचें इंग्रजी पत्रव्यवहारांतील वर्णन महाराजांच्या जलद हालचालींची पूर्ण कल्पना देणारें आहे. तें असें :—

## कारवार (मास्टर) – सुरत प्रेसिडेंट

श. १५८७ चैत्र शु. ८
इ. १६६५ मार्च १४

फेब्रुवारीच्या आरंभीं ८५ लहान व ३ मोठीं गलबतें घेऊन शिवाजी मालवणांतून बाहेर पडला, तो गोव्यावरून कांहीहि विरोध झाल्याशिवाय बार्सिलोरपर्यंत जाऊन, तें बंदर लुटून गोकर्णांत परत आला. तेथे तीर्थयात्रा संपादून ४००० पायदळासह तो अंकोल्यास गेला. तेथून सर्व आरमार पाठवून देऊन जमिनीवरून स्वदेशांत जातांना वाटेंत लागणाऱ्या नद्या तरून जाण्यापुरतीं १२ छोटीं तरांडीं त्याने राखून ठेविली. २२ फेब्रुवारीला तो कारवारला आला; परंतु हेरांकडून आधीच बातमी कळल्यामुळे आम्हांला सावध होऊन एका गलबतावर माल भरून सुरक्षित राहतां आलें. शिवाजीचें मोठें आरमार आधल्या दिवशींच निघून गेलें होतें आणि तशीच जरूर वाटल्यास गलबत हाकारून वाटेल त्या बंदरांत सोडण्याचें त्या गलबतवाल्या मस्कतच्या इसमाने आम्हांला वचन दिलें होतें. आम्ही गलबतावर चढलों, त्याच रात्रीं बहलोलखानाचा दुय्यम शेरखान तेथे आला. त्याला शिवाजीबद्दल आधी खबर नव्हती. तो बहलोलखानाच्या आईला मक्केला

जाण्यासाठी रुस्तुमजाचें एखादें गलबत भाड्याने ठरवून देण्या-करिता आला होता. त्याने खाडीचें रक्षण करण्याची कामगिरी आम्हांला सांगून थोड्या वेळांत जमली तितकी आत्मरक्षणाची तजवीज केली, व शिवाजीला आपल्या येण्याची बातमी देऊन शहरांतून न जाण्याबद्दल ताकीद पाठविली. शेरखानाचें धन्याशीं असलेलें वजन व बहलोलखानाची त्या प्रांतांतील जबरदस्ती लक्षांत घेऊन नाईलाजाने शिवाजीने त्याचें सांगणें मान्य करून तो शहरांत न जातां खाडीच्याच मुखापाशीं उतरला. आमचें गलबत व कोंगदेशचें एक गलबत अशीं दोन गलबतें त्याला विरोध करण्याच्या दृष्टीने खाडींत येऊन नांगरून पडलीं आहेत ही वातमी समजतांच शिवाजीने 'आपण शहर सोडून देऊन सूड घेण्यास मुभा करून द्यावी नाहीतर हीं गलबतें आमचे स्वाधीन करावी' असा शेरखानास निरोप पाठविला. तो त्याने आमच्याकडे कळविल्यावर आमच्या गलबतांत फक्त दारूगोळा आहे असें सांगून पाठविलें. हें ऐकून रागास येऊन निघून जाण्याचे पूर्वी समाचार घेण्याची गोष्ट तो बोलूं लागला. हें सुभेदाराचे कानावर जातांच त्याने सर्व व्यापाऱ्यांकडून त्याला नजराणा देण्यास लावण्याचें ठरविलें. त्यांत आम्हांलाही आमचा वाटा भरणें इष्ट, असा मालमत्तेच्या रक्षणाकरिता विचार करून जवळ जवळ ११२ पौंड देण्याचें आम्ही कबूल केलें आहे. ही खंडणी घेऊन 'माझी होळीची शिकार शेरखानाने घालविली' अशी कुरकूर करीतच तो २४ फेब्रुवारीला निघून गेला. बहुधा होळीच्या सुमाराला तो अशी लूट करतोच.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह पत्र क्र. १०४४)

याप्रमाणे महाराजांनी विजापूरकरांचा कारवारपर्यंतचा प्रदेश लुटला आणि ते मार्चच्या प्रारंभीं राजगडावर आले. तेथे येतांच त्यांना अत्यंत दुःखद बातमी कळली. ती म्हणजे त्यांच्यावर अतोनात प्रेम असलेले त्यांचे विश्वासपात्र व वयोवृद्ध मुत्सद्दी सोनोपंत डबीर यांचें देहावसान झालें ही होय. सोनोपंत डबीर हे शहाजी राजांनी महाराजांच्या पुण्याला झालेल्या पहिल्या पाठवणीच्या वेळीं

त्यांच्या बरोबर पाठविलेले मार्गदर्शक होत. प्रत्येक कठीण प्रसंगीं त्यांच्या मोलाच्या व निर्भीड सल्ल्याचा महाराजांना उपयोग झाला होता. शिवाजी महाराजांच्या संग्रामांत शेवटपर्यंत यशस्वी ठरलेली दुर्गनीति सोनोपंतांनीच त्यांना सुचविलेली होती. सोनोपंतांवर त्यांचें इतकें प्रेम होतें की, या वर्षीच्या पौष वद्य अमावास्येला (६ जानेवारी १६६५) मातुश्री जिजाबाईंच्या मागोमाग सोनोपंत डबीर यांचीही महाराजांनी सुवर्णतुळा केली होती. पण हें दुःख गिळून जयसिंगाच्या संकटाशीं झुंज घेणें त्यांना क्रमप्राप्त होतें.

जयसिंगाला शिवाजी महाराजांच्या सामर्थ्याची परिपूर्ण कल्पना असल्यामुळे शिवाजीला एकटें पाडावें व इतर दाक्षिणात्य सत्ता यांच्याशीं त्याला युति करतां येऊं नये अशी व्यवस्था करणें जयसिंगाला आवश्यक वाटलें. या वेळीं विजापूरची आदिलशाही व गोवळकोंड्याची कुतुबशाही या दोन सत्ता दक्षिणेंत होत्या. औरंगजेब जितका हिंदूंचा द्वेष्टा होता तितकाच तो शियापंथी असलेल्या विजापूरच्या आदिलशाहीचाही द्वेष्टा होता. शिवाजीच्या मागोमाग आदिलशाही सत्तेचाही विनाश करणें ही औरंगजेबाने त्याच्याकडे सोपवलेली एक महत्त्वाची कामगिरी होती. आदिलशहाच्या हें ध्यानांत येतांच शिवाजी महाराज व आदिलशहा हे दोघेही 'समान शत्रुमित्रसंधि'च्या तत्त्वानुरूप आपल्या विरुद्ध एकत्रित होतील व नंतर आपल्याला जड जाईल, हें जयसिंगाने ओळखलें व अत्यंत दूरदर्शीपणाने त्याने या उभयतांच्या मध्यभागीं म्हणजे शिवाजी महाराजांच्या स्वराज्याच्या पूर्वभागांत सासवडला आपला तळ दिला. युद्धकलेच्या दृष्टीने त्याने ही इतकी उपयुक्त जागा निवडली होती की येथून त्याला शिवाजी महाराजांवर लक्ष ठेवून विजापूरकरांकडेही लक्ष देतां येत होतें. जयसिंगाने येथे आपला तळ देऊन व्यर्थ कालक्षेप न करतां तत्काळ कोंकणांत उतरून शिवाजीच्या अधीन झालेल्या प्रदेशावर आक्रमण करावें अशी औरंगजेबाची त्याला वारंवार पत्रें येत होतीं. पण तिकडे मुळीच लक्ष न देतां जयसिंग ससैन्य सासवडलाच ठाण मांडून बसला. तेथे राहून शिवाजी

महाराजांवर विजय मिळवितां आल्यास त्यांच्या कोंकणमधील हालचालींना पायबंद घालणें सहज शक्य होईल अशी जयसिंगाची धारणा होती.

जयसिंगाने प्रथम शिवछत्रपतींच्या सर्व शत्रूंना एकत्रित करून त्यांच्याविरुद्ध आघाडी उभारावयाचें ठरविलें. इ. स. १६५७ मध्ये मोंगल व विजापूरकर यांच्यांत संधि होऊन विजापूरकरांनी मोगलांना मर्यादातीत खंडणी द्यावयाचें मान्य केलें होतें. ही खंडणी देणें विजापूरकरांना अशक्य होतें. जयसिंगाने ही खंडणी कमी करून देण्याचें आश्वासन विजापूरकरांना देऊन त्यांना आपल्या बाजूला वळवून घेतलें, व त्यानंतर शिवाजी महाराजांच्या मोरे, फाजलखान इत्यादि शत्रूंकडे त्याने आपली दृष्टि वळविली. औरंगजेबाला लिहिलेल्या पत्रांत जयसिंग लिहितो :—

## जयसिंग — औरंगजेब

शके १५८७ (इ. स. १६६५)

'जावळीचा जुना जमीनदार चंद्रराय आणि त्याचा भाऊ यांना मी बोलावणें पाठविलें आहे.... त्यांना पुष्कळ अभिवचनें देऊन पाथेयाचीही तजवीज केली आहे. अंबाजी, खारकुली (मोरे ?) यांचे दोन भाऊ हे सर्व पुरंदरावर शिवाजीने तोफा ओतण्याकरतां ठेविले असून त्यांना ३००० ची मनसबदारी आहे. त्यांच्याकडेही माझे दूत गेले आहेत. अफझलखानाच्या मुलाला बापाचा सूड उगविण्याकरता मोगली नोकरींत ये असें कळविलें आहे. कदाचित् शिवाजीचे कांही जोडीदारही आमच्याकडे फुटून येतील. आता या लोकांना मनसबा व जहागिरदाऱ्या द्याव्या लागतील. त्याबद्दल तुमचें मत काय आहे?'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह पत्र क्र. १०५३)

फ्रान्सील व डिग्मेलो यांच्या द्वारें त्याने गोवा, सुरत व मुंबई येथील पोर्तुगीज वखारवाल्यांच्या कडेही आरमाराच्या साहाय्यास्तव दूत पाठविले होते. कर्नाटकांतील जमीनदारांना त्याने आपल्याकडे

वळवून कल्याणच्या कोळी राजांनाही त्याने वश केलें. शिवछत्रपतींच्या कांही लोकांनाही लांच देऊन वश करण्याचा त्याने प्रयत्न केला होता. दक्षिणेंत आल्याबरोबर जयसिंगाच्या मार्गांत जी सर्वांत मोठी अडचण उपस्थित झाली ती शहाजादा मोअज्झमची होती. औरंगजेबाने केवळ समरभूमीचे अधिकार जयसिंगाला दिलेले असून इतर सर्व अधिकार दक्षिणेचा सुभेदार या नात्याने शहाजाद्याकडेच होते. त्यामुळे लहान गोष्टीसाठीही जयसिंगाला शहाजाद्याच्या तोंडाकडे पाहावें लागे. संघर्षांत आवश्यक त्या एकनेतृत्वाच्या दृष्टीने ही गोष्ट योग्य नव्हती. म्हणून जयसिंगाने या नाजूक गोष्टीसंबंधीं औरंगजेबाला पुढील पत्र पाठविलें.

## जयसिंग – औरंगजेब

शके १५८७ (इ. स. १६६५)

सैन्यांतील लोकांचें बरेंवाईट करणें सेनापतीच्या हातीं पाहिजे. शाहिस्तेखान सुभेदार झाल्यापासून सैन्याचे पगार, नेमणुका व बदल्या कारकुनांच्या हातीं गेल्यामुळे शिपायांना युद्धभूमि सोडून त्यांच्याकडे धावावें लागतें. शिपायांची हजेरी व काम सेनापतीला माहीत असायचें; परंतु त्याचे हातीं बक्षीस देणें किंवा शिक्षा करणें यांपैकीं कांहींच नाही!.... तरी हे सर्व अधिकार, जहागिरी बहाल करण्याचे सुद्धा माझे हातीं असावे. नेहमी शहाजाद्याकडे जावें लागतें तें बंद करावें. तसें झालें म्हणजे सर्वांची शेंडी माझे हातीं आहे याची जाणीव होईल व सर्वजण मनासारखीं कामें करूं लागतील. हें करणें तुम्हांला मान्य नसेल तर हें पत्र गुप्त ठेवावें. नाहींतर माझा आब जाईल.

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह पत्र क्र. १०५४)

बादशहा औरंगजेबाकडून जयसिंगाला त्याने मागितलेल्या सर्व सवलती मिळाल्या. इतकेंच नव्हे तर अहमदनगर व परिंडा येथील गडकऱ्यांना औरंगजेबाने अशा आज्ञा पाठविल्या की त्यांनी आपलें

सैन्य जयसिंगाच्या आज्ञेंत ठेवावें. ज्या रणभूमीवर जयसिंग युद्धाची सिद्धता करीत होता तिचें वैशिष्टच त्याच्यासारख्या मुरलेल्या सेनानीच्या तत्काळ ध्यानांत आलें. येथे स्वाभाविकपणें असलेल्या पश्चिम घाटांच्या अभेद्य भिंतीमुळे दक्षिणेकडील राज्यांना नैसर्गिक सुरक्षितता प्राप्त झाली होती. शिवाजी महाराजांचे दुर्गम किल्ले या घाटावरच असून तेथूनच ते सभोवारच्या प्रदेशांतील शत्रूवर झडप घालून पुन्हा आपल्या स्थानीं अंतर्धान पावत. या घाटांत अनेक दऱ्या आहेत. त्या पूर्वेकडे रुंदावत जाऊन विजापूरच्या मैदानांत विलीन होतात. पाण्याचे अनेक लहान ओहळ येथून निघून गोदावरी किंवा कृष्णेला मिळतात. अहमदनगरच्या पश्चिमेस पंचावन मैलांवर जुन्नर असून त्याच्या दक्षिणेला मोगलांच्या सीमेपलीकडे इंद्रायणीचें खोरें लागतें. त्याच्या वरच्या बाजूस पश्चिमेस लोहगड व तिकोनार हे गड असून मध्यभागीं चाकणचा गड आहे. त्यापलीकडे भीमेचें खोरें असून या खोऱ्यांतच पुणें वसलेलें आहे. पुढे दक्षिणेकडे असलेल्या कऱ्हेच्या खोऱ्यांतील मैदानांत सासवड व सुपें असून पश्चिम टेकडीवर सिंहगड व दक्षिणेच्या खडकांवर पुरंदर हे गड आहेत. या टेकड्यांच्या पलीकडे निरेचें खोरें असून निरेच्या कांठावर शिरवळ आहे. त्याच्या पश्चिमेस राजगड व तोरणा आणि वायव्येला रोहिडा आहे. पुण्याच्या वायव्येस लोहगड व दक्षिणेस राजगड हे पुण्यापासून सामान्यतः सारख्या अंतरावर आहेत. पुरंदर, सिंहगड व राजगड यांच्यावर मारा करण्यास सोयीचें ठिकाण व विजापूर कडून येणाऱ्या सैन्यास अडविण्यासाठी अथवा तेथे चालून जाण्यासाठी योग्य ठिकाण म्हणूनच जयसिंगाने आपला तळ सासवडला ठेविला होता. त्याने सैन्याचीही विशिष्ट आंखणी केली. कुतुबुद्दीन नांवाच्या सेनानीस सात सहस्र स्वारांसह उत्तरेला लोहगडासमोर ठेविलें. त्याने जुन्नरपासून कोंकणपर्यंतच्या प्रदेशाची राखण करावयाची होती. प्रत्यक्ष लोहगडलाही त्याने तीन सहस्र सैन्य ठेविलें होतें. नलदुर्गाजवळ असेंच उत्कृष्ट सैन्य ठेवून त्याने नाकेबंदी केली व सर्वांवर

पाहाणी करण्यासाठी एक स्वतंत्र सैन्य ठेविलें. चार सहस्र स्वारांसह एहेतेशामखान याला पुण्याच्या संरक्षणासाठी नियुक्त केलें. पुण्यापासून लोहगडपर्यंतचा चौदा कोसांचा मार्ग अडवून टाकण्यासाठी दोन सहस्र स्वारांची नियुक्ति करण्यांत आली, व सय्यद अब्दुल अझीज याच्या हाताखाली दोन सहस्र स्वार देऊन शिरवळच्या ठाण्याच्या रक्षणाचा भार त्याच्यावर सोपविला. दक्षिणेकडून शिवाजीच्या गडांना जाणारें साहाय्य जाऊं न देण्याचें काम त्याच्याकडे होतें. त्याच्या साहाय्याला बाजी चंद्रराव, अंबाजी गोंविदराव व माणकोजी धनगर हे दिलेले होते. सुप्याच्या ठाण्यावर सय्यद मुनवरखान हा ससैन्य होता.

प्रत्यक्ष युद्धाला प्रारंभ होण्यापूर्वी मिर्झा राजा जयसिंग व दिलेरखान यांच्यांत रणनीतीसंबंधी पहिला मतभेद झाला. जयसिंगाचें असें म्हणणें होतें की, प्रथम शिवाजीचा प्रदेश जिंकून नंतर त्याच्या डोंगरी किल्ल्यावर चढाई करावी. पण याच्या उलट दिलेरखानाचें असें म्हणणें होतें की, शिवाजीचें सारें बळ त्याच्या डोंगरी किल्ल्यांत असल्यामुळे प्रथम त्याच्या गडांवरच चढाई करावी. शेवटीं दिलेरखानाचेंच म्हणणें जयसिंगाला मान्य करावें लागलें व पुरंदरच्या वेढ्यापासून युद्धाचें टिपरू डंक्यावर पडलें.

दिनांक ३० मार्च १६६५ ला दिलेरखानाने आपल्या प्रचंड तोफखान्यासह पुरंदरकडे कूच केलें. अवजड सामान बरोबर असल्यामुळे त्याची गति मंद होती. तो सासवडला आला व जागेची व्यवस्था पाहाण्यांत गुंतला असतां जवळच्याच माचीवरून मराठी सैन्याने त्याच्यावर एकदम आक्रमण केलें. संतापलेल्या दिलेरखानाने या छोट्याशा तुकडीचा पाठलाग आरंभ करून ती माची जिंकली. व सासवडपासून अडीच कोसावर पुरंदरच्या पायथ्याशीं त्याने ससैन्य तळ दिला. दि. ३१ मार्चला पुरंदरच्या वेढ्याला आरंभ झाला. जयसिंगाला ही वार्ता कळतांच त्याने इंद्रमणि बुंदेला, रायसिंग, कुबदखान, कीरतसिंग मित्रसेन या सेनानींच्या हाताखालीं तीन सहस्र सैन्य देऊन त्यांना दिलेरखानाच्या

साहाय्यासाठी पाठवून दिलें. दाऊदखान कुरेशीला सासवडच्या तळावर ठेवून स्वतः पुरंदरच्या वेढ्याचें काम पाहण्याची जयसिंगाची इच्छा होती. पण जयसिंगाची आज्ञा न घेतांच परस्पर तो दिलेरखानाकडे निघून गेल्यामुळे जयसिंगाला तळावर राहणें भाग पडलें. एकदां जाऊन त्याने वेढ्याची पाहणी केली व त्याच्यासारख्या कुशल सेनानीच्या हे तत्काळ ध्यानांत आलें की, पुरंदर हा एकच किल्ला नसून अनेक टेकड्यांवर बळकट असे अनेक किल्ले बांधून त्यांचा एक किल्ला बनविलेला आहे. अशा किल्ल्याला वेढा घालून बाहेरून येणारें साहाय्य बंद करून त्याची नाकेबंदी करणें ही गोष्ट अत्यंत अशक्य कोटींतली होती. अर्थातच हा वेढा बराच गाजणार हें उघड दिसत होतें.

पुरंदरच्या या एकाच वेढ्यांत शिवछत्रपतींच्या स्वराज्य-सैनिकांची निष्ठा, तेज व पराक्रम इतक्या उत्कटतेने प्रकट झालेलें आहे की कोणालाही आश्चर्य वाटावें. पुरंदरचें हें प्रकरण हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेच्या इतिहासांतील अत्यन्त रोमांचकारी पर्व आहे. त्याकडे आपण पुढील प्रकरणांत वळू.

✦ ✦ ✦

## प्रकरण तिसरें

# शिवाजीचें जयसिंगास पत्र

सासवडच्या नैर्ऋत्येला तीन कोसांवर टेकड्यांचा एक समूह आहे. त्यांतील सर्वात उंच टेकडी समुद्रसपाटीपासून ४५६४ फूट व पायथ्यापासून २५०० फूट उंच आहे. पुरंदर हा एक दुर्ग नसून भुलेश्वर, रुद्रमाळ, वज्रगड, मोरगिली आणि केळणा हे सगळे दुर्ग मिळून पुरंदरचा एक दुर्ग बनलेला आहे. त्याचा परिघ चार

मैलांचा असून माचीपासून वर डोंगर तीनशे फूट आहे. पूर्वेकडे भैरवखिंड व याच खिंडीच्या पूर्वेस सुमारे मैलभर अंतरावर रुद्रमाळ किल्ला आहे. पुरंदर गडावर त्या वेळीं मुरारबाजी देशपांडे हे किल्लेदार होते. त्यांच्या हाताखाली अत्यंत कडवें सैन्य होतें. पुरंदरावरील सैन्य दिलेरखानाच्या पठाणी सैन्याच्या आवेशाला न जुमानतां शेवटपर्यंत गड लढविण्याचा निर्धार करून उभें होतें. मुरारबाजी हें रत्न श्रीशिवाजी महाराजांना चंद्रराव मोऱ्यांच्या जावळींत हातीं लागलें.

या अशा अवघड पुरंदर दुर्गाचें संरक्षण वज्रगड अथवा रुद्रमाळ या किल्ल्यांवर अवलंबून होतें. वज्रगड आणि पुरंदर एकाच डोंगरावर उभे असून त्यांच्या मध्यभागीं भैरवखिंड नांवाची खिंड होती. भैरवखिंडीपाशी पुरंदरला माची असून तिच्यावर बालेकिल्ला होता. वज्रगड आणि बालेकिल्ला यांची उंची जवळ जवळ सारखी असल्यामुळे वज्रगड जिकला की शत्रूला पुरंदरच्या बालेकिल्ल्यावर व माचीवर तोफा डागून तो सहज जिंकतां येण्यासारखा होता. दिलेरखानाच्या ध्यानांत वज्रगडाचें हें महत्त्व आलें व त्यामुळे त्याने आपलें सारें बळ वज्रगडावर केंद्रित केलें. आपल्या अफगाण फौजेसह त्याने पुरंदर व रुद्रमाळ यांच्या मध्यभागीं छावणी दिली. हरिभान व उदयभान गौर, तोफखान्यावरील मुख्य अधिकारी तुर्कताजखान व कीरतसिंग हे पुरंदरच्या दिल्ली दरवाजासमोर उभे होते. उजवीकडे राजा नरसिंग गौर, कर्ण राठोड, नरवरचा जगत्सिंग, सय्यद मकबुल आलम यांनी खंदक खणून आपला तळ दिला होता. पिछाडीला दाऊदखान रायसिंग, साली हतारखान, समरसिंग, शेरसिंग राठोड, राजसिंग गौर हे ससैन्य होते. येथील उजवी बाजू रसूलबेग रोजबानी संभाळीत होता. रुद्रमाळाच्या समोर चर्तुभुज चव्हाण हा ठाण मांडून उभा असून मित्रसेन व इंद्रमणि बुंदेला त्याची पाठराखण करीत होते. चोहोकडून रुद्रगडावर चढाई चालू होती व मुरारबाजीचे सैनिक शत्रूला रेसभरही पुढे येऊं देत नव्हते. तें भयंकर

रणकंदन चालू असतां टेकड्यांवर तोफा चढवून वज्रगडाच्या तटबंदीवर तोफांचा मारा करावयाचें दिलेरखानाने ठरविलें. वरचा प्रखर मारा सहन करून भूमीपासून १२०० फूट उंच तोफा चढविणें हें काम अत्यंत दुर्घट होतें. पण त्यासाठी शेकडों सैनिकांचे बळी देऊन शेवटीं अबदुल्लाखान या नांवाची तोफ तीन दिवसांनी दिलेरखानाने उंच टेकडीवर चढविली. तिच्या मागोमाग साडेतीन दिवसांनी फात लष्कर व हाहेली या तोफाही वर चढल्या. दि. १३ एप्रिल १६६५ ला मध्यान्हीं दिलेरखानाने या वज्रगडावर निर्णायक आक्रमण केलें. पण रक्तमांसाच्या चिखलांत प्रत्येक पाऊल तुडविल्यावांचून यशाचें चिन्ह दिसणें शक्य नव्हतें. शेवटीं तोफांच्या माऱ्याने किल्ला ढासळू लागला व स्वराज्य सैनिकांना आंतल्या बाजूला जावें लागलें. दि. १० एप्रिलच्या संध्याकाळपर्यंत मुरारबाजीच्या मूठभर सैन्याने निकराने युद्ध केलें पण संख्याबळ व सामग्री यांच्यासमोर त्यांचें कांही न चालून त्यांना शेवटीं शस्त्र खाली ठेवावें लागलें. ८० लोकांचे बळी देऊन व १०९ लोकांच्या जखमांकडे पाहत दिलेरखानाने वज्रगड जिंकला. तेथे मोगली ध्वज फडकविल्यावर त्याने आंतील लोकांना निःशस्त्र केलें व एकदम मोगली पद्धतीने त्यांना कंठस्नान न घालतां मुख्य सेनापति म्हणून जयसिंगाच्या अधीन केले. राजे जयसिंग अत्यंत धूर्त होते. आपल्या प्रचंड बळासमोर स्वतःचें कांही चालणार नाही हें किल्ल्यावरील मराठ्यांना लवकरच कळून येईल असें त्यांना वाटत होतें. पण या तावडींत आलेल्या सैनिकांना जर आपण कंठस्नान घातलें तर शत्रूला शरण जाऊन मरण्यापेक्षा किल्ल्यावरील कडवे सैनिक शेवटपर्यंत लढत राहतील हें त्यांनी ओळखलें. त्याऐवजी त्यांच्या अंतःकरणांत जीविताची आशा निर्माण करून प्रतिकार ढिला करावा या धूर्त विचाराने त्यांनी या सर्व बंदींना त्यांच्या योग्यतेप्रमाणे त्यांचा मानसन्मान करून हवें तिकडे जाण्याचें स्वातंत्र्य दिलें. पण स्वराज्याचे सैनिक अशा दिखाऊ धूर्ततेला फसण्याइतके कच्चे नव्हते.

वज्रगड हातीं येतांच दिलेरखानाने दुप्पट उत्साहाने वज्रगडावर दारूगोळा चढवून बालेकिल्ल्याच्या ईशान्य भागावर तोफा डागावयास प्रारंभ केला. जयसिंगानेही ही वार्ता औरंगजेबाला कळवून त्याच्याकडून आणखी मोठ्या तोफांची मागणी केली.

पुरंदरची ही अवस्था राजगडावर असलेल्या शिवाजी महाराजांना कळतच होती. आपल्या शूर सैनिकांना या वेळीं दारूगोळा पुरविणें हें आपलें कर्तव्य आहे हें महाराजांनी ओळखलें व मोठ्या साहसीपणाने त्यांनी त्या भयानक वेढ्यांतूनही किल्ल्यावर दारूगोळा पोहोचविला. ज्या बाजूने ही कुमक पोहोचविण्यांत आली तेथे दाऊदखान कुरेशी हा ससैन्य उभा होता. तो पाहत असतां कुमक पोहोचविणारी ही मराठ्यांची टोळी खिडकीच्या वाटे गडाच्या आंत गेली, तरी त्याने तिकडे लक्ष दिलें नाही. हें कळतांच दिलेरखानाने दाऊदखान कुरेशी हा मराठ्यांना मिळाला असल्याचा आरोप करून त्याची चांगलीच खरडपट्टी काढली. पण दाऊदखानानेही दिलेरखानाच्या रागाला उलट उत्तरें दिलीं, व त्या दोघांचें चांगलेंच भांडण जुंपलें. जयसिंगाला हें भांडण मिटविणें कठीण झालें, पण दिलेरखान हा या वेढ्याचा मुख्य सेनापति असल्यामुळे जयसिंगाने दाऊदखानाला वेढ्यांतून काढून आपल्या खास सैन्यांत घेतलें व त्याच्या जागीं कुरदिलखान व शुभकर्ण बुंदेला या दोन नव्या योद्धयांची नियुक्ति केली. तिचा फारसा उपयोग झाला असें नाही. याचें कारण शुभकर्ण बुंदेला हा मनाने शिवाजी महाराजांना अनुकूल होता. इकडे जयसिंगाच्या सैन्यांत आल्यावर दाऊदखानाने दिलेरखानाविरुद्ध प्रचार सुरू केला. तो म्हणू लागला, ‘हा पुरंदर गड कधीही कोणाला जिंकतां येणें शक्य नाही. येथे वेळ, पैसा व माणसें व्यर्थ दवडण्यांत काय अर्थ आहे? ही केवळ पैशांची उधळपट्टी व माणसांचा व्यर्थ नाश आहे.’ दाऊदखानाच्या या प्रचाराचा हेतु असा होता की, मुख्य सेनापति असलेल्या जयसिंगाने पुरंदरच्या जयाविषयी निराश होऊन दिलेरखानाला साहाय्य करणें थांबवावें. त्याचें हें कारस्थान

दिलेरखानाला अत्यंत तापदायक वाटूं लागलें. या गोष्टी जयसिंगाच्या ध्यानांत येतांच त्याने दाऊदखानाला शिवाजी महाराजांच्या प्रदेशाची लुटालूट करण्याची आज्ञा देऊन आपल्या सैन्यांतून दूर पाठवून दिलें. ही लुटालूट करण्यांत जयसिंगाचा दुसराही एक हेतु होता. आपल्याजवळ अगणित सैन्य असून आपण एकाच वेळीं किल्ल्याला वेढा देऊं शकतो व प्रांतही उद्ध्वस्त करूं शकतो हें त्याला शिवाजी व विजापूरकर यांना पटवावयाचें होतें व चोहोंकडून शिवाजी राजांना पेचांत आणावयाचें होतें.

दि. २५ एप्रिल १६६५ ला सहा सहस्र सैन्य व राजा रायसिंग, शर्जाखान, अचलसिंग कछवाह, अमरसिंग चोंडावत हे सेनानी बरोबर घेऊन दाऊदखान राजगड, सिंहगड व रोहिडा यांच्या जवळचा प्रदेश लुटून उद्ध्वस्त करण्यास निघाला. कुतुबुद्दीनखान व कुदीखान हे याच वेळीं हा प्रांत उत्तरेकडून लुटीत व उद्ध्वस्त करीत होते. दाऊदखानाच्या तुकडीने २७ एप्रिलला रोहिड्याच्या लगतचा प्रदेश लुटला व पन्नास खेडीं जाळून टाकलीं. अनेक शेतकरी तर त्यांनी कैद केलेच पण डोंगरांतील खेडींही नष्ट करून जनावरें व संपत्ति लुटली. त्यानंतर ही टोळी राजगडालगतच्या प्रदेशांत गेली. तेथील दृश्य मोठें करुण होतें. राजगडाला वेढा देण्याची सिद्धता नसल्यामुळे ही टोळी लगतच्या प्रदेशांत लुटालूट करीत होती, व राजगडावरील सैन्य या विध्वंसाला थांबविण्याइतकें संख्याबळाने पुरेसें नसल्यामुळे तो विध्वंस मुकाट्याने पाहण्यापलीकडे ते कांही करूं शकत नव्हते. यानंतर दाऊदखान सिंहगडाच्या प्रदेशांत शिरला. इतक्यांत राजगडावर असलेल्या शिवाजी महाराजांनी लोहगडावर आपलें सैन्य गोळा करून मोगलांच्या अधीन असलेला प्रदेश लुटावयास प्रारंभ केला. मोगली सैन्याच्या लोहगडास येणाऱ्या दोन टोळ्यांवर पांचशे अश्वस्वार व एक सहस्र पदाति सैन्यानिशी मराठ्यांनी आक्रमण केलें. निकराच्या चकमकीनंतर ऐन वेळीं या मोगली सैन्याला जयसिंगाचें साहाय्य येऊन पोंचल्यामुळे मराठी सैन्याला माघार

घ्यावी लागली. विसापूर, तिकोना, लोहगड, बालाघाट व पाईनघाट या विभागांतील खेडींही मोगली सैन्याने उद्ध्वस्त करून त्या विभागांत एकच प्रलय मांडिला. पण मराठ्यांनीही आपल्या गनिमी काव्याच्या पद्धतीने जयसिंगाला इतकें त्रस्त करून सोडलें होतें की, स्वत: जयसिंगच असें लिहितो की, 'पुष्कळ वेळां मराठ्यांच्या हालचालीमुळे आम्हाला अगदी मेटाकुटीला यावें लागलें.'

वज्रगड घेतल्यावर दिलेरखानाच्या तोफा पुरंदरच्या माचीवर आग ओकूं लागल्या. त्याने आपले खंदक गडाच्या आग्नेय दिशेकडे सरकविले. पण एवढ्या तोफांचा मारा सहन करूनही किल्ल्यांतील मुरारबाजीच्या सैन्याचें धैर्य पूर्णपणें अभंग होतें. एके दिवशीं रात्रीच्या घोर अंधारांत कीरतसिंगाच्या सैन्यावर किल्ल्यांतील एक टोळी तुटून पडली. दुसऱ्या एका रात्रीं तर रसूल बेग रोजबानी याच्या तोफखान्याच्या रक्षणासाठी असलेल्या तुकडीवर किल्ल्यांतील सैनिकांच्या टोळीने अकस्मात् छापा घालून तेथील तोफांच्या कानांत खिळे ठोकून त्या पूर्ण निरुपयोगी करून टाकल्या. तेथे रक्तमांसाचा एकच चिखल होऊन मराठ्यांचे कित्येक लोक कामास आले. पण तोफांच्या कानांत खिळे ठोकण्याचें काम पूर्ण केल्याविना कोणीही माघार घेतली नाही. त्या दिवशीं रणांगणावर पडलेलीं आपल्या सोबत्यांचीं प्रेतें परत घेऊन जाण्यासाठी किल्ल्यांतील मराठी सैनिकांच्या टोळीने पुन्हा तेथील मोर्चावर निकराची लढाई दिली. असें हें अटीतटीचें रणकंदन सारखें चालू होतें. दिलेरखान पुरंदर घेतल्यावांचून राहणार नाही अशा हट्टाने तेथे ठाण मांडून बसला होता व कोणत्याही परिस्थितींत गड त्याला न देण्याच्या निश्चयाने पुरंदरावरील स्वातंत्र्य सैनिक तळहातावर शिर घेऊन लढत होते.

एके दिवशीं सुरुंगाने किल्ल्यावरचे दोन पांढरे बुरूज उडाले. वरील सैन्याला हा प्रसंग मोठा आणीबाणीचा होता. पण वरच्या सैनिकांनी मोगली सैन्यावर बाण, दारूगोळे, तापलेलें तेल इत्यादींचा इतका निकराचा मारा केला की मोगल सैन्याचें तेथे

पाऊलही ठरेना. जयसिंगाने आपल्या सैन्याची ही अवस्था पाहून किल्ल्यावर मारा करण्यासाठी एक नवीन योजना ठरविली. पुरंदरच्या समोरच्या बाजूला एक मोठी लाकडी बैठक तयार करून तिच्यावर तोफा चढवून तेथून पुरंदरवर आग ओकण्याचें त्याने ठरविलें. दोनदा अर्धवट बैठक तयार झाली असतां मराठ्यांनी ती जाळून टाकली. शेवटीं तुकड्या तुकड्यांनी ही बैठक तयार करून ती बैठक तेथे एकत्रित जोडण्यांत आली व त्या वेळीं ती पुन्हा मराठ्यांनी जाळू नये म्हणून गिरिधर पुरोहित, रूपसिंग राठोड इत्यादि कसलेल्या योद्ध्यांना किल्ल्यावर हल्ला चढवावयास सांगून त्याने मराठी सैनिकांना त्यांत गुंतवून ठेवलें.

याप्रमाणे तोफा डागण्याची जागा तयार होतांच कित्येक पठाण सैनिकांना किल्ल्याचा बुरुज सहज हस्तगत होईल असें वाटून त्यांनी दिलेरखानाला न विचारतांच बुरुजावर हल्ला चढविला. किल्ल्यावरील सैनिकांनी त्यांच्यावर निकराचा हल्ला चढवून त्यांतील कित्येकांना कापून काढलें व उरलेल्यांना पिटाळून लावलें. ती त्यांची अवस्था पाहतांच दोन्ही बाजूंच्या खंदकांतून मोगल सैनिक बाहेर पडले व त्यांनी मराठ्यांवर जोराचें आक्रमण केलें. पहिल्याच झटापटींत जयसिंगाचा सरदार भूपतसिंग पवार आपल्या कित्येक अनुयायांसह मारला गेला. पण संख्याबळाने हें सैन्य अधिक असल्यामुळे व त्यांच्याजवळचीं साधनेंही विपुल असल्यामुळे मराठ्यांना माघार घ्यावी लागली. त्यांनी सफेद बुरूज सोडून मागच्या शहाबुरुजावर आपलें ठाणें दिलें आणि तेथून शत्रुसैन्यावर मारा सुरू केला. त्या भयंकर रणकंदनांत पुढे जाणें अशक्य वाटून मोगल सेनानीने आपल्या अधिकाऱ्यांना तेथेच खंदक खणून राहावयास सांगितलें. दोन दिवसांनी त्या तयार केलेल्या लाकडी ओट्यावर तोफा चढविण्यांत येऊन तेथून शहाबुरुजावर आग ओकण्यास सुरुवात झाली. तोही बुरूज सोडून मराठे मागे हटले. ते बुरूजावरून मागे हटले खरे; पण रणांगणावरून कोणीही मागे हटलें नाही.

त्याप्रमाणें खालच्या किल्ल्याचे पांचही बुरूज मोगलांनी घेतले. आता दिलेरखान माचीवर ताबा मिळवून बाले किल्लयाच्या मुख्य दरवाजावर चढाई करण्याच्या सिद्धतेत होता. पांच सहस्त्र निवडक पठाणी सैन्य त्याने बालेकिल्लयाच्या मुख्य दरवाजाच्या रोखाने पाठविलें. स्वतः खान मात्र मागे राहिला. रणमर्द मुरारबाजीने हा आणीबाणीचा प्रसंग पाहून आपल्या सैन्यांतून सातशे निवडक योद्धे बरोबर घेऊन तो या पांच सहस्त्र पठाणांवर तुटून पडला. हिंदवी स्वराज्याच्या इतिहासांत जे कांही अमर व स्फूर्तिशाली प्रसंग आहेत, त्यांत मुरारबाजीचा रणयज्ञ मेरु-मण्याच्या जागीं शोभण्यासारखा आहे. सभासद म्हणतो, 'निवड करून सातशें माणूस घेऊन गडाखाले दिलेलखानावरी आले.... (आणि दिलेलखानाच्या फौजेंत) सरमिसळ झाले. मोठें घोरांदर युद्ध जह्ालें. मावळे लोकांनी व खासा मुरारबाजी यांनी निदान करून भांडण केलें. पांचशें पठाण लष्कर ठार जह्यालें. खासा मुरारबाजी परभु दिलेलखानाच्या देवडीपावेतों साठी माणसा-निशीं मारीत शिरले. दिलेलखान देवडी सोडून माघारा जह्याला. आणि लोकांस सांगून तोफखाना व तिरंदाज बरचा व आडहत्यारी एक हजार लोक यांजकडून मार करविला. त्यामधें साठी लोक पडले. मुरार बाजी परभु यांनी ढाल फिरंग घेऊन दिलेलखानावरी चालून आले. महाराजांचे नांवाजलेले लोक ते खर्च जाह्ले आता तोंड काय दाखवावें? म्हणोन नीट चालून जावें असें मनांत आणोन खानाशीं गांठ घातली. तेव्हां दिलेलखान बोलिला जे, 'अरे तू कौल घे. मोठा मर्दाना शिपाई, तुज नांवाजितो.' ऐसे बोलतां मुरारबाजी बोलला जे, 'तुझा कौल म्हणजे काय? मी शिवाजी राजाचा शिपाई, तुझा कौल घेतो की काय?' म्हणून नीट खानावरी चालिला. खानावर तरवारीचा वार करावा तो खानानें आपले आंगें कमाण घेऊन, तीर मारून पुरा केला. तो पडला. मग खानानें तोंडांत आंगोळी घातली की, 'असा शिपाई खुदाने पैदा केला.' मुरार बाजी बरोबर तीनशे माणूस ठार

जह्याले. वरकड चारशें माणूस गडावर परत गेले. किल्ल्याचे लोक मुरार बाजी पडला म्हणोन गणना न करितां शरतीनें भांडूं लागले. 'एक मुरार बाजी पडला तरी काय झालें? आम्ही तैसेच शूर आहों. ऐशी हिंमत धरून भांडतो.' —(सभासद)

मुरारबाजीचें कबंध लढलें असें म्हणतात. पुरंदर गडावरील सैनिकांचें मुरारबाजी देशपांडे हेंच वस्तुतः मस्तक होतें. तें याप्रमाणे तुटून पडल्यावरही आंतील सैनिकांनी युद्ध तसेंच चालू ठेवलें याचा अर्थ कबंध लढलें असा आहे.

याप्रमाणें पुरंदर येथे जयसिंगाने धास्ती घ्यावी असें भयंकर रणकंदन चालू असतांच श्रीशिवाजी महाराजांनी जयसिंगाशीं संधीच्या वाटाघाटी प्रारंभ केल्या होत्या. जयसिंग पुण्याला आला तेव्हाच महाराजांचा दूत त्याला भेटला. पण जयसिंगाने प्रथम दुर्लक्षच केलें. पुन्हा दोनदा शिवछत्रपतीचे दूत त्याला भेटले. पण औरंगजेबाच्या आज्ञा वेगळ्या स्वरूपाच्या असल्यामुळे जयसिंगाने असें उत्तर दिलें की शिवाजीला जीविताची आशा असेल तर त्याने प्रथम मोगलांच्या नोकरींत शिरावें. मग वाटाघाटींचा विचार करतां येईल. महाराजांनी पुनश्च जयसिंगाकडे आपला कर्माजी नांवाचा विश्वासू वकील पाठवला. त्याच्या बरोबर त्यांनी पाठविलेल्या संदेशांत त्यांनी मोगल बादशहाशीं आपण राजनिष्ठेने वागूं व विजापूरकरांविरुद्ध मोगलांना साहाय्य करूं, त्यांचा प्रदेश जिंकून देऊं असें म्हटलें होतें. जयसिंगाने त्यावर जातिवंत दासाला शोभेल असेंच उत्तर पाठविलें. त्याने लिहिलें होतें, 'बादशाही सैन्य आकाशांतील ताऱ्याप्रमाणें असंख्य आहे. तें तुमचा पाडाव करण्यासाठीच येथे आलें आहे. तुमचा डोंगराळ व खडकाळ मुलूख त्या सैन्याला अजिंक्य नाही. आमच्या घोड्यांच्या टापाखाली कसल्याही अवघड मुलखाची धुळदाण होऊन जाईल. तुम्हाला जर जीव वांचवायचा असेल तर बादशहाची गुलामगिरी पत्करून शरण या.' तरीही महाराजांनी मिर्झा राजे जयसिंग यांच्याशीं संधीच्या वाटाघाटी सुरू ठेवल्याच. याच अवधींत त्यांनी

पुरंदरला वेढा घालून बसलेल्या दिलेरखानालाही संधीच्या याचनेचें एक पत्र पाठवलें. हें पत्र पाहतांच दिलेरखानाला अत्यंत आश्चर्य वाटलें. भीषण संकटांतही न डगमगणारा व विपत्तींचें हालाहल वारंवार पचविण्यांत कुशल असलेला शिवाजी संधीची याचना कशास्तव करतो आहे, हें त्याला कळेना. थोडीफार प्रदेशाची नासाडी हें कांही शिवछत्रपतींच्या शरणागतीचें कारण असू शकत नव्हतें. प्रतिदिनीं इतकी आग ओकून व असंख्य लोकांचे बळी देऊनही पुरंदर हातीं आला नव्हता. एकही किल्ला जिंकण्यांत आला नसतां या संधीच्या वाटाघाटी ज्या अर्थी शिवाजी करीत आहे त्या अर्थीं त्यांत कांही वेगळा प्रकार आहे असें दिलेरखानाला वाटल्यावांचून राहिलें नाही. त्याने महाराजांना पुढील प्रमाणें उत्तर पाठवलें.

### दिलेरखान – शिवाजी

श. १५८७ आषाढ
इ. १६६५ जून

'महालदाराबरोबर तुमचें पत्र आलें तें पावलें. मजकूर कळला. तह करण्याची तुमची इच्छाही कळून आली. लढण्याच्या पूर्वीच तुम्ही तहाचें बोलणें करतां हें आश्चर्य आहे. अशा बोलण्याकडे लक्ष देणें हें आमच्यासारख्या बादशाही अधिकाऱ्यास शोभत नाहीं. तुमच्या या डोंगराळ प्रदेशांत शिकार व नाच करण्यासाठी आम्ही हिंदुस्थानांतून इतके दूर आलों आहों. आमची एवढीच इच्छा आहे की तुम्ही एकदा येऊन आमच्याशीं सामना करावा. तुमच्या मुलखांत आम्ही पाहुणे आलों असतां पुढे येऊन आमचा समाचार घेण्याऐवजी तुम्ही दूर राहतां हें योग्य नाही. तुमचे ते मजबूत किल्ले, चुंबित पर्वत आणि पाताळास पोचविणारीं खोरीं प्रत्यक्ष पाहण्याची आमची इच्छा असतां, तुम्ही तर कोठे दिसत नाही आणि वर तहाचें बोलणें लावतां! हा विचार तुम्ही प्रथमच केला असता तर बरें झालें असतें; आतां तरी हा विचार सुचला हें चांगलें झालें. —( शिवकालीन पत्रसारसंग्रह पत्र क्रमांक १०६५)

दिलेरखानाच्या या पत्राची महाराजांना अपेक्षा असेलच. पण त्यांनी दिलेरखानाकडे आपली जी दृष्टि वळविली होती ती युद्धांत त्यांना सर्वनाश दिसत होता म्हणून नव्हे; एकही किल्ला जयसिंगाने जिंकला नसतांना, हजार पांचशें लोकांचा संहार व थोड्याशा प्रदेशाचा विध्वंस यामुळे शिवाजी महाराज संधीला तयार व्हावे अशा कातर हृदयाचे नव्हते. हे अफजलखान व शाहिस्तेखान प्रकरणांनी उत्कृष्ट रीतीने सिद्ध केलेलें आहे. मग ते जयसिंगाशीं संधीला कां सिद्ध झाले असतील? मिर्झा राजा जयसिंगाला त्यांनी आपलें हृदयाविष्करण करणारें एक पत्र पाठविलें आहे. त्या पत्राचें जर नीट मनन केलें तर पुण्यश्लोक शिवराय जयसिंगाशीं तो म्हणेल त्या अटीवर संधीचें नाटक करावयास कां सिद्ध झाले याची खरी कल्पना येते. तें पत्र मुळांत फारशी आहे. त्याचा अधिकृत अनुवाद पुढीलप्रमाणे :—

## शिवाजी – जयसिंग

श. १५८७
इ. १६६५

"हे श्रेष्ठ सरदारा, तुझ्यामुळे रजपुतांची मान उन्नत आहे. तुझ्यामुळे बाबरवंशाची राज्यलक्ष्मी अधिक प्रबल झाली असून तुझें साहाय्य तिला मिळत आहे. हे प्रबल व प्रौढ जयशाहा! 'सेवाचा' (शिवाजीचा) प्रणाम व आशीर्वाद स्वीकार. परमेश्वराने तुझें रक्षण करून तुला धर्माचा व न्यायाचा मार्ग दाखवावा. मीं असें ऐकिलें आहे की, मजवर हल्ला करण्यासाठी व 'दख्खण' जिंकण्यासाठी तूं आला आहेस. हिंदूंचें हृदय व नेत्र यांच्या रक्ताने तूं जगांत यशस्वी होऊं पाहत आहेस. पण तुझ्या हें लक्षांत आलें नाही की, याने तुझ्या तोंडास काळोखी फासली जात आहे. कारण या कृत्याने देशावर व धर्मावर आपत्ति ओढवली आहे. जर तूं क्षणमात्र अंतर्मुख होऊन आपल्या हाताकडे व झग्याकडे विवेकदृष्टीने पाहशील तर हा रंग कोणाच्या रक्ताचा आहे. व या रंगाचा रंग इहपरलोकीं काय होणार हें तुला समजेल. जर तूं

आपणहून दक्षिणप्रदेश जिंकण्यास आला असतास तर माझें शिर व डोळे तुझ्या रस्त्यावर बिछान्याप्रमाणे पसरले असते; मी तुझ्या घोड्याबरोबर मोठी सेना घेऊन आलों असतों आणि देशाच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंतची भूमि तुला जिंकून दिली असती. पण तूं सज्जनांना फसविणाऱ्या औरंगजेबाच्या थापांस भुलून इकडे आला आहेस. तेव्हा या वेळीं तुझ्याशीं कोणता डाव खेळावा हें मला समजेनासें झालें आहे. जर तुला सामील व्हावें; तर त्यांत मर्दपणा नाही; कारण मर्दलोक प्रसंगाची सेवा करीत नाहीत. सिंह भित्रेपणा दाखवीत नाही. बरें, जर मी तरवार व कुऱ्हाडी यांचा उपयोग केला तर दोन्ही बाजूंनीं हिंदूंचीच हानि होणार. मोठ्या दुःखाची गोष्ट ही आहे की, मुसलमानांचें रक्त पिण्याखेरीज इतर कामासाठी माझ्या तरवारीस म्यानांतून बाहेर पडावें लागेल! जर या लढाईसाठी स्वतः तुर्क आला असता तर आम्हां वीरपुरुषांना घरबसल्या शिकार लाधल्याप्रमाणे झालें असतें. पण जेव्हा अफजलखां व शाइस्ताखां यांच्या हातून काम झेपत नाही असें दिसलें तेव्हा तुला आम्हाशीं युद्ध करण्याकरतां नेमलें आहे. कारण स्वतः औरंगजेब आमचा मारा सोसण्यास समर्थ नाही. हिंदुलोकांत कोणीं बलशाली राहूं नये आणि सिंहांनी आपसांत लढून घायाळ व श्रांत व्हावे व गिधाडांना जंगलाचें सामर्थ्य प्राप्त व्हावें, अशी औरंगजेबाची इच्छा आहे. ही गूढ नीति तुझ्या ध्यानांत येत नाही. यावरून त्याच्या जादूने तुला भूल पाडली आहे असें प्रत्ययास येतें.

तूं जगांत बरेवाईट पुष्कळ प्रसंग पाहिले असशील; पण आम्हां लोकांशीं युद्ध करून हिंदूंचें शिर धुळीस मिळवण्याचें काम मात्र तूं करूं नये. प्रौढ वयांत अल्लडपणा न करतां सादीच्या या वचनाचें स्मरण कर. 'सर्वच ठिकाणीं घोडा फेकतां येत नाही. कधी कधी ढाल फेकून पळून जाणें योग्य असतें.' व्याघ्र, मृगादि प्राण्यांवर व्याघ्रता करतो; पण सिंहाबरोबर मृत्युयुद्ध करण्यास प्रवृत्त होत नाही. जर तुझ्या तीक्ष्ण तलवारींत पाणी असेल व घोड्यांत दम

असेल तर हिंदुधर्माच्या शत्रूंवर हल्ला करून इस्लामाचें जड मूळ खोडून टाक. जर या देशाचें राज्य दारा शिकोह यास मिळालें असतें तर आम्हां लोकांवर त्यांनी कृपा, अनुग्रह केला असता. पण तूं जसवंतसिंहास (शहाजहानचा सर्वांत वडील मुलगा दाराशिकोह हा अकबराप्रमाणे हिंदुमुसलमानांना समतेने वागवावें या मताचा होता. जेव्हा त्याचा शामगडच्या लढाईंत पराभव झाला तेव्हा तो सिंध प्रांतांतून जसवंतसिंहाच्या संमतीने अजमिरास आला. परंतु जयसिंगाने पत्र पाठवून जसवंतसिंहाचें मन कलुषित केल्यामुळे दारास अजमीर येथे साहाय्य मिळू शकलें नाही व औरंगजेबाने शेवटीं त्याचा पराभव केला.) दगा दिलास व उच्चनीच याची पारख तुला करतां आली नाही. आजवर किरकोळ शत्रूंशीं गांठ पडल्यामुळे तुझा दम कायम राहिला आहे. पण तूं आता सिंहाशीं युद्ध करण्याचो धिटाई करून आला आहेस. एवढ्या धांवपळीने तुला काय मिळत आहे? तूं मृगजळामागे धावत आहेस. एखाद्याने फार परिश्रम करून एखादी सुंदरी हस्तगत करावी आणि ती आपल्या शत्रूच्या स्वाधीन करावी, अशा तुच्छ व्यक्तीसारखा तूं आहेस? तूं या नीचाच्या कृपेचा काय अभिमान धरतोस? जुझारसिंहाच्या कामाचा परिणाम काय तुझ्या लक्षांत आला नाही? (ओडशाचा राजा जुझारसिंह बुंदेला याने जहांगीर व शहाजहान यांची इतकी एकनिष्ठपणें सेवा केली होती की त्याला राजा ही पदवी व चार हजारांची मनसब मिळाली. परंतु औरंगजेबाने पुढे त्यास क्षुल्लक कारणावरून पदच्युत केलें व जुझारसिंहास जंगलांत वणवण करीत फिरावें लागलें!)

कुमार छत्रसाल याजवर तो कशा प्रकारची आपत्ति आणूं पहात होता, हें तूं जाणतोस. (छत्रसालाचा बाप चंपतराय याने औरंगजेबास पुष्कळ साहाय्य दिलें होतें. परंतु पुढे किरकोळ कारणावरून वैमनस्य येऊन चंपतरायास आत्महत्या करावी लागली. नंतर छत्रसालाने शिवाजीची मदत मागितली.) याखेरीज इतर हिंदुलोकांवर या दुष्टाच्या हाताने काय काय अनर्थ आले आहेत हेंही

तुला माहीत आहे. इष्ट हेतु साधण्यासाठी तो बापाचा व भावांचा खून पाडण्यास भीत नाही. राजभक्तीची सबब सांगत असशील तर तूं शहाजहानशीं कसें वर्तन केलेंस याचें स्मरण कर. जर विधात्याने तुला अकलेचा अंश दिला असेल व मर्दपणाची चाड असेल तर तूं आपल्या जन्मभूमीच्या संतापांत आपली तरवार तापीव व अत्याचाराच्या दुःखाने पडणाऱ्या आसवांनी तिला पाणी दे. हा प्रसंग आम्ही लोकांनी आपसांत लढण्याचा नाही. कारण हिंदुलोकांवर या वेळीं मोठें कठीण कार्य येऊन पडलें आहे. आमचीं पोरेंबाळें, देश, धन, देव व पवित्र देवपूजक या सर्वांवर त्याच्यामुळे पराकाष्ठेचें दुःख कोसळलें आहे; आणि हाच क्रम आणखी कांही दिवस चालेल तर आम्हा हिंदुलोकांचें चिन्ह देखील पृथ्वीवर राहणार नाही ! मूठभर मुसलमानांनी आमच्या एवढचा देशावर प्रभुत्व गाजवावें ही मोठचा आश्चर्याची गोष्ट आहे. पण हें प्रभुत्व त्यांच्या पराक्रमाचें फळ नव्हे. जर तुला अकलेचे डोळे असतील तर पहा. आम्हांबरोबर तो कशा गोड गोष्टी बोलतो; व चेहऱ्यावर कसकसे रंग आणतो; आमच्या पायांत आमचीच बेडी अडकावतो व आमच्याच तरवारीने आमचीं शिरें कशीं कापतो तें लक्षांत घ्या. आम्ही लोकांनी या वेळीं हिंदु, हिंदुस्थान व हिंदुधर्म यांच्या संरक्षणार्थ फार जोराचे प्रयत्न केले पाहिजेत. तरवारीस पाणी देऊन (जशास तसें या न्यायाने) तुर्कांचा जबाब तुर्कीतच दिला पाहिजे. जर तूं मारवाडचा राजा जसवंतसिंह व मेवाडचा राजा राजसिंह यांज्याशीं ऐक्य करशील तर फार मोठें काम होईल अशी आशा आहे. चोहीकडून उठावणी करून तुम्ही या सर्पाचें डोकें दगडांनी ठेचून टाका; म्हणजे कांही काळपर्यंत तरी त्याला दक्षिण प्रांतांत आपलें जाळें पसरतां येणार नाही. तेवढचांत 'मी व माझे भालेबहाद्दर वीर विजापूर व गोवळकोंडा येथील दोनही बादशहांना जिकतों. मेघासारखी गर्जना करणाऱ्या सैन्यानिशीं मुसलमानांवर तरवारीचा पाऊस पाडीन, आणि सर्व दक्षिण देशाच्या पटावरून इस्लामाचें नांव किंवा चिन्ह धुऊन टाकीन. त्यानंतर कार्यदक्ष

वीर व भाला चालविणारे घोडेस्वार यांना बरोबर घेऊन प्रचंड लाटा व कोलाहल माजविणाऱ्या नदीप्रमाणे दक्षिण देशांतील पहाडांतून बाहेर पडून मैदानांत येईन; आणि अत्यंत जलदीने तुम्हा लोकांच्या सेवेस हजर होईन; व तुम्हांस हिशेब विचारीन. चोहीकडून भयंकर युद्ध उपस्थित करून रणांगणांत दंगल माजवून आम्ही लोक आमच्या सेनेच्या लाटा दिल्ली येथील त्याच्या जर्जर झालेल्या घरांत पोहोंचवूं म्हणजे त्याच्या नांवाचें औरंगही (राज-सिंहासन) राहणार नाही व जेब (शोभा)ही राहणार नाही. तसेंच त्याची तरवार राहणार नाही व कपटाचें जाळेंही राहणार नाही. शुद्ध रक्ताने भरलेली नदी वाहवून आम्ही आमच्या पित-रांच्या आत्म्याचें तर्पण करूं. हें काम कांही फार कठीण नाही. फक्त हृदय व डोळे आणि हात ह्यांची आवश्यकता आहे. दोन अंतःकरणें एक होतील तर पहाड तोडतां येईल व मोठ्या सैन्याच्या समूहाच्या ठिकऱ्या उडवितां येतील. या विषयासंबंधी मला तुझ्याशी फार बोलणें चालणें करावयाचें आहे; तें पत्रीं लिहिणें सयुक्तिक नव्हे. तूं म्हणशील तर मी समक्ष तुझ्या भेटीस येईन; माझा बेत तुला कळवीन. तरवारीची शपथ, घोड्याची शपथ, देशाची शपथ व धर्माची शपथ घेऊन मी सांगतों की, असें करण्याने तुझ्यावर आपत्ति येणार नाही. अफझलखानाचा शेवट कसा झाला हें लक्षांत आणून तूं शंकित होऊं नको. त्याने बाराशे लढवय्ये हबशी माझा घात करण्यासाठी ठेवले होते. त्याच्यावर मी प्रथमच हात चालविला नसता तर यावेळीं हें पत्र तुला कोणी लिहिलें असतें? मला तुझ्यापासून अशी भीति नाही. कारण, तुझ्या मनांत कांही शत्रुत्व नाही. जर मला तुझें उत्तर अनुकूल आलें तर रात्रीं मी एकटा तुझ्या भेटीस येईन. शाहिस्तेखानाच्या खिशांतून मी जें पत्र काढून घेतलें आहे तें गुप्त पत्र मी तुला दाखवीन. तुझ्या डोळ्यावर संशयाचें पाणी शिंपडून तुझी सुखनिद्रा नाहीशी करून तुझ्या स्वप्नाचा खरा खरा फलादेश करून नंतर तुझा जबाब घेईन. जर या पत्राचें उत्तर माझ्या मनाजोगें न येईल तर मी आणि माझी

तीक्ष्ण तरवार आहे व तुझी सेना आहे. उद्या सूर्य आपलें मुख संध्याकालांत लपवील तेव्हा माझा अर्धचंद्र (तरवार) म्यानांतून बाहेर पडेल. बस्स. कल्याण असो."

श्रीशिवाजी महाराजांचें हें पत्र खरें आहे की नाही या संबंधांत इतिहाससंशोधकांत मतभेद आहेत. पण केवळ मराठी कागदपत्रां-ऐवजी जयपूरच्या संग्रहालयांतील कागदपत्रें या दृष्टीनें तपासलीं जाणें अत्यवश्य आहे. अजून तरी तीं प्रसिद्ध झालेलीं नाहीत किंवा कोणाला फारशी पहावयास मिळालीं नाहीत, या पत्रांत शिवछत्रपतींनी ज्या भावना व्यक्त केल्या आहेत त्या वाचून त्यांना जयसिंगासमोर पडतें घेण्याचें दुसरें कांही कारण मात्र दिसत नाही.

जयसिंगाला शिवाजी महाराजांनी शरण जाण्याच्या मागें कांही तरी गूढ हेतु असावा असें समकालीन पाश्चात्य लेखकांनीही म्हटलें आहे. डॉ. बाळकृष्ण आपल्या विवेचक ग्रंथांत यासंबंधी विवेचन करतांना म्हणतात :—

'Shivaji single-handed had successfully weathered many storms raised by his multitudinous foes. He had laid low in dust the greatest Bijapur generals, rolled back the tide of invading hosts under Shaistakhan, the premier peerof the Mogul Empire, and humbled the pride of the great Rathor Rajput. Though he had not actually lost a single fort by this time, though he was not driven to desperation in any way, though he could have defied for a long time Mogul armies in any one of his impregrnable and rocky retreats, yet he made his submission to Jai Singh, agreed to give up a large part of his territory and to hold the rest as a vassal of the Emperor like the Rajput princes of the north. This prompt surrender came as a surprise to many. Hence the English letters have truly reported that 'Something is the matter that he (Shivaji) so peaceably parts with his country', and that he had 'some

after game to play still.' The act was an incomprehensible mystery to his contemporaries, but is it a mystery still? The clue to his profound policy is to be found in his letter to Jai Singh.

(शिवाजी महाराजांनी एकट्याने त्यांच्या भयंकर शत्रूंनी निर्माण केलेली भयानक वादळें यशस्वीपणाने परतवून लावली. त्यांनी विजापुरी सेनापतींचा गर्व धुळीला मिळविला. शाहिस्तेखानाचा पाश उधळून लावला व राठोड, राजपूत, महाराजा जसवंतसिंह यांचा अहंकार नष्ट केला. अशा स्थितींत एकही गड शत्रूच्या अधीन झाला नसतां, मनाचा तोल नष्ट करणारी निराशा उत्पन्न करणारें कोणतेंही कारण निर्माण झालें नसतां या वेळीं चालून आलेल्या मोगल सैन्यालाही आपल्या डोंगरी किल्ल्यांच्या आश्रयाने व गनिमी काव्याच्या पद्धतीने पुष्कळ दिवसपर्यंत रोखून धरण्याची पुरेपूर शक्यता असतांनाही शिवाजी महाराज जयसिंगाला शरण गेले, आपला बराचसा प्रदेश त्याच्या अधीन करावयास सिद्ध झाले व थोडासा उरलेला प्रदेशही उत्तरेंतील रजपूत राजांप्रमाणेच केवळ बादशाही कृपेचें प्रमादचिन्ह म्हणून स्वीकारावयास सज्ज झाले. त्यांचें हें अकस्मात् झालेलें आत्मसमर्पण अनेकांना मोठा आश्चर्याचा धक्का देणारें ठरलें. तत्कालीन इंग्रजी पत्रव्यवहारांतून जें म्हटलें आहे तें सत्यच आहे. त्या पत्रव्यवहारांत म्हटलें आहे, 'शिवाजी इतक्या शांतपणें आपला एवढा मोठा प्रदेश देत आहे यांत त्याचा कांहीतरी गूढ हेतु असला पाहिजे. त्याला पुढे कांहीतरी महत्त्वाचें राजकारण पार पाडावयाचें आहे असें दिसतें.' शिवाजी महाराजांची ही त्या वेळची कृति त्यांच्या समकालीनांना याप्रमाणे न सुटणारी गूढ समस्या ठरली. पण आजही ती गूढ समस्याच आहे काय? त्यांच्या या विशिष्ट धोरणाचीं सूत्रें त्यांनी जयसिंगाला लिहिलेल्या पत्रांत सांपडतात.)

महाराजांच्या या पत्राचें नीट मनन केलें तर ज्याच्यांत केवळ हिंदूंचीच उभयपक्षीं हत्या आहे असें युद्ध थांबविणें त्यांना आवश्यक

वाटत होतें व जयसिंगाला जर औरंगजेबापासून सोडून आपल्या धर्मराज्याच्या निर्मितीच्या प्रयत्नांना साह्यकारी बनवितां आलें तर पहावें असाही त्यांचा हेतु होता असें दिसतें. या पत्राने जयसिंग पूर्णपणाने वळला नसला तरी त्याच्यावर त्याचा परिणाम झालाच असला पाहिजे. वरून त्याने, त्याच्या हालचालींवर सूक्ष्म लक्ष असलेल्या दिलेरखानाला कोणताही सुगावा लागू नये म्हणून वागणुकींत कठोरपणाच धारण केला. त्याने महाराजांच्या वकिलाहातीं असा निरोप पाठविला की, प्रथम शिवाजीने विनाअट शरण यावें; मग त्याच्यावर दया दाखविण्याचा आम्ही विचार करूं. महाराजांनी जयसिंगाला शेवटी असें सांगून पाठविलें की, जर हा संधि होणार नसेल तर आपण विजापूरकरांना मिळून कोकणांत जाऊन मोगलांशीं लढण्याची सिद्धता करूं. हा वाटाघाटींचा घोळ कांही दिवस असाच चालू होता. शिवाजीची विजापूरकरांशीं हातमिळवणी होण्यांत असलेला धोका जयसिंगाच्या ध्यानांत आला व त्याने वेगळा पवित्रा घ्यावयाचें ठरविलें.जयसिंगाला शिवाजी महाराजांच्या विषयी काय वाटत होतें व आंतून त्याचें चित्त त्यांना अनुकूल असूनही दिलेरखानामुळे त्याला वेगळा देखावा कसा उत्पन्न करावा लागत होता याचें वर्णन करतांना मल्हार रामराव चिटणीस आपल्या सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रांत म्हणतात : ' जयसिंग यांणीं महाराजांचें चरित्र व राज्य आक्रमण शक्ति पाहून ' हा राजा हिंदु परम धार्मिक, भला, धर्मस्थापना करणार, नीतीकरून राज्य चालवितो; यांस कसेंही रक्षून पादशाहाची चाकरीहि मनसबेचे युक्तीने बजावावी. युद्ध याशी केलें असतां जय अथवा अपजय कसें पडेल (कोण जाणे) याची फौज व लोक, सामान, जातीने मनसबा (करणार) व ठिकाणे बाकी, सर्वगुणसंपन्न आहेत. वरकड सरदार नामोहरम होऊन गेले तसेंच आपणासहि घडल्यास ठीक नाही. आपण आब रक्षून जावे." ऐसा विचार करून महाराजाकडे सख्याचें अनुसंधान करावेसे करून, वकिलाबरोबर सांगून पाठविलें जे "औरंगजेब बलवान, पृथ्वीपति त्याशी तुम्ही सख्य करावें; शत्रुत्वेंच

राहून परिणाम या कालीं लागणार नाही; आम्ही हिंदु जयपूरचे राजे, तुम्ही उदेपूरचे घराण्यांतील शिसोदे थोर वंश आहांत. धर्मस्थापना हिंदुधर्म तुमचे कुलपरंपरा चालत आला तोच करिता. यास्तव तुम्हास अनुकूल आहों. तुमचा बचाव करून राज्य रक्षावें हें आमचे चित्तांत बहुत आहे. तुमचें मानस काय आहे तें कळवावें.'
—(चिटणीस विरचित शिवछत्रपतींचें चरित्र पृ. २१७ व २१८)

महाराजांसी जयसिंग यांचें चित्त मिळालें होतेंच. खानाचे दुराग्रहामुळे वकिलांस निरोप दिला (होता). आंतून ऐक्यता होती.
—(चिटणीस विरचित शिवछत्रपतींचें चरित्र पृष्ठ २२२)

केवळ दिलेरखानाची नव्हे तर जयसिंगाला औरंगजेबाची सगळ्यांत मोठी भीति होती. कारण त्याने जयसिंगाला वारंवार पत्रें लिहून शिवाजीशीं कोणत्याही तऱ्हेने वाटाघाट करावयाची नाही असें स्पष्ट कळविले होतें. या दोहींमधून मार्ग काढतांना त्याला उघडपणें कठोर आचरण करणें क्रमप्राप्तच होतें. शेवटीं शिवाजी महाराजांनी जयसिंगाला आपण समक्षच भेटीस येतों व संधि नच झाला तर आपल्याला सुरक्षितपणें परत जाऊं देण्याची हमी जयसिंगाने शपथपूर्वक घ्यावी असें कळविलें; व अनुकूल उत्तर येतांच साहस पत्करून महाराज दि. ११ जून १६६५ ला जयसिंगाच्या भेटीस्तव त्याच्या शिबिरांत आले. महाराज पालखींत बसून व केवळ सहा ब्राह्मण बरोबर घेऊन जयसिंगाच्या शिबिराच्या दाराशीं आले होते. ते आल्याचें कळतांच जयसिंग गडबडला. त्याने उदयराज व उग्रसेन कछवाह ह्यांना महाराजांना सामोरे पाठवून त्यांच्या करवी असा कठोर निरोप पाठविला की, 'शिवाजी सगळे किल्ले आपल्या स्वाधीन करावयास सिद्ध असल्यास त्याने भेटीस्तव आंत यावें; त्याला हें मान्य नसल्यास तो उभा आहे तेथूनच त्याने परत जावें.' महाराजांनी तें मान्य केलें व आणलेल्या व्यक्तींपैकीही केवळ दोनच सरदार बरोबर घेऊन ते आंत गेले. तंबूच्या दाराशीं जयसिंगाच्या मुजुमदाराने त्यांचें स्वागत केलें, व त्यांना जयसिंगाजवळ नेलें. महाराज नुसते आंत येणार या कल्पनेने जयसिंगासारख्याच्याही हृदयाला कापरें भरलें होतें असें दिसतें. त्याने

आपल्या भोवती सशस्त्र रजपूत शरीरसंरक्षक मोठ्या दक्षतेने उभे केले होते. शिवछत्रपतींनी आंत पाऊल टाकतांच जयसिंगाने उठून त्यांना आलिंगन दिलें व आपल्याजवळ आणून बसविलें. बसण्याची जागा त्याने अशी तयार केली होती की, जेथून पुरंदरचें युद्ध स्पष्ट दिसत होतें. असें म्हणतात की, त्याच वेळीं त्याने दिलेरखानास गडावर हल्ला करण्यास सांगितलें होतें. महाराजांनी पुरंदर एकदम स्वाधीन करीत असल्याचें सांगितलें. जयसिंगाचे मीर तुजुक व गाझीबेग हे दोन सरदार पुरंदरजवळ गेले. त्यांनी दिलेरखानाला वृत्त सांगितलें व आंतील शूर योद्ध्यांना शिवाजी महाराजांची आज्ञा कळविली. अनंत लोकांचे बळी देऊन व रक्ताचे शेकडो पाट वाहवूनही जो पुरंदर वाकला नाही तो केवळ महाराजांच्या आज्ञेने दिलेरखानाच्या स्वाधीन झाला.

महाराजांचा निवास जयसिंगाच्या शिबिरांतच होता. शेवटीं तेवीस किल्ले आणि त्यालगतचा चारलक्ष होन उत्पन्नाचा प्रदेश एवढे बादशहाला देऊन राजगडासह बारा किल्ले व त्या सभोवारचा एकलक्ष होन उत्पन्नाचा प्रदेश शिवाजी महाराजांनी आपल्याकडे ठेवावा व महाराजांनी तो प्रदेश आपल्याकडे असणें ही बादशहाची कृपा समजून त्यासाठी बादशहाची नोकरी पत्करावी असा आग्रह जयसिंगाने चालविला. तात्पर्य, जयसिंग महाराजांना आत्मामिष नांवाचा संधि करण्याचा आग्रह करीत होता. कौटिल्याने आपल्या अर्थशास्त्रांत या संधीचें वर्णन पुढीलप्रमाणे केलें आहे.

'स्वयं सङ्ख्यातदण्डेन दण्डस्य विभवेन वा ।
उपस्थातव्यमित्येष संधिरात्मामिषो मतः ॥'

'मागितलेलें धन देऊन शिवाय स्वतः शत्रूची नोकरी करण्यासाठी आपल्या शरीराने उपस्थित होणें याला आत्मामिष संधि असें म्हणतात.' पण शिवाजी महाराजांनी ती गोष्ट युक्तीने टाळली. त्यांनी जयसिंगाला असें सांगितलें की, 'आजपर्यंत मी वेडेपणाने वागून राजद्रोह केला, त्यामुळे बादशहास तोंड दाखविण्यास मला शरम वाटते. तथापि पांच हजार स्वारांसह माझा मुलगा बादशहाच्या

दरबारांत राहून चाकरी करील अशी तजवीज मी करीन. त्याच्या इभ्रतीप्रमाणे त्याला जहागीर मिळावी. मी स्वतः बादशहाचा गुन्हेगार असल्याने मला जहागीर वगैरे कांही देऊं नये व मजजवळून ठरीव चाकरीची अपेक्षाही करूं नये. तथापि दक्षिणेंत जेव्हा जेव्हा युद्धाचा प्रसंग येईल तेव्हा तेव्हा मजवर सोपविण्यांत येणारी लढाईची कामगिरी मी बिनबोभाट पार पाडीन. विजापूरच्या राज्यांतील जेवढा प्रांत औरंगजेबास जिंकावयाचा आहे तेवढा जिंकल्यावर तळ कोंकणांत चार लक्ष व वरघाटी पांच लक्ष होनांच्या उत्पन्नाचा मुलूख आपणांस बादशहाकडून फर्मानाने मिळाला तर तेरा वर्षांत चाळीस लक्ष होन आपण बादशहास हप्त्याहप्त्याने भरणा करूं.

तात्पर्य, श्रीशिवाजी महाराजांनी आपल्या अपूर्व बुद्धिमत्तेने आत्मामिष संधीऐवजी पुरुषांतर संधि जयसिंगाच्या गळ्यांत अडकविला. कौटिल्याने या संधीचें लक्षण पुढीलप्रमाणे केलें आहे :—

सेनापतिकुमाराभ्यामुपस्थातव्यमित्ययम् ।
पुरुषान्तरसन्धिः स्यान्नात्मनेनात्मरक्षणः ।।

'आपल्या स्वतःऐवजी आपल्या सेनापतीची अथवा कुमाराची उपस्थिति मान्य करावयास लावून संधि करणें हें या संधीचें स्वरूप आहे.'

जयसिंगाने हा संधि शेवटीं मान्य केला. याचें कारण त्यांत त्याला पुढील गोष्टींचा लाभ दिसत होता.

(१) या संधीमुळे चाळीस लक्ष होन उत्पन्नाचा लाभ औरंगजेबाला होणार होता.

(२) विजापूरकरांपासून शिवाजी सदाचा दूर राहणार होता. इकडचा विजापूरकरांचा प्रांत शिवाजी स्वतः जिंकून मोगलांना देणार असल्यामुळे मोगली सैन्याचा इकडच्या डोंगराळ भागांत राहून लढण्याचा व शेवटीं अयशस्वी होण्याचा त्रास वांचणार होता. हा संधि झाला तर दोन सहस्र अश्वदळासह संभाजी व सातसहस्र पायदळासह स्वतः शिवाजी महाराज विजापूरकरांवरील स्वारींत जयसिंगाबरोबर राहणार होते.

जयसिंगाच्या या शिबिरांत निकोलाय् मनुची याची व महाराजांची ओळख झाली. जयसिंगाने परस्पर शिवाजीशीं संधि केला व इतका पराक्रम करूनही पुरंदर जिंकून घेण्याचें समाधान लाभण्याऐवजी आपल्याला त्या तहांतील एक भाग म्हणून पुरंदर मिळाला ही गोष्ट दिलेरखानाला अत्यंत अपमानास्पद वाटली. श्रेयाचा वाटा जयसिंगाकडे जाणार हें पाहून तो चवताळून गेला. पण जयसिंग हा विलक्षण धूर्त पुरुष होता. त्याने महाराजांना असें सुचविलें की, हा तह कोणताही अडथळा न येतां व्हावा म्हणून आपण एकदा दिलेरखानाला भेटावें. महाराजांनी ती गोष्ट मान्य केली. त्यांच्या संरक्षणासाठी राजा रायसिंग नांवाच्या आपल्या विश्वासू सरदाराला बरोबर देऊन जयसिंगाने हतीवरून महाराजांना दिलेरखानाकडे पाठविलें. शिवाजी महाराज भेटीला येतात हें एकतांच आपला गौरव झाला असें वाटून दिलेरखान अत्यंत प्रसन्न झाला. त्याने महाराजांना दोन उत्कृष्ट घोडे, एक खड्ग, जडावाचें काम केलेली एक कट्यार व दोन भरजरी वस्त्रें दिलीं. नंतर स्वतः दिलेरखान महाराजांना घेऊन जयसिंगाकडे आला व त्याने संधि व्हावा म्हणून महाराजांचा हात जयसिंगाच्या हातांत दिला. दिलेरखानाने केलेल्या महाराजांच्या या सत्कारामुळे किंचित् ओशाळे होऊन जयसिंगानेही महाराजांना पोशाख, घोडा, हत्ती व एक खड्ग भेट दिलें. महाराजांनी किंचित् हसून तें खड्ग आपल्या कटिप्रदेशाला लावून बाजूला ठेवून दिलें व सांगितलें 'मी निःशस्त्र राहूनच बादशहाची एकनिष्ठेने सेवा करीन.' दि. १३ जून १६६५ ला आषाढ शुद्ध एकादशी होती. या दिवशीं पुरंदरचा सुविख्यात संधि झाला. त्यांतील कलमें पुढीलप्रमाणे होतीं—

(१) शिवाजी राजांनी केवळ बारा गड व त्या सभोवारचा एक लाख उत्पन्नाचा प्रदेश यावर संतुष्ट असावें. हा प्रदेशही केवळ बादशहाची कृपा म्हणून मिळणार असल्यामुळे शिवाजी राजांनी बादशहाशीं अत्यंत एकनिष्ठेने वागावें.

(२) दक्षिणेंतील मोगलांचा सुभेदार आज्ञा करील त्याप्रमाणे

त्या त्या वेळीं शिवाजी राजांनी त्यांच्यावर सोपविलेल्या कामगिऱ्या पार पाडाव्या.

(३) शिवाजीचा पुत्र संभाजी औरंगजेबाचा पंचहजारी मनसबदार होईल. पण तो लहान (आठ वर्षांचा) असल्यामुळे शिवाजीचा सेनापति नेताजी पालकर याने संभाजीचा प्रतिनिधि म्हणून मोगलांच्या दक्षिणेच्या सुभेदाराजवळ असावें.

(४) विजापूरकरांच्या अधीन असलेला तळकोंकणचा व बालेघाटावरचा प्रदेश जिकल्यावर तो शिवाजी राजांच्या अधीन ठेवण्यास बादशहाची अनुज्ञा राहील. त्यासाठी शिवाजी राजांनी दरवर्षीं तीन लक्ष होनांच्या हप्त्याप्रमाणे एकंदर चाळीस लक्ष होन बादशहाला द्यावे.

(५) १ ) पुरंदर, २) रुद्रमाळ, ३) कोंडाणा, ४) खंडागळा ५) लोहगड, ६) इसागड, ७) तुंग, ८) तिकोना, ९) रोहिडा, १०) नरदुर्ग, ११) माहुली, १२) भंडारदुर्ग, १३) पळसखोल, १४) रूपगड १५) बख्तगड, १६) मोरबखन, १७ माणिकगड, १८) सरूपगड, १९) साकरगड, २०) मरकगड, २१) अंकोला, २२) सोनगड, २३) माणगड हे किल्ले व त्यांच्या सभोंवारचा चार लक्ष होनांचा प्रदेश शिवाजीराजांनी बादशहाच्या स्वाधीन करावा.

तात्पर्य, १) दोन्ही बाजूंनी बहुसंख्य हिंदूंचाच ज्यांत संहार होत होता तें युद्ध थांबवावें; २) मोगलांचें वाढतें वर्चस्व झुगारून देणाऱ्या हिंदु स्वातंत्र्ययुद्धांत साह्यकारी म्हणून जयसिंग वळला तर साह्यकारी म्हणून मिळवावा, ३) जयसिंग येतांच विश्वासघातकीपणाने संधिभंग करून त्याला मिळण्याची सिद्धता दाखविणाऱ्या विजापूरकरांचा सूड घ्यावा, ४) मोगलांच्या साह्याने दक्षिणेंतील कुतुबशाही व आदिलशाही बुडवून आपलें सामर्थ्य वाढवावें व नंतर मोगली वर्चस्वही झुगारून द्यावे, ५) निदान या दोन्ही दक्षिणी बादशाह्यांत चौथाई व सरदेशमुखीचे अधिकार मिळवून हिंदवी स्वराज्याच्या प्रतिष्ठापनेच्या दृष्टीने आपले पाऊल पुढे पडावें म्हणून महाराजांनी पुरंदरचा हा अपमानास्पद संधि स्वीकारला.

या संधीने मिर्झा राजा जयसिंगाला अतिशय आनंद झाला. अवघ्या तीन महिन्यांत शिवाजी राजासारख्या, बड्या बड्या खड्गवंतांच्या इभ्रती घेणाऱ्या अजिक्य वीराला आपण शरण आणून शाही मनसबदार केलें यामुळे बादशहाच्या परिसरांत आपली प्रतिष्ठा वाढून शिवाजीचेंही संरक्षण झालें या कल्पनेने त्याची मान स्वाभाविकपणेंच ताट झाली. त्याने नम्रतापूर्वक बादशहाला शिवाजीचें म्हणून एक शरणपत्र लिहून त्याबरोबर स्वतःचें संधीची माहिती देणारें पत्र बादशहाकडे पाठवून दिलें. आपल्या पत्रांत जयसिंगाने औरंगजेबाला तहाला मान्यता देण्याविषयी प्रार्थना केली होती व पुरंदरच्या युद्धांत बादशहाच्या वतीने झालेला व्यय स्वतःची नम्र भेट म्हणून बादशहाला अर्पण करण्याची इच्छा प्रदर्शित केली होती. बादशहाने अत्यानंदाने या संधीला तत्काळ मान्यता दिली. संभाजीला सहा सहस्रांची मनसब, दोनलक्ष रुपये पारितोषिक, व निशाण आणि नौबत वापरण्याचा अधिकार बादशहाने दिला. जयसिंगाने संभाजीला स्वतःच्या वतीने एक शिरपेच व चांदीच्या अलंकारांनी सजविलेला एक हत्ती भेट म्हणून दिला. बादशहाच्याच्या वतीने संभाजीसाठी पोशाखही आला होता. याच वेळीं औरंगजेबाने शिवाजी महाराजांसाठीही एक फर्मान व भेट म्हणून पोशाख पाठविला होता. फर्मान वाटेवरच होतें. या अवधींत जयसिंगाने महाराजांना तातडीने शिबिरांत बोलावून घेतलें व पुन्हा एक त्यांच्याकडून बादशहासाठी शरणागतीचें पत्र पाठविलें. जातिवंत दासांनाच जी भाषा लिहितां येणें शक्य आहे ती लिहिणें शिवछत्रपतींना कसें शक्य होतें? या पत्रांतील विचार जयसिंगाचे व भाषा, अशीं पत्रें लिहिण्यांत सवयीमुळे निष्णात झालेल्या, उदयराज मुनशीची होती. तें पत्र असें—

'मी आपला गुन्हेगार व अपराधी आहे; आपणास शरण येऊन जीव व धनदौलत रक्षण करण्याची इच्छा धारण करीत आहे. इतःपर आपली नोकरी इमानाने बजावण्यास मी सदैव तत्पर राहीन; आणि आपला हुकूम पाळण्यांत मोठें भूषण मानीन. बंडाळी

करून मी आपल्या सर्वस्वाचा घात करून घेणार नाही. मिर्झाराजा जयसिंग यांनी सर्व वर्तमान आपणांस तपशीलवार कळविलेंच आहे. मला सर्व अपराधांची क्षमा करून जीवदान द्यावें, एवढेंच या दासाचें आपल्या चरणापाशी मागणें आहे. बादशाही शिक्का व पंजा यांनी अलंकृत झालेलें आपलें कृपापूर्ण फर्मान येऊन दाखल झालें, ही आनंदाची बातमी मिर्झाराजा जयसिंग यांनी आम्हांस कळविली. यायोगें बादशहांनी मला जीवदान दिलें आहे. बादशहाकडून पोशाख आला हें मला अत्यंत भूषण वाटत आहे. या पापी दासाचे अपराध क्षमेस पात्र नसतांही बादशहांनी केवळ उदार अंतःकरणाने ही कृपा मजवर केली हें त्यांस मोठें भूषण आहे. फर्मान आल्याप्रमाणे मी आपले हुकूम पाळण्यास सदैव तत्पर राहीन. आता मिर्झा राजांची रजा घेऊन घरीं जातों; आणि लढाईची तयारी करून फौज घेऊन विजापुरावर जाण्यासाठी त्यांच्या मदतीस येतों. या युद्धांत विशेष पराक्रम दाखवून पूर्वीचा काळिमा धुऊन काढावा अशी आशा बाळगीत आहे. आणि येणेकरून आपल्या अनंत उपकारांची अल्पतरी फेड माझ्या हातून होईल अशी उमेद आहे.'—(शिवकालीन पत्रसारसंग्रह, प. क्र. १०६७)

या पत्रावर स्वतःचें हस्ताक्षर करण्याच्या प्रसंगीं सिंहपराक्रमी शिवरायांच्या अंतःकरणांत क्रोधाच्या व दुःखाच्या केवढ्या ऊर्मी उसळल्या असतील! पण कौटिल्याने म्हटलें आहे— 'राज्यस्य मूलमिन्द्रियजयः' । महाराज विकारांचे दास नव्हते, विकार त्यांचे दास होते. साऱ्या ऊर्मि आवरून त्यांनी पत्रावर हस्ताक्षर केलें. परिस्थितीचीं पावलें ओळखण्यांत व तदनुसार पावलें टाकण्यांतच भावीयशसिद्धीचीं बीजें असतात.

◆ ◆ ◆

## प्रकरण चौथें

# जयसिंगाचें राजकारण

पुण्यश्लोक श्री शिवाजी महाराजांना केवळ त्या चमत्कारिक पत्रावर हस्ताक्षर करण्यानेच जयसिंगाने सोडलें नाही तर त्याहूनही अधिक कडू गोळी त्यांना गिळावी लागली. बादशहाचें फर्मान दि. ३० सप्टेंबर १६६५ ला जयसिंगाच्या शिबिरापासून कांही अंतरावर येऊन थडकलें. जयसिंगाने त्याचें स्वागत करण्यासाठी आपला मुलगा कीरतसिंग व मुजुमदार जानी बेग यांना तर पाठविलेंच पण त्यांच्या समवेत, फर्मान शिवाजी राजांसाठी असल्यामुळे त्यांनी जावें असा जयसिंगाने आग्रह धरला. अशा राजाज्ञापत्रकांचें स्वागत करण्याची यावनी सत्तेच्या काळांत एक विशिष्ट पद्धति होती. ती म्हणजे असें फर्मान आल्यावर त्याचें स्वागत करण्यासाठी एक स्वतंत्र मंडप उभारून बरोबर लवाजमा घेऊन पायीं चालत त्याला तीन चार कोस सामोरें जावयाचें व तें पत्रक घेऊन येणारा राजदूत भेटला, की भूमीवर गुडघे टेकून व त्याच्याजवळून ते राजाज्ञापत्रक घेऊन मस्तकी धरून थाटाने वाद्यांच्या गजरांत तें आपल्या निवासस्थानीं घेऊन यावयाचें. औरंगजेबाचें हें राजाज्ञापत्रक तर 'पंजाचें फर्मान' होतें. पंजाचें फर्मान याचा अर्थ उगाळलेल्या गंधांत आपला हात बुडवून ज्या राजाज्ञापत्रकावर त्याचें चिन्ह उमटविलें असेल असें राजाज्ञापत्रक होय. असें राजाज्ञापत्रक येणें ही बादशहाची मोठी कृपाच समजली जाई. शिवाजी महाराजांनी जयसिंगाच्या इच्छेप्रमाणे त्या फर्मानाचा नम्रतेने स्वीकार केला. औरंगजेबाचें तें फर्मान पुढीलप्रमाणे होतें:––

**'शिवाजी राजे याणी बादशाही कृपेचे उमेदवार होऊन जाणावें की, सांप्रत तुमचें पत्र बहुत नरमाईचे राजे जैसिंग यांचे भेटीबद्दल कळलें. कृत्य माफ व्हावें म्हणून घेतलें याचें पाहून गोड ध्यानास आला. यापूर्वी तुमचे मनांतील हाशील सरकार**

कामगारांनी समजाविलें होतें की, तुम्ही आपले कृत्यांचा पश्चात्ताप करून, या दौलतीचे आश्रयास येऊन, आपणाकडील तीस किल्ले इकडील कामगारांचे स्वाधीन करून, बारा किल्ले व त्यांजखालील मुलूख एक लक्ष होनांचा, निजामशाहीचे किल्ले व मुलूख पैकी त्याचप्रकारे आणखी चार लक्ष होनांचा मुलूक, तळकोंकणांतील विजापूरकरांचे इलाख्याचा जो हाली तुम्हाकडे चालू आहे व पांचलक्ष होनांचा मुलूक बालेघाटपैकी, विजापूरचे इलाख्यापैकी, येणेप्रमाणे एकंदराचा फर्मान बादशाही मागता व चाळीस लक्ष होन दरसाल तीन लक्षाप्रमाणे पेशकसीबद्दल देऊं म्हणतां. ऐशियास, तुमच्या गोष्टी ज्या तुम्ही तूट अंदेशा न पाहतां केल्या त्या माफीजोग्या नाहीत. तथापि राजे जैसिंग याणी लिहिल्यावरून ते सर्व माफ करून तुमच्या मनोरथाप्रमाणे बारा किल्ले—(देतो). त्यांचा तपशील खाली लिहिला आहे व त्यांच्या खालचा मुलूख देऊन आणखी हुकूम केला आहे की, जो मुलूक नऊ लक्ष होनांचा त्यापैकी चार लक्ष होनांचा तळकोकणपैकी विजापूरकरांचे इलाख्यापैकी हाली तुम्हाकडे चालत आहे तो बंदोबस्ताकरता इकडील सरकारांत आला. सबब बालेघाटी पांच लक्षांचा मुलूक, विजापूर आमचे हातीं येईल त्या आधी तुम्ही त्यांजकडून घेतल्यास व चांगले फौजेसुद्धा राजे जैसिंग यांस मिळोन बादशाही कामांत याचे मर्जीप्रमाणे कोशीस केल्यास, विजापूर फत्ते झाल्यानंतर, तुम्ही पेशकसीचे ऐवजाचा भरणा केल्यास, तुम्हाकडे बहाल ठेवूं. हाली चिरंजीवास पांचहजारी मनसब व पांचहजार स्वार—की एकेकाची दोन दोन तीन घोडीं असावीं—याप्रमाणे देऊन, तुम्हाकरतां पोशाख पाठवून, हा फरमान आपले पंजाच्या चिन्हासुद्धा पाठविला आहे. तरी तुम्ही इकडील लक्षांत वागोन, बादशाही काम लहानमोठे सुद्धा करोन हे आपलें उर्जीताचीच गोष्ट समजावें.

किल्ल्यांचा तपशील राजे जैसिंग यांचे लिहिल्याप्रमाणेः—

**(१) राजगड, (२) तोरणा, (३) लिंगमगड, (४) धोरप, (५) अलवारी, (६) महागड, (७) घोसाळा, (८) तळेगड, (९) पालगड, (१०) उधेदुर्ग, (११) रायरी, (१२) कुंवारी.**

या फर्मानानंतर जयसिंगाने स्वतः महाराजांना एक रत्नजडित खड्ग व कटयार भेट म्हणून दिली, आणि शस्त्रधारण करण्याची विनंति केली. जयसिंगाला यानंतर तत्काळ विजापूरकरांच्यावर स्वारी करावयाची होती. त्या स्वारीच्या वेळीं नऊ सहस्र सैन्यासह शिवाजीने उपस्थित राहावें असें बोलणें करून त्यांना दोन लक्ष रुपये देऊन जयसिंगाने त्यांना निरोप दिला. त्यानंतर महिन्या दीड महिन्याच्या अवकाशांतच जयसिंगाने विजापूरकरांवर स्वारी करण्याची सिद्धता केली. नोव्हेंबर महिन्यांत औरंगजेबाचा दक्षिणेचा सुभेदार शहाजादा मोअज्झम याने दक्षिणेची सुभेदारी जयसिंगावर सोपवून तो दिल्लीला निघून गेला. नंतर दि. २० नोव्हेंबर १६६५ ला जयसिंग पुरंदराहून विजापूरवर स्वारी करण्यासाठी निघाला. पूर्वीच्या वचनाप्रमाणे नऊ सहस्र सैन्यासह शिवाजी महाराज या स्वारीत आपला सेनापति नेताजी पालकर याच्यासह उपस्थित होते. मोगल सैन्याच्या डावीकडे या सैन्याची नियुक्ति झाली होती. पण प्रत्यक्ष संचलनाच्या वेळीं जयसिंगाने शिवाजी महाराजांचें हें सैन्य आघाडीवर पाठविलें. त्याचा परिणाम असा झाला की, या बादशाही सैन्याला कोठेही अडथळा न होतां पुरंदरापासून मंगळवेढ्यापर्यंत ५२ मैलांचा प्रदेश या सैन्याने पहिल्या धडक्यासच हस्तगत केला. याचें कारण फार विचित्र होतें. 'शिवाजी' या नांवाची विजापूरच्या अधिकाऱ्यांनी व सेनेने इतकी धास्ती घेतलेली होती की, जयसिंगाच्या स्वारींत आघाडीवर शिवाजीचें सैन्य आहे हें कळतांच विजापूरकरांच्या गडकऱ्यांनी भयाने गड मोकळे करून दिले. पुरंदरच्या आग्नेयेला चाळीस मैलांवर असलेलें फलटण दि. ७ डिसेंबरला महाराजांच्या सैन्याने जिंकलें. फलटणच्या नैर्ऋत्य दिशेला सात कोसांवर असलेला ताठोरा अथवा संतोषगड दि. ८ डिसेंबरला अधीन झाला. फलटणच्या दक्षिणेला पंचवीस मैलांवर असलेल्या खटावचा यानंतर एकाच आठवड्यांत पाडाव झाला. मंगळवेढ्याचा गड दि.१८ डिसेंबरला जिंकण्यांत आला. शिवाजी महाराजांनी हें जें विलक्षण

सामर्थ्य प्रकट केलें त्यामुळे आपल्या सर्व आकांक्षा त्यांच्या द्वारें फलद्रूप होतील असें भविष्य जयसिंगाला दिसूं लागलें व त्याने औरंगजेबाला या नेत्रदीपक विजयाचें वृत्त शिवाजी महाराजांच्या प्रशंसेसह कळवून त्यांना शाहीकृपेचें निदर्शक म्हणून भेट पाठविण्या-. विषयीं विनविलें. धूर्त औरंगजेबाने शिवाजीराजांना एक प्रशंसात्मक पत्र पाठवून पोशाख व रत्नजडित कट्यार भेट म्हणून पाठविली.

दि. २४ डिसेंबर १६६५ पर्यंत या सैन्याची ही जययात्रा निर्वेधपणें चालू होती. पण त्यानंतर विजापूरच्या सत्तेने, आत्मनाश टाळण्याच्या हेतूने कडवा प्रतिकार करावयाचा निश्चय केला. दि. २५ ला दिलेरखान व शिवाजीराजे आपल्या तळापासून पांचकोस पुढे जातात तोंच विजापूरचा सेनानी सर्जाखान, खवासखान, कल्याणीचे जाधवराव व शिवाजी महाराजांचे सापत्न बंधु व्यंकोजी राजे हे बारा सहस्र सैन्यासह त्यांना आडवे झाले. या सैन्याचा दिलेरखान व शिवाजी राजे यांनी पराभव केला तरी त्यांना या सैन्यानें गनिमी काव्याच्या पद्धतीने लढून बरेंच हैराण केलें होतें. या युद्धांत विजापूरकरांचा सिद्दी सेनानी याकूतखान व अन्य पंधरा योद्धे पडले. परंतु विजयी सैन्याची पाठ वळतांच विजापूरच्या मराठी सैन्याने मोगलांच्या पिछाडीवर निकराचा आघात केला. महाराजांचा सेनापति नेताजी पालकर याने कीरतसिंह व फातजंगखान यांच्यासह शौर्याने पिछाडी लढवून विजापूरकरांचा पराभव केला तरी त्याला विजापूरच्या सैनिकांनी आठवण राहण्यासारखे झणझणीत टोले लगावले. या युद्धांत विजापूरकरांची झालेली हानि म्हणजे कल्याणीच्या जाधवरावांचें निधन होय. २७ डिसेंबरला विजापूरच्या सैनिकांनी जयसिंगाला आपल्या तिखट खड्गाचें स्मरणांत राहण्यासारखे तडाखे दिले.

तात्पर्य, जयसिंगाची स्वारी ही खंडणी घेऊन थांबणारी नसून विजापूर राज्य पूर्णपणें बुडविणें हें तिचें उद्दिष्ट आहे हें विजापूरकरांनी ओळखलें होतें; व म्हणून हा जीवनमरणाचा संग्राम सर्व

सिद्धतेनिशी प्राणपणाने लढण्याचा त्यांनी निर्धार केला होता. म्हणून त्या सत्तेचे सर्व अभिमानी या वेळीं एकत्रित आले होते; इतकेंच नव्हे तर विजापूरकरांच्या मागोमाग गोवळकोंड्याच्या कुतुबशाहीवरही जयसिंगाचें हें संकट येऊन कोसळणार हें उघड सत्य असल्यामुळे गोवळकोंड्याच्या कुतुबशाहीनेही आदिलशाहीशीं हातमिळवणी करून संयुक्त लढा देण्याची सिद्धता केली होती. दि. २९ डिसेंबरला मिर्झा राजा जयसिंग विजापूरच्या उत्तरेला पांच कोसांवर नाखनपूर येथे ससैन्य येऊन पोहोचला. पण तेथे त्याची गति खुंटली; इतकेंच नव्हे तर आपल्या राजकीय बुद्धिमत्तेने अंतःस्थ भेद उत्पन्न करून विजापूर जिंकण्याची त्याची आशाही लयाला गेली. विजापूरच गिळंकृत करण्याच्या या प्रसंगीं तेथे कोणत्याही प्रकारची फितुरी करावयास कोणीही सिद्ध झाला नाही. अंतर्भेद करून अंतःकलह पेटविणें या आणीबाणीच्या प्रसंगीं त्याला शक्य कोटीतलें दिसेना; व आपल्या भेदनीतिकुशलतेवर परिपूर्ण विश्वास असल्यामुळे या सेनापतीने मोठमोठ्या तोफा व दारूगोळा विजापूर जिंकावयास आवश्यक त्या प्रमाणांत बरोबर आणलेलाच नव्हता. विजापूरची सिद्धताही कडेकोट असल्याचें त्याच्या ध्यानांत आलें. नगराच्या तटाच्या भिंती सुधारून विजापूरकरांनी आत कित्येक महिने पुरेल इतका अन्नधान्याचा व दारूगोळ्याचा संग्रह केला होता. गडावर तीस सहस्र नवीन कर्नाटकी पदाति सैन्य ठेवण्यांत आलें होतें. विजापूर सभोवारचा सात मैलांचा प्रदेश शत्रुसैन्याला पाणीसुद्धा मिळूं शकणार नाही इतका ओसाड करून टाकण्यांत आला होता. पाण्याचीं तळीं फोडून टाकून त्यांतून पाणी काढून घेण्यांत आलें. रस्त्यांतील सगळीं झाडें तोडून टाकण्यांत आलीं होतीं. अशा स्थितींत जयसिंगाचें चित्त द्विधा करण्यासाठी विजापूरच्या सेनापतींनी आपल्या कांही तुकड्या मोगली प्रदेशांत घुसवून लुटालूट करण्यास प्रारंभही केला होता. आता माघार घेण्याची पाळी विजापूरकरांवर येण्याऐवजी जयसिंगावरच आली. दि. ५ जानेवारी १६६६ ला

त्याने नाखनपूरवरून आपला तळ उठविला व तो २७ जाने. ला परिंडयापासून आठ कोसांवर दिला. चोवीस दिवसपर्यंत त्याला तेथून हलतांही येईना.

अशा स्थितींत एक निराळेंच प्रकरण उद्भवलें. जयसिंगाने जरी शिवाजी महाराजांशीं संधि केलेला असला तरी दिलेरखानाचें मन त्यांच्याविषयी शुद्ध नव्हतें. आज जरी शिवाजी आपल्याला मिळाला असला तरी तो केव्हांही आपल्यावर उलटूं शकेल अशी त्याची निश्चिति होती व त्यामुळे शिवाजीला जिवंत ठेवण्याऐवजी ठार मारून हा काटा समूळ उपटून टाकणेंच योग्य असें त्याचें मत होतें. त्यासाठी तो निमित्त शोधीत होता. मोगली सैन्याची ही एकाएकी चाललेली पीछेहाट पाहून त्याने जयसिंगाला असें सांगितलें की, 'वरून शिवाजी आपल्याला साह्य करीत असला तरी तो आंतून विजापूरकरांना मिळाला आहे त्यामुळे त्याला ठार करणें योग्य होईल. जयसिंग ह्या गोष्टीला मुळीच सिद्ध नव्हता. दिलेरखानाने असें बोलणें केलें की, मी शिवाजीला इतक्या युक्तीने ठार मारतों की तुमचा कोणाला संशयही येणार नाही. पण जयसिंगाला महाराजांचा हा विश्वासघात पूर्णपणें अमान्य होता. त्याच्या मनावर त्यांचा जो प्रभाव होता त्यामुळे जयसिंग दिलेरखानाच्या या कपटप्रयोगांत अडथळा होऊन राहिला. शेवटीं त्या दोघांचें वितुष्ट येईपर्यंत मजल गेली. दिलेरखान विश्वासघाताने आपले प्राण घेणार ही गोष्ट महाराजांना विजापूरकरांवरील एका चढाईत ध्यानांत आली. तत्काळ ते मोगली सैन्यापासून दूर झाले. दिलेरखान त्यावर शिवाजी राजांना कैद करावें म्हणून जयसिंगाजवळ हट्ट धरून बसला. जयसिंगाने या सगळ्या फाटाफुटीच्या गोंधळांत दिलेरखानाकडून महाराजांचा कोणताही घातपात होऊं नये म्हणून त्यांना तेथून दूर पन्हाळ्यावर पाठवून दिलें. या संबंधांत औरंगजेबाला लिहिलेल्या पत्रांत जयसिंग लिहितो, 'माझ्या पत्राप्रमाणें बादशहाकडून बहुमानाचा पोशाख व रत्नखचित जमिया शिवाजीसाठी आला (ता. २५ डिसेंबर

१६६५) हें उत्तम झालें. 'विजापूरला वेढा दिल्यास आपण अवश्य मदत करूं' असें शिवाजी म्हणतो. परंतु विजापूरला वेढा घालणें आपल्याला फायदेशीर होणार नाही म्हणून वेढ्याचा विचार तूर्त बाजूस ठेवला आहे. शिवाजीचें दुसरें म्हणणें असें आहे की, पन्हाळा किल्ल्याची आपणांस उत्तम माहिती आहे. आंतबाहेर जाण्यायेण्याचे मार्ग आपणांस ठाऊक आहेत आणि किल्ल्यावरील शिबंदी अगदीच गाफील आहे. तरी आपणांस पन्हाळ्यावर पाठवावें म्हणजे तिकडेस मारे दंगल उडवून देऊं, आणि याप्रमाणें हुलकावणी दाखविली म्हणजे विजापूरकरांना अर्थातच तिकडे लक्ष द्यावें लागेल, व तिकडच्या संरक्षणासाठी मोठी फौज पाठवावी लागेल.' शिवाजीचें म्हणणें मला योग्य वाटून मी त्याला तिकडेस पाठविलें आहे.

दि. ११ जानेवारी १६६६ ला शिवाजी महाराज जयसिंगाचा निरोप घेऊन पन्हाळ्याकडे गेले. जातांना त्यांनी आपला सेनापति नेताजी पालकर याला आपल्या मागोमाग साहाय्यासाठी यावयास सांगितलें. आंतील सैन्य असावध असेल अशा समजुतीने महाराजांनी किल्ल्यावर चढाई केली. पण आंतील सैन्य सावध असल्यामुळे या आक्रमणांत शेकडो लोक बळी देऊन पराभव पत्करून महाराजांना परत फिरावें लागलें. जयसिंगाला ही वार्ता २० जानेवारीला कळली. त्याला या वेळीं मान्या पराभवाच्याच वार्ता ऐकाव्या लागत होत्या. हा पराभव सहन करून महाराज विशाळगडला आले व तेथून त्यांनी विजापूरकरांच्या प्रदेशावर वारंवार चढाई केल्यामुळे सिद्दी मसाऊद व रणदुल्लाखान यांना सहा सहस्र सैन्यासह पन्हाळ्याच्या आसपास गुंतून राहावें लागलें.

महाराजांचा पन्हाळ्यावर हा जो पराभव झाला तो त्यांचा सेनानी नेताजी पालकर तेथे वेळेवर येऊन पोहोचला असता तर निश्चितच झाला नसता. नेताजीच्या या दीर्घसूत्रीपणामुळे महाराज त्याच्यावर विलक्षण संतापले व त्यांनी त्याला त्याच्या जागेवरून काढून टाकलें. त्याचा परिणाम काय झाला असेल?

लहानपणापासून पुण्यशील महाराजांच्या सहवासांत जीवनांतील सगळे छायाप्रकाश अनुभविलेल्या नेताजीला त्या त्याच्या वैयक्तिक प्रतिष्ठेला बसलेला धक्का सहन झाला नाही व तो सरळ विजापूरकरांना जाऊन मिळाला. नेताजी हा अत्यंत कुशल योद्धा व प्रथमश्रेणीचा सेनानी होता. स्वराज्याचे शत्रु व मित्र त्याला प्रतिशिवाजी समजत असत. त्याला काढून टाकण्यांत ज्याप्रमाणे महाराजांची कठोर अनुशासनशीलता प्रकट होते, त्याचप्रमाणे स्वराज्य सोडून निघून जाण्यांत मोठ्या माणसाच्या ठिकाणीसुद्धा आत्मकेंद्रितता किती तीव्र असते व प्रसंगी ती ध्येयवादित्वावरही कशी मात करते हेंही प्रत्ययास येतें. नेताजी पालकर जो निघाला तो सरळ विजापूरकरांना जाऊन मिळाला. अशा संकटकाळांत नेताजीसारखा प्रतिशिवाजी येऊन मिळतांच विजापूरकरांना केवढा विलक्षण आनंद झाला असेल! त्यांनी त्याचें स्वागत करून त्याला चार लाख होन भेट म्हणून दिले, आणि आपल्या सरदारांत समाविष्ट केलें. विजापूरकरांच्या वतीने नेताजी मोगली सैन्यावर वज्रपातासारखे आघात करूं लागला. नेताजीच्या या जाण्याने महाराज कंपितही झाले नाहीत व त्यांनी त्याचा रुसवा काढण्याचाही प्रयत्न केला नाही. तो जर शत्रुपक्षाला न मिळतां केवळ रुसलाच असता तर महाराजांनी त्याचा अनुनय व समजावणी निश्चित केली असती. पण शत्रुपक्षाशीं हातमिळवणी करण्याइतकी आत्मकेंद्रित माणसें कितीही कर्तृत्ववान् असलीं तरी स्वराज्यसिद्धीसारख्या महान् ध्येयाच्या दृष्टीने त्यांचा संग्रह करीत बसण्यांत उपायापेक्षा अपायच अधिक होतो.

नेताजीचें हें जाणें प्रथमदर्शनीं निरीक्षकांना कांही खरें वाटलेलें नाही. शिवाजी महाराजांचा हा कांहीतरी राजकीय डाव असावा अशी समकालीन निरीक्षकांची समजूत झालेली आहे. कारवारहून सुरतेला पाठवलेल्या दि. २४ एप्रिल १६६६ च्या पत्रांत या घटनांचें केलेलें वर्णन पाहण्यासारखें आहे. या पत्राचा इंग्रज लेखक लिहितो :—

'शिवाजी पन्हाळ्याकडे पळून गेला आणि त्याने वाटेंतील पुष्कळ आदिलशाही शहरें जाळलीं. 'आदिलशहा स्वतः येणार आहे तरी दरवाजे उघडे ठेवा' असा रात्रीं निरोप पाठवून युक्तीने पन्हाळा किल्ला ताब्यांत घेण्याचा डाव फसल्यामुळे शिवाजीने दुसऱ्या दिवशीं हल्ला केला. परंतु त्यांतही ५०० लोक मृत्युमुखीं पडले. अपयश आल्यामुळे राजापुराहून पांच गांव किंवा तीस मैल लांब असलेल्या खेळण्याकडे तो गेला. तेथे नेताजीचें आणि त्याचें भांडण झालें असें म्हणतात. हें भांडण खरोखरच होतें, कीं त्यांत आणखी कांही गोम आहे हें सागतां येत नाही. परंतु एवढें खरें की, नेताजी नेथून निघाला तो विजापूर दरबाराकडे जाऊन तेथील शहाला खूप करून त्याचेकडून त्याने दरसाल तीन लक्ष होनांची नेमणूक व मोगलाच्या सरहद्दीवरील कांही मुलूख मिळविला, आणि त्याच्या संरक्षणाकरिता म्हणून तो आदिलशहाच्या हुकुमावरून तिकडे गेला आहे.'—(शिवकालीन पत्र-सार संग्रह, पत्र क्र. ११२६)

नेताजी पालकराच्या आदिलशहाला मिळण्याचा परिणाम मिर्झा राजा जयसिंगावर फार विलक्षण झाला. त्याच्यासारखा शूर पुरुष आदिलशहाला मिळण्याचे घोर परिणाम त्याला दिसू लागले. जयसिंगाला असें वाटूं लागलें की, असाच जर शिवाजीही आदिलशहाला मिळाला तर मोगलांच्या फजितीस पारावार उरणार नाही. दिलेरखानाच्या कारस्थानाचा जर शिवाजीला पुन्हा वास आला तर कदाचित् शिवाजी विजापूरकरांना मिळण्याचाही संभव आहे असें त्याच्या मनाने घेतलें. एवढ्यांत त्याला अशी वार्ता कळली की, गोवळकोंड्याच्या कुतुबशहाने आदिलशहाला पन्नास सहस्र सैन्याचें अकस्मात् साह्य पाठविले आहे. त्याने एक योजना आखली. ती अशी की, या संकटाच्या वेळीं शिवाजीला येथे ठेवण्याच्या ऐवजी जर बादशहाच्याच भेटीला दिल्लीला पाठवून देतां आलें तर तें सर्वांत अधिक चांगलें होईल. पण ही आवळ्याची मोट बांधावयाची कशी हा मोठाच प्रश्न होता. त्याने औरंगजेबाला

शिवाजीस भेटीसाठी म्हणून साम्राज्यधानींत बोलावण्याविषयी विनंतिपत्रें लिहिलीं. पण औरंगजेब त्यांपैकी कोणत्याही पत्राचें प्रारंभीं उत्तरच देईना. शेवटीं दक्षिणेंतील संकटाची बादशहाला पूर्ण कल्पना द्यावी म्हणून जयसिंगाने त्याला लिहिलें की, 'आतां आदिलशाह व कुतुबशाह आमच्या विरुद्ध एक झाले आहेत, तेव्हा कसेंही करून शिवाजीचें मन आपल्याकडे वळवून घेतलें पाहिजे. बादशहाची भेट घेण्याकरिता म्हणून त्याला उत्तरेकडे पाठवून देणें जरूर आहे.' ––(शिवकालीन पत्रसार संग्रह पत्र क्र. १११२ )

औरंगजेबाने याही पत्राचें उत्तर तत्काळ दिलें नाही. एवढ्यांत जयसिंगाला काळजींत टाकणारी आणखी एक घटना घडली. ती म्हणजे औरंगजेबाच्या बंदींत असलेला त्याचा वृद्ध पिता बादशहा शहाजहान याचा मृत्यु होय. शहाजहान आग्र्याच्या किल्ल्यांत नऊ वर्षें औरंगजेबाच्या नजरकैदेंत होता. औरंगजेबाने भावाच्या व पुतण्यांच्या रक्ताचे टिळे आपल्या भालप्रदेशीं लावूनच राजसिंहासन हस्तगत केलें होतें. पित्याला त्याने यमसदनाला न पाठवितां नऊ वर्षें आग्र्याच्या किल्ल्यांत जिवंत ठेवण्याची उदारमनस्कता दाखविली ही त्याची आपल्या पित्यावरील कृपाच होय. या दोन पितापुत्रांचा एकमेकांचीं वर्मे काढणारा जो उपरोधिक पत्रव्यवहार चाले तो पाहण्यासारखा आहे. औरंगजेबाला शेवटपर्यंत आपला वृद्ध बाप आपल्याविरुद्ध बंड करून उठतो कीं काय अशी भीति वाटत असे व जर शहाजहान बंड करून उठला असता तर औरंगजेबाला तें मोडणें कठीण गेलें असतें. त्यामुळे शहाजहानचा मृत्यु ही औरंगजेबाला दुःखाऐवजी एक आनंदाचीच पर्वणी वाटली. दि. २२ जाने. १६६६ ला वयाच्या ७७ व्या वर्षी शहाजहानचा मृत्यु झाला. त्याच्या पूर्वीच आपल्या बापाला पैगंबरवासी करण्यासाठी औरंगजेबाने त्याच्या वैद्यांबरोबर विषाचे पेले पाठविले होते. पण त्या राजनिष्ठ वैद्यांनी आपल्या वृद्ध धन्याशीं कृतघ्नता न करतां औरंगजेबाच्या यमयातनांतून आपली सुटका व्हावी म्हणून स्वतःच तें विष पिऊन टाकलें. शहाजहान जिवंत

असेपर्यंत औरंगजेबाने आग्र्याला कधीही पाऊल ठेवलें नव्हतें. वृद्ध बादशहाच्या निधनसमयीं केवळ त्याची मुलगी बेगम जहाँआरा त्याच्याजवळ होती. होशदारखान नांवाच्या अधिकाऱ्याने या वृद्ध बादशहाचें प्रेत ताजमहालमध्ये त्याची प्रिय पत्नी मुमताज बेगम हिच्या थडग्याशेजारीं पुरलें. बापाच्या मृत्यूची वार्ता कळल्यावर आता सिंहासनाला कसलाही अडथळा उरला नाही या जाणिवेने औरंगजेब आनंदित झाला व दि. ४ फेब्रु. १६६६ ला दिल्लीहून निघून दि. १५ ला तो आग्र्याला येऊन पोहोचला. पितृमरणाचे यावनी विधि त्याने तेथे पार पाडले. जहाँआरा बेगम, परहेजबानू व गौहरआरा या आपल्या तिघी बहिणींचें त्यानें सांत्वन केलें, व स्वतःचा निवास कांही दिवस आग्र्यालाच ठेवला. जयसिंगाला काळजी वाटू लागली की, पितृमरणाच्या वातावरणांत असलेला औरंगजेब शिवाजीला उत्तरेंत बोलवावयास सिद्ध होईल कीं नाही ? पण आग्र्याला स्थिरावल्यावर जयसिंगाचें पत्र विचार करण्यासारखें आहे असें औरंगजेबाला वाटलें व त्याने जयसिंगाला आग्र्यालाच शिवाजीला पाठवावें असें लिहिलें.

तात्पर्य, महाराजांना आपल्या दरबारांत बोलावण्याची कल्पना मुळांत औरंगजेबाची नव्हे; इतकेंच नव्हे तर प्रथम तो विचार अधिक गांभीर्याने लक्ष देण्यासारखा आहे असेंही औरंगजेबाचें मत नव्हतें. मागाहून त्याला ती गोष्ट विचार करण्यासारखी वाटली. औरंगजेबाला तरी शिवाजीला आग्र्याला बोलावण्याची कल्पना कां रुचली असेल याचें बर्नियरनें दिलेलें कारण पुढीलप्रमाणे आहे :—

'The king meditating a war against Persia wrote to Sevaji in such kind and flattering terms, and extolled his generosity, talents and conduct so highly, as to induce him to meet the Mogul at Delhi' (Bernier, 190.)

'बादशहाने परशियाच्या राजाविरुद्ध युद्ध करावयाचें ठरविलें असून त्यासाठी योद्धा म्हणून शिवाजी त्याला हवा आहे. म्हणून

त्याने शिवाजीला नाना प्रकारचीं आमिषें दाखवून आपल्या कृपेचा त्याच्यावर वर्षाव करून अशी वागणूक दाखविली की, ज्यामुळे शिवाजीला दिल्लीला त्याच्या भेटीला येणें क्रमप्राप्त व्हावें.'

कॅरे व पी जे डी ऑर्लीन्स या इतिहासकारांनीही हेंच मत प्रदर्शित केलें आहे.

कोणत्याही कारणास्तव असो, पण औरंगजेबाने जयसिंगाच्या विचारांना संमति दिली व शिवाजी महाराजांना आग्र्याला भेटीस्तव पाठवून देण्याविषयी त्याला कळविलें. पण जयसिंगाच्या दृष्टीने औरंगजेबाला वळविणें जितकें कठीण होतें त्यापेक्षाही शिवाजी महाराजांना वळविणें अधिकच कठीण होतें.

श्रीशिवाजी महाराजांना लहानपणापासूनच मुसलमान राज्यकर्त्यांविषयी अत्यंत तिटकारा असून त्यांचें ताठ मस्तक कोणत्याही मुसलमान बादशहासमोर वाकविणें त्यांच्या दृष्टीने प्राणसंकटाचें होतें. शून्यांतून ब्रह्मांड निर्माण करण्याचें स्वतंत्र कर्तृत्व प्रकट करणाऱ्या महाराजांना बादशाही दरबारांतील दासतेचे संकेत व रूढि पाळण्याची संवय तर नव्हतीच, उलटी घृणा होती. धर्म, देव, गुरु व मातापिता यांच्या विना कोणाही समोर त्यांचें मस्तक कधीही नम्र झालें नाही; उलट त्यांच्या पराक्रमाने वांकलेलीं मस्तकें पाहण्याचींच त्यांना संवय झालेली होती. आजवर कोणाचेंही अंकितत्व न पत्करतां स्वतंत्र राजे म्हणून ते वावरले. स्वपराक्रमाने त्यांनी राज्य संपादन केलें. यवन सत्ताधिपांसमोर नतमस्तक होण्याचा प्रसंग नको म्हणून तर त्यांनी पुरंदरच्या संधीच्या वेळीं जयसिंग हवा तितका आग्रह करीत असतांनाही 'मी मोगलांच्या दरबारांत कधीही येणार नाही. मला त्यांची मनसब नको. माझा मुलगा त्यांचा मनसबदार होईल' असें स्पष्ट शब्दांत त्याला सांगितलें. ते शिवराय 'दुष्ट यवन तुरुखांचा' मुकुटमणि असलेल्या औरंगजेबासमोर नतमस्तक व्हावयास कसे जाणार? जयसिंगाच्या शब्दाचो तरी ते भलत्या बाबतींत बूज कशी राखणार?

जेथे जावयाचें त्या स्थानाची, अत्यंत सावध असलेल्या महाराजांना पूर्णपणें कल्पना होती. औरंगजेबाच्या दुष्टपणाविषयी त्या वेळीं भारतांत सर्वांनाच कल्पना असून कोणतेंही क्रूर कर्म करतांना त्यांचें हृदय कधीही चलित होणें शक्य नाही अशी सर्वांचीच दृढ धारणा होती. औरंगजेबाने आपल्या कर्तृत्वाने, धूर्तता, वाममार्गाचें अवलंबन व क्रौर्य, या संबंधांत मॅकिव्हलीच्या तत्त्वज्ञानावर आपल्या व्यवहाराने ताण केली होती. आपल्या प्रतिपक्षीयांचा पाडाव करून दूरदृष्टीने दिल्लीचें सिंहासन हस्तगत करतांना त्याने केलेला कपटाचा व नृशंसतेचा आश्रय, स्मरणानेही लोकांचा थरकांप उडविणारा होता. आपल्या सांवलीचा देखील संशय घेणारा म्हणून तो प्रसिद्ध असून स्वतःच्या मुलांच्यावर सुद्धा त्याचा विश्वास नसे. अशा कपटपटूच्या कोणत्याही आश्वासनावर विसंबून स्वतःचे प्राण संकटांत घालण्याइतके शिवाजी महाराजही असावध व भोळे नव्हते. पण शेवटीं शिवरायांना मिर्झा राजा जयसिंगाने प्रयत्नांची पराकाष्ठा करून वळविलें; व ते आग्र्याला जावयास सिद्ध झाले.

महाराज जसे औरंगजेबाला ओळखत होते तसेच ते जयसिंगालाही ओळखत होते. अर्थातच ते कोणाच्याही मायाजालांत फसून या संकटांत उडी घ्यावयास सिद्ध होणें शक्यच नव्हतें. मग ते कां गेले असतील? सर्वमान्य इतिहास संशोधकांचे या संबंधांत असलेले अभिप्राय पाहण्यासारखे आहेत. कै. सर जदुनाथ सरकार आपल्या 'शिवाजी व शिवकाल' या ग्रंथांत लिहितातः—

'शिवाजीचें मन वळवून त्याला दिल्लीच्या मोगल बादशहाबद्दल आपलेपणा वाटेल असें करून बादशहाला भेटण्यासाठी त्याची उत्तरेकडे रवानगी करून द्यावयाचें बिकट काम जयसिंगानें पत्करिलें होतें. परंतु, तें वाऱ्याची मोट बांधण्यासारखेंच होतें.... शिवाजीची मनोवृत्ति लहानपणापासूनच मुसलमानी दरबारांत 'हें शिर लववेना मातें' असेंच म्हणण्याकडे असून त्याने आतापर्यंत कोणत्याही पादशहाला मुजरा केलेला नव्हता .... म्हणून

पहिल्या प्रथम तर त्याने पादशहाच्या भेटीला जाण्याचें नाकारिलेंच. परंतु जयसिंगाने फारच आग्रह केला, व दिल्लीस गेल्याने पुष्कळ फायदा होण्याचा संभव आहे असेंही सांगितलें. कदाचित् दक्षिणची सुभेदारीही शिवाजीसच मिळेल असेंही जयसिंगाने सांगितल्याचें बखरी म्हणतात. 'इकडील दक्षिणच्या बादशाही इदलशाही व कुतुबशाही व निजामशाहीवरी आपणांस नामजाद करणें. तीन बादशाही फत्ते करूं. एक पादशाहो निजामशाही त्याही फत्ते केलीच आहे. दोन बादशाही तुम्हांस घेऊन देतो. म्हणून शिवाजी राजे जयसिंगास बोलिले.' असें सभासद म्हणतो. औरंगजेबाने मात्र कोणतेंच वचन दिलेलें नव्हतें. जयसिंगाच्या पत्रांतही दक्षिणची सुभेदारी शिवाजीस देण्याबद्दलची शिफारस अगर त्याने तसें वचन दिल्याचेंही दिसत नाही. तथापि जयसिंग मोठा मायावी व कपटी होता. त्याने दक्षिणच्या सुभेदारीची लालूच दाखविली असेल हें अगदी संभवनीय आहे. कारण, सन १६५६ पासून १६६६ पर्यंतच्या दहा वर्षांत औरंगजेबाचे मोठमोठे नामांकित सेनापति दक्षिणेंत येऊन नामोहरम होऊन गेले होते. आणि त्यामुळे अलीकडेच औरंगजेब स्वतःच दक्षिणेंत येऊन इकडील सुलतानांशीं लढाई देण्याचा विचार करीत होता. अशा प्रसंगीं शिवाजीसारखा जातिवंत लढवय्या व प्रख्यात विजयी सेनापति जर औरंगजेबाला मिळाला तर तो त्याचीच नेमणूक दक्षिणच्या सुभ्यावर करून दिल्लीहून मनुष्य व द्रव्य यांचा यथेच्छ पुरवठा त्यास करील व दक्षिणेंतील सुलतानांना जेरीस आणील असें जयसिंगाला वाटलें असणें अशक्य नाही. आपली सुद्धा डाळ दक्षिणेंत शिजत नाही याचा त्याला प्रत्यक्षच अनुभव आलेला असल्याने दक्षिण जिंकण्याला दक्षिणीच कोणी पाहिजे अशी त्याची खात्री झालेली होती. अशा एकंदर परिस्थितीमुळें शिवाजी दक्षिणेचा सुभेदार नेमिला जाण्याचा संभव जयसिंगास वाटणें साहजिक होतें व समक्ष भेटींत या गोष्टी नक्की होतील असें त्याने शिवाजीस सांगितलें असेल!

बादशहाला भेटण्यांत स्वतः शिवाजीचाही एक हेतु असून तो

प्रत्यक्ष भेटीशिवाय पार पडण्यासारखा नव्हता. तो हेतु असा की, " जंजिरा आपणाकडेस यावा ' असें शिवाजीच्या मनांत फार दिवसांपासून होतें. व त्याने बादशहाकडे तशी मागणीही केली होती. परंतु तिकडून टाळाटाळीचेंच उत्तर आलें होतें. हल्ली जंजिऱ्याचा सिद्दी औरंगजेबाचा नोकर म्हणवूं लागला असल्याने बादशहाकडून आपणांस जंजिरा मिळेल; परंतु त्यासाठी आपण त्यास समक्षच भेटलें पाहिजे असें शिवाजीस वाटत होतें. बादशहास भेटल्याने असा एकंदर लाभ होण्याचा संभव होता तरी शिवाजीचा निश्चय असा कांही होईना. त्याच्या मंत्रिमंडळालाही ही आग्र्याची सफर फारशी पसंत नव्हती. सहा वर्षांपूर्वी अफझलखानाच्या भेटीच्या वेळीं जी मनोवृत्ति मंत्रिमंडळाची होती तीच आज पुन्हा प्राप्त झाली. आग्र्यास जाणें म्हणजे सिंहाच्या गुहेंतच प्रवेश करणें होय असें त्यास वाटत होतें. जयसिंगाने शिवाजीच्या सुरक्षितपणाबद्दल शपथपूर्वक वचन प्रमाण केलें. त्याचा मुलगा रामसिंग दरबारांत होता. त्यानेही शपथा घेतल्या. त्यामुळें अखेरीस सिंहाच्या गुहेंत प्रवेश करण्याचें शिवाजीने ठरविलें.'

—(शिवाजी व शिवकाल, पृष्ठें १०३, १०४, व १०५)

शिवचरित्राचे विख्यात संशोधक डॉ. बाळकृष्ण यांनी कै. सरकारांचें विवेचन बरेंचसें मान्य करून शिवाय शिवरायांच्या स्थायी भावाला ओळखून स्वतःचें असें वेगळें अनुमान काढलें आहे. ते लिहितातः—

'We must consider the mysterious question why the ever vigilant and alert Shivaji should have reposed confidence in Aurangzeb and entrusted himself into the hands of his implacable enemy. He knew that the Emperor was cruel, crafty, suspicious, hypocritic and selfish to an extreme. Aurangzeb had tracked 'his unpattering way through a cloud of mysterious intrigues and a sea of blood to the throne.' He combined in him the venomous craft of Louis XI

with the merciless ferocity of Caesar Borosia. Shivaji thoroughly knew his host and yet the fearless 'Tiger of the Sahyadries' had invincible confidence in his extraordinary versatility to work out his release from any mishap that might befall him. In spite of apprehensions, he was ready to face the dangers for achieving his object.

Jai singh, to gurantee success in the war against Bijapur, desired to send away Shivaji from the Deccan, so that the latter should not lend any overt or covert aid to Ali Adil-Shah. He showed him strong hopes of obtaining the viceroyalty of the Deccan and the cession of Donda Rajapuri. Shivaji too was hopefull of winning over the Rajput Rajas of the north to the national cause by his magnetic persuations. His safety at Agra and his safe return to the Deccan were pledged with solemn oaths by Jai Singh who proposed to send his son Ram Singh with Shivaji to look after his comforts on his northward march and during his stay at Agra. It was for the realization of his cherished ideals that he accepted the invitation of the Emperor for an interview.'

—(Shivaji the great : by Dr. Balkrisna Vol. 1 Part II, P. 252/253)

'अत्यंत सावध व चाणाक्ष असलेल्या शिवाजी महाराजांनी औरंगजेबासारख्या पाताळयंत्री शत्रूवर विश्वास ठेवून त्याच्या जाळ्यांत स्वतःला कां अडकवून घेतलें या गूढ प्रश्नाचा विचार करणें अत्यंत आवश्यक आहे. बादशहा आलमगीर हा क्रूर, घातकी, संशयी, ढोंगी व मर्यादातीत स्वार्थी आहे हें शिवाजी महाराजांना परिचयाचें होतें. औरंगजेबानें सिंहासन मिळविण्यासाठी अनेक ढोंगें व कारस्थानें करून रक्ताचा सागर निर्माण केला होता. औरंगजेब म्हणजे ढोंगी, पाताळयंत्रीपणा व दयाशून्य क्रौर्य यांचा

अर्क होता. शिवाजीला आपल्या आमंत्रकाची सर्व दृष्टींनी पूर्ण कल्पना होती; आणि सह्याद्रीच्या या निर्भय व्याघ्राची अशीही दृढ धारणा होती की, आपण आपल्या विवेकशक्तीने कोणत्याही संकटांतून पार पडूं. हितचिंतकांनी विरोधी सल्ला दिला तरी आपलें ध्येय साध्य करण्यासाठी कोणत्याही संकटाला तोंड देण्याची महाराजांची सिद्धता होती.'

दक्षिणेंत विजापूरकरांशीं चाललेल्या युद्धांत निर्भेळ विजय संपादन करतां यावा म्हणून शिवाजीला दक्षिणेंतून दूर पाठवून देणें आवश्यक आहे असें जयसिंगाचें मत होतें. कारण त्या स्थितींत आदिलशहाला शिवाजीचें प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्ष साहाय्य मिळण्याची शक्यताच नष्ट होणार होती. जयसिंगाने शिवाजी महाराजांना बादशहाकडून दक्षिणची सुभेदारी मिळेल व दंडाराजपुरीच्या प्रकरणाचा त्यांच्या इच्छेप्रमाणें निर्णय लागेल असें प्रलोभन दाखविलें होतें. शिवाजी महाराजांना असें निश्चित-पणें वाटत होतें की, आपण आपल्या प्रभावी व्यक्तिमत्त्वाच्या भरंवशावर उत्तरेंतील राजपूत राजांना प्रभावित करून आपल्या राष्ट्रकार्यांत समाविष्ट करूं शकूं. यासाठी स्वतः आग्र्याला जाणें हा एकच मार्ग होता. जयसिंगाने आग्र्यांत त्यांना अपाय होऊं देणार नाही व सुरक्षितपणें दक्षिणेंत परत आणीन असें वचन दिलें होतें. जयसिंगाचा मुलगा रामसिंग आग्र्याला त्यांची व्यवस्था पाहणार होता. तात्पर्य, आपल्या ध्येयसिद्धीचा मार्ग सुकर व्हावा एवढ्यासाठीच शिवाजी महाराजांनी औरंगजेबाचें हें भेटीचें आमंत्रण स्वीकारलें.'

आग्र्याला जाऊन औरंगजेबाची भेट घ्यावयाच्या शिवछत्र-पतींच्या या निर्णयाच्या मागे कांही गूढ असावें असा संशय न्याय-मूर्ति रानडे यांनीही प्रकट केलेला आहे, आपल्या Rise of The Maratha Power या ग्रंथामध्ये न्यायमूर्ति रानडे म्हणतात : 'There must have been some deep laid scheme of policy' या निर्णयांत कांही अत्यंत गूढ असें राजकीय धोरण असलें पाहिजे.

न्यायमूर्तींच्याच प्रमाणे हें गूढ अनेकांना पडलेलें असून त्याचें ठामपणें उत्तर देणें इतिहास मीमांसकांना शक्य झालेलें नाही. एका प्रतिभासंपन्न इतिहासकाराने मात्र या गूढाचें धैर्याने विश्लेषण केलेलें आहे. हा प्रतिभासंपन्न इतिहासपंडित म्हणजे इतिहासाचार्य वि. का. राजवाडे हे होत.

श्री. राजवाडे यांनी महिकावतीच्या बखरीला लिहिलेल्या प्रस्तावनेंत या विषयाचा प्रथम ऊहापोह केलेला आहे. राजवाड्यांचें हें मत पुष्कळांना अतिशय असंभाव्य असें वाटलें. सभोवारच्या परिस्थितीचा विशेष विचार न करतां त्यांपैकी कांहींनी तर महाराजांच्या अगतिकतेचें पुराणच वारंवार उगाळण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यांतील एक इतिहाससंशोधक म्हणजे इतिहासाचार्य चिंतामणराव वैद्य हे होत. त्यांनी असें म्हटलें आहे की, 'शिवाजी महाराज हे विजापूर, गोवळकोंडे येथील मुसलमानी राज्यें मोगल साम्राज्यास जोडण्याची कामगिरी अंगावर घेऊन दक्षिणेची सुभेदारी मिळविण्यासाठी औरंगजेबाकडे गेले. आपण दक्षिणेत प्रबळ व्हावें नि मग पुढे जमेल तसें सामर्थ्य व बल वाढवीत राष्ट्रस्वातंत्र्याचा हेतु साध्य करावा असें महाराजांना वाटत होतें; अथवा स्वत: उत्तरेंत जाऊन रजपुतांचें संगनमत करून त्यांच्या साह्याने मोगल साम्राज्य नष्ट करावें असें त्यांच्या मनांत होतें. हे दोन्ही तर्क चुकीचे आहेत. औरंगजेबाच्या दरबाराची परिस्थिति निरखावी, त्यांतील वैगुण्यें व मर्मस्थानें जाणावींत आणि त्याच वेळीं राजपूत राजांशीं व सरदारांशीं सूत्रें बांधून ठेवावींत यासाठी महाराज उत्तरेंत गेले असावेत असें म्हणतात. परंतु आमच्या मतें याहीपेक्षा शिवाजी महाराजांना आग्र्यास जाण्यावांचून गत्यंतरच उरलें नव्हतें म्हणून ते गेले हेंच अधिक खरें असलें पाहिजे.'

पण वैद्यांच्या या प्रतिपादनाला महाराजांचा स्थायीभाव व घटना दोन्ही विरोधी आहेत. राजवाडे यांचा तर्क कै.दे. भ. गणेश दामोदर सावरकर यांनी एका स्वतंत्र पुस्तकांतून उचलून धरलेला

आहे. पुढील प्रकरणांत कै. राजवाडे यांचें प्रतिपादन, कै. सावरकर यांनी केलेलें विवेचन व कांही पाश्चात्य इतिहासकारांचे तर्क यांचा विचार करून महाराज आग्र्याला कां गेले असावेत याचा मागोवा घेण्याचा प्रयत्न करूं.



प्रकरण पांचवें

# महाराजांचें आग्र्यास प्रयाण

प्रत्यक्ष प्रमाणें नसतांही पुष्कळ ठिकाणीं सभोवारच्या परिस्थितीवरून आपल्या उत्तुंग प्रतिभेने इतिहासाचार्य राजवाडे यांनी जीं अनेक गूढ समस्यांची उत्तरें दिलेलीं आहेत त्या सर्वांत आग्रा प्रकरणाच्या गूढ समस्येचें त्यांनी दिलेलें उत्तर त्यांच्या प्रतिभेच्या उत्तुंगतेची अधिकच साक्ष देणारें आहे. महिकावतीच्या बखरीला लिहिलेल्या प्रस्तावनेंत या समस्येचें उत्तर देतांना श्री. राजवाडे लिहितात, 'शिवाजी ह्या व्यक्तीला ठार करण्यास औरंगजेब प्रयत्न करी नि औरंगजेब ह्या व्यक्तीचा प्राण घेण्याकरतां शिवाजी टपून बसे. पुढाऱ्याची उत्सवमूर्ति आणि तिचे हजार पांचशे प्रमुख सरदार उडविले म्हणजे दौलत गारद झाली ही बाब दोघेही जाणून होते. एकमेकांचा प्राण घेण्याचे दोघांचे असे डावपेंच चालूं असतां शिवाजीच्या मनांत औरंगजेबाला उडविण्याची व पातशाही काबीज करण्याची एक अचाट परंतु सर्वथा व्यवहार्य कल्पना आली. औरंगजेब स्वतः जातीने दक्षिणेस फार वर्षे आला नव्हता व पुढेही कित्येक वर्षे येण्याचा संभव नव्हता. औरंगजेबाला उचलावयाचें म्हणजे तो स्वतः दक्षिणेंत आला पाहिजे किंवा

शिवाजीने तरी उत्तरेस आग्र्यास गेलें पाहिजे. पहिला मार्ग नाही; तर शिवाजीने दुसरा मार्ग पत्करला. कसें तरी करून खुद्द आग्र्यास जावयाचें व तेथे औरंगजेबाचा म्हणजे त्याच्या पातशाहीचा कबजा घ्यावयाचा असा बेत शिवाजीने केला आणि तो बेत अत्यंत शिताफीने अमलांत आणण्याच्या मार्गास लागला. शाहिस्तेखानादि अनेक मुसलमान सरदारांना खडे चारणारा शिवाजी, जयसिंगापुढे दातीं तृण धरून केवळ गाय झाला. इतका गाय झाला की, जयसिंग सांगेल तें करण्यास तो राजी झाला. जयसिंगाने तोंडांतून शब्द काढण्याचा अवकाश की शिवाजीने त्याप्रमाणे केलेंच म्हणून समजावें. किल्ले द्या म्हटल्याबरोबर जयसिंगाच्या स्वाधीन किल्ले केले. भिकार पंचहजारी व्हा म्हटल्याबरोबर सगळ्या जगाला पालाण घालणारा तो महावीर क्षुद्र पातशाही सरदार बनला. आणि आग्र्यास चला म्हटल्याबरोबर पातशहाला आदबीने कुरनीस करण्याकरिता शिवाजी आग्र्यास निघाला. जयसिंगाने हा शेवटचा हुकूम करावा व तो आपण क्षणाचाही विलंब न लावतां ताबडतोब अमलांत आणावा ह्याच पर्वणीची शिवाजी चातकाप्रमाणें वाट पाहत होता. औरंगजेबाची प्रत्यक्ष व समक्षासमक्ष भेट होण्याचा व भेटीच्या प्रसंगीं पातशहा व पातशहात गारद करण्याचा हा कधी न येणारा कपिलाषष्ठीचा योग शिवाजीने लग्नमुहूर्ताप्रमाणे उत्सुकतेने साधला. औरंगजेबाच्या खुद्द मामाचीं बोटें छाटणारा व मामाच्या पोराचा जीव घेणारा शिवाजी, पातशहास कुर्निसात करावयास निघालेला पाहून संन्यास घेतलेल्या लांडग्याची आठवण जयसिंगाला व्हावयाला पाहिजे होती. परंतु तसा कांही एक प्रकार न होतां खुळ्या जयसिंगाला आपण बडी पातशाही कामगिरी बजावीत आहों अशी फुशारकी वाटली. हेंच शिवाजीला हवें होतें. शिवाजीने लीनतेचें सोंग इतकें बेमालूम आणलें की, शिवाजीला आपण नरम केला अशा वल्गना जयसिंग बडबडूं लागला. दिल्लींद्राचें पद पटकावण्याची ईर्षा शिवाजी आजन्म बाळगीत होता, हें हिंदुस्थानांतील

मुत्सद्दी जाणत होते; व जयसिंगाच्याही कानांवर हें गेलें नव्हतें असें नाही. ‘शिवप्रभृतिभूपालाः दिल्लीन्द्रपदलिप्सवः असें शिवाजीचें वर्णन जयसिंगाचा प्रशस्तिकार करण्याइतकी जगजाहीर ही आकांक्षा झाली होती. तथापि शिवाजीची हड्डी आपण मोकळी केली अशी फुशारकी जयसिंग मारीतच होता व स्वतःच्या मामाचा हात तोडणाऱ्या व मामाच्या पुत्राचा वध करणाऱ्या आततायीची भेट घेण्यास औरंगजेब सिद्ध झाला होता. जखमेवर फुंकर घालणाऱ्या शिवाजीने औरंगजेबाला ही जी भुरळ पाडली ती पाहून तत्कालीन शहाण्यांनी तोंडांत बोटें घातलीं असतील यांत संशय नाही. शिवाजी औरंगजेबाला स्नेहालिंगन देण्यास कडेकोट बंदोबस्त करून निघाला. बरोबर हजार पांचशे करोल व जातिवंत सरदार जिवाचे जिवलग व छातीचे निधडे असे त्याने घेतले; आणि मजल दरमजल दहादहा पांचपांच माणसें ठेवीत आग्ऱ्यांतील वाघाच्या गुहेंत सरज्याने प्रवेश केला. प्रथम भेटीच्या प्रसंगीं कुरनीस करण्याच्या वेळीं पातशाहाचीं व आपली जी लगट होईल त्या लगटींत सिंहासनावर उडी मारून पातशहाचा निकाल लावावा आणि दरबारांत जमा झालेल्या उमरावांची कत्तल करून तेथल्या तेथे हिंदुपदपातशाहीची स्थापना करावी आणि सरहद्दीवर जय्यत ठेवलेल्या सैन्याच्या जोरावर व धाकावर ती पातशाही स्थिर करावी असा शिवाजीचा बूट होता. चंद्रराव, अफझलखान, शाहिस्तेखान इत्यादींचा फडशा शिवाजीने असाच पाडला होता; तेंच दूरदृष्टिमिश्रित अघटित साहस या प्रसंगीं फलद्रूपतेस आणण्याचा शिवाजीचा आशय होता. परंतु औरंगजेबाला दरबारांत शिवाजीला आपल्यापासून शंभर हात दूर उभे करण्याची बुद्धि आयत्या वेळीं झाली म्हणून निभावलें; नाहीपक्षी चकत्यांच्या पातशाहीचा ‘रामबोलो’ त्याच समयीं होण्याचा प्रसंग बहुतेक ठेपल्यासारखाच होता.’ (महिकावतीची बखर, पृष्ठें ९४, ९५)

राजवाड्यांच्या या उत्तुंग कल्पनेलाच कै. गणेश दामोदर सावरकर यांनीही उचलून धरलें आहे. या कल्पनेचा पुरस्कार करतांना

सावरकरांनी अन्य इतिहासकारांच्या अन्य हेतूंविषयीच्या तर्कांना उत्तरें दिलेलीं आहेत. तीं उत्तरें विचार करावयास लावणारीं आहेत यांत शंका नाही. श्री. सावरकर लिहितातः—

(अ) 'दक्षिणेची सुभेदारी औरंगजेबाकडून मिळवून त्या नात्याने गोवळकोंडा नि विजापूर जिकावें आणि मग दक्षिणेंतील एकाधिपत्त्याचे सामर्थ्यावर औरंगजेबाशीं लढा लढावा असा तर्क कांहीजण करतात.

शंकानिरसनः— महाराज औरंगजेबाला पूर्णपणें ओळखून होते. आणि महाराजांचें सामर्थ्य, प्रभाव, पराक्रम आणि स्वतंत्र हिंदु-राज्याची महदाकांक्षा इत्यादि गोष्टी औरंगजेबाला माहीत असल्याने तो आपल्या हातीं दक्षिणेचीं सर्व सूत्रें देण्याचा मूर्खपणा करील अशी थोडीशीसुद्धा आशा महाराजांचे मनांत उदित होणें शक्य नव्हतें. उलट औरंगजेब आपणाला गोड गोड थापा देत बोलावून घेऊन शक्यतर अडकवून नष्ट करण्याचाच डाव रचील हें महाराजांना त्यांच्या पूर्वचरित्रांतील तशा प्रकारच्या निरपवाद मनोरचनेवरून नि तदनुसार त्याचे हातून घडलेल्या कृत्यावरून पूर्णपणें ठाऊक होतें. तेव्हा या कारणासाठी महाराज गेले म्हणणें हें महाराजांना यथार्थपणें न जाणण्याचें द्योतक ठरेल.

(आ) आग्र्यास जाऊन रजपूत राजांशीं संगनमत करावें नि सर्वांनी मिळून हिंदुस्थानांतून या मोगली मुसलमान सत्तेचें निर्मूलन करावें असा महाराजांचा हेतु होता असें कांहीजण म्हणतात.

शंकानिरसनः— आग्र्यास जाणें म्हणजे औरंगजेबाचे हातीं जाणें होतें. तसें तेथे जाऊन आपल्याला सुरक्षितता नि स्वस्थता लाभेल आणि त्या संधीचा लाभ घेऊन रजपूत राजे लोकांशीं संगनमत करूं अशी वेडी आशा करणारे महाराज नव्हते. एक तर रजपूत राजेलोकांशीं संगनमत करण्यासाठी आग्र्याला जाण्याचा द्राविडी प्राणायाम करावयाला महाराज प्रवृत्त झाले असें म्हणणें हें अप्रयोजकपणाचें ठरेल. रजपुतांशीं संगनमत करावयासाठी आग्र्यास औरंगजेबाचे दरबारीं न जातां अत्यंत विश्वस्त नि समर्थ

राजदूतांकरवी रजपूत राजांशीं संगनमताचीं बोलणीं करून एकत्र येण्याची नि वाटाघाट आणि चर्चा करावयाची योजना आखणेंच व्यवहार्य होणार होतें. तसें केल्याचें या आग्र्याचे प्रवासांत कोठेही उल्लेखित नाही. तेव्हा या आग्र्याचे प्रयाणांत या हेतूचा आरोप म्हणजे अवस्त्वारोपच आहे असें म्हणावें लागेल.

(इ) ग्रँट डफने लिहिलेल्या इतिहासांत तो म्हणतो की, शिवाजी महाराज आग्र्यास गेले ते साम्राज्याची परिस्थिति बघावी, त्यांतील वैगुण्यें हेरावींत नि साधल्यास रजपुतांशीं दळणवळण स्थापावें म्हणून गेले होते.

शंकानिरसन :– हेंही कारण लंगडें पडतें. परिस्थिति बघण्यासाठी नि वैगुण्यें टेहळण्यासाठी पाठविण्यास महाराजांजवळ एकापेक्षा एक माणसें होतीं. दुसरें या कामासाठी स्वतः जावयाचें ठरविलें असतें तर असा उघडपणें अवरंग्याचे दाभाडांत शिरण्याचा मार्ग त्यांनी खचित स्वीकारला नसता. यावरून लोकांनी तर्किलेले तर्क लंगडे, कोते नि वस्तुस्थितीशीं सुसंगत न ठरणारे असे ठरतात. महाराजांचा कांहीतरी निगूढ हेतु होता हें मात्र निश्चित.

कै. दे. भ. बाबाराव सावरकर यांनी शिवाजी महाराजांच्या आग्र्याला जाण्यासंबंधीच्या ज्या अन्य इतिहासकारांच्या तर्कांचें खंडन केलें आहे तें सयुक्तिक आहे; पण त्यांनी आपल्या विधेयकाच्या समर्थनार्थ जे पुरावे म्हणून मांडले आहेत तें कृत्रिम आहेत. आधी एक विधेयक मनाशीं ठरवून नंतर त्यांनी तें सिद्ध करावयाचेंच अशा आकसाने पुराव्यांची पेरणी केलेली आहे. उदाहरणार्थ, श्रीशिवाजी महाराजांनी जयसिंगाला पाठविलेल्या पत्राचा उपयोग करून औरंगजेबाचा वध करण्याच्या महाराजांच्या योजनेंत जयसिंग समाविष्ट होता असें त्यांनी मांडलें आहे. पण त्या पत्रावरून महाराजांचें अंतःकरण उघडें होत असलें तरी जयसिंग बादशहाचा वध करण्याच्या योजनेंत समाविष्ट होण्याइतका महाराजांना वश झाला होता असें त्या पत्रावरून मुळीच सिद्ध होत नाही. उलट

शिवाजी महाराजांना अपाय होऊं नये अशी जरी जयसिंगाची इच्छा असली तरी औरंगजेबाचा वध करण्याच्या योजनेंत भाग घेण्याइतका जयसिंग कणखर कधीच नव्हता. शिवाजी महाराजांना आग्र्याकडे पाठवून स्वतः मागे राहण्यांतही कै. बाबाराव सावरकरांना जयसिंगाचें धोरण दिसतें. पण ऐतिहासिक वस्तुस्थिति इतकीच आहे की, जयसिंगाला शिवछत्रपतींचें दक्षिणेंतील वास्तव्य नेताजी पालकराच्या विजापूरकरांशीं हातमिळवणी करण्याच्या क्षणापासून भयप्रद वाटत होतें. आपल्या दक्षिण विजयाच्या मार्गांतील हा मोठा अडथळा दूर करावा व शक्यतर शाही कृपेचा वरदहस्त शिवाजीकडे वळवून त्याचेंही लौकिक कल्याण साधावें हा जयसिंगाचा महाराजांना बादशहाच्या भेटीस्तव पाठविण्यामागे सरळ हेतु होता. आग्र्याला प्रयाण करण्याची मूळ कल्पना औरंगजेब व शिवाजी महाराज या दोघांचीही नसून केवळ जयसिंगाचीच होती व मागाहून ती औरंगजेबाच्या व त्यानंतर शिवाजी महाराजांच्या मनांत भरली याचा उल्लेख मागे केलाच आहे. महाराजांच्या सिद्धतेचें वर्णन करतांना त्यांचा मुख्य सेनापति नेताजी पालकर हा कृतक कलह करून त्यांच्याकडून विजापूरला गेला व नंतर पांच सहस्र स्वार घेऊन तो आग्र्याला उपस्थित होता असें बाबाराव सावरकर यांनी मांडलें आहे तें ऐतिसासिक दृष्टीने खरें नाही. नेताजीला पंचहजारी मनसबदारींचें आमिष दाखवून जयसिंगाने विजापूरकरांपासून भेदनीतीने फोडलें असलें तरी नंतर औरंगजेबाच्या आज्ञेने त्याला बंदी करून दिलेरखानाच्या स्वाधीन केलेलें होतें, व नेताजीला आग्र्याला नेण्यांत आलें तें बंदी म्हणून नेण्यांत आलें होतें. तेव्हां पांच सहस्र स्वार घेऊन नेताजी कधी दिल्लीला गेला नव्हताच. म्हणूनच आधी सिद्धान्त ठरवून नंतर मिळेल त्या पुराव्याचा असा उपयोग करून घेण्यांत आला आहे असें म्हणावें लागतें. मग शिवाजी महाराजांसारख्या चाणाक्ष पुरुषाने औरंगजेबाच्या गुहेमध्ये प्रवेश करण्याचें कां ठरविलें असेल? आमच्या मतें याचीं कारणें पुढीलप्रमाणे आहेत :—

(१) दिल्ली हें भारतीय मनाचें पूर्वीपासूनच एक महान् आकर्षण केन्द्र असून तेथील सिंहासनावर जो कोणी अधिष्ठित असेल त्याला भारताचा सम्राट् मानण्याची सर्वच लोकांची प्रथा होती. विलक्षण साहसी प्रवृत्तीच्या शिवाजी महाराजांच्या मनांत कै. राजवाडे म्हणतात त्याप्रमाणे सिंहासनाधिष्ठित औरंगजेबाला अफझलखान व शाहिस्तेखान यांच्या पद्धतीने कंठस्नान घालण्याचा यशस्वी प्रयत्न केल्यास सारें भारत हिंदुपद पातशाहींत रूपांतरित करणें सहज शक्य होईल असा विचार असणें अत्यंत स्वाभाविक आहे. नेत्याला कंठस्नान घातल्यावर केवढी विलक्षण राज्यक्रांति त्या काळीं होणें शक्य होतें हें विजयनगरचा इतिहास पाहिला तर सहज ध्यानांत येतें. औरंगजेबाविषयीच्या श्रद्धेपेक्षा हिंदू मनाचा न्यूनगंडच त्याचें सिंहासन स्थिरपद करावयास खरा कारणीभूत होता. त्यालाच कंठस्नान घालण्याने व तेंही भरसभेंत घालण्याने हा न्यूनगंड संपणार होता. महाराजांच्या साहसाच्या अद्भुत कथा सर्वत्र प्रचलित होत्या. ते निःशस्त्र स्थितींत भेटावयास गेले तरी जयसिंगा-सारख्या धीराच्या सेनानीला अंगरक्षकांच्या दक्ष वलयाची आव-श्यकता भासत होती; यावरूनच त्यांचा धाक किती पसरला होता याची कल्पना येते. तेव्हा महाराजांच्यासारख्या विलक्षण साहसी व प्रतिभासंपन्न क्रांतिकारकाच्या अंतःकरणांत असा एखादा विचार असणें सहज शक्य आहे.

(२) पण हा विचार यशस्वी होणें केवळ साहसी प्रवृत्तीवर अवलंबून नसून परिस्थितीवरही पुष्कळसें अवलंबून होतें. ज्याच्या भेटीला ते जात होते तो कोणी गर्विष्ठ व साम्राज्य-मदाने अंध झालेला पुरुष नसून अत्यंत सावध, पाताळयंत्री व आपल्या स्वतःच्या छायेचाही संशय घेणारा पुरुष होता याची त्यांना कल्पना होती. त्यामुळे अफझलखानाच्याप्रमाणे तें निश्चित साधूं शकेल असें नव्हतें याची महाराजांनाही पुरेपूर कल्पना होती. त्यामुळे परिस्थिति जर या साहसाच्या प्रतिकूल असली तर अकारण जीव संकटांत घालण्या-इतके महाराजही भावनाप्रधान नव्हते. त्यामुळे महाराज अनुकूल

परिस्थिति नसल्यास परिस्थितीच्या अनुसार जीं अन्य कामें त्यांच्या योजनांच्या दृष्टीने साधण्यासारखीं होतीं तीं साधून घेणार होते हेंही निश्चितच. त्यांच्यासारखा महापुरुष केवळ एकांतिक साहसाचाच विचार करील व अन्य गोष्टी विचारांच्या कक्षेंत येऊंच देणार नाही असें मानणें बरोबर नाही. महाराजांच्या मनांत असणारे जे अनेक विचार, त्यांत दक्षिणची सुभेदारी जयसिंगाच्या वचनाप्रमाणे आपणांस निश्चित मिळेल हा विचार जरी मूळ धरून नसला तरी दक्षिण जिकण्यासाठी औरंगजेबाला आपलें साह्य निश्चित लागेल व त्यासाठी आपल्याला दंडा राजपुरीचा प्रश्न अनुकूल असा सोडवून घेतां येईल असें निश्चितच वाटलें असेल.

(३) त्याचप्रमाणे विजापूर व गोवळकोंडयाच्या सत्ता मोगलांच्या रणसाहित्याने बुडवून आपलें आसन स्थिर केल्यावर त्याच साहित्याचा उपयोग मोगलांच्या विरुद्ध करणें आपल्याला शक्य होईल हाही विचार त्यांच्या मनांत असला पाहिजे.

तात्पर्य, आग्र्याला जाणें हें अनेक दृष्टींनी लाभदायक ठरण्याचा संभव असल्यामुळेच महाराजांनी तेथे जाण्याचा विचार निश्चित केला.

आग्र्याला जावयाचें तर स्वराज्याची संपूर्ण व्यवस्था करणें आवश्यक होतें. कदाचित् दैववशात् कपटपटु औरंगजेबाच्या बंदींत आपणांस राहावें लागलें अथवा प्राणांना मुकावें लागलें तरी त्यामुळे स्वराज्याचें कांही अडणार नाही अशी व्यवस्था त्यांनी केली. सेनापति नेताजी पालकराच्या जागीं कडतोजी गुजराला प्रतापराव ही पदवी देऊन त्यांनी त्याची नियुक्ति केली. पेशवे मोरोपंत पिंगळे, मुजुमदार निळोजी सोनदेव व सेनापति प्रतापराव गुजर यांचें एक राजप्रतिनिधि मंडळ त्यांनी स्थापन केलें, व त्याचें नेतृत्व आपली कर्तृत्वशील माता जिजाबाई हिच्याकडे दिलें. मातुःश्री जिजाबाईच्या आज्ञेंत राहून या तिघांनी स्वराज्याचा संपूर्ण कारभार चालवावयाचा होता. आपल्या माघारी गडकऱ्यांनी दक्षतेने गडांची राखण करावी व घालून दिलेल्या अनुशासनानुसार सर्वांनी

कडकपणाने राहावें अशा आज्ञा देण्यांत आल्या. मुलकी अधिकाऱ्यांनाही याच स्वरूपाच्या आज्ञा होत्या. सागरी सत्तेचीं सूत्रें दर्यासारंग दौलतखान, व मायनाक भंडारी यांच्या स्वाधीन करण्यांत आलीं. महाराजांनी स्वतः एकदा आपल्या छोटयाशा स्वराज्यांत फिरून जातीने सर्व व्यवस्थांचें निरीक्षण केलें. समवेत घ्यावयाच्या मंडळींत आठ वष वयाचे त्यांचे ज्येष्ठ पुत्र राजे संभाजी यांनाही त्यांनी घेतलें होतें. कारण औरंगजेबाचे मनसबदार शिवाजी महाराज नसून संभाजी राजे हेच होते. याशिवाय निराजी रावजी, सोनोपंत डबिरांचे चिरंजीव त्र्यंबकराव डबीर, रघुनाथ बल्लाळ कोरडे, बाजी सर्जेराव जेधे, माणकोजी हरि सबनीस, दत्ताजी त्र्यंबक, हिरोजी फर्जंद, राघोजी मित्रा, दावलजी गाडगे, मदारी मेहेतर, रामजी आणि कवींद्र परमानंद (शिवभारताचा कर्ता) अशी निवडक मंडळी त्यांच्या समवेत होती. अश्वदळ व पदाती मिळून चारसहस्र सैन्य होतें. शिवाय पालख्यांचे भोई व सामानाची वाहतूक करणारे वंजारीही होते. महाराजांच्या प्रयाणाची सिद्धता पूर्ण झाल्यावर स्वतःच्या सुरक्षिततेविषयी त्यांनी जयसिंगाकडून शपथ घेत्रविली. आणि दि. ५ मार्च १६६६ ला (फाल्गुन शुद्ध ९ शके १५८७ सोमवार) त्यांनी सर्वांचा निरोप घेऊन आग्र्यासाठी राजगडावरून प्रस्थान केलें. औरंगजेबाने या शाही पाहुण्याची प्रवासांतील व्यवस्था उत्कृष्ट व्हावी म्हणून सर्व प्रकारची काळजी घेतली होती. दक्षिणच्या बादशाही धनकोशांतून महाराजांच्या प्रवासासाठी एक लक्ष रुपये देण्यांत आले होते. महाराजांच्या प्रयाणस्थानापासून आग्र्यापर्यंत त्यांची व्यवस्था पाहण्यासाठी गाझी बेग या नांवाचा एक शाही प्रतिनिधि देण्यांत आला होता. तो वरून दिसायला महाराजांचा व्यवस्थापक होता व आंतून त्यांच्या प्रत्येक हालचालीवर लक्ष ठेवणारा औरंगजेबाचा हेर होता. वाटेंत लागणाऱ्या मोगलांच्या प्रदेशांतील सर्व अधिकाऱ्यांना शिवाजी राजांचा थाट व सन्मान राजपुत्राप्रमाणे राखण्याविषयी औरंगजेबाने आज्ञापत्रकें पाठविलीं होतीं. महाराज निघाले त्या

वेळीं जयसिंगाने तेजसिंग कछवा या नांवाचा आपला एक विश्वासू सरदार त्यांच्याबरोबर आग्र्यापर्यंत सोबत म्हणून दिला होता. कारण पाताळयंत्री बादशहा काय हवें तें करील याची जयसिंगालाही कल्पना होतीच. जयसिंगाने आपला पुत्र रामसिंग यालाही पत्र पाठविलें व त्याला स्वच्छपणें आग्र्याच्या निवासांत महाराजांच्या जीविताला अपाय होणार नाही याविषयी दक्ष राहण्यास सांगितलें. महाराजांचा प्रवास चालू असतांनाच वाटेंत त्यांना बादशहाचें पत्र मिळालें. तें पत्र असें :—

'तुमचें पत्र मिर्जा राजे जैसिंग यांणी ठरविल्याप्रमाणे इकडील प्रांतीं रवाना जालें. तें पावून संतोष जाला. ऐशियास इकडील लोभ तुम्हांवर पूर्ण आहे म्हणोन अदकार न करिता खातरजमेने मजल दरमजल करीत निघोन यावें. म्हणजे भेटीअंती बहूत सत्कार पावून माघारे जाण्याविषयीचा निरोप दिल्हा जाईल. सांप्रत तुम्हाकरिता पोशाख पाठविला आहे तो घ्यावा.'

—(शिवकालीन पत्रसार संग्रह, पत्र क्र. ११२३)

महाराज प्रवास करीत मोगलांची दक्षिणेकडील राजधानी औरंगाबाद येथे येऊन पोहोचले. त्यांना पाहण्यासाठी सहस्रावधि नागरिकांचे थवेच्या थवे एकत्र आले होते. महाराजांचा औरंगाबादेला मुक्काम होणार आहे अशी वार्ता तेथील अधिकाऱ्यांना आधीच गेल्या होत्या. पण तेथील अधिकारी सेख शिकनखान हा मोठाच घमेंडखोर होता. शिवाजी म्हणजे एक साधा जमीनदार, त्यांतून बादशहाला शरण आलेला; तेव्हा आपण त्याच्या भेटीला न जातां त्यानेच आपल्या भेटीला आलें पाहिजे असें त्याच्या मनाने घेतलें. आपल्या मोठेपणाच्या घमेंडीत त्याने आपल्या पुतण्याला महाराजांच्या सामोरे पाठविलें, व बरोबर असा निरोप दिला की, आपण आमच्या घरीं येऊन आम्हांस भेटावें. तो स्वतः आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांसह स्वतःच्या निवासस्थानींच शिवाजीची वाट पाहत बसून राहिला. महाराजांची स्वारी नगरांत प्रवेशली. आघाडीवर भव्य हत्ती होता. सभोवार सैनिकांची तुकडी होती.

सुवर्ण शिबिकेंतून महाराजांनी हा नगरप्रवेश केला होता. त्यांचे खास अधिकारीही शिबिकांतूनच होते; व त्या शिबिकांच्या पाठीमागून अंबारीसह दोन हत्तिणी डौलाने चालत होत्या. त्यामागोमाग सामानाने लदबदलेले उंट होते. शेख शिकनखानाच्या पुतण्याने आपल्या काकाचा उर्मट निरोप महाराजांना सांगितला. मोठमोठ्या सेनानींचा व नरवीरांचा थरकांप उडविणाऱ्या त्या पुरुषाला हा निरोप ऐकतांच काय वाटलें असेल ?

महाराजांनी त्याच्याकडे पूर्ण दुर्लक्ष केलें. तें इतकें की, ते सरळ आपल्या निवासस्थानीं जाऊन स्वस्थ राहिले. शेख शिकनखानाला हें कळल्यावर तो चांगलाच गोंधळून गेला. ज्याची व्यवस्था शहाजाद्याप्रमाणे ठेवण्याविषयी बादशहाची आपल्याला आज्ञा आहे त्याच्या संबंधांतलें आपलें हें वर्तन वर कळलें तर आपली कोणत्या पद्धतीची खरडपट्टी निघेल हें चित्र त्याला दिसूं लागलें व तो गडबडीने आपल्या अधिकाऱ्यांसमवेत महाराजांना जाऊन भेटला. महाराजांना नजराणा देऊन त्याने त्यांचा सन्मान केला व दुसऱ्या दिवशीं परत भेटीचें निमंत्रण दिलें. महाराजांनीही दुसऱ्या दिवशीं त्याला परत भेट देऊन रीतीप्रमाणे सर्वांचा सन्मान केला. कांही दिवस तेथे राहून व तेथील अधिकाऱ्यांकडून पुढच्या प्रवासाची तरतूद करून घेऊन त्यांनी औरंगाबाद सोडलें.

हें वर्ष औरंगजेबाच्या दृष्टीने अत्यंत महत्वाचें होतें. यापूर्वीपासूनच बादशहा औरंगजेब स्वतःला साम्राज्य सिंहासनावर बसवून सगळे बादशाही सोपस्कार करून घेत असला तरी त्याचा बाप जिवंत असल्यामुळे लोकांच्या दृष्टीने सामर्थ्याच्या पोटीं जन्म पावलेल्या बंडखोरीचें स्वरूप त्याला होतें. आता बाप मेल्यामुळे सिंहासनावर बसण्याचा व शाही सोपस्कार करवून घेण्याचा नैतिक अधिकारच औरंगजेबाला प्राप्त झाला होता. त्यामुळे पुन्हा एकदा समारंभपूर्वक राज्यारोहण करावें असें त्याने ठरविलें. महाराज प्रवासांत असतांनाच दि. २७ मार्च १६६६ ला आग्रा येथील दिवाण-इ-आम मध्ये बादशहाचा राज्यारोहण समारंभ थाटाने

पार पडला. या प्रसंगीं त्याने आपल्या बहिणींना पुष्कळ संपत्ति दिली. या समारंभानंतर आणखी एक भव्य समारंभ करावयाचें बादशहाने योजिलें होतें. दि. १२ मे १६६६ ला औरंगजेबाचा चांद्रमानाने पन्नासावा वाढदिवस होता. हा दिवस अधिकांत अधिक मोगली वैभवाचें प्रदर्शन करून साजरा करावयाचा असें औरंगजेबाने ठरविलें होतें.

शिवाजी राजे आग्र्याला येत असतांना त्यांच्या प्रवासांतील प्रत्येक घटनेची वार्ता गाजी बेगच्या द्वारा बादशहाला कळतच होती. या वाढदिवसाच्या भव्य व नेत्र स्तिमित करणाऱ्या समारंभांत शिवाजी राजांना भेट देऊन आपल्या वैभवाने त्यांना दिपवावें अशी औरंगजेबाने योजना केली. वाढदिवस समारंभाच्या एक दिवस आधीं आग्र्याला येऊन पोहोंचावें असें रामसिंगाचें महाराजांना पत्र गेलें. तें त्यांना वाटेंतच मिळालें, व तदनुसार महाराज समारंभाच्या एक दिवस आधीच आग्र्याच्या दक्षिणेस तीन कोसांवर येऊन थांबले; व या क्षणापासूनच राजनीतीच्या दृष्टीने अत्यंत आत्मघातक ठरलेल्या प्रयोगाला धर्मांध औरंगजेब बादशहाने प्रारंभ केला.

वस्तुतः शिवाजी महाराज हे स्वतः होऊन बादशहाच्या भेटीला गेलेले नसून बादशहाने निमंत्रिलेले अभ्यागत होते. त्यांनी तेथे जावें म्हणून मिर्झाराजा जयसिंगाने त्यांचा जो अनुनय केला त्यावरून स्वतःला मिळणार असलेल्या वागणुकीसंबंधी महाराजांच्या स्वाभाविकपणेंच वेगळ्या कल्पना होत्या. प्रवासांत त्यांची जी शाहजाद्याप्रमाणे व्यवस्था ठेवण्यांत आली होती, त्यावरून त्यांच्या त्या कल्पना दृढ होणें स्वाभाविक होतें. पण प्रत्यक्षांत त्यांना जी वागणूक मिळाली ती इतकी धक्का देणारी होती की, तिने त्यांच्या मनाची प्रसन्नता तर हिरावून घेतलीच; पण त्यांचा स्वाभिमान चांगलाच दुखावला गेला.

गेल्या सहा महिन्यांपासून शिवाजीराजे आग्र्यास येत असल्याचें गाजत होतें. मोठमोठ्या मोगल सेनानींचा रणमद जिरविणारा

भीमपराक्रमी पुरुष म्हणून त्यांचें नांव साम्राज्यधानींत दुमदुमत होतें. बादशाही पद्धति अशी होती की असा मोठा पाहुणा आला असतां शहरापासून पहिल्या विश्रामस्थळीं बादशहाच्या प्रतिनिधीने जाऊन त्याचें स्वागत करावयाचें व त्याला सन्मानाचे वस्त्रालंकार भेट म्हणून अर्पण करावयाचे. त्या दिवशीं त्या पाहुण्याच्या निवासाची व्यवस्था तेथेच करावयाची. दुसऱ्या दिवशीं समारंभपूर्वक नगरांतील राजरस्त्याने त्या पाहुण्याला मिरवीत बादशहाच्या भेटीला घेऊन जावयाचें. भेटीची वेळ बादशहाच्या ज्योतिषांनी निश्चित केलेली असे. पाहुण्याच्या योग्यतेनुसार बादशहाकडून त्याच्या स्वागतासाठी प्रतिनिधि जात असे. शिवाजी महाराजांनी आपली जी योग्यता स्वपराक्रमाने प्रतिष्ठित केली होती तिचा विचार केला तर बादशहाचा वजीर, शाहजादा अथवा असाच तोलाचा शाही प्रतिनिधि त्यांच्या स्वागतासाठी जाणें आवश्यक होतें. बादशहाने त्यांच्या स्वागतासाठी मिर्झा राजा जयसिंगाचा मुलगा रामसिग व मुखलिसखान यांना नियुक्त केलें. हे दोघेही दरबारचे अत्यंत क्षुद्र योग्यतेचे सरदार होते. रामसिग हा अडीच हजारी मनसबदार होता तर मुखलिसखान हा केवळ दीड हजारी मनसबदार होता. या दोन क्षुद्र सरदारांना शिवाजी राजांसारख्या पुरुषाच्या स्वागतासाठी नियुक्त करणें हाच त्यांच्या स्वाभिमानावरील पहिला आघात होता. प्रत्यक्षांत तर तो आघात अधिकच बोचक ठरला. कारण हे दोन क्षुद्र मनसबदारही स्वतः महाराजांच्या स्वागताला न जातां रामसिगाचा एक साधा कारकून मुनशी गिरिधरलाल त्यांच्या स्वागतासाठी आला. चाणाक्ष शिवरायांच्या ध्यानांत पुढचा सर्वच प्रकार आला. पण एकदा त्यांनी दृढ निश्चयाने या सापळ्यांत पाऊल घातलें होतें. पूर्ण सोक्षमोक्ष ठरल्यावांचून तें मागे घेण्याची शक्यताच नव्हती. ते कांही बोलले नाहीत.

त्यांची उतरण्याची व्यवस्था एखाद्या राजवाड्यांत अथवा एखाद्या मोठ्या मानकऱ्याच्या घरीं करण्याऐवजी मुलुकचंदाच्या सराईंत म्हणजे एका भिकारड्या धर्मशाळेंत करण्यांत आली.

ती रात्र शिवाजी महाराजांनी अपमानाने दग्ध झालेल्या मनःस्थितींत त्या धर्मशाळेंत काढली. दुसऱ्या दिवशीं त्यांना मिरवीत नगरांत घेऊन जाण्यासाठी रामसिंग येणार अशी त्यांची स्वाभाविकच अपेक्षा होती. पण औरंगजेब बादशहाने त्यांना एकाहून एक अपेक्षाभंगाचें धक्के द्यावयाचें हेतुपुरस्सरच ठरविलें होतें. बादशहाने आपण रामसिंगाला शिवाजी राजांच्या स्वागतासाठी नियुक्त केलें आहे हें हेतुपुरस्सर विसरून त्याला त्या दिवशीं सकाळीं आपल्या महालाभोंवती ससैन्य संरक्षकाचें काम सांगितलें. त्यामुळे तो स्वतः तिकडे अडकून पडला. व अगतिकतेने त्याने पुनश्च आपला कारकून मुनशी गिरिधरलाल यास महाराजांना नगरांत घेऊन येण्याच्या कामगिरीवर पाठविलें. त्याने येऊन महाराजांना नगरप्रवेशाची प्रार्थना केली, व सारी सुलतानी सिंहासनें आपल्या पराक्रमाने थरकांपविणाऱ्या त्या नरसिंहाचा हा असा नगरप्रवेश झाला. हे सारे प्रकार जणूं कांहीच नव्हेत असा आणखी एक घोटाळा झालाच.

रामसिंहाकडे बादशाही महालाच्या संरक्षणाचें असलेलें काम त्याच्या पुरतें संपतांच तो मुखलिसखानाला बरोबर घेऊन घाईघाईने महाराजांच्या स्वागतासाठी निघाला. पण आपला कारकून कोणत्या मार्गाने महाराजांना घेऊन येत आहे हें रामसिंगाला माहीत नव्हतें व अमक्या मार्गाने त्यांना घेऊन यावयाचें असें त्याने त्याला सांगितलेंही नव्हतें. त्यामुळे त्याचा कारकून महाराजांना दहर आराच्या बागेवरून घेऊन येत होता; तर रामसिंग व मुखलिसखान फिरोज बागेच्या रस्त्याने येत होते. कोणी तरी रामसिंगाला त्याची चूक ध्यानांत आणून देतांच त्याने आपल्या कारकुनाला निरोप पाठविला व शेवटीं रामसिंग व महाराज यांची गांठ नूरगंज बागेजवळ पडली.

स्वागताचा हा प्रकार व विचका पाहतांच प्रखर स्वाभिमानी शिवरायांचें रक्त किती तापून गेलें असेल ? जेम्स डग्लस याने असें म्हटलें आहे.

'After about three months in travelling this was the reception meted out to Shivaji Raja and the flower of the Deccan chivalry by the Emperor of Delhi. You may be sure that Shivaji had a bump in his throat, for at one glance he now took in the whole position; no, did every man of his dust-covered and toil-worn cavalcade as with sinking hearts each passed through the gates of the Imperial city.

—(Shivaji the Great By: Dr. Balkrisna. Vol I Part II P.254)

(तीन महिन्यांच्या प्रदीर्घ प्रवासानंतर, दक्षिणेंतील पौरुषाचें पुष्प असलेल्या शिवाजी राजांचें दिल्लीच्या बादशहाने या स्वरूपाचें स्वागत केलें. महाराज कांहीही बोलले नाहीत; पण एकाच दृष्टिक्षेपांत सारी परिस्थिति त्यांच्या ध्यानांत आली. प्रवासाने शिणलेल्या त्यांच्या सैनिकांच्याही तें ध्यानांत आलें. भग्न हृदयाने त्यांच्यापैकी प्रत्येकाने त्या राजधानींत प्रवेश केला.

औरंगजेबाने या आपल्या कृत्याने केवढी भयावह राजनैतिक चूक केली हें एल्फिन्स्टन व लेनपूल या इतिहासकारांनी मार्मिक रीतीने दाखविलें आहे. एल्फिन्स्टन म्हणतो:—

Aurangzib had now an opportunity of uniting Shivaji's interests to his own by liberal treatment, and of turning a formidable enemy into a zealous servant, as had been done before with so many other Hindu princes; but his views in politics were as narrow as in religion, and although he could easily suppress his feelings to gain any immediate advantage, he was incapable of laying aside his prejudices, or making such full and free concessions as might secure permanent attachment. Moreover, he despised as well as disliked Shivaji; he felt the insults offered to his religion and his dignity the more because they came from so ignoble

a hand; and he so far mistook the person he had to deal with as to think he would be most easily managed by making him sensible of his own insignificance.

—(Elphinstone's History of India, PP. 612–13)

लेनपूलने म्हटलें आहे:—

The visit was not a success. Aurangzib clearly did not understand the man he had to deal with, and showed a curious lack of political sagacity in his reception of the Maratha. No prince or general in all India could render the Emperor such aid in his designs against the Deccan kingdoms as the rude highlander who had at last come to his feet. A good many points might well be stretched to secure so valuable an ally.'

—(Aurangzib by LanePoole PP. 164–5)

महाराज रामसिंगाच्या निवासस्थानीं जाऊन त्याच्याच समवेत बादशहाच्या वैभवशाली राजसभेकडे जावयास निघाले व जगाच्या साहसी इतिहासात मूर्धास्थानीं शोभणाऱ्या एका महान् संविधानकाचा प्रारंभ झाला.



प्रकरण सहावें

# दरबारांतील समरप्रसंग

आग्र्याच्या परिसरांतील प्रथमपासूनच्या अपमानाने क्रुद्ध झालेल्या शिवरायांनी आपल्या उद्दिष्टपूर्तीकडेच सर्व लक्ष केंद्रित करून रार्मासगासमवेत त्याच्या निवासस्थानीं प्रवेश केला. राम-सिंगाच्या निवासस्थानाजवळच त्यांच्यासाठी स्वतंत्र उतरण्याची व्यवस्था करण्यांत आली होती. ते आपल्या निवासस्थानीं आले तोंवर बादशहाच्या वाढदिवसाच्या राजसभेला प्रारंभ झालेला असल्यामुळे रार्मासगाच्या इतर आदरातिथ्याकडे लक्ष न देतां ते सरळ त्याच्याबरोबर राजसभेकडे जावयास निघाले.

ही वाढदिवसाची राजसभा मोगलांच्या साम्राज्यसत्तेच्या वैभवाचें प्रदर्शन करण्यासाठीच औरंगजेबाने भरविलेली असल्या-मुळे तिची शोभा केवळ अवर्णनीय होती. सारे अधिकारी वा अमीर उमराव श्रीमंती वेषांत सजून आलेले होते. बादशहा औरंगजेबाची त्या दिवशीं सुवर्णतुला व रजततुला व्हावयाची होती. राजसभेच्या छताला मूल्यवान् झालरी लावण्यांत आलेल्या होत्या. या जागीं शिवाजी महाराजांची भेट घेऊन त्यांना त्यांची क्षुद्रता सामर्थ्याच्या आणि वैभवाच्या दृष्टीने असलेली स्वतःची महत्ता औरंगजेबाला पटवून द्यावयाची होती. पण महाराजांविषयीच्या अत्यंत अद्‌भुतकथा त्या वेळीं सर्वतोमुखी झालेल्या होत्या. शिवाजी चाळीस चाळीस हात लांब उडी मारून आपल्या शत्रूला कंठस्नान घालतो असें त्यांच्याविषयी बोललें जात होतें. औरंगजेबाला, अफजलखानाला त्याच्या दहा सहस्र सेनेसमक्ष ठार करणाऱ्या पुरुषाच्या साहसाविषयी कोणी विशेष कांही सांगण्याचीही आवश्यकता नव्हती. त्यामुळे शिवाजी महाराजांचा राजसभाप्रवेश हा औरंगजेबाच्या दृष्टीने अत्यंत भीतीचा व संकटाचा विषय होणें स्वाभाविक होतें. स्वतःच्या सावलीचा सुद्धा संशय घेणारा

तो महाधूर्त व पाताळयंत्री पुरुष शिवाजीराजासारख्या साहसी शत्रूच्या संबंधांत कोणतीही असावधानता बाळगणें केवळ अशक्य होतें. साधारणतः महाराजांची झेप पोहोचूं शकणार नाही इतक्या उंचीवर त्याने आपली बसण्याची जागा केलेली होती. स्वतःजवळ आयत्या वेळीं उपयोगी पडावीं म्हणून पांच शस्त्रें त्याने ठेविलीं होतीं आणि निवडक दोन सहस्र योद्धे, अगर रक्षक म्हणून त्याने आपल्या भोवती सुसज्ज ठेविले होते. डग्लसने म्हटलें आहेः——

'Conscience makes cowards of us all, and the Emperor had a kind of conscience. On this occasion he wore chain armour under his muslin dress and five weapons about his person. Moreover he had two thousand of his bravest men near around him. Where they were stowed away we must leave others to determine, who are familiar with the topography of the place. But remembering Afzal Khan's and jaoli's assassinations a nd Poona palace escalade, remembering also his own crimes in the expressive language of the 'holy writ' the shaking of a leaf, would, on that memorable day, have put him to flight. 'Shivaji' he said, 'was not a man but a devil.'

—(Shivaji the Great by Dr. Balkrishna Vol. I Part II.P.255)

(सावधपणा आपणा सर्वांच्याच ठिकाणीं भीरुता उत्पन्न करण्यास कारणीभूत होतो; व बादशहा अत्यंत सावध होता. या प्रसंगीं औरंगजेब बादशहाने आपल्या अंगांत जाळीचें पोलादी चिलखत घातलेलें असून त्यावर आपला दरबारी यावनी पोशाख चढविलेला होता. स्वतः जवळ पांच हत्यारें धारण केलेलीं होतीं. याशिवाय त्याच्या भोवताली दोन सहस्र सशस्त्र निवडक योद्ध्यांचें, अंगरक्षक म्हणून कडें होतें. ते कोणत्या स्थळीं व कोणत्या पद्धतीने उभें होतें हें त्या जागेच्या भौगोलिक स्थितीचा जाणकारच सांगूं शकेल.

अफझलखानाचा व जावळीच्या चंद्रराव मोऱ्यांचा वध आणि पुण्यांतील शाहिस्तेखानाच्या विटंबनेचें प्रकरण यांच्या भीतिप्रद आठवणी व स्वतःच्या अनंत कृष्ण कृत्यांचें स्मरण यामुळे औरंगजेब मनांतून इतका भ्याला होता की, 'त्या संस्मरणीय दिवशीं झाडाचें एखादें पान हललें असतें तरी तेवढें त्याला पळून जावयास पुरेसें निमित्त होतें' या वचनाची आठवण व्हावी. तो म्हणत असे, 'शिवाजी हा माणूस नसून सैतान आहे!')

महाराज राजसभेच्या दाराशीं येतांच त्यांच्या आगमनाची वार्ता आंत कळविण्यांत आली. बादशहाच्या आज्ञेवरून बक्षी आसदखान त्यांना आंत न्यावयास सामोरा आला. शिवाजी राजे, युवराज संभाजी, त्यांच्या बरोबरीचे दहा सरदार व रामसिंग यांना घेऊन बक्षी आसदखानाने आंत प्रवेश केला. महाराजांचा प्रवेश आंत होतांच त्यांची आणि औरंगजेबाची दृष्टि क्षणमात्र एकमेकांवर खिळून राहिली. ते परस्परांचे हाडवैरी एकमेकांवर दृष्टि जातांच कोणत्या विलक्षण भावविश्वांत असतील हें वर्णन करणें कोणत्याही इतिहास-काराला केवळ अशक्य आहे. महाराजांनी आंत प्रवेश केला त्या वेळीं केवळ बादशहा सिंहासनावर बसला होता व वजीरासुद्धां सारे-जण उभे होते. एकवार बादशहाकडे त्यांची दृष्टि जातांच त्याने स्वसंरक्षणाची केलेली सारी सिद्धता शिवरायांच्या धूर्त दृष्टीला जाणवली. ते तसेच चालत शाही सिंहासनाजवळ गेले. बक्षी आसदखानाने महाराजांचा बादशहाला परिचय करून दिला. कोठेंही न नमलेलें त्या नरसिंहाचें मस्तक राजकीय हेतूस्तव त्या पापमय सिंहासनासमोर नमलें. त्या वेळीं त्यांच्या स्वाभिमानी मनाला केवढ्या यातना झाल्या असतील! महाराजांनी सिंहासनाला पद्धतीप्रमाणे त्रिवार मुजरा करून बादशहापुढे स्वतःच्या नांवाने एक सहस्र मोहरा, दोन सहस्र रुपये नजराणा व पांच सहस्र रुपये निसार म्हणून ठेविले. संभाजीच्या नांवाने पांचशे मोहरा, दोन सहस्र रुपये नजराणा व पांच सहस्र रुपये निसार म्हणून बादशहाला अर्पण केलें.

येथपर्यंत सर्व ठीक झालें. पण बादशहाने यानंतर स्वतःच्या चेहऱ्यावर कोणताही भाव न दाखवितां केवळ संकेत केला. त्या बरोबर महाराजांना संभाजीसहित पंचहजारी सरदारांत म्हणजेच तिसऱ्या वर्गाच्या सरदारांच्या रांगेंत नेऊन उभें करण्यांत आलें. तेंही अशा ठिकाणीं की जेथून महाराजांना बादशहाचें तोंडही दिसेना. महाराजांना शहाजाद्याप्रमाणे वागवावयाचें वचन औरंगजेब बादशहाने याप्रमाणे पूर्ण केलें! यानंतर त्यांच्याकडे कोणी लक्षही दिलें नाही. राजसभेंत पानसुपारीचें तबक फिरूं लागलें. मानाची खिलत वाटण्यास प्रारंभ झाला. ही खिलत शाहजादे, वजीर व जसवंतसिंग यांना देण्यांत आली. शिवाजी राजांना त्यांतूनही वगळण्यांत आलें. अंशतः सुरक्षिततेविषयी सावधगिरी व शिवाजीला आपण किती क्षुद्र समजतों या गोष्टीचें प्रदर्शन यांच्या आहारीं बादशहा गेला होता. साहसी विचारांना कृतींत आणण्याचा पूर्ण असंभव, अन्य विचारांच्या व योजनांच्या सफलतेविषयी बादशहाच्या वर्तनाने उत्पन्न झालेली निराशा व अपमानाच्या शल्याचे वारंवार झालेले आघात यांमुळे तो सह्याद्रीचा निर्भय वनराज अगदी खवळून गेला. साऱ्या दरबाराला अनपेक्षित अशी सिंहगर्जना त्या दरबारांत उमटली. महाराजांनी दरडावणीच्या स्वरांत रामसिंगाला विचारलें, ‘रामसिंग, हा माझ्यासमोर कोण उभा आहे?’ त्या गर्जनेने रामसिंग घाबरून गेला. आपल्या अडीच हजारी मनसबदारांच्या रांगेंतून शीघ्रगतीने महाराजांच्या जवळ येऊन तो सांगूं लागला, ‘हे महाराजा जसवंतसिंग.’ त्याबरोबर क्रुद्ध झालेले महाराज स्वर अधिक उंचावून म्हणाले, ‘जसवंतसिंगासारखा उमराव! याच्या पाठी माझ्या लष्करांनी पाहिल्या असतील. याचे खाले आपण उभे रहावें म्हणजे काय?’ (सभासद) स्वराज्यांतून अनेक वेळा मार खाऊन पळालेल्या जसवंतसिंगाइतकीही या राजसभेंत आपली योग्यता मानली जात नाही याचा महाराजांना उद्वेग वाटला. जसवंतसिंगाच्या कानांत मात्र त्यांचे शब्द तापल्या सळईसारखेच शिरले. सारा दरबार आश्चर्याने थक्क होऊन पाहूं लागला. जेथे हसण्याची अथवा

बादशहाकडे पाहण्याची सुद्धा चोरी, केवळ खाली मान घालून लाचारीने राहवयाचें व चोरट्या दृष्टीने बादशहाकडे पाहावयाचें हाच जेथील शिष्टाचार, तेथे ही सिंहगर्जना केवढ्या आश्चर्याचा, भीतीचा व कुतूहलाचा विषय झाली असेल!

महाराजांनी पुन्हा रामसिंगाला विचारलें, 'मला कोणाच्या ओळींत उभें करण्यांत आलें आहे.' त्यांना शांत करण्याचा प्रयत्न करीत रामसिंगाने पंचहजारी मनसबदार हा शब्द उच्चारतांच महाराज अगदी खवळून गेले. ते संतप्त स्वरांत म्हणाले 'काय? माझा सात वर्षांचा शंभू दरबारांत न येतांही पंच हजारी सरदार बनविण्यांत आला. माझा चाकर नेताजी पालकरही पंच हजारी सरदार आहे, आणि माझी सुद्धा तितकीच योग्यता काय? दक्षिणेंत बादशहाचें येवढें मोठें काम साधून इतक्या दूर मी या दरबारांत आलों तो काय इतक्या क्षुल्लक मनसबदारीकरता आलों आहे काय?'

महाराजांची रागीट मुद्रा व सिंहगर्जना पाहून त्या दरबारांत कित्येक लोक पुढे कोणता प्रलय ओढवणार याची नुसती कल्पना करूनच भयकंपित झाले तर कित्येक गर्भदासांना या उद्धटपणाचा अतिशय राग आला. रामसिंग तर अगदी गोंधळून गेला. तो पुन्हा महाराजांना समजावून सांगण्याचा प्रयत्न करूं लागला, तोच महाराज पुन्हा गरजले. 'तुला आणि तुझ्या पिताजींनाही मी कोण आहे हें चांगलें माहीत आहे. इतकेंच नव्हें तर तुझ्या बादशहाला देखील तें चांगलें माहीत आहे. असें असूनही बुद्धया मला इतक्या दूर व क्षुद्र ठिकाणीं उभें करण्यांत आलें आहे! मला तुमची ही मनसब मुळीच नको. मला येथे उभें करण्याचेंच काय प्रयोजन? मला येथे उभें रहावयास सांगण्यापूर्वी माझ्या योग्यतेचा विचार करणें आवश्यक होतें.'

'एवढें बोलून महाराज आपल्या स्थानाहून एकदम बादशहाकडे पाठ करून वळले व जराशा अंतरावर जाऊन बसले. रामसिंग त्यांची समजूत घालण्याचा प्रयत्न करूं लागला. महाराजांनी त्याचा

हात झिडकारून सांगितलें की, 'माझा मृत्यु झाला तरी चिंता नाही, पण मी या बादशहाचें तोंड सुद्धा पाहणार नाही. मी स्वतःच आत्महत्त्या करतो, ते रामसिंगाजवळ कटचार मागूं लागले. ती कटचार कशाकरितां होती? जेम्स डग्लस म्हणतो—

What he intended to do with the daggar had he obtained it, is unknown – Aurangzeb, Jaswant or himself.'

(जर कटचार मिळाली असती तर शिवाजी काय करणार होता? तें एक न सुटणारें गूढ आहे. त्या कटचारीचें लक्ष्य औरंगजेब होता कीं जसवंतसिंग कीं तो स्वतःच्याच छातींत ती भोसकणार होता? )

महाराज स्वतःच्याच छातींत ती भोसकण्याइतके कातर हृदयाचे आत्महत्त्यावादी नव्हते. जसवंतसिंगासारख्या गर्भदासाच्या हृदयांत ती भोसकण्याचा कांही उपयोग नव्हता हें ते चांगलें जाणत होते. दुरून कटचारीने लक्ष्यवेध करणें त्यांच्यासारख्या शस्त्रवेत्त्याला सहज शक्य होतें. साऱ्या शत्रूंचा मुकुटमणि असणाऱ्या औरंगजेबाच्या कंठनालाविना त्या कटचारीचें दुसरें काय लक्ष्य असूं शकणार? पण रामसिंगाला ते आत्महत्त्येसाठी कटचार मागतात असेंच वाटलें. त्याने ती त्यांना न देतां उलट दरबारांत विनयाने उभे राहण्याविषयी त्यांचीं आर्जवें चालविलीं. निराशा व क्रोध यांच्या अतिरेकाचा परिणाम होऊन महाराज तेथेच मूर्छित पडले.

परमसंयमी व विकारातीत स्थितप्रज्ञ असणारे शिवराय केवळ अपमानाच्या जाणिवेने मूर्छित झाले असतील काय ? भावनांचें, सावधता नष्ट करण्याइतकें, तांडव त्यांच्या अंतःकरणांत उचंबळलें असेल काय ? व तेंही केवळ दरबारांतील विशिष्ट क्षुद्रता पाहून! महाराजांच्या अंतःकरणाला चांगलाच निराशेचा धक्का जाणवला असला पाहिजे. त्यावरून वेगळ्या स्वरूपाची फार मोठी महत्त्वाकांक्षा त्यांच्या मनांत घोळत असली पाहिजे हें उघड होतें. मूर्च्छेइतकी निराश करणारी ती महत्त्वाकांक्षा कोणती असेल? सिडने ओवेन म्हणतो :—

Then the question naturally arises as to why he was so seriously perturbed and so bitterly disappointed? Was it not because he realised that he was checked, if not checkmated in his deep secret game? Because he had good reasons to suspect that Aurangzeb was resolved to give him no opportunity of playing it.'

'स्वाभाविकपणेंच असा प्रश्न उत्पन्न होतो की, शिवाजी इतका गंभीरपणें त्रस्त व इतका भयंकर निराश कां झाला असेल? आपण आपली भयंकर योजना पार पाडण्यासंबंधांत पूर्णपणें अवरुद्ध झालों हें त्याच्या लक्षांत आलें म्हणून तर तो इतका त्रस्त व निराश झाला नसेलना! जरी त्याची भयंकर गुप्त योजना फुटली नसली तरी ती यशस्वी होऊंच शकत नव्हती. कारण त्याला हें लक्षांत यावयास पुरेसें कारण घडलें होतें की त्याची योजना प्रत्यक्षांत आणण्याची कोणतीही संधि औरंगजेब त्याला मुळीच देणार नव्हता.'

तात्पर्य, मोगल साम्राज्यशाहीच्या त्या मध्य केन्द्रांवर चिर परिणामी आघात करण्याचें महाराजांचें अभिलषित औरंगजेबाच्या सवाई धूर्ततेने पूर्णपणें धुळीस मिळालें. आता केवळ औरंगजेबाच्या कृष्णकारस्थानाचे पुढचे विषारी पाश स्वतःभोवती पडलेले पाहणेंच भाग्यांत उरलें या जाणिवेनेच महाराज मूर्च्छित पडले हें उघड आहे.

दरबारांतील शिवाजी महाराजांच्या त्या आवेशयुक्त सिंहगर्जना व सिंहासनाकडे पाठ वळवून जाणें यामुळे झालेल्या गोंधळाकडे बादशहाचें लक्ष वेधलें. सभासद म्हणतो— हें पाहून पादशाह म्हणूं लागले की 'काय जाहलें?' रामसिंग बोलला की 'जंगली वाघ हयवान, त्यास गर्मा जहाला. कांहीं करीणा जहाला' असें बोलतांच पादशहाचे मनांत शंका उत्पन्न जहाली. काय होईल तें न कळे' रामसिंगावर महाराजांच्या प्राणांचें त्याच्या पित्याने सोपविलेलें दायित्व होतें. औरंगजेबासारख्या क्रूरकर्म्याच्या दरबारांत त्याने शाही क्रोधाचे अनेक भयावह आविष्कार पाहिले होते. त्यामुळे

शिवाजी राजांवर तो प्रसंग येऊं नये म्हणून तो बादशहाची समजावणी करूं लागला की, 'याने कधी पादशाही दरबार पाहिला नाही. याच्या चालीरीती दक्षिणी लोकांच्या आहेत.'

औरंगजेबाच्या मनांत त्या वेळीं शिवाजीचें काय करावें याचा निश्चय झालेला नव्हता. त्याने शेजारच्या खोलींत त्याला नेऊन गुलाबपाणी वगैरे शिंपडून सावध करावयास रामसिंगाला सांगितलें. महाराज सावध झाल्यावर औरंगजेबाने मुलतफतखान, अकीलखान व मुखलीस या तीन सरदारांना आज्ञा दिली की, 'शिवाजीला मानाची खिलत द्या. त्याची समजूत घालून त्याला सिंहासनासमोर घेऊन या. ते तिघेही सरदार महाराजांजवळ आले व त्यांची समजूत घालूं लागले. पण महाराजांनी स्पष्ट शब्दांत सांगितलें की, 'आतां मला ही मानाची खिलत मुळीच नको. माझी योग्यता माहीत असतांही बादशहाने जाणून बुजून मला जसवंतसिंहाच्याही मागे उभे केलें. मला बादशहाची मनसब व खिलत नको. वाटेल तर मला ठार करा पण मी ही खिलत घेणार नाही.'

ते सरदार हात चोळीत परतले व झाला प्रकार त्यांनी भीत भीत बादशहाला सांगितला.

## महाराजांची मूर्च्छा

शिवचरित्रांतील जे अनेक विवादास्पद प्रसंग आहेत त्यांतच महाराजांची मूर्च्छा हाही एक वादाचा विषय झालेला प्रसंग आहे. शिवचरित्रविषयक प्राचीन साहित्यांत कांही ठिकाणीं त्यांच्या मूर्च्छेचा निर्देश आहे; तर कांही ठिकाणीं नाही. म्हणून या विषयाची थोडीशी चर्चा करणें आवश्यक आहे. सभासदाची बखर, शिवदिग्विजय, रायरी बखर व मल्हार रामराव चिटणिसांची बखर यांत महाराजांच्या या राजसभेंतील मूर्च्छेचा उल्लेख नाही. मनूची, थेवेनॉट, कॅरे, डी ऑर्लिअन्स, ओर्मे, डफ, तारीख ई शिवाजी व आलमगीरनामा या साहित्यांतही महाराजांच्या मूर्च्छेचा उल्लेख नाही. महाराजांच्या मूर्च्छेचा निर्देश काफीखानाने मात्र केलेला

आहे व जे. स्कॉट्, मिल, एल्फिस्टन, बेव्हेरीज्, मॉंटग्‍मॅामेरी, मार्टिन्, डग्लस या लेखकांनी काफीखानाचेंच अनुकरण केलेलें आहे. सर्व समकालीन व जुन्या लेखकांत महाराज राजसभेंत मूर्च्छित झाले नाहीत या संबंधांत एकमत असल्याचें दिसतें. काफीखानही महाराज मूर्च्छित पडले असें विधान करीत नसून त्यांनी मूर्च्छेचें सोंग केलें असें म्हणतो. काफीखान लिहितो :—

'(1) Raja Jaising had flattered Shivaji with promises but as the Raja knew the Emperor to have strong feeling against Shivaji, he artfully refrained from making known the promises he had held out. (2) The reception of Shivaji had not been such as he expected. (3) As his eight years old son Sambha had been created a commander of five thousand and his relation Netaji, too, had been raised to the same rank, this stupid, empty brained, proud fellow (Shivaji) expected no less high a degree than the command of 7000 men. (4) He did not receive most of the Royal favours with the promise of which the Raja (Jai Sing) had consoled him; bccause this wretch's acts had excited hatred in the pious Emperor's heart. (5) Nor did he meet with the honourable welcome on the way, that he expected. Therefore, before the robe, jewels and elephant, which had been kept ready for him could he bestowed, he displayed his folly and meanness, instantly took refuge in cunning, deceitfully shammed heart-sickness, retired to a nook, flung himself down upon the ground, like a prey pierced with the arrow or just entrapped, then after a time cunningly and deceitfully recovered consciousness and complained to Kumar Ramsing that he was very much disappointed and wished for his weapon with a view to commit suiside. When

his disrespectful hearing came to the knowledge of the Emperor, he was dismissed with little ceremony, without receiving any mark of the imperial bounty.

—(Elliot and Dawson VII)

'राजा जयसिंगाने शिवाजीला नाना प्रकारचीं अभिवचनें देऊन चढवून ठेविलें होतें. पण बादशहाचें शिवाजीविषयीं अत्यंत वाईट मत होतें याची जयसिंगाला पूर्णपणें जाणीव होती. म्हणून त्याने आपण शिवाजीला कोणतीं वचनें दिलीं हें बादशहापासून धूर्ततेने लपवून ठेविलें. (२) या वचनांमुळे आपलें जसें स्वागत होईल असें शिवाजीला वाटत होतें तसें तें मुळींच झालें नाही. (३) त्याचा आठ वर्षांचा मुलगा संभा याला पंचहजारी मनसबदार करण्यांत आलें होते, त्याचा नातलग (वस्तुतः सेवक) नेताजी यालाही तोच मान देण्यांत आला होता, अर्थातच या मूर्ख, बुद्धिशून्य व अहंकारी माणसाची (शिवाजीची) अशी कल्पना होती की आपल्याला निदान सात हजारी मनसबदारीचा तरी सन्मान देण्यांत येईल. (४) राजा जयसिंगाने दिलेल्या वचनांप्रमाणे त्याला कोणतेंच शाहीकृपेचें वरदान मिळालें नाही; कारण की त्याच्या नीच दुष्कृत्यांनी बादशहाच्या पवित्र हृदयांत त्याच्याविषयी तीव्र द्वेषभाव निर्माण झाला होता. (५) रस्त्यांतही शिवाजीच्या अपेक्षेप्रमाणे त्याचें कोणतेंच आदरातिथ्य झालेलें नव्हतें. वस्तुतः पुढे बादशहांकडून त्याचा सन्मान म्हणून त्याला खिलत, जवाहीर व हत्ती मिळणारच होता. हें सर्व त्याला देण्यासाठी सज्ज होतें. पण तें मिळण्याच्या आधीच, या सर्व कारणांनी त्याने आपल्या क्षुद्र मनाचें प्रदर्शन करण्याची चूक केली. धूर्ततेने त्याने आपल्या हृदयावर एकदम परिणाम झाल्याचें दाखविलें. तो एका खांबाजवळ गेला; व बाण लागून एखादी शिकार खाली पडावी अथवा सांपडल्यामुळे एखाद्या प्राण्याने लोळण घ्यावी त्याप्रमाणे भूमीवर अंग टाकून त्याने मूर्च्छा आल्याचें सोंग केलें. नंतर थोड्या वेळाने मोठ्या धूर्ततेने व योजनापूर्वक सावध होऊन त्याने कुमार रामसिंगाजवळ आपला तीव्र असंतोष व्यक्त केला व त्याला

आत्महत्या करण्यासाठी शस्त्र मागूं लागला. ज्या वेळीं त्याची सिंहासनाचा अनादर करणारी ही उद्धट वागणूक बादशहाच्या ध्यानांत आली त्या वेळीं शाही कृपेच्या कोणत्याच लाभाचा वाटेकरी न करतां त्याला दरबारांतून काढून लावण्यांत आलें.

डॉ. बाळकृष्ण यांनी महाराजांना प्रत्यक्ष मूर्च्छा आली नसून त्यांनी मूर्च्छेची केवळ बतावणी केली हा काफीखानाचा पक्ष मान्य करून म्हटलें आहे.

It is probable that to avoid standing like a mute with folded hands among inferior nobles, Shivaji might have deliberately resorted to a fainting fit. ( Shivaji the Great by : Dr. Balkrishna Vol. 1 Part II P. 250)

(हें संभवनीय आहे की एखाद्या पुतळ्याप्रमाणे हात जोडून निम्न श्रेणीच्या सामंतांत उभे राहणें टाळतां यावें म्हणून शिवाजी महाराजांनी हेतुतःच मूर्च्छेची बतावणी केली असेल.)

कै. जदुनाथ सरकार यांनी त्यांना मूर्च्छा आल्याच्या घटनेचा निर्देशच न केल्यामुळे ती घटना त्यांना मान्य नसावी असें दिसतें.

आमच्या मतें त्यांना मूर्च्छा येणें, न येणें व त्यांनी मूर्च्छेची बतावणी करणें हे तिन्ही पक्ष संभवूं शकतात. त्यांच्या समकालीन व जुन्या लेखकांना ती घटना तितकी महत्त्वाची न वाटल्यामुळेही त्यांनी तिचा निर्देश न करणें शक्य कोटीतलें आहे. ही गोष्ट पूर्णपणें मिथ्याच असती तर काफीखानाला तसे बुद्ध्या तिचा निर्देश करण्याचें कांही कारण नव्हतें. या उल्लेखाने महाराजांची कोणतीही विशेष निंदा करण्याचें पुण्य त्याला संपादन करतां येण्यासारखें नाही. असो.

महाराजांनी खिलत नाकारल्यावर रामसिंगाने शिवाजी रानवट असल्यामुळे त्याला दरबारी शिष्टाचारांची कल्पना नाही अशी बादशहाजवळ रदबदली चालविली. धूर्त बादशहाने आपल्या मनांतील कोणतीच खळबळ कुशलतेने व्यक्त न होऊं देतां शिवाजीला त्याच्या

निवासस्थानीं घेऊन जाण्याची व दरबारी शिष्टाचार नीट समजावून सांगण्याची आज्ञा केली. रामसिंग महाराजांना घेऊन आपल्या निवासस्थानाकडे परतला. बादशहा औरंगजेब व शिवाजी महाराज यांचें परस्परांचें हेंच पहिलें व शेवटचें दर्शन. यानंतर बादशहाचा पंचहजारी मनसबदार म्हणून आठ वर्षांचा लहानसा संभाजी रामसिगाबरोबर दरबारांत जात होता. पण महाराज मात्र त्या दरबारांत पुन्हा गेले नाहीत. बिचाऱ्या रामसिंगाची मात्र मधल्या मध्ये फारच तिरपीट उडाली होती. महाराजांचें संतप्त मन तो दरबारांत येण्याविषयी वळवूं शकत नव्हता, व बादशहाला तो काय सांगूं शकणार होता ?

दरबारांतील महाराजांच्या वागणुकीनंतर शिवाजीला कठोर शिक्षा करावी यासाठी बादशहाचा क्रोधाग्नि भडकविण्याचें काम महाराजा जसवंतसिंग, औरंगजेबाची बहीण जहाँआरा बेगम व वजीर जाफरखाँ हे करूं लागले. जसवंतसिंगाला त्याच्या अपमानाचा सूड घ्यावयाचा होता. जहाँआरा बेगमचा महाराजांवर राग असण्याचें खास कारण महाराजांनी केलेली सुरतेची लूट हें होय. सुरतेचें उत्पन्न औरंगजेबाने आपल्या या बहिणीला लावून दिलें होतें. सुरतेची लूट म्हणजे तिच्या अधिकृत संपत्तीचीच लूट होती. वजीर जाफरखाँचा महाराजांवर राग असण्याचें कारण तर अधिकच नाजूक होतें. त्याची बायको ही शाहिस्तेखानाची बहीण होती हें सांगितलें म्हणजे पुरें. पण बादशहाला शिवाजीचा कांटा काढावयाची दुसऱ्या कोणी प्रेरणा देण्याचें कारणच नव्हतें. महाराजांना परत महाराष्ट्रांत जाण्याची संधि न देतां व आपल्यावर दोष न येऊं देतां कसें ठार करावें याच्या विविध योजना त्याच्या मनांत प्रथमपासूनच घोळत होत्या. कारण एवढा भीषण शत्रु हातांत आल्यावर कोणता धूर्त व मुरब्बी राजकारणी त्याला परत जाऊं देण्याचें संकट पत्करील ? औरंगजेबाच्या क्रोधांत आणखी भर पडण्याचीं हीं तात्कालिक कारणें घडूं लागलीं. दरबारांतून निवासस्थानीं आल्यावर महाराजांनी उघडपणें औरंगजेबावर

वचनभंगाचा आरोप केला व त्याबद्दल महाराज रागाने प्रत्येकाजवळ बोलले. तीच चर्चा कर्णोपकर्णी सगळीकडे पसरून नागरिक व उमरावांतीलही कित्येकजण महाराजांच्या बाणेदारपणाबद्दल त्यांची प्रशंसा करूं लागले. शिवाजी आपणांवर विश्वासघाताचा आरोप करतो ही चर्चा बादशहाच्या कानांपर्यंत गेली व तो अत्यंत क्रुद्ध झाला. त्याला जयसिंगाने आपण शिवाजीला दिलेलीं अभिवचनें कळविलीं नव्हतीच. त्याने शिवाजीला ठार करावयाचा निश्चय करून आपले पाश त्याच्यावर टाकावयास प्रारंभ केला. महाराजांना त्याने दरबार बंद केला व नगराबाहेर जयपूर बंगल्यांत त्यांना ठेवण्याची रामसिंगाला आज्ञा केली. या आज्ञेचा खरा अर्थ महाराजांच्या ध्यानांत आला. आपणांस औरंगजेबाने बंदी केलें असून आपलें जीवित येथे सुरक्षित नाही हें त्यांच्या ध्यानांत आलें. त्यांनी आपल्या मुक्ततेसंबंधी व स्वराज्यांत परत जाऊं देण्यासंबंधी बादशहाकडे विनम्र प्रार्थनापत्रें पाठवावयास प्रारंभ केला. एकांतांत त्याच्या भेटीची अनुज्ञाही मागितली. सभासद म्हणतो ' राजीयांनी आपले कारकून हुजरे व रघुनाथपंत कोरडे यांसि बोलावून आणून विचार केला ' पुढे तजवीज काय करावी? पादशहाची मजलस कळली. तेथून यश पावून निरोप घेऊन कैसें जावें ? पादशहाजवळ कांही एक कार्य कबूल करून गेलियाविना पादशाह निरोप देत नाही.' (मग) रघुनाथपंत कोरडे यांस सांगोन पाठविलें की ' तुम्ही पादशहास उद्यां जाऊन अर्ज करणें की, स्वामीशीं आमचा दुसरा विचार नाही. आपण निखालस आपले पुत्र घेऊन देखील भेटीस आलों. सेवकाजवळोन चाकरी घ्यावी. दक्षिणेस कुल अदलशाही व कुल कुतबशाही दोनी पातशाही घेऊन हजरतीस देतो. वरकड सुभे रवाना करतां त्यांची कामगिरी पाहणें आणि आपली कामगिरी पाहणें,' ऐसें किती एक गोष्टी बोलून एकांती घुसलखानियांत भेटीस बोलाविलें (म्हणजे) भेटी घेऊन कित्येक मजकूर बोलूं, म्हणून अर्ज करणें, म्हणून सांगितलें, त्याजवरून रघुनाथपंत कोरडे दुसरे दिवशीं पादशहाजवळ जाऊन येणें

प्रमाणें करीणा लिहून पाठविला. पातशहानें रोखा वाचून चित्तांत विकल्प धरिला. आणि पत्राचे पाठीशीं जाब लिहिला की, सबुरी करणें. तुमच्या मुद्द्यामाफक करूं.'

हा निरोप ऐकतांच महाराजांना भविष्य उघड दिसूं लागलें. त्यांच्या एकांतांतील भेटीच्या मागणीविषयी लिहितांना कै. सर जदुनाथ सरकार लिहितात : 'शिवाजी हा जादुगिरीच्या विद्येंत निष्णात असून चाळीस पन्नास गज उंच अशी उडी तो सहज मारतो असें तेव्हा प्रसिद्ध झालें होतें. आणि म्हणून औरंगजेबाने त्याची एकांती भेट घेऊं नये असें शाइस्तेखानाने दिवाण जाफरखानामार्फत मुद्दाम पादशहास पत्र पाठवून कळविलें होतें असें सभासद म्हणतो. परंतु औरंगजेबाला हें कोणी सांगावयास पाहिजे होतें असें नाही. दहा हजार शिपायांन्या देखत ज्याने अफजलखानाला ठार मारिलें व वीस हजार मोगली फौजेच्या मजबूत कड्यांत शिरून भर जनानखान्यांत ज्याने शाइस्तेखानाचीं बोटें तोडिलीं त्या शिवाजीला एका लहानशा खोलींत थोडक्याशा संरक्षकांच्या पाहऱ्यांत भेटण्याइतका औरंगजेब कांही वेडा नव्हता.'

—(शिवाजी व शिवकाल पृष्ठ. १०९)

शेवटीं औरंगजेबाने शिवाजीच्या संबंधांत निर्णय घेतला. त्याने आग्र्याचा किल्लेदार राद अंदाजखान अथवा सुजाअतखान याच्या स्वाधीन शिवाजीला करावयाचें ठरवून आग्र्याचा नगररक्षक पोलादखान याला तशी आज्ञा दिली. ही वार्ता रामसिंगाला कळतांच तिचा अर्थ त्याच्या ध्यानीं आला. आग्र्याचा हा किल्लेदार अत्यंत क्रूर असून औरंगजेबाने त्याच्या आधीन कोणालाही करावयाचें तें मारण्याकरिताच हें ठरलेलें होतें. महाराजांच्या जीविताच्या सुरक्षिततेविषयी जयसिग व रामसिंग हे दोघेही शपथबद्ध होते. त्यामुळे मनाचा निश्चय करून रामसिंग मीरबक्षी मुहम्मद अमीनखान याला भेटला. त्याचें बादशहावर वजन होतें. त्याने अमीनखानाला सर्व वृत्त सांगून म्हटलें की, 'बादशहांनी शिवाजीला ठार करण्याचा निर्णय घेतला आहे असें कळतें. पण शिवाजीच्या

जीविताच्या संरक्षणाची हमी माझ्या वडिलांनी घेतलेली असून मी त्यांच्या वचनाला बांधला गेलों आहे. बादशहांनी प्रथम मला ठार करावें व नंतरच शिवाजीला ठार करावें.' अमीनखानाने प्रश्नाचें गांभीर्य ध्यानांत घेऊन प्रथम बादशहाची भेट घेतली व त्याला रामसिंगाचें म्हणणें समजावून सांगितलें. बादशहालाही तो पेंच कठीण वाटला. साऱ्या राजपूत सरदारांत बेदिली उत्पन्न होईल असें त्या प्रश्नाने स्वरूप घेतलेलें पाहून औरंगजेबाने शिवाजीला ठार करण्याचा बेत धूर्ततेने लांबणीवर टाकला व रामसिंगाने शिवाजी पळून जाणार नाही याची हमी घेऊन स्वतः त्याचें दायित्व स्वीकारावें असें सांगितलें. नुसतें रामसिंगाच्या तोंडी वचनावर विश्वसून न राहतां बादशहाने त्याच्याजवळून लेखी वचन घेतलें.' रामसिंगाने वचन देऊन महाराजांचे त्या क्षणीं प्राण वाचविण्यांत साऱ्या स्वराज्येतिहासाला ऋणी करून ठेविलें आहे यांत शंका नाही.

शिवाजी महाराजांच्या प्राणांना एकदम हात न घातला तरी कपटाने त्यांना ठार करण्याचें औरंगजेबाच्या मनांत होतेंच. त्यामुळे काबूलच्या स्वारीवर त्यांना पाठविण्याचें ठरविलें. वरून दिसायला काबूलच्या स्वारीची पाठवणी व आंतून कपटाने ठार करून स्वतः नामानिराळें राहण्याची योजना असें या प्रकाराचें स्वरूप होतें. यांच वेळीं शिवाजी राजे करीत असलेल्या विश्वासघाताच्या आरोपाविषयी जयसिंगाला तरवारीच्या धारेवर धरावयाचें औरंगजेबाने ठरविलें. त्याने जयसिंगाला पत्र पाठविलें की, 'मला कांहीच कल्पना नसतांना तूं शिवाजीला माझ्या नांवावर वचनें तरी कोणकोणतीं दिलीं आहेस?' या पत्राने गडबडून जाऊन जयसिंग वारंवार बादशहाला विनवून कळवूं लागला की, 'पुरंदरच्या तहांतील गोष्टीपलीकडे मी शिवाजीला कोणतींही वचनें दिलीं नाहीत यावर आपण विश्वास ठेवावा. जयसिंगाशीं चालूं असलेल्या या पत्रव्यवहारांत पुष्कळ दिवस गेल्यामुळे शिवाजी राजांना काबूलच्या स्वारीवर पाठविण्याची योजना मागे पडली.

महाराजही चालू घटनांचें स्वरूप पाहून आपल्याला दक्षिणेंत जाण्याविषयी बादशहाची अनुज्ञा मागणारी अभ्यर्थनापत्रें वारंवार पाठवूं लागले. औरंगजेबाजवळ वजन असणाऱ्या लोकांना वळवून त्यांच्या द्वारे आपलीं प्रार्थनापत्रें बादशहाकडे जावीं म्हणून रघुनाथपंत कोरडे यांच्या द्वारे त्यांनी या लोकांना मोठमोठ्या देणग्या दिल्या. पण त्याचा विशेष उपयोग झाला नाही. शेवटीं त्यांनी औरंगजेबाचा वजीर जाफरखान याची भेट घेऊन त्याची, आपल्याला अनुज्ञा देण्याविषयी बादशहाचें मन वळविण्यास, प्रार्थना करावयाचें ठरविलें. ही भेट झाली; पण तिने सामोपचाराने कांही माग निघण्याची महाराजांची आशा मात्र नष्ट झाली. सभासद या भेटीचें वर्णन करतांना लिहितो:—

दुसरे दिवशीं राजे यांस कळलें की, जाफरखान दिवाणाने आपला गिल्ला पादशहाजवळ केला. असें कळोन रघुनाथपंत कोरडे यांस जाफरखानाकडे पाठविलें की 'आपले भेटीस येतो' त्याने बहुत वेळ मनांत तजवीज करून 'बरें येऊं द्या' म्हणोन सांगितलें. त्यावरून राजे जाफरखानाचे भेटीस गेले. सन्मान बहुत केला. कित्येक आपले सरंजामाविशीं सांगितलें. परंतु त्याचे मनांत आलें नाही. बाहेर 'बहुत बरें' म्हणून बोलिला. जाफरखानाची बायको ती शाइस्तेखानाची बहीण. तिने खानास आंतोन सांगोन पाठविलें की शास्ताखानाची बोटें तुटलीं, अफजलखान मारिला, तसें तुम्हांसही शिवाजी मारील, त्यास लवकर निरोप देणें.' मग राजास वस्त्रें देऊन निरोप दिला. 'पादशहास अर्ज करून सरंजाम करवितो' ऐसें बोलिला. मग राजे डेरियास आले. 'जाफरखानही दिलखुशाने बोलिला नाही, बरें, श्री करील तें खरें' म्हणून बोलून राहिले.' जाफरखानाने दि. २० मेला महाराजांचे प्रार्थनापत्र बादशहास सादर केलें. पण बादशहाने त्याचें कांहीच उत्तर दिलें नाही.

आठ दिवस वाट पाहून दि. २९ ला महाराजांनी बक्षी अमीन खानाच्या द्वारे दुसरें प्रार्थनापत्र बादशहाला पाठविलें. त्या पत्रांत महाराजांनी म्हटलें होतें, 'जर बादशहा माझे सारे गड मला

द्यावयास सिद्ध असतील तर मी दोन कोटि रुपये बादशहास देईन. मला दक्षिणेंत जाण्याची अनुज्ञा असावी. माझ्या मुलाला मी येथे ठेवून जाईन. मी बादशहांवर पूर्ण विश्वास टाकून येथे आलों. विजापूरकरांवरील स्वारी मी यशस्वी करून दाखवितों.'

या पत्राचा औरंगजेबावर अनुकूल परिणाम होण्याऐवजी प्रति-कूल परिणाम झाला. त्याला असें वाटलें की आपल्या अधिकाऱ्यांना लाच देऊन व आपल्याला नम्रतेच्या भाषेने झुलवीत ठेवून हा 'मराठा' आपल्या हातांवर तुरी देऊन निसटून जाईल. त्याने कडक उपाययोजना करावयाचें ठरविलें. त्याने महाराजांच्या सर्व भेटी-गांठी बंद केल्या. त्यांना निवासस्थानांतून बाहेर पडण्यास मनाई केली व नगराधिकारी पोलादखान याला तोफांचें व पांच सहस्र सैनिकांचें कडें शिवाजीच्या निवासस्थानाभोंवती करून सुसज्ज राहण्यास सांगितलें. सभासद म्हणतो : 'दुसरे दिवशीं पादशहा यांणीं राजापाशीं पांच हजार स्वार व पायदळ फुलादखान कोतवाल यास (नेमून) हुकूम केला की 'तूं राजाच्या डेऱ्याभोंवती चौकी देऊन खबरदारीने राहणें.' त्यावरून कोतवाल येऊन डेरा ठोकून राहिला. मग राजे घाबरे झाले. कष्टी होऊं लागले. संभाजी राजे यांस पोटाशीं धरून बहुत खेद केला.'

औरंगजेबाने शिवाजी राजांना अटक केली हें या घटनेने स्पष्ट झालें. किंबहुना त्या कृष्णसर्पाच्या विळख्यांतून शिवाजी आता वांचत नाही अशी बहुतेकांना निश्चिति वाटूं लागली. त्यामुळे कांहीना जसें दु:ख झालें तसाच कांहीना आनंदही झाला. ज्यांच्या दक्षिणेंतील व्यापाराला महाराजांच्या मुळे धक्का बसलेला होता त्या इंग्रजांचा पत्रव्यवहार या दृष्टीने पाहण्यासारखा आहे. त्याच-बरोबर महाराजांच्या दरबारांतील स्वाभिमानी वर्तनाचा परिणाम या त्रयस्थ निरीक्षकांवरही कसा झाला होता हें या पत्रव्यवहारावरून चांगलेंच स्पष्ट होतें. उदाहरणार्थ, सुरत कंपनीला आफ्रिकन बोटीने गेलेलें दि. २५ सप्टेंबर १६६६ चें पुढील पत्र पहा :—

"शिवाजी अखेरीला त्याच्या सारख्याच, मोठीं वचनें देऊन घात करणाऱ्या बादशहाच्या कचाटींत सापडला. खुद्द शिवाजीकरिता ६००० घोड्यांची मनसब, आणि मुलाकरिता ३००० घोड्यांची मनसब अशीं बढतीचीं मोठीं वचनें आपल्या सेनापतीचे मार्फत देऊन, आणि वरती गत अपराधांची क्षमा करून कृपा करण्याबद्दल लेखी पत्रें पाठवून, बादशहानें वारंवार आमंत्रण केल्यामुळें भाळून गेलेला शिवाजी स्वतःला सुरक्षित समजून बादशहाला कुर्निसात करून राजनिष्ठा व्यक्त करण्याकरिता म्हणून गेला. परंतु दरबारांत गेल्यावर आपल्यापेक्षा कमी दर्जाचे उमरावांचे खाली उभें केल्यामुळें, बादशहाची पर्वा न करिता **तो निधड्या छातीचा वीर** संतापून तिरस्कारानें दरबाराचा त्याग करून निघून गेला. बादशहानें त्याच्या समाधानाकरितां अनेक सरदार पाठविले; तरी देखील तो परत येईना, कीं दरबारची निर्भर्त्सना करण्याचें थांबेना. 'आपण युद्धांत जिंकलेले कैदी नाही. तह होऊन भेटीस आलों आहों' असें तो म्हणाला; व बादशहापुढें येण्यास पुन्हा कधींच तयार झाला नाही. बादशहाने नंतर शिवाजीने बरोबर आणलेल्या सर्व लोकांस रजा देऊन, त्याला फक्त हालचालीची मोकळीक ठेवून त्याच्या घरावर आपल्या लोकांचा इतका कडक पहारा ठेविला कीं बहुतेकांच्या मतानें त्याला स्वदेशाकडे परत जाण्यास किंवा येथून सुटका करून घेण्यास सवड दिली जाणार नाही. '**शिवाजीपासून आपली आतां मुक्तता झाली असेंच सर्वजण समजत होते.**'

--(शिवकालीन पत्रसारसंग्रह पत्र क्र. ११३६)

शिवाजी महाराजांच्या अटकेने खरोखरी दयनीय परिस्थिति जर कोणाची झाली असेल तर ती मिर्झाराजा जयसिंग व रामसिंग यांची होय. ते वचनबद्ध झालेले राजपूत होते. पण आपल्या पाताळयंत्री व विश्वासघातकी धन्याचें तेही नियंत्रण करूं शकत नव्हते. पोलादखानाच्या या पाहऱ्यांत महाराजांची केव्हांही हत्त्या होऊं शकेल हें रामसिंगाने ओळखलें, व त्याने महाराजांच्या निवासस्थानाच्या आंतील भागांत, इतकेंच नव्हे तर, त्यांच्या पर्यंका

भोवतीही आपल्या विश्वासाच्या राजपूत योद्धयांचा पाहरा ठेविला. पोलादखानाच्या कारस्थानांत हा मोठाच अडथळा होता. त्यानें रामसिंगाला या संबंधांत विचारणा करतांच रामसिंगानें त्याला स्पष्ट शब्दांत सांगितलें की 'माझ्याकडून बादशहांनी शिवाजी संबंधांत लेखी दायित्व घेतलें आहे. उद्या शिवाजीने आत्महत्या केली अथवा अन्य मार्गांनी तो नाहीसा झाला तर मला उत्तरदायी समजण्यांत येईल. मला माझें काम केलेंच पाहिजे.' इतक्या चपखल उत्तरावर पोलादखान काय करणार होता?

जयसिंगाला या अटकेचें अतिशय वाईट वाटलें. त्याने रामसिंगाला महाराजांच्या जीविताला जपण्यास्तव वारंवार लिहिलें. बादशहाला त्याने नम्रतापूर्वक लिहिलें की, 'शिवाजीने आपल्या राज्याची इतकी सुंदर व्यवस्था केली आहे की, त्याच्या गैरहजेरींतही त्याचें राज्य उत्तम प्रकारें चाललें आहे. त्याची उणीव अशी मुळीच भासत नाही. म्हणून शिवाजीची मैत्री करून जर त्याला सुरक्षितपणें आपल्या राज्यांत परत जाऊं दिलें तर दक्षिणेंत मोगली पादशाहीचा लाभ होऊन पादशहाच्या इकडच्या अंमलदाराचीही इभ्रत वाढेल.' ——(शिवाजी व शिवकाल पृ. ११०)

पण अशीं नम्रतापूर्वक पत्रें लिहिण्यापलीकडे जयसिंग तरी दुसरें काय करूं शकणार होता? औरंगजेबाला जयसिंगाच्या इभ्रतीचें व शब्दांचें मुळीच महत्त्व नव्हतें. शिवाजीचा काटा कसा समूळ काढावा येवढेंच त्याच्या मनांत घोळत होतें. रामसिंगाची जामिनकी घेऊं नये, असें जयसिंगाने बादशहाला वारंवार लिहिलें. पण त्याकडेही बादशहानें लक्ष दिलें नाही. इतकेंच नव्हे तर शिवाजीला कडक व्यवस्थेंत आग्र्याच्या किल्ल्यांत ठेवून रामसिंगालाच तेथे किल्लेदार नेमावें व आपण स्वतः दक्षिणेच्या स्वारीवर जावें असे विचार औरंगजेबाच्या मनांत घोळूं लागले. जयसिंगाला हें कळतांच त्याने बादशहाला तर तसें न करण्याविषयी नम्रतापूर्वक कळविलेंच, पण रामसिंगालाही तें टाळण्याविषयी सूचना दिली. रामसिंगाला या संबंधांत लिहिलेल्या पत्रांत जयसिंग लिहितो :——

'प्रथम, शिवाजीबद्दल जामिनकी व जबाबदारी तुझ्याकडून बादशहानें काढून घेतली होती असें कळलें. त्यावरून तुझा त्यांत कांही संबंध नव्हता असें जें मी पत्र पूर्वी पाठविलें होतें त्याचा उपयोग झाला, आणि तुझ्यावरील जबाबदारी संपली असें मी समजत होतों; परंतु आतांच बादशाही पत्र मिळालें त्यावरून शिवाजीला तुझ्याच ताब्यांत देण्याचा इरादा दिसतो! आजपर्यंत वाट पाहिली अशीच आणखी थोडी पहा. इतक्यांत माझ्या अर्जाचें उत्तर येईल आणि त्याचे अनुरोधाने शिवाजीबद्दल काय विनवावयाचें तें ठरवितां येईल. मी असा अर्ज केला आहे की 'एकतर मला दख्खनच्या सैन्याचा संपूर्ण अधिकार सोपवून द्या आणि भरपूर कुमक पाठवा; किंवा तसें जमत नसेल तर दरबारकडे परत तरी बोलवा.' तुला आग्र्याचा फौजदार नेमून पुन्हा शिवाजीला तुझ्याच ताब्यांत ठेवण्याचा बादशहाचा विचार आहे असें तूं लिहितोस; त्यावर आपल्याला बादशाही दौरा सोडून कधीच राहावें लागलें नसल्यामुळे या वेळींही बरोबर घ्यावें असें बादशहाला म्हणावें.

'जर बादशहा स्वारीवर निघत असतील, तर शिवाजीला आग्र्यालाच ठेवणें सोईचें पडेल. त्याची समजूत करून त्याला असें आश्वासन दिलें पाहिजे की, दरबार दख्खनमध्ये पोंचतांच त्याला तिकडे बोलविण्यांत येईल. तूं मात्र, नित्याचें धोरण म्हणून बादशहाबरोबरच राहणें इष्ट आहे. नाहीतर तुझे अनुयायी निराश होऊन त्यांची निष्ठा पक्की राहणार नाही.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह पत्र क्र. ११३०)

या वेळीं दक्षिणेंत, साऱ्या दक्षिणी सत्तांची एकजूट होऊन मोगलांना बिकट दिवस येत चालल्यामुळे शिवाजी महाराजांच्या मुक्ततेसंबंधीचीं जयसिंगाचीं पहिलीं मतें बदलूं लागलीं होतीं. महाराजांचें दक्षिणेंत येणें आपल्याला अडचणीचें होईल असें त्याच्या मनाने घेतलें. त्यानें बादशहाला असें लिहिलें की .—

'शिवाजीला सोडून द्यावें असें मी जेव्हां मागे लिहिलें होतें तेव्हापेक्षा हल्लींची परिस्थिति मोठी बिकट झाली आहे. सगळी

दक्षिण आतां आपल्यावर उलटली आहे. म्हणून या वेळीं शिवाजीला तिकडेच अडकवून ठेविणें इष्ट आहे. तथापि त्याला अशा रीतीनें वागविण्यांत यावें की, त्यायोगें त्याचे दक्षिणेंतील अंमलदार खूष राहून विजापूरकरांना मिळणार नाहीत व आपणांशींच इमानी राहतील. शिवाजीला आग्र्यास ठेवावें व दक्षिणेंत लवकरच बोलावून घेण्यांत येईल असें त्यास सांगावें, आणि त्याचा मुलगा संभाजी मात्र बादशहाने आपल्याजवळ ठेवावा. त्यायोगें राजकीय दृष्टयाहि मोठा फायदा आहे. अनायासें शिवाजीची जामिनगिरी आपल्याजवळ राहील व त्यायोगें त्याचे सरदार आपल्याशीं राजनिष्ठ राहतील.'

— (शिवाजी व शिवकाल पृ. १११)

या वेळीं खुद्द जयसिंगाविषयीच बादशहाचें मन कलुषित करणारा एक पक्ष उत्पन्न झालेला असून त्याच्या कारस्थानाच्या वार्ता जयसिंगापर्यंत पोहोचल्या होत्या असें दिसतें. वरून दिसायला तरी जयसिंगाला शिवाजी राजांवर भरघोस यश प्राप्त झालें होतें. केवळ वारंवार पराभवच ज्यांच्या वाटयाला आला होता असे महाराणा जसवंतसिंगासारखे मत्सरी लोक त्यामुळे जयसिंगावर जळफळत राहणें स्वाभाविक होतें. असेच लोक या कारस्थानांत असावेत. जयसिंग याच वेळच्या एका पत्रांत बादशहाला लिहितो :—
'शिवाजीवर मला खुद्द बादशहांनी पाठविलें . . . . अगदीं थोडयाच वेळांत मला यश प्राप्त झालें आणि नंतर हजारो युक्त्या करून त्याला आणि त्याच्या मुलाला दोघांनाही मी बादशहासमोर पाठवून दिलें. बादशहांना या गोष्टी माहीत आहेत असें असून दरबारी लोक आतां म्हणतात, 'शिवाजी हा असा होता, हें तुला माहीत असतांना त्याला कशाला दरबारला पाठविलें ? . . . . असें ऐकतों. जेव्हां मी त्याला पन्हाळयावर पाठविलें, तेव्हाही 'जयसिंगाने त्याला आपल्या काबूतून पळून जाण्यास संधि दिली' अशीहि लोकांनी टीका केली आणि आतां त्याला (ताब्यांत आणून देण्याकरितां) बादशाही मुलाखतीला पाठविलें तरीहि 'कशाला

पाठविलें?' म्हणून म्हणणें आहेच. या प्रकारांनी एवढेंच झालें कीं, अर्धवट राहिलेलें विजापूरचें प्रकरण मात्र अधिक घोटाळ्यांत पडलें आहे.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. ११३२)

असो. पोलादखानाच्या तोफांचा व सैन्याचा विळखा बसतांच आपल्याला ठार करण्याचा बादशहाचा निर्णय झालेला आहे हें महाराजांनी ओळखलें होतें. मिर्झाराजा जयसिंग हा निर्णय बदलूं शकणार नव्हता. आपल्या प्रार्थनापत्रांची त्या वंचनापटु बादशहाने जी वासलात लावली ती महाराजांच्या डोळ्यांसमोर होती. कोणत्याही सरळ उपायांनी सुटका न होतां केवळ मरण ओढवणार हें महाराजांना दिसून आलें, व सह्याद्रीच्या त्या सिंहाने दिल्लीच्या क्रूर व नरभक्षक वाघाला आपल्या प्रतिभेचा चमत्कार दाखवावयाचें ठरविलें.

औरंगजेबाच्या दरबारीं येतांना महाराजांनी आपल्याबरोबर मावळ्यांचें सैन्य व निवडक मुत्सद्दी आणले होते. इतक्या लोकांना एकत्र ठेवणें पुढच्या बेताच्या दृष्टीने अर्थातच सोईचें नव्हतें. म्हणून त्यांना प्रथम परत दक्षिणेंत पाठवावयाचें महाराजांनी ठरविलें. 'पादशहास अर्ज करून प्रतापराऊ गुजर, पागा व मावले वगैरे लोक देशास जातील. पादशाही दस्तक वाटेचे करून देणें. आम्ही उभयतां पादशाही कैदेंत आहों. वरकडास जाऊं देणें.'

दि. ७ जून १६६३ ला औरंगजेब बादशहाकडे हें आवेदन पत्र गेलें. पण त्यांत कांही डाव असावा असा संशय त्याला आलाच. शेवटीं निराश होऊनच शिवाजी ही निरवानिरव करीत आहे अशी खात्री पटल्यावर अठ्ठेचाळीस दिवसांनी म्हणजे दि. २५ जुलै १६६३ ला महाराजांच्या लोकांना परत दक्षिणेंत जाण्याची अनुज्ञा मिळाली. लहान लहान टोळ्या करून बादशाही अनुज्ञापत्रकें जवळ असलेलीं ही मंडळी दक्षिणेंत निघून गेली. महाराजांच्या या आज्ञेने परत गेलेल्या मंडळींतच कवीन्द्र परमानंद हेहि होते. हेच शिवभारताचे कर्ते परमानंद होत.

सैन्य परत जातांच महाराज अगदी थोड्या मंडळीनिशी तेथे राहिले. पुढची योजना यशस्वीपणें पार पाडावयास भरपूर द्रव्य लागणार होतें. महाराजांनी रामसिंगाकडून तें द्रव्य घेतलें. परस्पर ते राजगडावरून मिर्झा राजा जयसिंगाच्या शिबिरांत पोहोचविण्याची व्यवस्था झाली.

आणि महाराज यानंतर एकाएकी आजारी पडले. औरंगजेबाची त्यांना ठार करण्याची योजना पक्की झाली. फिदाईखान नांवाच्या सरदाराचा नवा वाडा बांधण्याचें काम चालू होतें. हा वाडा बांधून झाला की, तेथेच शिवाजीला कैदेंत ठेवून ठार करावयाचें व पुरून टाकावयाचें बादशहाने ठरविलें होतें. मनूची म्हणतो 'It being intended that he (Shivaji) be smothered there and buried on the spot' कास्मा गार्डाने तर असें लिहिलें आहे की, 'Aurangzeb ordered a silver vase to put Shivaji's head therein' 'औरंगजेबाने शिवाजीचें मस्तक तोडून तें शाही भेट म्हणून ठेवावयास चांदीचें तबक तयार करावयास दिलें होतें.

महाराजांचा आजार वाढूं लागला. वैद्य व हकीमांचीं औषधें सुरू झालीं. पण त्याने गुण न येतां ते दिवसभर पडून राहण्याइतके अशक्त झाले. पोलादखानाची व सभोवारच्या सर्व पापग्रहांची ते आजारी असल्याची खात्री पटली. इतरहि अनेकांची तशी निश्चिति पटून आपल्याभोवती एक विशिष्ट वातावरण निर्माण होणें त्यांना आवश्यक वाटलें. त्यासाठी त्यांनी एक साधी योजना केली. तिच्याकडे पुढील प्रकरणांत वळूं.



प्रकरण सातवें

# आग्र्याहून पलायन

शिवाजीराजे अतिशय आजारी असून ते दिवसेंदिवस अशक्त होत आहेत अशा वार्ता राजनगरींत पसरूं लागल्या. आपण आता या दुखण्यांतून वांचत नाही अशाच जणूं निश्चितीने महाराजांनी दानधर्माचें पुण्य पदरीं पडावें व धर्मगुरूंचे आशीर्वाद मिळावे म्हणून नगरांतील ब्राह्मण, तपस्वी, फकीर व दीन, पंगु, यांना पेटारे भरभरून मिठाई पाठवावयास प्रारंभ केला. त्याच बरोबर मोठ्या शाही अधिकाऱ्यांचाही अंतिम निरोप घ्यावा म्हणून जणूं की काय त्यांनाही मोठमोठे पेटारे भरून मिठाई जाऊं लागली. सभासद म्हणतो, 'नाना जिन्नस मेवा खरेदी करून आणविला. आणि वेळूचे पेटारे आणवून दहा पेटारे मेवा भरिला. एका पेटाऱ्यास दोघे दोघे मजूर लावून, मध्ये लाकूड घालून मेवा वजिरास पाठविला. चौकीच्या लोकांनी पुशिलें कीं, 'पेटारे कोणाचे, कोठें जातात?' मजुरांनी उत्तर दिलें की, 'राजे यांणीं चौघा वजिरांस मेवा पाठविला आहे.' त्याणीं एकदोन उघडून पाहिलें तो मेवा खरा. मग जाऊं दिलें. असा राबता रोज लाविला.' औरंगजेबाच्याही कानांवर या वार्ता गेल्याच. पण या प्रकारांतील गूढ नीति त्याच्याहि ध्यानांत आली नाही. शेवटचा दानधर्म शिवाजी करतो आहे तो करूं द्या, फिदाईखानाचा वाडा बांधून झाला की त्याचें मरण निश्चितच आहे अशा कल्पनेंत तो गुंग होता, प्रथम प्रथम कडक तपासणी होत होती. पण नंतर रोजचाच प्रकार म्हणून तिकडे दुर्लक्ष होऊं लागलें. तपासणींतील वाढती ढिलाई हाच महाराजांचा विजय क्षण होता.

फिदाईखानाची हवेली अथवा औरंगजेबाने बांधलेलें तें महाराजांचें मृत्युमंदिर पूर्ण झालें. दि. १८ ऑगस्टला औरंगजेबाने या मृत्युमंदिरांत महाराजांना लोटावयाचें निश्चित केलें. पण

त्याच्या एकच दिवस आधी 'पक्षी उडाल्याचें' त्याच्या ध्यानांतच आलें नाही.

जगांतील ऐतिहासिक घटनांत सर्वांत अधिक रोमांचकारी घटना दि. १७ ऑगस्ट १६६६ ला घडली असल्यामुळे तो दिवस अविस्मरणीय होय. शतावधि वर्षें दास्यांत खितपत पडलेल्या भारतांत हिंदुराष्ट्र निर्माण होणें शक्य आहे कीं नाही याचा निर्णय त्या दिवशीं लागावयाचा होता. सहाशें वर्षें ज्ञानदेवांपासून ज्याची जोपासना झाली व समर्थांना ज्याचीं सारखीं स्वप्नें पडत होतीं तो धर्मसिंहासनाचा विजयध्वज भारतांत डौलाने फडकणार कीं धुळींत पडणार याचा निर्णय त्या दिवशीं लागावयाचा होता व ईश्वरी इच्छेने तो अनुकूल लागला. हिंदुराष्ट्र मृत्युंजय असल्याचें त्या निर्णयानेच सिद्ध झालें. म्हणूनच त्याचें यशोगान हें प्रत्येकाचें कर्तव्य होय.

दि. १७ ऑगस्टला महाराजांचा सेवक हिरोजी फर्जद याने बाहेरच्या संरक्षकांना, 'महाराज अतिशय आजारी आहेत, कोणीही त्रास देऊं नये,' असें सांगितलें. सभासद म्हणतो, 'ते वेळीं आपला सर्व साज उतरून, हिरोजी फरजंद यास घालून आपले पलंगावरी निजविला. (हिरोजी फरजंद हा शहाजी राजांचा दासीपुत्र म्हणजे एक प्रकारे महाराजांचा बंधूच होता.) एक पोरगा (मदारी मेहेतर) रगडावयास (पाय चेपायला) ठेविला. आणि आपण उभयतां पेटारियांत बसून चालिले. चौकीचे लोक होते त्यांनी एकदोन पुढील पेटारे उघडून पाहोन वरकड पेटारे न उघडितां जाऊं दिले. शहराबाहिर दोन कोसांवरी जाऊन पेटारे टाकून पाय उतारा होऊन चालिले.' आग्र्यापासून सहा मैलांवर एका संकेतस्थळीं, महाराज व संभाजी राजे येऊन पोहोचले. तेथे महाराजांचा सर न्यायाधीश निराजी रावजी व अन्य मंडळी डोळ्यांत प्राण आणून वाटच पाहत होती. घोडे तेथे होते. महाराजांनी बरोबरीच्या लोकांच्या दोन टोळ्या केल्या. महाराज, राजपुत्र संभाजी, निराजी रावजी, दत्ताजी त्रिंबक व राघो मित्रा यांनी अंगाला राख

फासून बैराग्याचा वेष घेतला व मथुरेकडे प्रयाण केलें. उर्वरित मंडळींना सरळ दक्षिणेकडे जावयास सांगण्यांत आलें.

इकडे महाराजांच्या पर्यंकावर, सोन्याचें महाराजांचें कडें घातलेला एक हात बाहेर काढून हिरोजी फर्जद झोपला होता. पांघरुणाबाहेर असलेला त्याचा तो सुवर्णवलयांकित हात पाहून पाहरेकऱ्यांना महाराजच आहेत असें वाटत होतें. थोड्या वेळाने त्यानेही आपली सुटका करून घेतली. सभासद लिहितो, 'हिरोजी फरजंद पलंगावरी निजला होता. तो चार प्रहर रात्र व तीन प्रहर दिवस तैसाच निजला. चौकीचे पोलादखानाचे लोक कोठडींत येऊन पाहतात तो राजे शेला पांघरून निजले. पोर पाय रगडीत होता. पोरास लोक पुसतात कीं, 'राजे आज फार वेळ निजले.' पोर म्हणतो की, 'शिर दुखतें.' ऐसे पाहोन लोक जातात. तैसाच तीन प्रहर दिवस हिरोजी निजला होता. तो प्रहर दिवस असतां हिरोजी उठोन, आपलीं पांघरुणें, चोळणा, मुंडासें घालोन, पोर बराबरी घेऊन बाहेर आला. चौकीदारांनी पुसिलें त्यास हिरोजीने सांगितलें की, 'शिर दुखतें, कोणी कोठडींत जाऊं लागेल त्यास मना करणें. आपण औषध घेऊन येतों' म्हणून चौकीदारास सांगून दोघे बाहेर गेले.

नऊ तास दिवस आला. नववे चौकीचे लोक म्हणत होते की 'आज माणसांचा राबता नाही. राजा श्रमी जहाला आहे म्हणून चाकर सांगतात. त्याजवर कोणी जात येत नाही, काय वर्तमान?' म्हणून कोठडींत पहावयासि गेला तो पलंगावरी कोणी नाही. राजा पळाला ऐसें जाहलें. हें देखोन पोलादखानाने पादशहाजवळ वर्तमान सांगितलें की 'राजा कोठडींत होता. वरचेवर जाऊन पाहत असतां एकाएकीं गायब जाहला, पळाला, किंवा जमिनीमध्यें घुसला कीं अस्मानामध्यें गेला, हें नकळें. आम्हीं जवळ आहों देखत देखत नाहीसा झाला. काय हुन्नर जहाला नकळें.'

पोलादखानाच्या तोंडचीं हीं अक्षरें ऐकतांच औरंगजेबाच्या क्रोधाला सीमा राहिली नाही. त्याने मारलेल्या जादूगिरीच्या

थापांवर औरंगजेबासारख्या धूर्त राजकारणपटु पुरुषाचा विश्वास बसणेंच शक्य नव्हतें. शिवाजीला पुरावयास तयार केलेल्या फिदाईखानाच्या हवेलींत कोणाला पुरावें हें त्याला कळेना. शिवाजीच्या कापलेल्या मस्तकासाठी तयार केलेल्या मूल्यवान् तबकांत पोलादखानाचेंच मस्तक कापून ठेवावें काय असें त्याला वाटलें असेल. त्याने तत्काळ महाराजांच्या शोधासाठी शतावधि घोडेस्वार वऱ्हाड खानदेशच्या मार्गाने दक्षिणेकडे पिटाळले. ठिकठिकाणच्या स्थानिक अधिकाऱ्यांना शिवाजीच्या पलायनाची वार्ता कळवून पकडण्याच्या कडक आज्ञा देण्यांत आल्या व आग्रा आणि सभोवारच्या प्रदेशांत शाही हेरखातें महाराज व त्यांचीं माणसें शोधण्यासाठी धुमाकूळ घालू लागलें. पोलादखानाने आग्रा नगरांत कसून शोध केल्यावर त्र्यंबक सोनोपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे हे महाराजांचे दोन विश्वासू सेवक त्याच्या हातीं लागले व त्यांच्या अनन्वित छळाला प्रारंभ झाला.

औरंगजेबाने सूक्ष्म शोध केल्यावर शिवाजीराजे कसे निसटून गेले हें त्याच्या ध्यानांत आलें. त्या अभूतपूर्व धाडसाने व युक्तीने तोही आश्चर्यचकित झाल्याविना राहिला नाही. वस्तुत: शिवाजीराजांविषयीचें दायित्व पोलादखानाचें असल्यामुळे तोच दंडार्ह होता. पण त्याने बादशहाच्या कानाला लागून त्याचें रामसिंगाविषयी मत कलुषित करावयास प्रारंभ केला. त्याने महाराजांच्या माणसांचा तर अतोनात छळ केलाच, पण रामसिंगाचीही माणसें पकडून, रामसिंगाचें या कारस्थानांत अंग असल्याचें त्यांच्याकडून वदवून घेतलें. पुढे त्याचा वरिष्ठ अधिकारी असलेल्या फिदाईखानाने रामसिंगाच्या माणसांचें म्हणणें स्वतंत्रपणें ऐकून त्यांची सुटका करविली; पण त्र्यंबकपंत डबीर व रघुनाथपंत कोरडे यांचा अमानुष छळ मात्र चालूच राहिला.

स्वत: औरंगजेबाचाही, शिवाजीच्या मुक्ततेच्या या कारस्थानांत रामसिंगाचा हात असला पाहिजे असा शेवटपर्यंत संशय होता. इंग्रजांच्या सुरतेला गेलेल्या एका समकालीन पत्रांतही रामसिंगाचें

या घटनेंत अंग असलें पाहिजे असें म्हटलें आहे. हा पत्रलेखक लिहितो:—

'The king ......... committed him prisoner into the charge of Rajah Jesson's sonne (Ram Singh), who with his father having given their word to Savagee that hee should bee friendly dealt with all, in case hee would submit to the king (for they could never have compelled him to it); and they finding the king, contrary to his word, endeavour to break their promise, took it soe hainously, that the son, with the father or through his means, gave Savagee opportunity to escape.'

औरंगजेबाच्या मनांत ही गोष्ट पक्की कशी बसली होती व त्याची सूडबुद्धि कशी दीर्घकालपर्यंत टिके, याचें वर्णन करतांना कै. सर जदुनाथ सरकार लिहितात : 'शिवाजीची जबाबदारी घेण्याला रामसिंग टाळाटाळी करीत होता. यामुळे शिवाजीला पळविण्यांत त्याचाच हात असावा असा संशय बादशहाला आला. आणि शिवाजीच्या कित्येक लोकांनी पोलिसांजवळ आपणांस रामसिंगाचें साहाय्य असल्याबद्दल कबुलीही दिली. ही कबुली पोलिसांनी मिळविलेली होती हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. परंतु बादशहाला रामसिंगाचा संशय पक्का येऊन त्याला एकदम दरबार बंद झाला. व लवकरच नोकरीवरून दूर करण्यांत आलें. त्याचा बाप जयसिंग हा निवर्तल्यानंतर म्हणजे शिवाजीच्या पलायनानंतर अकरा महिन्यांनी त्याला पुनः चार हजारी सरदार करून आसामांत लढाईवर पाठविण्यांत आलें. हेतु हा की, तिकडच्या वाईट हवेने तो तिकडेच खपून जावा.' (शिवाजी व शिवकाल पृ. ११४)

पदरच्या प्रामाणिक सेवकाविषयी ज्या धन्याची ही बुद्धि असते त्याचें राज्य विनाशाच्या पाऊलवाटेवर असणें स्वाभाविकच होय. याच आपल्या दुर्गुणामुळे, लोकोत्तर कर्तृत्व अंगीं असूनही औरंगजेब मोगल साम्राज्याचा विनाशक ठरला.

असो. समकालीन इंग्रजी पत्रलेखकाचें रामसिंगाविषयीचें उपर्युक्त मतही असेंच आधारहीन अनुमान होय. ॲबे कॅरेने तर प्रत्यक्ष औरंगजेबालाच महाराजांच्या या युक्तीचे साहाय्यक ठरविण्याची करामत केलेली आहे. तो लिहितो:—

'Shaista Khan's wife was so near the king and had raised against Sevagy so powerful a party that they resolved to arrest him. The king desired to give this satisfaction to the afflicted friends of his uncle, but he offered, according to his word and in view of the need that he had of Sevagy to open to him the means of escaping shortly after his imprisonment.'

—(Shivaji the Great by : Dr. Balkrishna, Vol. 1 P. II, P. 263)

हें विवेचन वस्तुस्थितीला किती सोडून आहे हें सांगण्याचीही आवश्यकता नाही. त्याचा उल्लेख हेंच त्याचें खंडण होय.

असो. महाराजांनी बैराग्याप्रमाणे वेष धारण करून राजे संभाजी व अन्य निवडक मंडळीसह मथुरेकडे प्रयाण केल्याचा उल्लेख केलाच आहे. या मंडळींच्या जवळ मूल्यवान हिरे, जड जवाहीर-माणकें, सोनें, नाणें पुष्कळच होतें. तें कपडयांत, कफन्यांतून, कुबाडयांतून या लोकांनी बरोबर वागविलें. कांहीनी तर मूल्यवान् हिरे तोंडांत लपवून वागविले. प्रथम ही सारी मंडळी मथुरेला आली. तेथे महाराजांचे पेशवे मोरोपंत पिंगळे यांचे तीन मेव्हणे राहत होते. सभासद म्हणतो 'पुढे राजे व राजपुत्र मजल दरमजल चालोन मथुरेस गेले. मथुरेमध्ये ओळखीचें माणूस शोधितां कृष्णाजी पंत व काशीराऊ व विसाजीपंत हे त्रिवर्ग बंधु ब्राह्मण मोरोपंत पेशवे यांचे मेव्हणे, त्यांस निराजीपंत ओळखीत होते, त्यांणीं जाऊन, त्यांची भेट घेऊन वर्तमान सांगितलें.' या तिघांना महाराजांनी संभाजी राजांचा संभाळ करावयास सांगितलें. कारण प्रवासांत संभाजीला बरोबर घेऊन जाणें अडचणीचें व आपत्तीचेंही होतें.

हे त्रिवर्गबंधु औरंगजेबाचे अंकित होते. पण त्या गोष्टीची यत्किंचितही क्षिति न बाळगतां त्यांनी संभाजी राजांना ठेवून घेतलें, व महाराजांचा प्रवास पुढे सुरू झाला. सरकार म्हणतात 'देशासाठी व धर्मासाठी शिवाजीला मदत करणें आपलें कर्तव्य आहे ही भावना त्या वेळीं समाजांत चांगलीच रुजलेली होती असें दिसतें.'

—( शिवाजी व शिवकाल पृ. ११४)

मथुरेला संभाजीला ठेवून महाराजांनी राजगडापर्यंत जो प्रवास केला त्याचा क्रम सभासदाने पुढीलप्रमाणे दिला आहे : मथुरा, वाराणशी, प्रयाग, गया, कटक, जगन्नाथपुरी, गोंडवन, भागानगर, विजापूर व राजगड. मल्हार रामराव चिटणीस यांच्या बखरीत हा क्रम थोडा वेगळा दिलेला आहे. तो असा : मथुरा, कुरुक्षेत्र, उत्तरमानस, हरिद्वार, गंडकी, अयोध्या, वाराणशी, प्रयाग, गया, देवगड, चांदा, भागानगर, पन्हाळा व रायगड. प्रत्यक्ष कागदपत्रांशिवाय पाऊल पुढे न टाकणाऱ्या कांही लोकांचें म्हणणें असें आहे की सभासद व चिटणीस यांच्या म्हणण्याला साहाय्यक असा दुसरा उल्लेख न आढळत असल्यामुळे महाराज उत्तरेकडे न वळतां व अन्यत्र कालक्षेप न करतां सरळ दक्षिणेंत आले असले पाहिजेत.

पण हें तिसरें मत टिकण्यासारखें नाही असें थोडा विचार केला असतां आढळून येईल. केवळ एखाद्या प्रत्यक्ष पत्रांत पुरावा नाही म्हणून प्राचीन शिवचरित्रकारांचें म्हणणें अग्राह्य ठरवितांना आपण आव आणीत असतों की शिवकालीन सर्व पत्रें व कागदपत्र उपलब्ध झाले असून त्यांचा अधिकृत संग्रह आपल्यापाशीं आहे. पण तशी वस्तुस्थिति नाही. अजून सारीं पत्रें व कागदपत्रें सांपडलेलीं नाहीत. त्यामुळे प्रत्यक्षाच्या अभावीं अनुमानावरच भिस्त ठेवावी लागते. अनुमानच करावयाचें तर सभासद व चिटणीस यांना परंपरागत माहितीचा व आमच्यापेक्षा अधिक प्रत्यक्ष स्वरूपाचा आधार होता ही गोष्ट उघडच आहे. शिवाय परिस्थितीचा आधार घ्यावयाचा तर तो त्यांना जुळेल असाच अधिक आहे.

आग्र्याहून निघाल्यानंतर सरळ दक्षिणेकडे गेल्यास तत्काळ

होणाऱ्या औरंगजेबाच्या सैन्याच्या पाठलागामुळे आपण पकडले जाऊ असा विचार शिवाजी महाराजांना सुचणें व म्हणून प्रथम कांही दिवस वेगळ्या दिशेने उत्तर भारतांत घालवून नंतर लांबच्या रस्त्याने त्यांनी दक्षिणेकडे येण्याचें दूरदर्शी धोरण आंखणें हेंच त्यांच्यासारख्या प्रज्ञावंताच्या दृष्टीने योग्य होतें.

महाराजांनी आग्र्याहून औरंगजेबाच्या हातांवर तुरी देऊन जें प्रयाण केलें तेवढ्याने त्यांचें संकट वस्तुतः टळलेलें नव्हतें. खरें म्हणजे येथूनच संभाव्य संकटांना प्रारंभ झालेला होता. आग्र्याहून राजगडापर्यंतचा प्रवास त्यांना मोगलांच्या प्रदेशांतून करावयाचा होता. मोगल साम्राज्यशाहीचीं मर्यादातीत साधनें शिवाजी महाराज व त्यांचे सहप्रवासी यांची पारध करण्यासाठी गतिशील झालेलीं होतीं. त्यांच्या मागावर चिडलेल्या औरंगजेब बादशहाने सहस्रावधि गुप्तचर व सैनिक सोडलेले होते. आपल्या दाढीला वेदना होण्यासारखा हिसडा दिलेल्या शिवाजीला हवें तें करून पकडण्यासाठी प्रांतोप्रांतींच्या सुभेदारांना व लहानमोठ्या अधिकाऱ्यांना औरंगजेबाने कडक आज्ञा दिलेल्या होत्या. शिवाजीराजांना पकडून देणाऱ्यास अथवा त्यांचा पत्ता लावून देणाऱ्यास मोठमोठीं पारितोषिकें घोषित करण्यांत आलेलीं होतीं. अर्थात् सहस्रावधि गरजू व धनलोभी लोक डोळ्यांत तेल घालून स्वयंस्फूर्तीने त्यांचा शोध करीत होते. ज्याने इस्लाम व इस्लामी बादशाही विरुद्ध बंडाचा बावटा उभारलेला होता त्या या 'काफिराला' पकडून देण्यांत महत्पुण्य असल्याच्या भावनेने औरंगजेबाची सहस्रावधि यावनी प्रजा उद्दीपित व उत्तेजित झाली असणें अत्यंत स्वाभाविक होतें. आणि तरीही महाराजांचा मागमूस सुद्धा कोणालाही लागला नाही. याचा अर्थच असा की हें सारें ज्या दक्षिणेच्या वातावरणांत गतिशील होतें तिकडे प्रथम न वळतां दूरदर्शीपणाने महाराज प्रथम उत्तरेकडेच वळले असले पाहिजेत.

येण्याचा महाराजांचा मार्ग अक्षरशः कंटकाकीर्ण होता. मथुरा काशी, कटक या ठिकाणीं त्यांच्यावर संकटेंही आलीं. पावसाळ्यांत

त्यांचा हा प्रवास चालू होता. घोर वर्षा, अनोळखी प्रदेशांतील भरलेले नद्यानाले, अरण्यें यांतून मार्ग काढावा लागे. डॉ. बाळकृष्ण महाराजांच्या या प्रवासाचें वर्णन करतांना म्हणतात:—

'The thrilling experiences and unbearable hardships of the dreary journey through strange countries can better be imagined than described ...... A little neglect would have thrown Shivaji into the hands of his relentless foes, and then he would have been doomed to the gruesome fate of Muard, Dara, Shuja and other princes. But he seemed to be under divine protection, so that he might successfully work out the liberation of the Hindus and the independence of Maharashtra.'

– (Shivaji the Great By : Dr. Balkrisna. Vol I,P. II, P. 268)

'अनोळखी प्रदेशांतील त्या संकटमय प्रवासांत आलेल्या रोमांचकारी अनुभवांची व असह्नीय विपत्तींची कल्पना करणेंच प्रत्यक्ष वर्णनापेक्षा अधिक योग्य होईल.... यत्किंचितही असावधानता झाली असती तर महाराज आपल्या निर्दय शत्रूच्या हातीं सांपडल्याविना राहिले नसते; व जर दुर्दैवाने असें झालें असतें तर दारा, मुराद, सुजा व अन्य राजपुत्रांच्या वाटयास जे दुर्दैवाचे दशावतार आले तेच शिवाजी महाराजांच्याही वाटयास आले असते. पण महाराजांना प्रत्यक्ष ईश्वरानेच संरक्षण दिलें असें म्हटलें पाहिजे. महाराष्ट्राचें स्वातंत्र्य व हिंदू जातीची मुक्तता यासाठी शिवरायांना यशस्वी करावयाचें प्रत्यक्ष ईश्वरानेच ठरविलेलें होतें.'

या जिवावरच्या प्रवासांत महाराजांवर कांही आणीबाणीचेही प्रसंग आले. कै. जदुनाथ सरकार लिहितात, 'एका गांवच्या फौजदाराला सरकारी हुकूम येण्यापूर्वीच खाजगी रीतीने शिवाजीच्या पलायनाची बातमी कळली होती. त्याने या टोळीस संशयावरून पकडून कैद केलें व प्रत्येकाची झडती घेण्याचें ठरविलें.

तेव्हा रात्रीं एकांतीं त्या फौजदारास भेटून शिवाजीने लाख रुपये किमतीचे जडजवाहीर दिलें व आपली मुक्तता करून घेतली.

प्रयागास त्रिवेणी संगमावर स्नान करून शिवाजी काशीस गेला. तेथे मोठ्या पहाटेस भागीरथीवर जाऊन त्याने एका ब्राह्मणास हिऱ्यामोत्यांची दक्षिणा देऊन धार्मिक कृत्यें पार पाडिलीं. इतक्यांत शिवाजीला पकडण्यासाठी शिपायांची धावपळ सुरू झाली. तत्काळ शिवाजी तेथून निसटला. पुढे ज्या ब्राह्मणांस हिरेमोत्यांची दक्षिणा मिळाली होती त्याने सुरतेस येऊन चांगलें घर खरेदी करून कायमची वसती केली. हा ब्राह्मण पुढें इतिहासकार काफीखानास भेटला होता.

गयेहून शिवाजी दक्षिणेकडे वळला गोंडवन, हैदराबाद, विजापूर या प्रांतातून तो पायीं प्रवास करीत जात असतांना एकदा एक घोडा विकत घेण्याचें त्याने ठरविलें. घोडा पसंत करून त्याची किंमत देतांना पुरेसे मोकळे रुपये शिवाजीजवळ नसल्याने त्याने कांही मोहरा व्यापाऱ्यास दिल्या. या वेळीं शिवाजी आग्र्याहून निसटून गेल्याची बातमी सर्वतोमुखीं झाली होतीच. इतक्या मोहरा याच्याजवळ आहेत यावरून हा शिवाजीच असावा असा त्या व्यापाऱ्याला संशय आला व तो त्याने बोलूनही दाखविला. त्या व्यापाऱ्याने विशेष बोभाटा करूं नये म्हणून शिवाजीने त्याला मोहोरांची पिशवीच बक्षिस दिली व आपली सुटका करून घेतली.'

—(शिवाजी व शिवकाल पृ. ११६)

उत्तरेकडून दक्षिणेकडे वळसा घेऊन केलेल्या या शिवरायांच्या प्रवासांत, त्यांच्या प्रवासाच्या मार्गांत असलेल्या श्री समर्थांच्या मठांतील महंतांकडून त्यांना मोलाचें साहाय्य झालें. समर्थांचें महंतांचें जाळें महाराजांच्या या प्रवासाच्या मार्गावर पूर्वीच पसरलेलें असून मथुरेला हरिकृष्ण, अयोध्येला रामकृष्ण, प्रयागला वेणी माधव, वाराणशीला रामचंद्र, जगन्नाथ पुरीला पद्मनाभ असे समर्थांचे महंत मठपति होते. त्यांचें अनमोल साहाय्य घेऊन नोव्हेंबर महिन्यांत महाराजांनी दोन सहस्र मैलांचा हा प्रवास संपविला.

बैराग्याच्या वेशांत महाराज राजगडावर आले व मोठ्या रोमांचकारी पद्धतीने त्यांनी स्वराज्याची देवता जी जिजामाता तिची भेट घेतली. काळजीने या मातेचें अंतःकरण करपून गेलें होतें. कोणी बैरागी आल्याची वार्ता कळतांच त्यांच्या आशीर्वादाने तरी माझ्या शिवबावरील संकट टळो या भावनेने त्या राजमातेने त्या बैराग्यांना महालांत बोलाविलें. ९१ कलमी बखरींत म्हटलें आहेः–

'जिजाऊस खबर केली जे, बैरागी झुंडी उत्तरेकडून आले. हें वर्तमान ऐकतांच परवानगी जाली. जिजाऊच्या दर्शनास बैरागीवेशे गेले. निराजीपंतें आशीर्वाद केला. शिवाजीराजे त्यांणी मातुःश्रीस जाऊन पायावर डोई ठेविली. मातुःश्रीने वळखिलें नाही. राजे जाऊन मांडीवर बसले. डोईची टोपी काढिली. तेव्हा वलखिलें.'

मृत्यूच्या प्रत्यक्ष अंतःपुरांत जाऊन परत आलेल्या त्या आपल्या विक्रमशाली पुत्रावर त्या भाग्यशाली मातेची दृष्टि कशी खिळून राहिली असेल व तिच्यांत केवढे ब्रह्मांडाचे भाव उमटले असतील याची सहृदय वाचकांनी कल्पना करावी! आमच्या प्रतिभेंत ती शब्दचित्राने चित्रित करण्याचें सामर्थ्य नाही.

दि. २० नोव्हेंबरला महाराज राजगडावर प्रकट होतांच साऱ्या जगाला केवढा विस्मयाचा धक्का व साऱ्या स्वराज्यांत व स्वराज्या-बाहेरच्याही प्रत्येक राष्ट्रनिष्ठ व धर्मनिष्ठ अंतःकरणांत केवढा महदानंद फुलला असेल! प्रत्येक दुर्गादुर्गावरून तोफांची गर्जना महाराज सुटल्याचा आनंद जगाला सांगू लागली. घरांघरांतून दीपोत्सव सुरू झाले. 'राजगडास आलियावर थोर धर्म, मोठा महोत्सव केला. साखरा वाटल्या. तोफांचे आवाज केले. मातुःश्रीने व कारकुनांनी व लष्कर, गड, कोट, हशम सर्वांनी संतोष करून खुशाली केली.

महाराज व त्यांच्याबरोबर कांही मंडळी परत आली असली तरी अजून कांहीजण परत यावयाचे होते. राजपुत्र संभाजी, हिरोजी फरजंद, कवीन्द्र परमानंद, मदारी मेहेतर, त्र्यंबकपंत डबीर व रघुनाथ पंत कोरडे हे यावयाचे होते. त्र्यंबकपंत डबीर व रघुनाथ

पंत कोरडे हे तर मोगली मगरमिठींत सापडून यमयातना भोगीत होते. त्यांची सुटका मृत्यु करणार कीं बादशहा हें ठरावयाचें होते. इतर मंडळी आज ना उद्या येणार होती. पण संभाजीच्या येण्यासंबंधांत गुप्तता बाळगणें आवश्यक होतें. संभाजी जिवंत असून राजगडावर पोहोचलेला नाही हें जर औरंगजेबाला कळलें असतें तर त्याने त्याला पकडण्यासाठी व त्या द्वारे महाराजांना पेचांत धरण्या-साठी आकाश पाताळ एक केलें असतें. महाराजांनी त्याच्या डोळ्यांत पुरतीच धूळ झोकली. त्यांनी आल्याबरोबर असें सांगितलें की, 'या संकटमय प्रवासांत संभाजीला शीण झाल्या-कारणाने तो मृत्युमुखीं पडला.' सगळीकडे एकच शोकमय वाता-वरण निर्माण झालें. जिजामातुःश्रींना हें सांगतांना महाराजांना काय वाटलें असेल व ही वज्रप्रपातासारखी वार्ता ऐकतांच त्या मातेच्या हृदयाचीही काय अवस्था झाली असेल! 'नृपनीतिरनेक-रूपा' हेंच खरें! महाराज इतकें नुसतें बोलूनच राहिले नाहीत; तर त्यांनी संभाजीचें यथाविधि क्रियाकर्मांतरहि उरकून घेतलें. त्यामुळे तर ती गोष्ट वज्रलेपच झाली. त्याचा व्हायचा तोच परिणाम झाला. मोगलांचा शोध बंद पडून संभाजीचा येण्याचा मार्ग निष्कंटक झाला. नंतर योग्य वेळीं मोरोपंत पिंगळे यांच्या मेव्हण्यांनी संभाजीला राजगडावर आणलें. आपल्या या नातवाची पहिली भेट घेतांना त्या आजीच्या हृदयाला केवढा अवर्णनीय आनंद झाला असेल! सभासद लिहितो– 'मथुरेस माणसें व पत्रें पाठविलीं त्याजवरून कृष्णाजीपंत व काशीराऊ व विसाजीपंत या त्रिवर्गांनी आपले कुटुंबासहित संभाजी राजियास जानवें व वस्त्रें नेसवून, आपला भाचा म्हणवून राजगडास आले. येतांना मार्गी चौकीवर चाहूल जाली की, संभाजी राजे यांजला ब्राह्मण नेतात. तेव्हां उभयतांनी निराकरण करून दही पोहे त्रिवर्गपंतांनी एकस्थळीं भक्षिलें आणि घेऊन आले.' (राष्ट्रांत भेद मोडण्यावर जोर दिल्याने भेद व वैषम्य शिथिल तर होतच नाही, पण असे प्रयत्न करणाऱ्यां-चीच एक वेगळी जात बनते. त्याऐवजी राष्ट्रांत उदात्त भावनांचा

प्रवाह प्रवाहित झाला की, पाण्याच्या समपातळीखाली सारे खांचखळगे जसे दिसेनासे होतात त्याचप्रमाणे सारे सामाजिक भेद व वैषम्यें लुप्त होऊन कोणताही भेद व वैषम्य राष्ट्रकार्याच्या आड येत नाही असाच या उदाहरणाचा अर्थ आहे. त्या काळच्या सुदृढ श्रद्धाजीवनाच्या समाजरचनेंत ही घटना घडलेली असल्या-मुळे तर ती अधिकच उद्बोधक वाटते.) 'आणि राजियास भेटले. मग राजे पुत्रास भेटले. आनंद थोर जहाला. मोठा दानधर्म केला. आणि कृष्णाजीपंत त्रिवर्ग बंधूंस 'विश्वासराव' हा किताब दिला. लक्ष होन बक्षिस दिले. तिघां बंधूंस दहाहजार होन तैनात केली. मातबर लोकांत आसामी घातली. मोकाशे महाल दिधले, तसेंच निराजीपंत हे बराबरी बहुत श्रम साहस करून आले व दत्ताजी पंत बरोबरी होते व राघोमित्राही बरोबरी होता. समागमे जे जे लोकी श्रम साहस केला त्यांस नावाजिलें.' ज्यांनी ज्यांनी आग्र्याच्या या प्रकरणांत कष्ट सोसले व महाराजांना शिर तळ हातांवर घेऊन साह्य केलें त्या त्या सर्वांचा यथायोग्य परामर्श त्यांनी घेतला.

आग्र्याचें हें सारें प्रकरण इतकें रोमांचकारी आहे की, तो एखाद्या महाकाव्याचा विषय व्हावा. जे. डग्लसने म्हटलें आहे :—

'Shivaji's appearance at the court of Delhi (Agra) in the year 1666 was a wonderful phenomenon. It occurred only once and was never to do so again. Where are our poets, painters, and romancists that they cannot revive for us the elements of this story and body forth the spirit of the time, a story in which the deepest pathos, the wildest ambition, tragedies known and unknown, love strong as death and hatred cruel as the grave, are lying together in one mighty heap ready for the great magician.'

—(J. Douglas – Bombay and Western India. Vol. II P. 359)

आग्र्याच्या या घटनेचें मरणप्राय दुःख जर कोणाला झालें असेल तर तें बादशहा औरंगजेबाला होय. त्याची स्थिति पिसाळल्यासारखी

झाली. रामसिंगाला दरबार बंद करून, त्याचीं वतनें जप्त करून त्याने त्याला नोकरीवरून काढून टाकलें. मिर्झाराजा जयसिंगाची स्थिति अत्यंत केविलवाणी झाली. ज्याची, त्याने धर्म व राष्ट्रभक्तीवर तिलांजलि देऊन, पूजा बांधली त्या बादशहाने त्याच्या एकनिष्ठ सेवेचें त्याला वृद्धपणीं दिलेलें हें प्रायश्चित्त होतें. केवळ रामसिंगच नव्हे तर दक्षिणेंत जयसिंगाची पीछेहाट सुरू झाल्यापासून त्याचीच दिल्ली दरबारांत नाचक्की होऊन त्यालाच शिवाजीच्या सुटके-संबंधीही उत्तरदायी समजण्यांत येऊं लागले. हें कळतांच जयसिंगाला अत्यंत दुःख होऊन त्याने बादशहाला लिहिलें की, 'अनेक युक्त्या करून व आमिषें दाखवून मी शिवाजीस उत्तरेकडे पाठविलें त्याचा असा विपरीत परिणाम होऊन मलाच त्याबद्दल जबाबदार धरण्यांत यावें हा दैवदुर्विलास होय. पण नशिबांत जें लिहिलें असेल तें कोण मिथ्या करूं शकेल? रामसिंगाची जहागीर जप्त केली व त्यास चाकरीवरून काढून टाकण्याचें घाटत आहे असें मला कळतें. आणि याला कारण म्हणजे शिवाजीच्या कांही ब्राह्मण सरदारांनी 'रामसिंगाने शिवाजीस पळून जाण्यास मदत केली अशी कबुली दिली हें आहे असें समजतें. पण हें सगळें बनावट आणि माझ्या वाईटावर असलेल्या दरबारी लोकांचें कृत्य आहे. शिवाय शिवाजीच्या लोकांवर तरी इतका विश्वास कां ठेवावा? ते कशावरून खोटें सांगत नसतील ? खरें म्हटलें तर असें अराजनिष्ठ कृत्य माझ्या मुलाच्या हातून कधीही होणार नाही. ज्याच्या हातून होईल त्याचा सत्यानाश होवो. माझ्या मनांत असे बेइमानीचे विचार आले असतील तर मला मरण येवो.'

बादशहाने जयसिंगाच्या या कळवळ्याच्या पत्राकडे मुळीच लक्ष दिलें नाही. उलट शिवाजीचा सूड कोणावर तरी भयंकर रीतीने उगवावा म्हणून 'प्रति शिवाजी' म्हणून प्रसिद्ध असलेल्या नेताजी पालकराला कैद करून आग्र्याला तत्काळ पाठविण्याबद्दल जयसिंगाला राजाज्ञा पाठविली.

वस्तुतः बादशहाच्या या विचित्र आज्ञेचा जयसिंगाच्या सरळ बुद्धीला अर्थच समजेना.

नेताजी पालकर हा महाराजांवर रुसून विजापूरकरांना मिळाला होता याचा उल्लेख मागे केलाच आहे. त्याच्यासारखा योद्धा विजापूरकरांच्या बाजूला असण्यांतील संकट मिर्झाराजा जयसिंगाने ओळखलें व नेताजीला आमिष दाखवून त्याने विजापूरकरांकडून फोडलें, त्याला जयसिंगाने अडीच सहस्रांचें वतन देऊन मोगलांचा पंचसहस्री सामंत केलें होतें. नेताजी पूर्ण प्रामाणिकपणाने जयसिंगाच्या अधीन राहून मोगलांची सेवा करीत होता. त्याचा कांही एक अपराध नसतांना त्याला कशास्तव अटक करावयाची हें जयसिंगाला समजेना. शिवाजीचा पूर्वी सरसेनापति असणें, प्रतिशिवाजी म्हणून गाजण्याइतका पराक्रम प्रकट करणें व सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे हिंदू असून कर्तृत्ववान् असणें हे औरंगजेबाच्या मतें सर्वांत मोठे अपराध होते. सेवक या नात्याने शाही आज्ञा शब्दशः पाळणें हें जयसिंगाचें कर्तव्यच होतें. बिचाऱ्या नेताजीला, महाराजांच्या पवित्र चरणांना सोडून अविधांची सेवा पत्करण्याचें इतकें क्रूर प्रायश्चित्त मिळणार असल्याची कल्पनाच नव्हती. तो असावध अवस्थेंत असतांना जयसिंगाच्या सैनिकांनी त्याच्यावर आक्रमण करून त्याला व त्याचा चुलता कोंडाजी पालकर याला बंदी केलें व जयसिंगाच्या शिबिरांत आणलें. जयसिंगाने त्याला दिलेरखानाच्या स्वाधीन करून आग्र्याला बादशहाकडे पाठविण्याची आज्ञा दिली. बिचाऱ्या नेताजीला आपल्याला कशास्तव पकडण्यांत आलें आहे व आग्र्याला कां पाठवीत आहेत या गोष्टीची कांहीच कल्पना येईना. नेताजी आग्र्याला पोहोंचेपर्यंत बादशहा दिल्लीला पोहोंचलेला होता. नेताजीला दिल्लीला आणण्यांत आलें. बादशहाने त्याला फिदाईखानाच्या स्वाधीन करून शिवाजीचा सूड म्हणून त्याचा न भूतो न भविष्यति छळ चालविला. आपला इतका छळ कशासाठी चालविलेला आहे हें नेताजीला कळेना. शेवटीं या छळांतून मुक्तता व जीवदान हवें असलें तर मुसलमान व्हावें लागेल असें बादशहाकडून नेताजीला कळविण्यांत आलें.

मनुष्याचा एकदा अधःपात व्हायला लागला की, तो किती होईल याचा नियम नसतो. व्यक्तिगत अहंकारासाठी यवनांच्या पक्षाला मिळालेल्या नेताजीच्या व्यक्तिजीवनावरच आघाताचा औरंगजेबाने जेव्हा प्रसंग आणला व त्याला अपार यातना दिल्या तेव्हा तो शेवटीं वाकला व हा ‘प्रतिशिवाजी’ मुसलमान व्हावयास सिद्ध झाला. केवळ पदव्यांनी शिवाजी कसें होतां यावें? शिवाजीच्या पलायनाचा सूड घेतल्याचें तामसी समाधान म्हणून दि. २७ मार्च १६६७ ला नेताजीला मुसलमानी धर्माची दीक्षा देऊन व त्याची सुंता करून औरंगजेबाने मुहम्मद कुलीखान हें त्याचें नवें नांव ठेवलें.

नेताजी मुसलमान होतांच औरंगजेबाने त्याला पंचसहस्री सामंत केलें. नेताजीच्या बायकांना तेथे पकडून आणून व त्यांनाही मुसलमानी धर्माची दीक्षा देऊन बादशहाने त्यांचीं यावनी विधी-प्रमाणे नेताजीशीं पुन्हा लग्नें लाविलीं. या प्रसंगीं पांच सहस्र रुपयांचे अलंकार बादशहाने त्याला भेट म्हणून दिले. नेताजीला तीन बायका होत्या; त्यांपैकी दोन स्त्रिया मुसलमान झाल्या. एकीने मात्र स्वधर्म संभाळला व ती महाराष्ट्रांत आपल्या जात-कुळींतच राहिली.

नेताजीला पुन्हा महाराष्ट्रांत परतायला पाताळयंत्री औरंग-जेबाने वावच ठेविला नाही. त्याने सेनापति महाबतखानाच्या सैन्याबरोबर नेताजीची अथवा मुहम्मद कुलीखानाची काबूलच्या स्वारीवर पाठवणी करून तो प्रश्न तात्पुरता मिटवून टाकला. या साऱ्या अघोर कृत्यांत बादशहाला तामसी समाधान थोडा वेळ मिळूं शकलें असलें तरी शिवरायांच्या राजकीय विचक्षणतेने त्याच्यावर मात करून त्याची जी फटफजिती केली तिचें दुःख तो कधीही विसरूं शकणार नव्हता. त्याच्या या चिडलेल्या मनो-वृत्तीवर दक्षिणेंतील जयसिंगाच्या पराभवाच्या वार्तांनी तेजाबच शिंपडलें जात होतें.

जयसिंगाचे संपूर्ण ग्रह या वेळीं प्रतिकूल झालेले होते. विजापूर

करांनी औरंगजेबाजवळची त्याची प्रतिष्ठा संपलेली आहे हें ओळखून त्याला एका बाजूला तहाच्या वाटाघाटींत गुंतवून ठेवून त्याचें थोडें दुर्लक्ष झालें की उचल घेऊन त्याच्यावर हल्ले करावयास प्रारंभ केला होता. शाही अवकृपेच्या कल्पनेने व शिवाजी महाराजांच्या प्रत्यागमनाने भग्नहृदय झालेल्या जयसिंगाची प्रतिभा रणांगणावर आता तळपेना. जयसिंगाचा मुन्शी उदयराज याचें एक उद्‌बोधक पत्र या दृष्टीने पाहण्यासारखें आहे, तें असें :—

'शिवाजी (राजगडला) परत आला आहे. परंतु मुलगा बरोबर आला नाही म्हणून तो फार काळजींत आहे. बादशाही सत्तेला शरण जाण्याबद्दल तो उघड बोलत आहे. परंतु त्याचे मनांत काय आहे हें कोण जाणणार? शिवाजीचा जांवई फलटणकर बजाजीचा मुलगा महादजी निंबाळकर पुण्याच्या आसपास धुमाकूळ घालीत असतो. माझा धनी (जयसिंग) यानेही त्या बाजूला बंदोबस्ताकरिता त्या प्रांताचे जहागीरदार वगैरे नेमिले आहेत. ते असे :- बाबाजी भोसले वगैरे लोक सुपें येथे; हलालखान इंदापूरचे बाजूला, घलीबखान चांभारगोंद्याकडे; हसनखान, अबदुलरसूल आणखी कांही दक्षिणीही इतरत्र ठेविले आहेत. त्रिंबकजी भोसले वगैरे लोक रैसिनकडेही पाठविले आहेत. सर्वांच्या आधी बाबाजी भोसले आपल्या जहागिरींत पोचून त्याने महादजीवर हल्ला करून त्याचे पुष्कळ लोक मारिले; व त्याचा झेंडा, तोडा, १५० घोडे, बाण इत्यादि पकडून तो परत आला. तोडा व झेंडा परक्यांच्या हातीं राहूं देऊं नये अशी समजूत असल्यामुळे महादजी शरण आला. परंतु बाबाजीने त्या वस्तु दिल्या नाहीत. पुढे चार दिवसांनी त्याला विजापूरकरांची मदत मिळाली. त्याने बाबाजीवर अचानक छापा घातला. बाबाजी या हल्ल्यांत पडला. दत्ताजी देशमुख पंढरपुरानजीक पडला. महादजीलाही जखमा झाल्या . . . जयसिंग त्याच बाजूला ह्या अपयशाचें परिमार्जन करण्याकरिता जाणार होता. परंतु आपण तिकडे गुंतलों तर विजापूरकर मध्येच उचल खातील

या भीतीस्तव तो बेत त्यानें रद्द केला व तिकडच्या बाजूला ५००० लोकांनिशी अबदुल हमीदला रवाना केलें.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह . क्र. ११४५)

दि. ५ नोव्हेंबर १६६६ ला लिहिलेल्या एका पत्रांत स्वतः जयसिंगच लिहितो, 'माझे ग्रह आतां अगदीं फिरलेलें दिसतात. रात्रंदिवसाच्या काळजीने मी अगदी खंगत चाललों आहे. तहाच्या वाटाघाटींत विजापूरकर निष्कारण कालहरण करीत आहेत.'

—(शिवाजी व शिवकाल पृ. ११८)

तात्पर्य, बादशाही अवकृपेमुळे उत्पन्न झालेल्या काळजीने जर्जर झालेला व अतिश्रमाने थकलेला जयसिंग नियतीच्या हातांतलें खेळणें होऊन राहिलेला होता. औरंगजेबाची कृपा संपादन करण्यासाठी तो आता कोणतेंही पातक करावयास सिद्ध होता. बादशहा आपल्या कोणत्याही पत्राचें उत्तर देत नाही असें पाहून शेवटीं जयसिंगाने वजीर जाफरखान याला एक पत्र लिहिलें. हें पत्र जयसिंगाचें किती अधःपतन झालें होतें या गोष्टीची परिपूर्ण साक्ष देणारें आहे. या पत्रांत जयसिंग लिहितो 'विजापूर, गोवळकोंडा आणि शिवाजी या त्रयीच्या विरुद्ध माझें सर्व सामर्थ्य एकवटून मी प्रयत्न केला व करीतही राहीन. शिवाजीने कसें तरी मला एकदा भेटावयास यावें अशा तजविजींत मी आहे. म्हणजे येतां जातांना केव्हा तरी संधि साधून माझे हुशार लोक त्याचा नाश करतील. हा बादशहाचा बंदा लोकांच्या निंदास्तुतीकडे न पाहतां बादशाही कार्य फत्ते करण्याकरितां कांहींही करण्यास तयार आहे. बादशहांनी संमति दिली तर त्याच्या कुळाशीं शरीरसंबंध जोडण्याचें म्हणजे माझ्या मुलाला त्याची मुलगी करण्याचें बोलणें लावण्यास मी तयार आहे. त्याचें घराणें आणि जातकुळी माझ्यापेक्षा इतकी हीन आहे की, आम्ही त्याचा स्पर्श झालेलें अन्नही खाणार नाही; मग लग्नसंबंधाची गोष्ट कशाला? त्याची मुलगी पकडून आणली गेली तरी मी तिला आपल्या जनानखान्यांतही ठेवणार नाही! पण तो

हीन कुळांतला असल्यामुळे हें आमिष गिळून हुकाला अडकेल. हा बेत फार गुप्त राखला पाहिजे. उत्तर त्वरित पाठवावें.'

—(शिवकालीन पत्रसासंग्रह क्र. ११५२)

लघुरुद्राचा प्रतिदिनीं एकलिंगजीला अभिषेक करणाऱ्या व शतचंडीचीं अनुष्ठानें करणाऱ्या मिर्झाराजा जयसिंगाच्या धर्मनिष्ठेचें व नीतिमत्तेचें हें केवढें केविलवाणें स्वरूप आहे! यावर लिहितांना कै. जदुनाथ सरकार लिहितात: 'सतराव्या शतकांतल्या राजकारणाच्या नीतिमत्तेवर या पत्राने पुष्कळ प्रकाश पडतो. अफजलखानाच्या भेटींत खानाने शिवाजीस ठार मारलें नसतें असें कित्येक भोळे लोक म्हणतात. त्यांनी स्वतःची राजनिष्ठा व्यक्त करण्यासाठी जयसिंग शिवाजीचा खून करण्यास तयार झाला होता, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.'

—(शिवाजी व शिवकाल पृ. १२०)

औरंगजेबाने जयसिंगाच्या या पत्राचें स्वतः तर कांहीच उत्तर दिलें नाही; पण वजीर जाफरखानालाही उत्तर देऊं दिलें नाही. उलट त्याने दक्षिणचा सुभेदार म्हणून आपला मुलगा शहाजादा मुअज्जम याची नेमणूक केली. हा अपमान जयसिंगाच्या मनाला फार झोंबला. मे १६६७ मध्ये शहाजादा मुअज्जमला अधिकारसूत्रें देऊन अपमानित व भग्नहृदय जयसिंग उत्तरेकडे परतला. पण तो दिल्लीला पोहोचूं शकला नाही. वाटेंत तो बऱ्हाणपूरला आजारी पडून आषाढी अमावास्येला निधन पावला. सरकार म्हणतात, 'जयसिंगाने आजन्म मोगली साम्राज्याच्या हितासाठी जिवापाड मेहनत केली पण तिचें असें चीज झालें!'

—(शिवाजी व शिवकाल पृ. १२१)

जयसिंगाला स्वाभाविक मरण आलें नसून त्याला औरंगजेबाने विषप्रयोग केला असें जयसिंगाच्या तोफखान्यावरचा अधिकारी निकोलाय मनूची याचें म्हणणें आहे. राजस्थानचा विख्यात इतिहासलेखक कर्नल टॉड याचें असें म्हणणें आहे की बापाच्या अम्बर

येथील राजसिंहासनाचें प्रलोभन दाखवून औरंगजेबाने जयसिंगाचा मुलगा कीरतसिंग याच्याकडून त्याला विषप्रयोग करविला. उलट कीरतसिंगाने जयसिंगाचा विश्वासू मुन्शी उदयराज यानेच जयसिंगाला विषप्रयोग केला असें उठवून त्याचा छळवाद करावयास प्रारंभ केला. शेवटीं उदयराज मुन्शीने मुसलमानी धर्माची दीक्षा घेतांच पारडें फिरलें; व तो निर्भय झाला.

कपट कारस्थानाने औरंगजेबाने नेताजी व जयसिंग यांच्यावर येवढा भयंकर सूड घेऊनही औरंगजेबाच्या मनांतील शिवरायांच्या आग्र्याच्या प्रकरणांतील धाडसाचें व यशाचें शल्य कधीच गेलें नाही. शेवटचे दिवस मोजीत असतां लिहिलेल्या आपल्या मृत्युपत्रांत औरंगजेबाने या घटनेचा उल्लेख करून म्हटलें आहे :–

'The Greatest pillar of a Government is the keeping of information about everything that happens in the kingdom, while even a minute's negligence results in the shame for long years. See, the flight of the wretch Shiva was due to carelessness, but it has involved me in all these distracting campaigns to the end of my days.'

—(Shivaji and His Times By Sarkar P. 157)

'सर्व राज्यांत हेर ठेवून सूक्ष्म बातमी ठेवणें हेंच राज्याच्या बळकटीचें मुख्य साधन आहे. यांत क्षणभरही दुर्लक्ष झालें की राजाला जन्मभर पश्चात्ताप करीत मोठ्या दुःखांत आयुष्य कंठावें लागतें. स्वतः माझेंच उदाहरण पाहा! माझ्या थोड्याशा निष्काळजीपणामुळे शिवाजी आग्र्याच्या कैदेंतून निसटला आणि त्यामुळे माझ्या शेवटच्या काळांत मला या युद्धांत गुंतून राहावें लागलें.'

✦ ✦ ✦

प्रकरण आठवें

# सुटकेनंतरचें राजकारण

महाराज आग्ऱ्याहून सुटून आले या वार्तेने मित्रांना जसा आनंद झाला तसाच शत्रूंच्या अंतःकरणांत धाक उत्पन्न झाला. समकालीन पाश्चात्यांच्या पत्रांतील कांही उतारे या दृष्टीने पाहण्यासारखे असल्यामुळे येथे उद्‌धृत करतों.

'शिवाजीवर इतका कडक पाहरा ठेवूनहि अखेरीस तो आणि त्याचा मुलगा असे दोघे दोन पेटाऱ्यांत बसून निसटून गेले अशी खात्रीलायक बातमी नुकतीच आली आहे. त्याचा कोठेच तपास लागत नाही. या बाजूच्या प्रांतांत (शिवाजीच्या सुटकेमुळे) सर्वत्र भीति आणि संशय यांचें साम्राज्य पसरलें आहे.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. ११३६)

सुरत-कारवार दि. १७ आक्टोबर १६६६

'जमिनीवर किंवा समुद्रावरहि तुम्हांआम्हांला आतां जपून राहिलें पाहिजे. कारण मोगलांच्या दरबारांतून शिवाजी सुटून आला हें नक्की आहे. त्याची युक्ति यशस्वी झाली. आता तो स्वदेशीं पोचल्याची बातमी आहे. दरबारामध्यें त्याच्या अपेक्षे-प्रमाणें स्वागत न झाल्यामुळें संतापून जाऊन भयंकर सूड उगविण्याची त्याने प्रतिज्ञा केली आहे. ४५ हजार स्वारांनिशी तो सुरतेनजीक आल्याची बातमी आल्यामुळे सर्वत्र अनिश्चितता आणि अंदाधुंदीचें साम्राज्य पसरलें आहे. आता ही बातमी कदाचित् खोटी ठरली तरी शिवाजी मोकळा असेतोंपर्यंत व्यापारी वगैरे लोकांना स्वतःच्या बायकामुलांच्या रक्षणाच्या काळजीपुढे व्यापाराकडे लक्ष देणें फावणार नाही! तुमच्याकडेहि हीच परि-स्थिति होईल.' —(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. ११३७)

सुरत कंपनी दि. २४ नोव्हेंबर १६६६

“शिवाजीच्या सुटकेबद्दल खात्रीलायक बातमी आल्यामुळे आतां बादशाही मुलखावर व प्रजेवर भयंकर सूड घेतला जाईल अशी लोक अटकळ करीत आहेत. सुरतेवर शिवाजी येणार अशी हूल उठल्यामुळे सर्वत्र पळापळ सुरू झाली. तो केव्हांहि येवो, येथे कोणीही शहरांत राहणार नाही. त्याचेशीं सलोख्याने वागण्यास तुम्ही सुचवितां; पण दरोडेखोरापाशीं कसला स्नेह राखावयाचा ? चार पावलें दूर रहावें हेंच चांगलें.’ ––(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. ११४२)

सुरत, रॅडॉल्फ टेलर-जॉन स्टॅन्मन् २४ नोव्हेंबर १६६६

‘शिवाजी मोगली दरबारांतून सुटून स्वदेशांत आला आहे अशी बातमी आल्यामुळे सर्व दख्खनभर भीतीचा संचार झाला आहे. शिवाजी अजून बराच दूर आहे तोंच त्याच्या नांवानें कित्येक ठिकाणीं दरोडे पडण्यास सुरवात झाली आहे.’

––(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. ११४३)

या पत्रव्यवहारांत ‘महाराज आग्र्याच्या अपमानाचा सूड घेतील’ अशी जी भीति पाश्चात्य लेखकांनी व्यक्त केलेली आहे तीच औरंगजेबाचीहि कल्पना होती. पण तसें महाराजांनी कांहीहि केलें नाही. गेले कित्येक दिवस ते स्वत: अनेक कष्टांनी श्रमी झालेले असल्यामुळे आजारी पडले. पुरंदरच्या तहानंतर स्वराज्याची त्यांच्या अनुपस्थितींत केवढीहि चोख व्यवस्था असली तरी मोगल साम्राज्याशीं एकदम धडक घेण्याचें सामर्थ्य स्वराज्यांत उरलेलें नव्हतें. तें निर्माण करणें हें आवश्यक होतें. त्याचप्रमाणे राज्याचें उत्पन्न सुव्यवस्थित गोळा करणें, स्वराज्याच्या सामर्थ्याचें केन्द्र जे दुर्ग त्यांची नीट व्यवस्था करून ते शत्रूंशी संस्मरणीय झुंज देऊं शकतील असे सामर्थ्यसंपन्न करणें, पश्चिम किनाऱ्यावर आपली सत्ता वाढविणें या गोष्टी अत्यावश्यक होत्या. खरा सूड घेण्याचें व ध्येय प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य स्वराज्यांत निर्माण करण्यासाठी महाराजांना दोन तीन वर्षें तरी पूर्ण शांतता हवी होती. त्यासाठी राजनीतिधुरंधर शिवरायांनी बादशहा औरंगजेबाला स्वत: होऊनच एक पत्र लिहिलें. तें पत्र असें :––

दि. २२ एप्रिल १६६७

'हा बंदा गुलाम आपली नोकरी करून हुकूम पाळण्यांत मोठें भूषण मानीत आहे. हिंदुस्थानच्या बादशहाची मोठी फौज मजवर चालून येत आहे. या फौजेशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य पृथ्वीमध्ये कोणास तरी आहे काय? म्हणून माझी अशी नम्र विनंति आहे की, माझा मुलगा संभाजी यास चार हजार स्वारांची मनसब बादशाही फौजेंत मिळावी. मनसब न मिळाली तरी ही फौज घेऊन नेहमी तो बादशहाची नोकरी करीत राहणार, माझ्या ताब्यांत किल्ले होते ते सर्व मी बादशहाकडे सोपवून दिले आहेतच आणि अद्यापि जे कांही किल्ले माझ्याकडे आहेत ते व माझी सर्व जिंदगी आपल्या सेवेस अर्पण आहे.'—(पत्रसारसंग्रह क्र. ११५८)

हें पत्र वाचून औरंगजेबाला काय वाटलें असेल याची कल्पनाच केलेली बरी! त्याने हें पत्र वाचून कोणताहि विकार न दाखवितां तें आपल्या वजिराजवळ दिलें. औरंगजेबाकडून या पत्राचें मुळीच उत्तर न आल्यामुळे महाराजांनी त्याच्या दक्षिणेंतील अधिकाऱ्याकडे आपली दृष्टि वळविली.

या वेळीं दक्षिणेंत शहाजादा मुअज्जम हा सुभेदार म्हणून आला होता. तो आळशी व मूर्ख होता. त्याचा साहाय्यक म्हणून औरंगजेबाने महाराजा जसवंतसिंगाला पाठविलें होतें. महाराजांना या दोघांच्याहि कर्तृत्वाची परिपूर्ण कल्पना असल्यामुळे ते त्यांच्या संबंधांत पूर्णपणें निर्धास्त होते. महाराजांनी जसवंतसिंगाकडे संधान बांधून औरंगजेबाचें मन वळविण्याचा प्रयत्न केला. त्यांनी जसवंतसिंगाला लिहिलें की :—

'बादशहाची माझ्यावर खप्पा मर्जी झाली आहे. त्यामुळे मला फार वाईट वाटतें. मी माझ्या एकट्याच्या हिंमतीवर काबूल, कंदाहार सर करून बादशहास द्यावें असा माझा हेतु होता; पण आतां त्याचें काय? आग्र्यास माझ्या जिवाला अपाय होईल असें मला निश्चितपणें वाटल्यामुळें मी तेथून निसटून आलों. माझा पुरस्कर्ता मिर्झाराजा जयसिंग हा आता मरण पावला. माझा

आता असा तुमच्या (जसवंतसिंगा) शिवाय दुसरा कोणीच नाही. तरी तुमच्या मध्यस्थीने मला माफी मिळाल्यास माझा मुलगा बादशाही मनसब पत्करून शहाजादा मुअज्जम यांचे सैन्यांत फौजेनिशी येऊन दाखल होईल.

—(शिवाजी व शिवकाल, पृ. १२३)

महाराजा जसवंतसिंगाला मनांतून शिवाजी महाराजांशीं युद्ध नकोच असल्यामुळे त्याने शहाजाद्याकडे रदबदली केली. शहाजाद्याचें व जसवंतसिंगाचें विशेष रहस्य असल्यामुळे व त्यालाही शिवाजी राजांशीं युद्ध हें एक संकटच वाटत असल्यामुळे त्यानेहि या महाराजांच्या पत्राचें स्वागत केलें. दोघांनीही बादशहाकडे संधि मान्य करावयाचे प्रयत्न चालविले. औरंगजेबाला मनांतून संधि नको असला तरी तो मान्य करण्यायोग्य परिस्थिति मात्र उत्पन्न झाली होती. इराणचा शहा हिंदुस्थानावर स्वारी करणार असल्याच्या वार्ता त्या वेळीं औरंगजेबाच्या गुप्तचरांनी आणल्या असल्यामुळे त्याचें सारें लक्ष त्या वेळीं तिकडे गुंतून राहिलें होतें. येवढ्यांत पेशावरला युसफसाई लोकांनी बंड केल्याची वार्ता येऊन थडकली. त्याच्या निवारणार्थ आपलें महत्त्वाचें सैन्य औरंगजेबाला तिकडे गुंतवून ठेवणें प्राप्त झालें. जवळ जवळ वर्षभर हें सैन्य तिकडे गुंतून पडलेलें होतें. त्यामुळे शिवाजीकडे विशेष लक्ष देणें व त्याला दुखविणें बादशहालाही इष्ट नव्हतें. त्याने शहाजादा मुअज्जम व जसवंतसिंग यांची प्रार्थना मान्य करून शिवाजीला 'राजा' ही पदवी दिली. दि. ९ मार्च १६६८ ला महाराजांना पाठविलेल्या पत्रांत बादशहा लिहितो :—

'आमचा बहुत लोभ तुम्हांवर आहे. याजकरितां तुम्हांस राजेपणाचा किताब दिला आहे. पेशजीपेक्षां अधिक काम करून दाखवावें म्हणजे सर्व मनोरथ पूर्ण होतील. तुमचे कार्याविषयीं विनंति लिहिली आहे तेहि बंदोबस्त यथास्थित घडोन येईल. खातरजमा ठेवावी.' —(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. १२०००)

या वेळीं महाराजांनी औरंगजेबाच्या बंदींत यमयातना भोगीत

असलेले आपले स्वामिनिष्ठ सेवक त्र्यंबक सोनदेव डबीर व रघुनाथपंत कोरडे यांच्याहि सुटकेची मागणी केली. ती मान्य होऊन दि. ३ एप्रिल १६६७ ला त्यांची मुक्तता झाली. त्यांच्या कष्टांना व स्वामिनिष्ठेला तोड नव्हती. हिरोजी फरजंद व मदारी मेहेतर हेही स्वराज्यांत येऊन पोहोचले होते. आग्र्याला महाराजांच्यापासून निघालेले कवीन्द्र परमानंद यांनाहि रस्त्यांत असेंच अडकून पडावें लागलें होतें. कवीन्द्र परमानंद महाराजांचा हत्ती, घोडे आदि सारा लवाजमा घेऊन निघालेले होते. ते दौसा येथे येऊन पोहोचले तोंच महाराजांच्या पलायनाची वार्ता सर्वत्र प्रसृत झालेली असल्यामुळे तेथील ठाणेदाराने त्यांना पकडलें. त्यांच्या सुदैवाने दौशाचे अधिकारी मनोहरदास पुरोहित व नाथूराम हे मिर्झाराजा जयसिंगाचे सेवक असल्यामुळे परमानंदांची लवकरच सुटका झाली.

औरंगजेबाशीं झालेल्या संधींत ठरल्याप्रमाणे औरंगाबादेला शहाजादा मुअज्जमच्या दरबारीं राजे संभाजी यांची पाठवणी झाली. त्यांची व शहाजाद्याची भेट होऊन संभाजीला परत पाठविण्यांत आलें. वय लहान असल्यामुळे प्रत्यक्ष संभाजी कांही शहाजाद्याजवळ राहावयाचा नव्हता. त्याचे प्रतिनिधि म्हणून सेनापति प्रतापराव गुजर व निराजी रावजी यांना सैन्यासह औरंगाबादेस राहावयाचें होतें. संभाजीला पंचसहस्री सामंत बनविण्यांत येऊन एक हत्ती व एक रत्नखचित कटयार बादशहाकडून भेट म्हणून मिळाली. वऱ्हाडांत संभाजीला जहागीरहि देण्यांत आली. संभाजीच्या सैन्यापैकी अर्धें सैन्य वऱ्हाडांतील प्रदेशाचा वसूल करण्यासाठी पाठविण्यांत येऊन अर्धें शहाजाद्याजवळ ठेवण्यांत आलें.

या संधीनंतर दोन वर्षेंपर्यंत महाराजांनी आपलें सगळें लक्ष स्वराज्याची अंतर्गत राज्ययंत्रणा सुव्यवस्थित करण्यावर व स्वतःचें सैनिकी सामर्थ्य वाढविण्यावर केंद्रित केलें. सन १६६७, १६६८ व १६६९ ह्या तिन्ही वर्षांत त्यांनी मोगलच काय पण विजापूर-

करांच्याहि विरुद्ध हात उचलला नाही. वस्तुतः या संधींत पुरंदरच्या संधीप्रमाणे मोगलांच्याकडे गेलेला एकहि गड परत मिळालेला नव्हता. गेलेले गड तत्काळ परत मिळावे म्हणून महाराजांनी हा संधि केलेलाच नव्हता. त्यांना सामर्थ्याच्या वाढीसाठी व अंतर्गत सुव्यवस्थेसाठी संधि हवा होता, म्हणूनच त्यांनी तो केला होता. दोन वर्षे त्यांनी तो टिकविला. सभासदाने महाराजांच्या तोंडीं पुढील शब्द घातले आहेत :—

'आपणांस एक विजापूरचे पातशाहीशीं दावा, भागानगरकरांशीं दावा व मोगलांशीं दावा असे तीन दावे सोसवत नाहीत. आपलें राज्य नवें, त्याहीमध्यें दोन तीन चपेटे होऊन हलाखी जाली आहे. त्यास एक शत्रु तरी मित्र करावा आणि दोन वर्षें बळ धरून सावरावें. मग पुढे जें कर्तव्य तें करावें.'

महाराजांनी याप्रमाणे शांततेचें धोरण जरी स्वीकारलें तरी त्यांचा धाक त्यांच्या शत्रूच्या मनांत होताच. त्यामुळे आग्र्याच्या संकटांतून सुटल्याविषयी त्यांचें अभिनंदन करण्याचें निमित्त करून त्यांनी त्यांची अवकृपा स्वतःवर होऊं नये अशी खटपट चालविली होती. उदाहरणार्थ गोव्याच्या व्हाइसरॉयचें महाराजांना आलेलें पुढील पत्र पहा :—

'रामाजी शेणवी कोठारी यांजकडून असें कळलें होतें की, (आग्रा येथील कैदेच्या) संकटांतून सुटून आपण आपल्या राज्यांत सुखरूपपणें पोचला असून मनोहरगड येथे राहत आहां. पोर्तुगालहून इकडे येतांच मी आपली माहिती मिळविली व मनोहरगड येथे आपण असतांनाच वकील पाठविण्याचें योजिलें होतें. परन्तु रामाजीकडून समजलें की, त्या किल्ल्यावर जाण्याची वाट फार अडचणीची आहे; व आपण तेथून निघून रायगडावर जाऊन राहणार. यास्तव मनोहर गडावर असतां आपल्याकडे वकील पाठविला नाही. पण आपण रायगडावर आतां मुक्काम केला आहे, असें कळल्यावरून हें अभिनन्दनपर पत्र पाठवीत आहें.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. ११६०)

या काळांत शिवाजी महाराजांनी भूमीच्या धारावसुलीचे नियम करून त्या संबंधांत होणारे अन्याय दूर केले. सततच्या युद्धामुळे व शाहिस्तेखान आणि जयसिंग यांच्या सैन्याच्या अत्याचारामुळे स्वराज्याची प्रजा नागवून निर्धन झालेली होती. या लोकांजवळून प्रत्यक्ष पैशाच्या रूपाने कर वसूल करणें म्हणजे त्यांना पिळून काढणेंच होतें. महाराजांनी अशी व्यवस्था केली की, ज्यांना पैसे देतां येणें परिस्थितीमुळे शक्य नसेल त्यांनी धान्याच्या व ज्यांच्या शेतांत जें पीक येत असेल त्याच्या रूपाने कर द्यावा. वसूल झालेलें असें धान्य त्या त्या गांवांत ठेवण्याची व्यवस्था केल्यामुळे संभाव्य दुष्काळांत प्रजेचे हाल न होण्याचीहि सोय झाली.

स्वराज्यांतील वतनदारीचे दुष्परिणाम त्यांना दिसत असल्यामुळे हळू हळू त्यांनी तिचीहि नांगी मोडून टाकिली. नवीं वतनें देणें त्यांनी बंद केलें व जुन्या वतनदारांचे सरंजाम निरुपद्रवी ठरण्याइतके नियंत्रित केले. एका बाजूला ही मुलकी व्यवस्था करीत असतांनाच दुसऱ्या बाजूला आरमार व सैनिकी सामर्थ्यहि त्यांनी वाढविलें.

त्यांचा मोगलांशीं संधि झालेला असला तरी भारतमातेच्या हृदयांत खुपणारे कांही कांटे अजिबात काढून टाकण्याचा प्रयत्न करणें त्यांना आवश्यकच होतें. गोव्याची पोर्तुगीज सत्ता हा असाच एक कांटा होता. गोव्याच्या व्हाइसरॉयने १६६७ च्या शेवटीं रोमन कॅथॉलिक धर्माचे लोक सोडून अन्य धर्माच्या लोकांना सीमापार होण्याची आज्ञा केली. ही आज्ञा कळतांच महाराजांनी अत्यंत क्रुद्ध होऊन सहा सहस्र सेनेनिशी बारदेशवर चढाई केली व पोर्तुगीजांना थरकांप सुटेल असा त्यांचा रेच उतरविला. पुढील पत्र या दृष्टीने पाहण्यासारखें आहे :—

'गोव्याच्या व्हाइसरॉयने रोमन कॅथॉलिक धर्म वगळून इतर धर्मांच्या माणसांना हद्दपारीचा हुकूम काढल्यामुळे अत्यंत क्रुद्ध होऊन शिवाजीने गोव्यानजीक बारदेशच्या सरहद्दीवर स्वारी केली

व तेथील चार पाद्री लोकांनी स्वधर्मीयांव्यतिरिक्त इतरांचा प्राणनाश करण्याचा सल्ला दिला होता हें लक्षांत ठेवून शिवाजीने त्यांचा शिरच्छेद केला. ह्यामुळे घाबरून जाऊन व्हाइसरॉयने आपला क्रूर आणि कडक हुकूम परत घेतला! शिवाजीने आसपासच्या मुलुखांत जाळपोळ करून दीडशे लक्ष होनांची लूट नेली.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. ११८६)

पुनश्च जानेवारी महिन्यांत लगतच्या प्रदेशांतील देसाई जमीनदारावर महाराजांनी स्वारी केली. त्यांतील भतग्रामच्या खळोशेणई नांवाच्या देसायाने पोर्तुगीजांचा आश्रय घेतला. त्यासरशीं महाराज पुनश्च बारदेशमध्ये शिरले. घाबरलेल्या पोर्तुगीजांनी महाराजांना चढाई थांबविण्याची प्रार्थना करून आश्रयार्थ आलेल्या सार्‍या देसायांना हांकून लाविलें. सुरत कंपनीच्या इंग्लिश फॅक्टरी रेकॉर्डस्‌मध्ये महाराजांच्या या विजयाचें पुढीलप्रमाणे वर्णन केलें आहे :—

'थोड्याच दिवसांपूर्वी शिवाजीने पोर्तुगीजांना थोडा हात दाखविला. अनेक घोडेस्वारांचा अंमलदार असलेल्या, थोड्या मोठ्या अशा गोव्याजवळलील प्रांतांतील एका जमीदाराबरोबर शिवाजीचें कांही भांडण निघून शिवाजीशीं टिकाव धरतां न आल्यामुळे तो जमीनदार बारदेश प्रांतांत अग्वाडाजवळ पोर्तुगीजांच्या आश्रयार्थ गेला.'

'व्हाइसरॉयकडे अनेक वेळां तक्रार करूनही जेव्हा तिकडे लक्ष दिलें गेलें नाही, तेव्हां शिवाजीने त्या जमीनदारावर हल्ला करून त्याला जर्जर केल्यामुळे तो आणखी मागे हटला. पुढे शिवाजीने त्याचा पाठलाग करीत बारदेशांत प्रवेश केला. त्यांतील बराच भाग जाळला व लूट करून गोव्याच्या व्हाइसरॉयला व त्याच्या आरमाराला न जुमानतां त्याने १३०० कैदी आपल्याबरोबर नेले. त्याचा निकाल कसा लागेल तें अजून समजलें नाही. परंतु हें भांडण लवकर मिटलें नाही तर समुद्रावर आणि जमिनीवर दोनही ठिकाणीं शिवाजीपुढे पोर्तुगीजांचा टिकाव लागणार नाही.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. ११९२)

या वेळीं महाराजांनी पोर्तुगीज व्हाइसरॉयची प्रार्थना मान्य करून चढाई थांबविली. पण पोर्तुगीजांच्या धर्मवेडामुळे व माजोरी-पणामुळे त्यांना या देशांतून सीमापार करण्याचीच महाराजांची इच्छा होती व त्यासाठी त्यांचे प्रकट व गुप्त असे सर्व प्रकारचे प्रयत्न चालू होते असें तत्कालीन पत्रव्यवहारावरून दिसतें. आठ ऑक्टोबर १६६८ च्या डच गव्हर्नर जनरलच्या पत्रांत असें म्हटलें आहे की 'कित्येक वर्षेपर्यंत पोर्तुगीजांच्या ताब्यांत असलेल्या बारदेश बेटावर हल्ला करून त्याने विनाविरोध कित्येक खेडीं हस्तगत करून घेतलीं आहेत. विजापूरकरांच्या मालकीहक्काची सबब सांगून तो साष्टी बेटावरही ताबा सांगत आहे. पोर्तुगीजांना त्याची फार भीति वाटते. शिवाजी किनाऱ्यावरील मुलुखाचा सुभेदार झाल्यामुळे, शिरस्त्याप्रमाणे डच रेसिडेंटला २५३ होनांचा नजराणा शिवाजीला देणें भाग पडलें. शिवाजी डच कंपनीला अनुकूल असल्याचें पुष्कळ तऱ्हांनी दाखवितो. 'पोर्तुगीजांशी तुमचें युद्ध सुरू झाल्यास तुम्ही (डच) मला कळविलें असतां पोर्तुगीजांची कायमची हकालपट्टी करण्यास मी तुम्हांस मदत करीन.' असें त्याने आम्हांस कळविलें आहे. पोर्तुगीजांविरुद्ध त्याची ही भावना अगदी मनापासूनची दिसते. तिचा आपल्याला फायदा होण्याचा संभव आहे.'
—(शिवकालीन पत्रसार-संग्रह क्र. १२२१)

महाराजांनी या वेळीं एक गुप्त कारस्थानही पोर्तुगीजांच्या सत्तेच्या विनाशासाठी केलें होतें असें इंग्लिश फॅक्टरी रेकॉर्डस्-मधील पत्रव्यवहारावरून दिसतें. उदाहरणार्थ, पुढील दोन पत्रें पहा :—

'गोव्याचा व्हाइसरॉय मेला असून, आतां त्याचे जागीं तीन अधिकारी काम करतात. व्हाइसरॉय मरण्यापूर्वी त्याने बारकाईने तपास केला असतां, सर्व शहरांत मिळून शिवाजीचे चार पांचशे लोक छपून राहिलेले आढळले. तेव्हा स्वहस्ताने शिवाजीच्या वकिलाच्या दोन तीन थोबाडींत देऊन त्याला आणि या सर्व

कैद्यांना त्याने गोव्यांतून हद्दपार केलें. हें ऐकून शिवाजीने ८।१० हजार पायदळ आणि एक हजार घोडेस्वारांनिशी गोव्यावर स्वारी करण्याचें जाहीर केल्यामुळे पोर्तुगीजांनीही आपल्याकडून कडे-कोट तयारी केली. शिवाजी राजापूरचे उत्तरेकडे आहे तो या बाजूला येईल किंवा कसें याबद्दल सुभेदार व व्यापारी लोक यांचे-पाशी तपास करून पाहतां, स्वारी करून आदिलशहाचा तह मोडण्याचें, किंवा या प्रांताचा जागीरदार मुस्ताफाखान (हा आदिलशहाचा मोठा आवडता असून औरंगाबादेस वकील म्हणून राहिला आहे.) याचे विरुद्ध जाण्याचें धाडस शिवाजी करील असें कोणालाच वाटत नाही.'

— (शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. १२२८)

'शिवाजीची भीति आता राहिली नाही. कारण तो परत फिरला आहे. अनेक लहान लहान तुकडया करून आणि निरनिराळ्या सबबींवर शिवाजीने सुमारे चार पाचशे लोक गोव्यांत घुसडून दिले होते. थोडयाच वेळांत ही संख्या दुप्पट झाली असती आणि त्यानंतर एका रात्रीं एकदम उठाव केला असता तर कोणताही एक दरवाजा ताब्यांत घेऊन, पोर्तुगीजांनी पुरेसें सैन्य रणांगणावर उभे करण्याचे पूर्वीच शिवाजीचे लोक आंत शिरून त्यांनी गोवा काबीज केलें असतें यांत शंका नव्हती. परंतु गोव्यापर्यंत आल्यावर आपला कट उघडकीस आला, आपले लोक पकडले गेले आणि पोर्तुगीज लोकही सज्ज होऊन राहिले, हें पाहून मूळचा बेत बदलून, त्या भागांतील आपल्या किल्ल्यांची शिवाजी पाहणी करूं लागला. त्याने या वेळीं कित्येक ठिकाणची शिबंदी बदलून रसद आणि दारूगोळा यांची तरतूद केली. पुढे इकडील सर्व मुलुखांत सर्व ठिकाणीं कडेकोट बंदोबस्त झाला असून आपल्याला प्रवेश मिळणें शक्य नाही असें पाहून राजगडला कांही जरुरीचें काम आहे असा बहाणा करून आपलें सैन्य घेऊन तो परत वळला. त्याचे येण्याची इतकी दहशत बसली आहे की तो परत गेल्याची बातमी खरी मानावयास कोणीच तयार नाही.'

— (शिवकालीन पत्रसार संग्रह क्र. १२३१)

पोर्तुगीजांप्रमाणेच जंजिरेकर सिद्दीवरही महाराजांनी या वेळीं स्वारी केली होती. जंजिरा म्हणजे जलदुर्ग. सिद्दीचा हा जलदुर्ग कोकणांतील कुलाब्याच्या जवळ दंडा व राजपुरी या गांवाच्या पश्चिमेला समुद्रांत एका बेटावर वसलेला आहे. हे सिद्दी नांवाला विजापूरकरांचे अंकित, पण वस्तुत: स्वतंत्र होते. सन १६६९मध्ये फत्तेखान सिद्दी हा जंजिऱ्याच्या गादीवर असून सिद्दी संबूल, सिद्दी कासीम व सिद्दी खैर्यत हे त्याचे तीन शूर सेनानी होते. स्वराज्याचें आरमार प्रभावी असण्याच्या दृष्टीने जंजिऱ्यावर शिवाजी राजांचा प्रथमपासूनच डोळा होता. जंजिऱ्यावर त्यांनी पहिली स्वारी सन १६५७ मध्ये केली. पण ती यशस्वी झाली नाही. आग्ऱ्याला होणाऱ्या बादशहाच्या भेटीच्या वेळीं जंजिऱ्याचें राजकारण करण्याची महाराजांची इच्छा होती; पण ती फलद्रूप झाली नाही. त्यामुळे या वेळीं विशेष सिद्धता करून त्यांनी जंजिऱ्यावर स्वारी केली.

महाराजांनी या स्वारींत दंडा-राजपुरीच्या परिसरांतील सिद्दीचे सात किल्ले जिंकून दंडा व राजपुरी हीं दोन्ही गांवेंही जिंकलीं व प्रत्यक्ष जंजिऱ्याचीही नाकेबंदी केली. जंजिरा मराठ्यावर व मराठे जंजिऱ्यावर आग ओकीत होते. युद्धाने नाही तरी उपासमारीने हैराण करून सिद्दीला जंजिरा सोडण्यास भाग पाडावयाचें असा महाराजांचा निश्चय होता. सिद्दी फत्तेखानाने इंग्रजांना साह्य मागितलें. मुंबईकर इंग्रजांनी प्रथम त्याला साह्य द्यावयाचें ठरविलें. पण त्यांच्या सुरत येथील वरिष्ठ अधिकाऱ्यांनी त्यांना शिवाजीचा राग स्वत:वर ओढवून न घेण्याचा पोक्त सल्ला दिला. घाबरलेल्या सिद्दीने स्वत:ला वांचवावें म्हणून मोगलांची प्रार्थना केली. शिवाजीराजे मोगलांचे अंकित झालेले आहेत याची सिद्दी फत्तेखानाला कल्पना होतीच. मोगलांच्याकडून महाराजांना जंजिऱ्याचा वेढा उठविण्याविषयी संदेश आला. पण महाराजांनी तिकडे पूर्ण दुर्लक्ष करून जंजिऱ्याची नाकेबंदी अधिकच तीव्र केली.

सिद्दी घाबरलेला आहे हें महाराजांनी ओळखलें व त्याला असें सांगून पाठविलें की, 'जंजिरा तुम्ही आमच्या स्वाधीन करा. आम्ही त्याच्या बदली तुम्हांला भरपूर पारितोषिक देऊन आमच्या राज्यांत तुम्हांला योग्य अशी जागाही देऊं.'

घाबरलेल्या सिद्दी फत्तेखानाने महाराजांची ही मागणी मान्य केली. पण त्याचे शूर सेनानी सिद्दी संबूळ, सिद्दी कासीम व व सिद्दी खैर्यत यांना त्याचा भ्याडपणा सहन न होऊन त्यांनी फत्तेखानाला बंदी करून जंजिरा आपल्याकडे घेतला व महाराजांशीं ताज्या दमाने युद्धाचें ठाण मांडलें. केवळ विजापूरकरांच्या पाठिंब्यावर शिवाजीशीं मांडलेलें वैर टिकण्यासारखें नाही हें ओळखून त्यांनी औरंगजेबाकडे संधान बांधून मोगली बादशाहीचें अंकितत्व स्वीकारलें. औरंगजेबाने सिद्दीच्या गादीला 'याकुतखान' अशी नवी पदवी देऊन तिघांनाही मनसबा व सुरतेजवळ तीन लाख रुपये उत्पन्नाची जहागीर दिली.

याप्रमाणे सिद्दीचें बळ वाढून त्याने मोगलांचें अंकितत्व पत्करतांच महाराजांना तात्पुरता जंजिऱ्याचा नाद सोडावा लागला. दंडा राजपुरीच्या परिसरांत आपलें नौदल, जिंकलेल्या प्रदेशाच्या संरक्षणासाठी ठेवून महाराज परतले.

हीं दोन प्रकरणें सोडलीं तर तीन वर्षें महाराजांनी शांततेंत घालविलीं. पण १६७० च्या जानेवारींत महाराजांना संतप्त करणाऱ्या वार्ता येऊं लागल्या व त्यामुळे ते पेशवे मोरोपंत पिंगळे यांच्यासह कोंकण किनाऱ्यावरून राजगडला आले.

या वेळीं औरंगजेबाच्या धर्मवेडाने उग्र स्वरूप धारण केलेलें होतें. बादशहा औरंगजेबाच्या अंगीं नेतृत्वाला व राज्यकर्त्याला लागणारे अनेक अलौकिक गुण होते. पण त्याच्या सर्व गुणांची माती करणारा व मोगल साम्राज्याचा विनाशकाल जवळ आणणारा मोठा दोष म्हणजे त्याचें धर्मवेड होय. या धर्मवेडापायी त्याने राज्यकर्ता या नात्याने जे जोडावयाचे मित्र त्यांना शत्रु करून ठेविलें. त्याच्या धर्मवेडाचाही अर्थ हिंदूंचा व त्यांच्या श्रद्धाकेंद्रांचा

विध्वंस व अत्याचार करून परधर्मीयांना बाटविणें हा असे. जें जें कांही काफिरांचें तें तें या जगांतून नष्ट करण्याचा त्याने विडा उचललेला होता व इस्लामाशिवाय दुसऱ्या कशालाही जगण्याचाच अधिकार नाही अशी त्याची प्रामाणिक पण लोकविद्विष्ट श्रद्धा होती. या वेळीं या धर्मवेडाने किती उचल घेतली होती हें समकालीन पत्रव्यवहारांतून पाहावयाला मिळतें. पुढील कांही परिच्छेदच पहा:—

'वसईचें पत्र. दि. १० डिसेंबर १६६७. औरंगजेबाने मुसलमानांना जकातीची पूर्ण माफी दिली असून हिंदूवर मात्र त्या पूर्ववत् ठेविल्या आहेत. ख्रिस्त्यांनी अर्ध्या भरावयाच्या आहेत. ह्या त्रासामुळे मुंबईची वस्ती खास अधिक वाढेल.'

——(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. ११८७)

सुरतकंपनी दि. २२ जानेवारी १६६८

या बादशहाचें धर्मवेड एकसारखें वाढत असल्यामुळें देशांत सर्वत्र अशांतता माजली आहे. विशेषत: बनिये लोक, आणि सामान्यत: मुसलमानेतर धर्मांचे लोक यांचेवर इतका कठोरपणें जुलूम होतो की त्यामुळें आपसांतील संबंधांत मोठा अडथळा उपस्थित झाला आहे. एखाद्या हिंदूचें घेतलेलें कर्ज बुडवावयाचा सोपा मार्ग म्हणजे सावकार हिंदूने, महम्मद व मुसलमानी धर्म यांना शिव्या दिल्याची खोटीच तक्रार काजीकडे करण्याची धमकी द्यावी म्हणजे झालें. कारण अशी तक्रार येतांच, दोनचार खोटे साक्षीदार घेऊन. लगेच त्याची सुंता करून मुसलमान करण्याची शिक्षा भोगावी लागे. या भीतीने सावकार बिचारा गप्प बसे. आपला कैवार घेतला जातो अशा खात्रीमुळें मुसलमानांचें भिकार इतकें बेसुमार वाढलें आहे की ते बेलाशक बनियांच्या घरांत शिरतात आणि आपल्याला काय पाहिजे तें मिळाल्याशिवाय बाहेर पडत नाहीत. राज्याचा इतर सर्व कारभार सोडून बादशहाने हिंदूंना बाटविण्याचा आणि देवळें पाडून मशिदी बांधण्याचा धोशा लाविला आहे. टॉमस रोच नांवाच्या इंग्रजावर कैद, जाच

धमकी आणि शेवटीं लाच यांचा प्रयोग करूनही जेव्हा तो धर्मान्तराला कबूल होईना तेव्हां मग बादशहाने त्याला सोडून दिलें.'
—(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. ११९२)

दि. ९ एप्रिल १६६९ मध्ये औरंगजेबाने मोगल साम्राज्यामधील यच्चयावत् हिंदु मंदिरांचा विध्वंस करण्याची राजाज्ञा काढून त्यासाठी स्वतंत्र काजीची नेमणूक केली व त्याच्या हाताखाली एक सैन्याची तुकडीही दिली.

या राजाज्ञेप्रमाणे प्रथम काशी विश्वनाथाचें मंदिर फोडून त्या जागीं मशीद उभारण्यांत आली. साऱ्या हिंदूंचें तें महान् श्रद्धास्थान होतें. महाराजांची त्यावर इतकी निष्ठा की आग्र्याच्या बंदिजीवनांतून मुक्त होऊन प्राणसंकटाचा प्रवास पत्करल्यावरही महाराज विश्वनाथाच्या दर्शनासाठी काशीला गेले होते. ही वार्ता ऐकतांच त्यांचे नेत्र क्रोधाने केवढे प्रदीप्त होऊन उठले असतील! विश्वनाथाच्या मंदिरामागोमाग बिंदुमाधवाच्या मंदिराचा विध्वंस करण्यांत आला. त्या मागोमाग मथुरेच्या केशवदेवाच्या मंदिराचा विध्वंस करण्यांत आला. तेथील केशवदेवाची मूर्ति आग्र्याला नेऊन तिची मशिदीची पायरी करण्यांत आली. सोरटी सोमनाथाच्या मंदिराचाही पुनश्च विध्वंस करण्यांत आला. या सर्व वार्तांनी औरंगजेबाच्या मूळ वृत्तीने उचल खाल्लेली असून मोगलांशीं झालेला आपला संधिही मोडण्याची शक्यता आहे असें महाराजांना वाटू लागलें. आता त्यांची परिपूर्ण सिद्धता झालेली होती. आता त्यांना संधीची कोणतीही आवश्यकता वाटत नव्हती. किंबहुना दिल्लीपतीच्या नव्या आज्ञांनी व कृत्यांनी क्रुद्ध झालेल्या महाराजांना त्याच्यावर आघात करणें हेंच आपलें कर्तव्य वाटू लागलेलें होतें, व ती त्यांची इच्छा दिल्लीपतीनेच पुरविली. त्यानेच होऊन संधिभंग केला व वासुकीच्या शेपटावर पाय दिला.

इ. स. १६६९ मध्ये औरंगजेब पैशाच्या अडचणींत सांपडला. त्यासरशी त्याने राज्यांतील सर्व खर्च कमी करण्याची आज्ञा दिली, दक्षिणेंतील मोगली सैन्य यामुळे एकदम कमी करण्यांत आलें. ही

मोगलांच्या सेनेंतून बाहेर पडलेली सेना शिवाजी राजांनी आपल्या पदरीं ठेविली. बादशहाने महाराजांवर जो पहिला प्रहार केला तो म्हणजे आग्ऱ्याला येण्याच्या वाटखर्चासाठी दक्षिणेच्या शाही खजिन्यांतून त्याने जे एक लक्ष रुपये महाराजांना देणगी म्हणून दिले होते ते परत घेण्याचें त्याने ठरविलें. या देणगीच्या परत वसुली-साठी त्याने संभाजीला दिलेली वऱ्हाडांतील जहागीर एकदम परत घेतली. मोगलांनी आपणहूनच हा संधिभंग केला.

एवढेंच करून औरंगजेब थांबला नाही तर मनूची असें लिहितो की, औरंगजेबाने शहाजादा मुअज्जमला अशी गुप्त आज्ञा पाठविली की, शिवाजीच्या तुमच्या पदरीं असलेल्या सेनापतींना व अधि-काऱ्यांना तत्काळ कैद करून दिल्लीला पाठवावें. शहाजादा मुअज्जम-मध्ये जसें बापाचें कर्तृत्व नव्हतें त्याचप्रमाणे बापाची क्रूरता व वंचकताही नव्हती. त्याला ही गोष्ट कांही योग्य वाटली नाही. त्याने त्याच्या पदरीं संभाजीचे प्रतिनिधि म्हणून असलेले प्रतापराव गुजर व निराजी रावजी यांना एकांतांत बोलावून घेऊन सर्व परि-स्थिति समजावून सांगितली व रात्रींच सैन्यासह पळून जावयास सुचविलें. तदनुसार ते दोघेही ससैन्य महाराजांकडे निघून गेले. मुअज्जमने औरंगजेबाकडे मराठे आधीच पळून गेल्यामुळे त्यांना पकडणें शक्य झालें नाही अशी संपादणी केली.

वऱ्हाडांतील संभाजी राजांच्या जहागिरीचा कारभार पाहण्याचें काम महाराजांचें कोकणांतील चाणाक्ष सेनापति रावजी सोमनाथ हे करीत होते. त्यांच्या ध्यानांत औरंगजेबाची ही कपटनीति येतांच त्यांनीही एके दिवशीं गुप्तपणें ससैन्य रायगडाकडे प्रयाण केलें. जातांना त्यांनी मोगली प्रदेश लुटून बरीच लूटही नेली. उदाहर-णार्थ, दि. २४ जानेवारी १६७० चें पुढील पत्र पहा: ‘ शिवाजीची फौज वऱ्हाड प्रांत लुटीत आहे. बादशाही प्रांतांतून वीस लाख रक्कम त्याने गोळा केली. औसा येथील किल्लेदार बरखुरदारखान याजकडून लिहून आलें की ‘ शिवाजीची वीस हजार फौज या प्रांतांत आली आहे; मराठे सर्व प्रांत लुटून वसूल घेत आहेत.

किल्ल्यापासून दोन कोसांवर त्यांचा मुक्काम आहे. मी किल्ल्याची तयारी चालविली आहे. (अश्रफखान हा औरंगजेबास हें लिहीत आहे.) माझी सर्व जहागीर शिवाजीने लुटली. मला निर्वाहाला सुद्धा कांही साधन नाही. बादशहांनी पैशाची मदत करावी. यावर बादशहा बोलला की 'असे पुष्कळ लोक मराठ्यांनी लुटले म्हणून पैसे मागत येतील. आम्ही कितीकांना असें नुकसान भरून द्यावें?

औरंगजेब बादशहाने आपण होऊन संधिभंग केला ही गोष्ट महाराजांच्या दृष्टीने अतिशय चांगली झाली. पुरंदरच्या संधीने परवयांच्या अधीन झालेली स्वराज्याची दुर्गलक्ष्मी पुन्हा स्वराज्यांत येण्यासाठी आसुसलेली होती. महाराज म्हणाले 'दोन वर्षें लष्करचें पोट भरलें ! आणि शाहजादा मित्र जोडिला. ही गोष्ट बरी जाहाली. आता मोगलाई मुलूख मारून खावयास वाव जाहला.' (सभासद)

वऱ्हाडांत रावजी सोमनाथाने केलेल्या लुटीवरून आपण केलेल्या संधिभंगाने चिडलेला शिवाजी मोगलाविरुद्ध शस्त्र धारण करील हें औरंगजेबाला उघडच दिसत होतें. पण महाराजांचे सैनिकी सामर्थ्य विशेष गंभीर विचार करण्यासारखें वाढलें असेल अशी मात्र त्याला कल्पना नव्हती. त्याने तत्काळ दि. २६ जानेवारी १६७० ला गोंड प्रांतांतील देवगड येथे असलेल्या दिलेरखानाला औरंगाबादेला ससैन्य जाऊन शाहजादा मुअज्जमला मिळण्याची आज्ञा केली. दाऊदखान नांवाचा त्याचा दुसरा सेनानी खानदेशांत होता. त्यालाही आपल्या प्रदेशाची व्यवस्था करून तत्काळ शाहजादा मुअज्जमला जाऊन मिळण्याची आज्ञा झाली. इतरही अनेक सरदारांना अशाच तऱ्हेच्या शाही आज्ञा झाल्या.

पण औरंगजेबाला महाराजांच्या सामर्थ्याची जशी कल्पना नव्हती तशीच आपलें सैन्य आंतून किती पोखरलेलें आहे व आपल्या सेनानायकांत एकमेकांचे प्राण घ्यावयास सिद्ध होण्याइतकी फूट कशी पडलेली आहे याही गोष्टीची त्याला कल्पना नव्हती. ज्या

दिलेरखानाला त्याने शाहजादा मुअज्जमच्या साह्यार्थ पाठविलें होतें तो व शाहजादा यांच्यांत मधून विस्तव न जाण्याइतकें तीव्र स्वरूपाचें भांडण होतें. व हेंही भांडण नवें नसून सन १६६७ पासूनच होतें. शाहजादा मुअज्जम हा आळशी, मूर्ख, व कर्तृत्वशून्य होता; तर दिलेरखान हा पराक्रमी, संतापी व कर्तृत्ववान् होता; अशा स्वामी-सेवकांचें पटावें कसें? पण दिलेरखानावर औरंगजेब बादशहाची विशेष कृपा असे. महाराजा जसवंतसिंग हा दिलेरखानाविषयी अत्यंत मत्सर बाळगून असे, व उलट दिलेर-खानही सर्वच हिंदूंचा कट्टर द्वेष्टा होता. दिलेरखानाचें बादशाही दरबारांत असलेलें वजन शाहजाद्याला आवडत नसल्यामुळे तो त्याचा मनांतून द्वेष करीतच असे. त्यांतच जसवंतसिगाच्या कर्ण-दंशाच्या सवयीनेही ही द्वेषभावना दिवसेंदिवस परिपुष्टच होत गेलेली होती. ही गोष्ट दिलेरखानाच्या ध्यानांत आल्यामुळे एकदा त्याने भर दरबारांत जसवंतसिगाचा सडकून अपमान केला. त्यामुळे तर शहाजाद्याचा दिलेरखानावर अतिशय राग झालेला होता. त्याचा परिणाम असा झाला की, दिलेरखानाच्या शत्रूंना व निंदकांना शहाजाद्याच्या पदरीं हमखास आश्रय मिळूं लागला व दिलेरखानाला शहाजाद्याचें पारिपत्य करतां येण्याची शक्यताच नव्हती. बिका-नेरचा राणा रावकर्ण राठोड हा दिलेरखानाच्या सैन्यांत एक सरदार होता. त्याचे राजपूत सैनिक सैन्यांत लूटमार करीत व दरवडे घालीत. त्यामुळे त्याला कैद करावें असा बादशहाने गुप्तपणें दिलेरखानाला आदेश दिला. पण रावकर्णाने शाहजाद्याचा आश्रय घेतला व दिलेरखानाला चडफडण्यापलीकडे कांहीही करतां आलें नाही.

शाहजादा मुअज्जम व दिलेरखान यांचें याप्रमाणे वितुष्ट असल्यामुळे दिलेरखानाने शाहजाद्यापासून दूर असलेला गोंड प्रांत हें आपलें कार्यक्षेत्र ठरविलें व तेथे तो मोंगलांची सत्ता प्रस्थापित करण्याचें कार्य करीत होता. पण बादशहाचें त्याला वारंवार शाहजाद्याला जाऊन मिळण्याचे आदेश आल्यामुळे तो दि. २ मार्च

१६७० ला नागपूरहून निघाला व दि. १२ एप्रिलला तो औरंगाबादेस पोहोचेल अशी अपेक्षा होती. दि. ८ एप्रिलला दिलेरखान औरंगाबादेपासून २६ मैलांवर पाथरी येथे येऊन पोहोचला. पण तेथेच थांबला. शाहजादा मुअज्जमने त्याला प्रत्यक्ष येऊन भेटण्याविषयी आज्ञा पाठविली. शिवाजीवर करावयाच्या स्वारींत शाहजाद्याला साहाय्य करण्यासाठी दिलेरखान आला होता. त्यासाठी प्रत्यक्ष भेटीची कांही आवश्यकता नव्हती. दिलेरखानाला त्याच्या तळावर स्वारीसंबंधाने कोणतीही आज्ञा शाहजादा करूं शकत होता. त्याऐवजी हा अनाहूत भेटीचा आदेश येतांच दिलेरखानाला वेगळाच संशय आला. त्याला असें वाटलें की शाहजाद्याच्या मनांत कपट असून आपण औरंगाबादेला भेटीस्तव गेल्यास आपली हत्या तरी होईल किंवा आपल्याला अटक तरी करण्यांत येईल. त्यामुळे त्याने वारंवार येणाऱ्या शाहजाद्याच्या आज्ञांना आपण आजारी असल्याचें निमित्त सांगून टाळलें. त्यासरशीं शाहजाद्याने दिलेरखान बंडखोरी करीत असल्याची कागाळी प्रत्यक्ष बादशहाकडेच केली. शाहजाद्याचा वारंवार कर्णदंश करणाऱ्या महाराजा जसवंतसिंगानेही बादशहाला असेंच लिहून कळविलें. ही वार्ता दिलेरखानाला कळतांच त्याने उलट मुअज्जमविषयी बादशहाकडे कागाळी केली की 'शाहजाद्याने दक्षिणेंत मोगली मुलुखाच्या संरक्षणासाठी कांही एक तजवीज केली नाही, इतकेंच नव्हे पण, तो शिवाजीस सामील झालेला आहे. म्हणून जर उत्तम तोफखाना आणि वेढ्याचें सामान पुरवून दोन वर्षेंपर्यंत दक्षिणेची सुभेदारी आपणाकडे सोपविण्यांत आली तर आपण मराठ्यांचा अगदी नायनाट करून टाकू.

—(जदुनाथ सरकार कृत, शिवाजी व शिवकाल. पृ. १२८)

या प्रमाणे शिवाजीवर आक्रमण करण्याऐवजी आपला पुत्र व सेनापति हे परस्परांविरुद्ध आरोप प्रत्यारोप करण्यांत गुंतलेले पाहून औरंगजेब संभ्रमांत पडला. महासंशयी बादशहाला आपला मुलगा शिवाजीशीं संधान बांधून असणें विशेष अशक्य वाटलें नाही.

गादी मिळविण्यासाठी स्वतः त्याने जीं अनन्वित कृत्यें केलीं होतीं व स्वतःच्या पित्याशीं जें वर्तन केलें होतें तसेंच आपल्या मुलानेही करण्याचें ठरविणें अगदी सहज शक्य आहे असें त्याला वाटलें. दिलेरखान व मुअज्जम यांत खरा बंडखोर कोण याचा शोध करण्यासाठी त्याने आपला कंचुकी (खानसामा) इफ्तिकारखान याला दक्षिणेंत पाठविलें. पण या पाताळयंत्री पुरुषाने योग्य तो शोध करण्याऐवजी अधिक भांडणें वाढविण्याचे मात्र कार्य केलें. त्याने दिलेरखानाला शाहजाद्याच्या मनांत त्याच्याविषयी अपार द्वेष भरलेला आहे असें सांगितलें. इतकेंच नव्हे तर भेटीस गेल्यास त्याची हत्त्या होणें अथवा त्याला अटक होणें सहज शक्य आहे असेंही सांगितलें.

याच्या उलट शाहजाद्याला दिलेरखान आपल्याला अगदी पाण्यांत पाहतो असें भासविलें. शाहजाद्याने पुन्हा बादशहाकडे कागाळी केली की दिलेरखान आपली कोणतीही आज्ञा मान्य करीत नसून त्याचें अफगाण सैन्य आपल्याच प्रदेशांत लुटालूट करतें. दिलेरखानाला हें कळतांच अधिक काळ दक्षिणेंत राहिल्यास शाहजाद्याच्या प्रयत्नांना यश येऊन बादशहाचें आपल्याविषयी मत कलुषित होईल व तसें झाल्यास आपल्यावर प्राणसंकट कोसळेल असें वाटून अनुज्ञेची वाट न पाहतां दिलेरखान दिल्लीला परत जाण्याची सिद्धता करूं लागला. हें शाहजाद्याला कळतांच त्याने बादशहाला कळविलें की उत्तरेकडे बंडाळी करण्यासाठी दिलेरखान येत आहे. तत्काळ बादशहाची आज्ञा झाली की दिलेरखानाला दक्षिणेंतच अडकवून ठेवावें. या आज्ञेने शाहजाद्याचें कामच झालें. त्याने दिलेरखानाशीं लढण्याची सिद्धता चालविली. आपलें पसरलेलें सारें सैन्य एकत्रित करून त्याने नवीन सैन्य भरतीही प्रारंभ केली. वस्तुतः दिलेरखान या वेळीं गोदावरीच्या कांठी मराठ्यांशीं युद्ध करण्यांत गुंतला होता. त्याला साहाय्य करायचें सोडून कैद करण्याची ही शाही आज्ञा येतांच तो भयकंपित झाला. पूर्वी त्याला जी शंका होती तिचें निश्चितींत रूपांतर झालें. त्यामुळे दिलेरखान अत्यंत उद्विग्न झाला. या वेळीं ऑगस्ट महिना म्हणजे भर

पावसाळ्याचे दिवस होते. तरीही प्राणभयाने आपलें शिबिर इत्यादि सर्व साहित्य जाळून टाकून तो शाहजादा मुअज्जमच्या भयाने उत्तरेस माळव्यांत पळून गेला. शाहजाद्याने जसवंतसिंगासह तापी नदीपर्यंत त्याचा पाठलाग केला. हें आपसांतील वैर अशा थराला पोहोचलें होतें की या पाठलागांत शहाजादा मुअज्जम व महाराजा जसवंतसिंग यांनी शिवाजी राजांनाही आपल्या साहाय्यार्थ बोलाविलें होतें.

औरंगजेबाने सूक्ष्म शोध केल्यावर सर्व वस्तुस्थिति त्याच्या ध्यानांत आली. सप्टेंबर महिन्यांत त्याने मुअज्जमला औरंगाबादेलाच राहण्याची आज्ञा केली. जसवंतसिंग व मुअज्जम यांच्या युती-मुळेच हा सगळा प्रकार झाल्याचें ध्यानांत घेऊन त्याने जसवंत-सिंगाला बऱ्हाणपूरला राहण्याची आज्ञा करून ही युति फोडली.

जानेवारींत औरंगजेबाने संधिभंग केला व तेव्हापासून सप्टेंबर पर्यंत मोगली सैन्यांत ही लाथाळी चालू होती. शिवाजी महाराजां-सारख्या राजनीतिविशारद पुरुषाच्या दृष्टीने ही मोठीच पर्वणी होती व तिचा त्यांनी भरपूर उपयोग करून घेतला. महाराजांच्या या वेळच्या शीघ्रगतीचें व पराक्रमाचें वर्णन करतांना सभासद म्हणतो : 'मोगल देश मारून मोठी धुंद उठविली. चहूं महिन्यांत सत्तावीस गड घेतले. मोठी ख्याति केली. हें औरंगजेबास कळोन मनांत चिंतातुर झाला.' जदुनाथ सरकार लिहितात:—

'सन १६७० मध्ये एके दिवशीं राज्यांतील निरनिराळ्या ठिकाणच्या आलेल्या बातम्या बादशहा वाचीत असतां दक्षिणेंतील एका बातमीपत्रांत शिवाजीने मोगली मुलुख लुटल्याची हकीकत त्याच्या वाचण्यांत आली. तत्काळ बादशहा शून्यव्यवसाय होऊन स्वस्थ बसून राहिला. बादशहाची अशी शोचनीय स्थिति झाली होती. आपल्या सर्व पराक्रमी सरदारांनी शिवाजीपुढे हात टेकले हें पाहून औरंगजेब नेहमी शिवाजीच्या पारिपत्त्यासाठी दक्षिणेंत आतां कोणाला पाठवावें असें दरबारांत विचारीत असे. औरंगजेब धर्मवेडा असे व काझी अबदुल वहाब याचें याच कारणाने बादशहावर

मोठें वजन असे. अर्थातच इतरांना तें असह्य होतें. औरंगजेबाचा उपर्युक्त प्रश्न ऐकून महाबतखान एकदा मुद्दामच टोचून म्हणाला, ' शिवाजीच्या पारिपत्त्यासाठी सरदार कशाला पाहिजे ? त्याला नामशेष करण्यास काजीचा फतवा पुरे आहे !' इराणचा तरुण बादशहा शहा अब्बास याने तर औरंगजेबास मुद्दामच अधिक्षेप-पूर्वक लिहून पाठविलें होतें की 'तूं स्वत.ला आलमगीर (जगताचा बादशहा) म्हणवितोस परंतु लहानशा जमीनदाराच्या मुलालाही तुला जिकतां येत नाही. मी लवकरच हिंदुस्थानांत येऊन बाद-शहाचीं कर्तव्यें कशीं करावींत हें तुला शिकविणार आहें.'

महाराजांची यापुढचीं विक्रमशाली कृत्यें 'अनभिषिक्त भूप-तीचे विजय ' या सदरांत येतात. या नेत्र स्तिमित करणाऱ्या जयमालिकेकडे पुढील प्रकरणांत वळूं.



प्रकरण नववें

# अनभिषिक्त भूपतीचे विजय

औरंगजेबानेच वंचनेचा आश्रय करून संधिभंग केल्यामुळे शिवाजी महाराज, त्या अडचणीचे प्रसंगीं केलेल्या संधीचें आता कोणतेंहि सोयरसुतक लागत नव्हते. प्रथम त्यांनी पुरंदरच्या तहाने मोगलांच्याकडे गेलेले आपले दुर्ग व प्रदेश मिळविण्याचा कृतनिश्चय केला. सिंहगड व पुरंदर या दोन दुर्गांचें महत्त्व तर त्यांना विशेषच होतें. मागे राजे शहाजी यांनी स्वत.च्या मुक्ततेसाठी पुरंदर व सिंहगड हे दुर्ग आदिलशहाला दिले असतां महाराजांना त्याचें किती वैषम्य वाटलें याचा उल्लेख प्रथमखंडांत केलेलाच आहे.

त्यांची दृष्टि प्रथम सिंहगडावर खिळली. राजगडावरून अवघ्या सहा मैलांवर ईशान्येला हा दुर्ग होता. मातुःश्री जिजाबाईसाहेबांचा निवास या वेळीं राजगडावर होता. असें सांगतात की, रोज त्यांच्या दृष्टीला पडणारा हा गड स्वराज्यांत यावा असें त्यांना सारखें वाटत होतें. त्यांनी या गडाची मागणी महाराजांच्या जवळ केली. पण जिजामातेने मागणी न केली असती तरी महाराजांना हा दुर्ग घेणें आवश्यक होतेंच.

या वेळीं कोंडाणा अथवा सिंहगड येथे औरंगजेबाच्या वतीने उदयभान नांवाचा एक कडवा योद्धा गडकरी म्हणून नियुक्त झालेला होता. हा मूळचा राजपूत असून बाटून मुसलमान झाला असल्याकारणाने त्याचें प्रस्थ विशेषच होतें. त्याच्या हाताखाली बाराशे कडवें रजपूत सैन्य गडावर होतें. उदयभान हा स्वतः अत्यंत जागरूक गडकरी असल्यामुळे गडावरील संरक्षणव्यवस्था अत्यंत उत्कृष्ट होती. गडाच्या पायथ्याशीं कोळी लोकांची वस्ती असून त्यांच्याच नायकाकडे पायथ्याच्या संरक्षणाचें काम असे. या गडाला पुण्याच्या दिशेला पुणें दरवाजा नांवाचा दरवाजा होता. खेड-शिवापूरच्या दिशेला दुसरा दरवाजा होता. त्याला कल्याण दरवाजा असें म्हणत. या दोन दरवाजाविना गडावर जायला दुसरी कोणतीहि वाट नव्हती. बाकी सगळ्या गडाला सरळ उभे कडे असून पक्की तटबंदी होती. या तटबंदीवरून तोफा व बंदुकांतून खालच्या शत्रूवर हवी तितकी आग ओकतां येत असे. कांही ठिकाणीं मुळीच तटबंदी नव्हती, कारण तिची आवश्यकताच न वाटावी इतके तेथील कडे भयानक होते. तेथेही सावध उदयभानाने आपल्या चौक्या ठेविलेल्याच होत्या. पश्चिमेच्या बाजूला डोणागिरीचा कडा होता. हा कडा अत्यंत भयंकर असून खाली रान माजलेलें असे. या कड्यावरून कोणी वर येण्याची कल्पनाच करणें शक्य नसल्यामुळे तेथे चौक्या नव्हत्या.

अशा या गडावर पाठवावयासाठी महाराजांनी आपल्या एका खात्रीच्या योद्ध्याची योजना केली. त्याचें नांव तानाजी मालुसरे.

तानाजी मालुसरे हा महाड जवळच्या उमराठे गांवचा राहणारा. हा महाराजांचा बालमित्र होता असें म्हणतात. या वेळीं तो महाराजांचा सुभेदार होता. अफझलखानाच्या जावळीच्या परिसरांत आलेल्या सैन्याचा संहार करतांना तानाजी मालुसरे यांनी केलेल्या पराक्रमाचें वर्णन व महाराजांनी तळ कोंकणांत केलेल्या स्वारीच्या वेळीं सूर्यराव सुर्वे याच्या आक्रमणाचा प्रतिकार करतांना त्याने केलेल्या पराक्रमाचें वर्णन प्रस्तुत ग्रंथाच्या दुसऱ्या खंडांत आलेलेंच आहे. सिंहगडाच्या या स्वारीच्या वेळीं तानाजीच्या घरीं त्याच्या मुलाचें लग्न निघालें होतें. पण पोवाड्यांत असें वर्णन आहे की, महाराजांच्या कार्याची निकड जाणून तानाजीने 'आधीं लगीन कोंडाण्याचं व मग रायबाचं' असे उद्गार काढून आपण होऊन ही कामगिरी पत्करली. तानाजीने खालच्या कोळ्यांच्या साहाय्याने किल्ल्यावर जाण्याची, चौकी पहारे विशेष नसलेली डोणागिरीच्या भयंकर कड्याची अवघड वाट शोधून काढली व माघ वद्य नवमीच्या दिवशीं अंधाऱ्या रात्रीं या कड्यावर मूठभर मावळ्यांसह घोरपडीच्या साहाय्याने तानाजी चढून गेला. या बाजूने आक्रमण होणार आहे हें उदयभानाला सांगूनही खरें वाटलें नसतें. पण अशक्य तें शक्य झालें होतें. मावळ्यांनी वर चढतांच जो दिसेल त्याला कंठस्नान घालावयास प्रारंभ केला. प्रथम असावध असलेले गडावरील राजपूत सैन्य लगेच सावध झालें. उदयभान तर संतापाने वेडाच झाला. त्याने आपल्या सैन्यानिशी शत्रूवर हल्ला चढविला. युद्धाच्या ऐन धुमश्चक्रींत उदयभान व तानाजी एकमेकांसमोर आले व एकमेकांवर तुटून पडले. तानाजी परिश्रमाने थकलेला होता. उदयभान आवेशांत होता. दोघेहि सारखेच रणपंडित होते. युद्धाच्या ऐन भरांत उदयभानाच्या हातांतील खड्गाचा जोरकस आघात होऊन तानाजीची ढाल तुटली. तरीहि त्या वीराने माघार न घेतां आपल्या कमरेचा शेला हाताभोवती गुंडाळून त्यावर उदयभानाचे वार झेलावयास प्रारम्भ केला. पण असें विषम युद्ध किती वेळ चालणार? शेवटीं

उदयभानाचा वार मर्मस्थानीं लागून महाराजांचा हा रणमर्द सुभेदार धारातीर्थी पडला. पण त्याने शेवटचा मर्मभेदक आघात उदयभानावर करून त्याला परलोकीं पाठवून मगच धारातीर्थी शयन केलें. दोघेहि एकमेकांचे वार लागून गतप्राण झाले. पोवाड्यांत असें वर्णन आहे की, तानाजीचा ८० वर्षांचा वृद्ध शेलारमामा या युद्धांत त्याच्याबरोबर होता. उदयभानाच्या मर्मभेदक वाराने तानाजी गतप्राण होतांच या वृद्धाने तरुणाच्या तडफेने उदयभानावर चालून जाऊन द्वन्द्वयुद्धांत त्याला ठार केलें. तानाजी पडतांच मावळ्यांचा धीर सुटला. पण येवढ्यांत कांही लोकांनी कल्याण दरवाजा उघडून दिला. पूर्वी असा संकेत ठरला होता की, मूठभर लोकांनिशी तानाजीने अवघड वाटेने वर जाऊन कल्याण दरवाजावरील सैन्य कापून काढून तो दरवाजा उघडावा व तानाजीचा धाकटा भाऊ सूर्याजी याने त्या दाराने आंत यावें. या संकेतानुसार कल्याण दरवाजा उघडतांच सूर्याजी ससैन्य आंत आला. तानाजी पडल्याची व मावळे घाबरून माघार घेत पळत सुटल्याची वार्ता त्याला कळतांच त्याने त्यांची वाट रोखून धरली, व आपल्या सुभेदाराचा सूड घेण्याऐवजी षंढासारखे पळून जाण्यासंबंधी त्यांची उत्तेजक शब्दांत निर्भर्त्सना केली. त्यासरशी अवसान चढून सारे मावळे परत फिरले व त्यांनी गडावरील सैन्याची लांडगेतोड चालविली. ते निर्नायक किती वेळ लढणार? बहुतेक सैन्य कापलें गेल्यावर उरलेलें राजपूत सैन्य शरण आलें व विजय झाला. हा विजय महाराजांना कळावा म्हणून सूर्याजीने गडावरील गवताच्या झोपड्यांना आग लावून दिली. त्या भडकलेल्या ज्वालांनीच राजगडावर उत्कंठित असलेल्या महाराजांना विजय कळला. पण हा विजय तीव्र दुःखाने माखलेला असेल अशी त्या वेळीं मात्र त्यांना कल्पना नव्हती. पण नंतर सूर्याजीच्या दूताने येऊन त्यांना समग्र वृत्त सांगितलें, 'तानाजी मालुसरे यांनी मोठें युद्ध केलें. उदयभान किल्लेदार यास मारिलें आणि तानाजी मालुसरेही पडिले.'

तानाजीच्या मृत्यूचें महाराजांना अतोनात दुःख झालें. त्यांनी

तानाजीची सुभेदारी सूर्याजीला दिली. स्वराज्य मंदिराचा पाया प्रिय सुहृदांच्या रक्तमांसाच्या चिखलाने भरला जातो तो असा.

याच वर्षीच्या फाल्गुन शु. पौर्णिमेला (दि. २४ फेब्रु. १६७०) महाराजांच्या कौटुंबिक जीवनांत एक आनंददायक घटना घडली. ती म्हणजे राजारामाचा जन्म होय.

सिंहगडामागोमाग पुरंदरकडे महाराजांनी दृष्टि वळविली. तेथे राझीउद्दीनखान नांवाचा गडकरी होता. दि. ८ मार्च १६७० मध्ये निळोपंत मुजुमदार यांनी पुरंदरवर स्वारी करून तो जिंकला. व गडकरी राझीउद्दीनखान यास अटक केली. पुरंदरच्या मागोमाग चांदोरवर स्वारी करून तें लुटण्यांत आलें. तेथील गडकरी प्राणभयाने गडांतच लपून बसला. येथील लुटींत एक हत्ती, बारा घोडे व चाळीस सहस्र रुपये इतकी लूट मिळाली. १६७० च्या फेब्रुवारींत स्वतः महाराजांनी माहुलीला वेढा घातला. तेथे मनोहरदास गौर या नांवाचा मोगलांनी नियुक्त केलेला गडकरी होता. तो अत्यंत शूर व सावध होता. वेढा चालू असतां एका रात्रीं पांचशे निवडक मावळ्यांचें सैन्य शिड्यांच्या साह्याने गडाच्या तटबंदीवर चढून गेलें. त्यासरशी सावध गडकऱ्याने त्यांच्यावर एकदम चालून जाऊन सारे मावळे कापून काढले. महाराजांनी तात्पुरता माहुलीचा नाद सोडला व कल्याण-भिवंडीवर ते चालून गेले. त्यांनी तेथील ठाणेदार उजबेगखान याला ठार करून कल्याण व भिवंडी स्वराज्यांत समाविष्ट केली. त्या मागोमाग कोंकणच्या अधिकाऱ्यांना त्यांनी पिटाळून लावलें. नांदेडचा मोगल अधिकारीहि मराठ्यांच्या भीतीने पळून गेला.

याप्रमाणे सर्व ठिकाणीं मोगलांचा पराभव होऊन त्यांचीं ठाणीं स्वराज्यांत समाविष्ट होत होतीं. नाही म्हणायला मोगलांचा एक सरदार दाऊदखान कुरेशी हा मात्र महाराजांसमोर थोडा वेळ टिकाव धरूं शकला. त्याने पारनेर व जुन्नरवर विजय संपादन करून थोडेसें यश मिळविलें. पण तें अतिशय थोडा वेळ टिकणारें ठरलें.

माहुलीला मनोहर गौर याने मराठ्यांचा एकदा पराभव केल्याचा उल्लेख वर केलाच आहे. पण गडावर पुरेशा साहित्याचा जाणवणारा अभाव, तुटपुंजें सैन्य, मोगलांच्या सर्वत्र होत असलेल्या पराभवाच्या ऐकूं येणाऱ्या वार्ता आणि मराठ्यांचे एकामागून एक होणारे दीप्तिमान् विजय यामुळे व्यर्थ अपयशाचे धनी होऊं नये म्हणून त्याने आपल्या जागेचें त्यागपत्र दिलें. त्याच्या जागीं अलीवर्दी बेग याची गडकरी म्हणून नियुक्ति झाली. महाराजांनी या संधीचा लाभ घेऊन दि. १६ जून १६७० ला माहुलीवर स्वारी केली व दोनशे सैनिकांसह नवीन यवन गडकऱ्यास ठार मारून माहुली स्वराज्यांत समाविष्ट केली. लोहगड, हिंदोळा, करनाळा, रोहिडा असे एकामागून एक गड जिंकून व मोगली प्रदेश लुटून महाराजांनी ऑगस्टमध्ये जुन्नरला वेढा दिला.

याप्रमाणे चार महिन्यांच्या अवधींत सत्तावीस गड जिंकून महाराजांच्या अश्वस्वारांच्या टोळ्या निर्भयपणें मोगली प्रदेशांत संचार करूं लागल्या. स्वतः महाराज तीस सहस्र सैन्यासह संचार करीत होते. त्यांच्या सैन्याच्या वाटेला जाण्याची शाहजादा मुअज्जमची छाती होत नव्हती. त्यामुळे तो शिवाजीला मिळाल्याचेंहि तर्क वितर्क चालू होते. उदाहरणार्थ, सुरतेच्या इंग्रजांचें पुढील पत्र पहा :—

'शहाजादा मुअज्जम शिवाजीला उत्तेजन देत असून, औरंगजेबाने आपल्या धाकट्या भावाला गादीचा वारस ठरविल्याकारणाने त्याच्याविरुद्ध बंड उभारून शिवाजीला तो मिळणार आहे. शिवाजीच्या हालचाली पाहून या मताला दुजोरा मिळतो. कारण, आता तो पूर्वीप्रमाणे चोरासारखा वागत नाही, तर राजरोसपणें तीस हजार सैन्यानिशी जाईल तेथे जिंकण्याचा त्याचा क्रम चालू असून शाहजादा मुअज्जम जवळ असतांनाहि त्याला विरोध करीत नाही.' —(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. १२९५)

या सुमारास महाराजांनी स्वतः तर जययात्रेला प्रारंभ केलाच होता, पण आपले पेशवे मोरोपंत पिंगळे, सेनापति प्रतापराव गुजर

आदि साऱ्या कर्त्या पुरुषांनाहि वेगवेगळ्या स्वाऱ्यांवर पाठविलें होतें. पण एका वृद्ध स्वामिनिष्ठ सेवकाला मात्र त्याच्या वाढत्या वार्धक्याकडे पाहून व सारेच स्वाऱ्यावर असतां 'वतनीचें' बैठें काम दायित्व घेऊन करणारा कोणी विश्वासू पुरुष हवा होता म्हणून तें काम दिलें. हा वृद्ध पुरुष म्हणजे नुकताच पुरंदरवर विजय संपादन केलेले निळोपंत मुजुमदार होत. पण पंतांना हें कांही आवडलें नाही. त्यांच्या वृद्ध हाडांत लढण्याची रग अजून होती. त्यांनी महाराजांना सांगितलें की, ही वेळ आमच्यासारख्यांनी बैठें काम करण्याची नसून तरवार गाजविण्याची आहे. तरी हें बैठें कारकुनी काम अन्य कोणाला सांगून मला युद्धाचेंच काम द्यावें. पण महाराजांना हें रुचलें नाही. त्यांना दोन्ही कामें सारखींच महत्त्वाचीं वाटत होतीं. पंतांना त्यांनी 'वतनी' कामच घ्यावयास सांगितलें. पंतांनी काय केलें असेल? त्यांनी महाराजांची इच्छा जाणून स्वतःची आवड निवड बाजूला ठेवली व आनंदाने तें काम स्वीकारलें.

राष्ट्रनिर्मितीसाठी उभारलेल्या यंत्रांत कोणाला कोठें बसवावें हें शेवटीं नेत्याच्या इच्छेनुसारच ठरतें. लहरीनुसार काम मिळालें नाही म्हणून रुसून बसणें हा विघटनात्मक भाव होय. पडेल तें काम तितक्याच उत्साहाने पार पाडण्याची प्रवृत्ति हाच संघटनात्मक भाव होय. संघटनात्मक भावव्यक्तित्व ध्येयांत विलीन झाल्याविना व निरहंकारी प्रवृत्तीविना उत्पन्न होत नाही. अशा व्यक्तित्वाचा संपूर्ण विलय झालेलीं माणसें महाराजांच्या परिसरांत होतीं म्हणूनच त्यांचें धर्मराज्याचें स्वप्न साकार झालें आहे.

हें सारें प्रकरणच अत्यंत उद्बोधक असल्यामुळे त्याचें समग्र स्वरूप सांगणारें महाराजांचें एक पत्रच उद्धृत करतों म्हणजे त्यावरून कार्यनिष्ठा, उज्ज्वल स्थायीभाव व कर्तव्यपरायणता यांनी महाराजांचा परिसर कसा गजबजलेला होता याची कल्पना येईल. तें पत्र असें :—

'राजश्री निळोपंत मुजुमदार यास वतनीचा कारभार

करावयास ठेविलें. माहोलीपासून भीमगडपावेतों व इंदापूर, पुणें, चाकण कदीम वतनीचा कारभार करावा. यासी पंडित म।। इलेनें साहेबासी अर्ज केला की, 'आजी कामाचे दिवस आहेत. वतनीचा कारभार आणिक कोण्हास सांगावा. आपण बराबरी येऊन दाहा लोक कार्ये करितील तैसी करून देऊन गड घेणें पडिलें तरी घेऊन देऊन ऐसा अर्ज केला. त्यास साहेबी उत्तर दिधलें की : वतनी राहाणें हेंहि काम थोर आहे. वतनी राहाणें येथें तुम्हांस बकशीस इमारतीस पैके पावतील त्यास दरसदे होन २ दोनीप्रमाणें पावतील. ऐसे साहेब बोलिलियावरी पंडित म।। इले बोलिले की : जरी वतनीचेंहि काम थोर आहे तरी बहुत बरें. एकाने सिद्ध संरक्षण करावें. एकानें साध्य करावें. दोन्ही कामें साहेब बराबरीनें मानितातीतरी आपण वतनीं राहोन. परंतु इमारतीचे पैके पाववून बकशीस घेणार नाही. मोरोपंत त्रिंबक शिवनेर येथें पाठविले आहेत. ते गड घेतील व मुलुक घेतील, कामें करितील. साहेब थोर कामास जातातीतें काम श्रीचे कृपेनें होऊन येईल. त्यास राजश्री मोरोपंतास मेहेरबानीने पंचवीस फुलें दिधलीं तरी आम्हांसहि वीस फुलें द्यावीं. ऐसा साहेबी निश्चय केला पाहिजे. त्यावरी साहेबी ऐसाच तह दिधला की : वतनी राहोन कारभार करावा. इमारतीचे पैके पाववून बकशीस न घ्यावें. राजश्री मोरोपंत काम करितील, गड घेतील, पैके मिळवितील, सुरागिरीचा प्रयत्न करून घेतील. त्यास मेहेरबान होऊन, पेशवे आहेत याकरितां पंचवीस फुलें दिधलीं तरी, तुम्हांस मजमूच्या काईदियानें, वतनीचें काम तें काम बराबरी ऐसें समजोन त्यास द्यावीं तेच वख्तीं तुम्हांसहि २० फुलें पाठवावी. या हिसेबा (नें) जैसें त्यास पावेल तैसें तुम्हांस देऊन. ऐसा साहेबी निश्चय करून पंडित म।। इलेस वतनीचा कारभार करावयास ठेविलें असे. पंडित म।। इलेनेहि सद्दरहूप्रमाणें मान्य केलें असे. मोर्तब सूद (मर्यादेयं विराजते)'

—(मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें. संपादक विश्वनाथ काशीनाथ राजवाडे, खंड ८, पत्रक १०)

शिवाजी महाराजांच्या विजयाची अशी चढती स्थिति पाहून ते सुरतेवर धनलाभाच्या अपेक्षेने चालून येतील असा संशय प्रथम इंग्रजांना आला. दि. २१ एप्रिल १६७० च्या मुंबईकर इंग्रजांनी सुरतेला पाठविलेल्या पत्रांत म्हटलें आहे: 'शिवाजी सुरतेपासून १०० मैलांच्या आंत नसला तरी सुरतेकडे तो येईल हें नक्की समजून बंदोबस्त करणें जरूर आहे.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र १३०६)

शिवाजी कदाचित् सुरतेवर चालून जाईल अशी शंका औरंगजेबालाही आलीच होती. म्हणून बादशहाने १६७० च्या एप्रिल मध्ये पांच सहस्र सैन्यानिशीं बहादुरखानाला तेथे पाठविले होतें. शिवाजीशी लढण्यासाठी बारा सहस्र अश्वदल द्यावें अशी मागणी या वेळीं मोगलांनी विजापूरच्या बादशहाकडेहि केली होती. महाराज अशी सिद्धता असतांना सुरतेकडे वळतातच कशाला ? त्यांनी या स्वारीची सिद्धता गुप्तपणें चालविली होती. पण योग्य वेळींच ते ही स्वारी करणार होते. बहादूरखान तेथून दूर जाण्याचीच संधि ते पाहत होते.

ऑगस्टमध्ये औरंगजेबाचा पुत्र शाहजादा मुअज्जम बापाविरुद्ध बंड करणार असल्याच्या अफवा होत्या. औरंगजेबाचाच हा एक डाव होता. डॉ. बाळकृष्ण म्हणतात :—

'The arch diplomat Aurangzeb instigated his son Muazzam to pretend rebellion, so that he might test the loyalty of his troops and officers and once more entrap Shivaji into his cluches. Everything happened according to the pre-arranged plan, but the Maratha lion was too shrewd to be deceived again by the Mogul Fox. In spite of repeated invitations, Shivaji refused to join the prince's army and to march with him to the north.

[Shivaji the great By Dr. Balkrishna Vol. I part II Page 279]

'कूट राजनीतिज्ञतेचा केवळ अर्क असलेल्या औरंगजेबाने आपला मुलगा मुअज्जम याला स्वतःच्याच विरुद्ध बंड करण्याची बतावणी करावयास सांगितलें. त्याला यांत आपल्या सैनिकांच्या व अधिकाऱ्यांच्या विश्वासूपणाची परीक्षा घेऊन शिवाजीला आपल्या जाळ्यांत पुन्हा ओढावयाचें होतें. ठरविलेल्या या योजनेप्रमाणे सर्व कांही घडून आलें. पण या लांडग्याच्या जाळ्यांत पुन्हा न सापडण्यासारखा तो मराठा नृसिंह चाणाक्ष होता. वारंवार बोलावूनही महाराजांनी मुअज्जमच्या सैन्यांत येण्याचें व त्याच्या बरोबर उत्तर भारतांत जाण्याचें नाकारलें.'

सप्टेंबरच्या सुमारास सुरतेवर स्वारी करण्यासाठी शिवाजी आपलें सैन्य सज्ज करीत आहे अशी वार्ता सुरतेच्या इंग्रजांना कळली. त्यासरशी त्यांनी आपल्या वखारींतील पैसे व माल सुरक्षित स्थळीं नेऊन ठेविला. ही वार्ता कळूनही तेथील मोगल अधिकारी मात्र असावधच राहिला. त्याने सुरतेच्या संरक्षणासाठी केवळ ३०० सैनिक ठेविले होते. पूर्वीच्या अनुभवावरूनही सुरतेच्या मोगल अधिकाऱ्यांना कोणतेंही शहाणपण आलेलें नव्हतें बहादूरखानाचें सैन्य जवळ नसल्याची निश्चिति होतांच १५००० सेनेसह महाराजांनी सुरतेकडे प्रयाण केलें. दि. २ ऑक्टोबरला अश्वदळ व पायदळ मिळून पंधरा सहस्र सैन्यानिशी शिवाजी सुरतेपासून अवघ्या वीस मैलांवर येऊन थडकला. ही भयंकर वार्ता ऐकतांच सुरतेचे व्यापारी घाबरून गेले व एकदम पळापळीला प्रारंभ झाला. त्यांच्या संरक्षणासाठी असलेले मोगल अधिकारीही पळून गेले. पूर्वी १६६४ मध्ये शिवाजी महाराजांनी सुरत लुटल्यावर औरंगजेबाने नगराला सुदृढ तटबंदी केलेली होती. दि. ३ ऑक्टोबरला कोटावरील मुठभर मोगली सैन्याच्या प्रतिकाराला चोख उत्तर देऊन महाराजांच्या सैनिकांनी त्यांना हुसकून दिलें; व नगरांत प्रवेश केला. फ्रेंच वखारीचे प्रमुख आपलें काय होईल म्हणून भयग्रस्त झाले होते. त्यांनी शिवाजी महाराजांना मोठी भेट अर्पण करून आपलें संरक्षण करून घेतलें. काशगरचा पदच्युत राजा अबदुल्लाखान

नुकताच मक्केच्या यात्रेहून परततांना सुरतेला स्थिरावला होता. त्याच्याजवळ सोन्याचा पलंग, सोन्याची पालखी, जड जवाहीर व औरंगजेबाने दिलेली मूल्यवान लूट होती. महाराजांच्या सैनिकांनी या तार्तार राजाला यथेच्छ लुटलें. इंग्रजांनी आपल्या वखारींतला माल पूर्वीच दुसरीकडे नेऊन ठेविलेला असल्यामुळे लुटण्यासारखें विशेष कांही तेथे नव्हतेंच. तरीही वखारीच्या संरक्षणासाठी पन्नास खलाशी त्यांनी तेथे ठेविले होते. महाराजांच्या सैन्यावर त्यांनी तोफांचा मारा केला.

डच वखारवाल्यांना महाराजांनी असा आदेश दिला होता की, ते जर उपद्रव न देतां आपल्या वखारींतच स्वस्थ राहतील तर मराठेही त्यांच्या वाटेला जाणार नाहीत. डचांनी तो आदेश मान्य केल्यामुळे त्यांची वखार सुरक्षित राहिली. तार्तारी लोकांनी मात्र कडवा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला. सभासद म्हणतो : 'प्रतापराव सरनोबत व व्यंकोजी दत्तो व मकाजी आनंदराव व वरकड सरदार १०००० पागा व १०००० शिलेदार असें २०००० जमाव लष्कर, तसेंच सात पांच हजार मावळे लोक निवडक व सरकारकडून मोरोपंत पेशवे व निळोपंत व दत्ताजीपंत व बाळप्रभू चिटणीस असे बरोबर घेतले. कोळवनांतून नीट पांचगांव, सातगांव, एक मजल करून सुरतेस पावले. सुरतेचे लोक गैरहुशार होते. चढे घोड्यानिशी सुरतेच्या दरवाजा जवळ पेठेंत लष्कर शिरलें. मोगलांचीही फौज पुढे आली. मोठी मारामारी जाहली. तांब्राकडील लोक बहुत मारिले. आणि सावकारांचे वाडे काबीज करून . . . शहर दोन दिवस अहोरात्र लुटलें.'

वखारींतील इंग्रजांकडे महाराजांनो प्रथम अगदी दुर्लक्ष केलें होतें. पण त्यांची रग जिरविण्यासाठी सुरत सोडण्यापूर्वी मराठी सैन्याने त्यांच्याकडे दृष्टि वळविली. मराठी सैनिकांचा तो आवेश पाहतांच वखारींतील खलाशांच्या तोफा बंद पडल्या व इंग्रजांचे दोन प्रतिनिधि येऊन महाराजांना भेटले. तरवारी, कटयारी व शेंदरी कापड यांची राजभेट महाराजांना अर्पण करून त्यांना स्वत:च्या

वखारीचें संरक्षण करण्याची प्रार्थना केली. महाराजांनी त्यांच्याशीं हस्तांदोलन करून त्यांना प्रेमळपणाची वागणूक दिली. दि. ५ ऑक्टोबरला महाराज सुरतेहून परतले. परत जातांना त्यांनी सुरतेच्या धनिक व्यापाऱ्यांना चेतावणी दिली की 'प्रतिवर्षीं बारा लक्ष रुपये खंडणी म्हणून न दिल्यास आम्ही पुढच्या वर्षीं पुन्हा येऊं.'

डच रेकॉर्डस्‌मध्ये सुरतेवरील या दुसऱ्या स्वारीचा तपशील पुढीलप्रमाणे दिला आहे.

'शिवाजीच्या मुलखांत फ्रेंचांनी एक वखार घातली असल्यामुळे शिवाजीने स्वहस्त लेखाने ( by an autograph letter) आपण सुरतेवर हल्ला करणार आहों परंतु तुमच्या रक्षणाची काळजी घेतली जाईल असें समजून स्वस्थ रहावे' असें (सुरतेच्या) फ्रेंचांना कळविलें होतें. नगरांत आल्यावर शिवाजीच्या शिपायांनी त्यांच्या वखारीला गराडा दिला, व दंगा माजवला. परंतु इतर कोणताही त्रास दिला नाही. फ्रेंचांनीही त्यांच्याजवळ भरपूर तयारी असतांना आणि मूल्यवान् नजराणे देऊन स्वास्थ्याची हमी मिळविली असतांना देखील कराराविरुद्ध, आपल्या दोन कृष्णवर्णी सेवकांना मराठ्यांच्या हातून विनाप्रतिकार, आपल्या डोळ्यांदेखत मरूं दिलें !

इंग्रजांच्या गलबतावर पुष्कळ श्वेतवर्णी सैनिक होते. शिवाजीच्या लोकांनी इंग्रजांच्या वखारीवर हल्ला करून त्यांना टेकीस आणलें होतें. परंतु गलबतांवरून किनाऱ्यावर पाठविलेले ११० लोक व त्यांतील कर्नल याने बाजू सावरली. पुढे शिवाजी निघून जाण्यापूर्वी इंग्रजांची व त्याची आपसांत समजूत निघाली.

काशगरचा राजा शिवाजी येण्यापूर्वी थोडा वेळ जुन्या कारावान सराईच्या आश्रयाला आला होता. त्याचा सर्व विश्वास समोरच्या फ्रेंचांवर होता. ते मदतीला न आल्यामुळे त्याला सराई सोडून जावी लागून त्याची संपत्ति शिवाजीच्या हातीं लागली; याबद्दल फ्रेंचांना दोष देऊन त्यांचा सूड उगविण्यासाठी बादशहाकडे यांच्या गैरविश्वसनीयतेबद्दल त्याने अर्ज केला आहे.

शिवाजी सुरतेंत येण्यापूर्वीच मालमत्ता आणि बायकामुलें स्वालीला पाठवून आम्ही (डच) फक्त ३५ लोक घेऊन वखारींत राहिलों. परंतु शिवाजीने आम्हांला (डचांना) त्रास दिलाच नाही. शिवाजीकडून 'तुम्ही कोणतीही हालचाल न केल्यास तुम्हाला त्रास होणार नाही. तरी तशी खात्री देण्याकरिता इसम पाठवा' असा निरोप आल्यावरून आम्ही मनुष्य पाठविला. त्याला असें सांगण्यांत आलें की 'शहरांतील मुख्य व्यापाऱ्यांकडून द्रव्य उकळण्याचा उत्तम मार्ग कोणता? याचें उत्तर घेऊन उद्या ये.' इंग्रजांकडून तशाच प्रश्नाचें उत्तर मागविलें होतें. तें त्याच दिवशी यावयाचें होतें. परंतु दुसऱ्या दिवशीं हा इसम शिवाजीकडे जाणार तोंच शिवाजी शहर सोडून गेल्याची बातमी पसरली. आमचे इसमाबरोबर सुरक्षित पोहोंचविण्याकरितां आलेले शिवाजीचे दोन शिपाई अशा रीतीने आमच्याकडेच राहिले! शहरांत सोडल्यास, (चिडलेल्या) लोकांनी त्यांना ठारच केलें असतें! वखारींत ठेविल्यास, सुभेदाराच्या स्वाधीन करावें लागलें असतें. तेव्हां रात्रीं गुप्तपणें आम्ही त्यांना नगराबाहेर सोडून दिलें आणि ते शिवाजीला जाऊन मिळाले.

या निघण्याच्या त्वरेचें कारण समजलें नाहीं. त्याला कोणाचाच विरोध झाला नाही व होण्याचा संभव नव्हता. त्याने सुरत ६ ला सोडली आणि १३ ला तो २५ मैलांवरील पेठ गांवीं ६००० घोडदळ व १००० पायदळ घेऊन आला असून पुनः सुरतेवर येणार अशी बातमी आली. लगेच सर्वत्र पळापळी होऊन शहर सामसूम झालें. **तुर्क, इंग्रज, फरेंच** सर्व पळाले. डचांनी वखारींत तोफा व ५२ शिपायांचा बंदोबस्त करून बंदरापासून वखारीपर्यंत मिरवणूक काढली. या योगाने भयभीत होऊन पळालेल्या मुसलमानांवर चांगला परिणाम झाला. वारंवार खोटया हुली उठून लोकांच्या मनोवृत्ति संशयांत आणि गोंधळलेल्या राहतात. त्यांतून शिवाजी ३५ मैलांवरच तळ देऊन राहिल्यामुळे केव्हाही ३–४ दिवसांत येऊन पोचेल ही धास्ती असल्याने व्यापार कायम बसला.

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. १३५१)

या सुरतेवरील दुसऱ्या स्वारींत महाराजांना रोकड, मोत्यें आणि इतर वस्तु मिळून त्रेपन्न लक्षांचा माल व सुरतेजवळच्या नवल, शाहू, हरिशाहु आणि इतर खेडयांतून मिळून तेरा लक्षांच्या वस्तु याप्रमाणे सहासष्ट लक्षांची लूट मिळाली.

महाराज सुरतेहून निघून गेल्यावर इतर लुटारूंनीही सुरतेच्या व्यापाऱ्यांना लुटलें. त्यांत महाराजांना 'लुटारू' व 'दरडेखोर' म्हणणारे सुरतेच्या इंग्रज वखारींतलेही लोक होते हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

सुरतेवरील या दुसऱ्या स्वारींत शिवाजी महाराजांनी डच, इंग्लिश व फ्रेंच या तिन्ही वखारींना कोणत्याही प्रकारें उपद्रव न देतां इतर सगळयांना लुटल्यामुळे या तिन्ही वखारवाल्यांनी शिवाजीशीं संगनमत केलें असावें अशा संशयाने बादशहा औरंगजेब त्यांच्यावर अतिशय रागावला. त्याने इ. स. १६६४ च्या शिवाजीच्या स्वारीच्या वेळीं इंग्रज वखारीचा प्रमुख जॉर्ज ऑक्झिडेन याने दाखविलेल्या बाणेदारपणावर प्रसन्न होऊन इंग्रजांना ज्या व्यापारी सवलती दिल्या होत्या त्या सर्व काढून घेतल्या. इतकेंच नव्हे तर पुन्हा कोणत्याही युरोपियन वखारीला सवलती दिल्या नाहीत.

महाराजांच्या या स्वारीनंतर सुरतेंतील व्यापार डबघाईस येऊन हें बंदर मोडकळीस आलें. महाराज अथवा त्यांचें सैन्य सुरतेजवळ आल्याच्या वार्ता वारंवार पसरत. त्यांच्या नांवाचा असा धाक उत्पन्न झाला होता की, या वार्तेसरशी इतर व्यापारी लोकच नव्हे तर इंग्रज वखारवाले सुद्धा घाबरून पळापळीला प्रारंभ करीत. प्रत्येक व्यापारी आपला माल सुरक्षिततेसाठी शेजारच्या खेडया-पाडयांतून गुप्तपणें ठेवी. या अस्थिरतेमुळे आयात मालावर विलक्षण परिणाम होऊन सुरतेचा व्यापार पूर्णपणें बसला. सुरतेला यानंतर १६७९ पर्यंत हेंच वातावरण होतें. सर जदुनाथ सरकार म्हणतात : 'या लुटीनंतर एक महिनापर्यंत सुरतेस बेबंदशाही माजून राहिली होती. आणि रोज नव्या नव्या गप्पा उठत होत्या. दि. १२ जूनला शिवाजी वीस हजार फौजेसह पुन्हा सुरत लुटण्यासाठी

येत आहे अशी गप्प पसरतांच, सर्वत्र जी धावपळ सुरू झाली, ती सांगतां पुरवत नाही. १६७० च्या नोव्हेंबर आणि डिसेंबरमध्येही शिवाजी सुरत लुटण्यास येत आहे अशा गप्पा उठल्या होत्या. सन १६७२ च्या जूनमध्ये मोरोपंताने रामनगरावर जय मिळविल्याने तो आता सुरत लुटण्यास येईल अशी सुरतकरांना रात्रंदिवस काळजी वाटत होती. त्याने उघडपणें सुरतेच्या फौजदाराकडे चौथाईची मागणी तर केलीच होती, आणि त्यामुळे सुरतकर अधिकच घाबरून गेले होते. पुढे१६७२ च्या फेब्रुवारी आणि ऑक्टोबर महिन्यांत सुरतकर असेच भीतमानस झाले होते. १६७३ च्या सप्टेंबरांत अशीच भीति त्यांना वाटली होती. १६७४ च्या ऑक्टो-बरांत तीच धास्ती त्यांना उत्पन्न झाली होती, आणि १६७९ च्या डिसेंबरांत याच चिंतेने त्यांना पछाडिलें होतें, सारांश सुरतेचा व्यापार या लुटीमुळे आणि शिवाजीच्या त्रासामुळे याप्रमाणे सपशेल बसला. ––(शिवाजी व शिवकाल पृ. १३२ व १३३)

मोगल, आपल्या वैभवश्रीचें विलासमंदिर असणाऱ्या, या नगरीला महाराजांपासून वांचविण्यासंबंधांत किती दयनीय परिस्थितींत होते याची या घटनेवरून कल्पना येते.

सुरतेच्या या दुसऱ्या स्वारीच्या वेळीं साऱ्या लोकांची पांचावर धारण बसली असतां इंग्रज वखारीचा मुख्य स्ट्रिनशॅम मास्टर याने अवघ्या पन्नास लोकांनिशी आपल्या वखारीच्या संरक्षणार्थ जें बाणे-दार वर्तन केलें त्यामुळे त्याच्या राष्ट्राने त्याचा मोठा गौरव केला. तो लिहितो: 'सुरतेची लूट दुसऱ्याने करण्याकरिता शिवाजी आला. प्रेसिडेंट व कौन्सिल स्वालीला जाऊन त्यांनी मजबरोबर ३० लोक दिले. तेवढ्यांचे साहाय्याने मी वखारीचें रक्षण केलें; त्यायोगे राष्ट्राची मान्यता वाढली, व कंपनीच्या वर्षाच्या जकातीची बचत झाली. मी इंग्लंडांत परत गेल्यावर मला या कामगिरीबद्दल सुवर्ण-पदक देण्यांत आलें. ––(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. १३४९)

महाराज याप्रमाणे आग्ऱ्याच्या अपमानाचा सूड घेत होते. त्या वेळीं दक्षिणेचा मोगल सुभेदार काय करीत होता? तो आपल्या

सैन्यानिशी दिलेरखानाचा पाठलाग करीत होता. औरंगजेबाच्या आज्ञेने हा पाठलाग थांबवून शाहजादा औरंगाबादला परत येतांच त्याला सुरतेची ही वार्ता कळली. त्याने ब-हाणपूरला असलेला मोगल सरदार दाऊदखान कुरेशी याला शिवाजी राजांचा पाठलाग करण्याची आज्ञा केली. या वेळीं महाराज सुरतेहून निघून बागलाण-मध्ये शिरले होते. दाऊदखानाचे हेर महाराजांच्या मागावर होतेच. त्यांनी खानाला कळविलें की शिवाजी मुल्हेर मागे टाकून कांचन मांचनच्या घाटाने पुढे जात आहे. दाऊदखान रात्रीच्या वेळीं चांदोरच्या किल्ल्याजवळ येऊन महाराजांच्या पुढील वार्तेची वाट पाहूं लागला. मध्य रात्रीस पुनश्च गुप्तचरांनी वार्ता आणली की, शिवाजीने आपल्या सैन्याचे दोन विभाग केले असून एक विभाग स्वत:कडे घेऊन तो घाट उतरून पुढे नाशकाकडे गेला व दुसरा विभाग, घाटांत मागे रेंगाळत असलेल्या लोकांस घेण्यासाठी त्याने ठेविला आहे. ही वार्ता कळतांच दाऊदखान निघाला. त्या वेळीं मध्यरात्र उलटून गेली होती व चंद्र मावळून अंधाराचें साम्राज्य पसरलें होतें. त्यामुळे मोगलांचें सैन्य पांगून त्याला अव्यवस्थित स्वरूप आलें होतें. या सैन्याच्या अग्रभागीं इखलासखान मियाणा हा पठाण सेनानी होता. तो टेकडीवरून खाली उतरत असतां शिवाजी राजांचें सैन्य मैदानावर युद्धाची सिद्धता करून उभे असल्याचें त्याला दिसलें. तत्काळ तो मदोन्मत्तपणें त्या सैन्यावर तुटून पडला. महाराजांच्या या सैन्यांत सेनापति प्रतापराव गुजर, व्यंकोजी दत्तो, मकाजी आनंदराव (शहाजी राजांचा दासीपुत्र)असे अनेक रणक्षेत्रें गाजविलेले जयशाली सेनानी होते. इखलासखान घोड्यावर होता. त्यांनी पहिल्याच क्षणीं इखलासखानास घायाळ करून घोड्याखाली आणला. या अवधींत स्वत. दाऊदखान तेथे येऊन पोहोचला व त्याने इखलासखानाच्या साहाय्यास्तव रावमकरंद नांवाच्या योद्ध्याला पाठविलें.

या युद्धाला वणी-दिंडोरीचें युद्ध असें म्हणतात. हें युद्ध दि. १७ ऑक्टोबरला झालें. महाराजांच्या सैनिकांनी त्यांच्या पद्धतीप्रमाणे

पळती लढाई देऊन मोगलांना जेरीस आणलें. मोगलांचे अनेक नामवंत सरदार या युद्धांत घायाळ झाले व अनेक लोक धारातीर्थी पडले. मोगलांच्या सैन्यांतील बुंदेला पायदळाने आपल्या बंदुकींच्या योगाने व दाऊदखानाच्या तोफांनी मोगलांचें बराच वेळ संरक्षण झालें. त्यामुळेच इखलासखान मराठ्यांच्या हातून जिवंत सुटला. शेवटीं मोगलांचा तोफखान्यावरील अधिकारी मीर अबदुल माबूद हा घायाळ झाला. व जयाचें पारडें फिरलें. सभासद म्हणतो 'मराठ्यांनी मोठी कत्तल केली, आणि मोगल मारून मुडदे पाडिले. दोन प्रहर युद्ध जाहलें. तीन हजार मोगल मारिले. तीनचार हजार घोडे पाडाव केले. असें फत्ते करून आले.'

याप्रमाणे या वणी-दिंडोरीच्या युद्धांत मोगलांचा धुव्वा उडवून महाराजांचें सैन्य कोकणांत सुखरूपपणें पोहोचले.

या विजयानंतर महाराजांचे पेशवे मोरोपंत पिंगळे यांनी त्र्यंबकेश्वर दुर्ग जिंकल्याची वार्ता एकाच आठवड्याने त्यांना कळली. दिंडोरीचा पराजय मोगली सत्तेला चांगलाच जाणवला. यानंतर पुढे एक महिना तरी दक्षिणेंत मोगलांची सत्ता आहे असें कोणालाही वाटलें नाही. पराजयाची धास्ती घेतलेला दाऊदखान कुरेशी हा नाशकाला येऊन एक महिना नवी सैन्यभरती करण्याच्या कामांत गढलेला होता.

सुरतेची यशस्वीपणें लूट करून परतल्यावर महाराजांनी इ. स. १६७० च्या शेवटीं सिद्दीच्या जंजिऱ्यावर स्वारी केली. पण ती यशस्वी झाली नाही. यानंतर १६७० च्या डिसेंबरमध्ये बागलाण प्रांतांतील दुर्ग अहिवंत, मार्कंडा, रवळा आणि जावळा घेऊन महाराज खानदेशांत उतरले. खानदेशाच्या राजधानीचें नगर बऱ्हाणपूर येथे त्या वेळीं महाराजा जसवंतसिंग होता. महाराजांनी बऱ्हाणपूरवर आक्रमण न करतां सभोवारच्या प्रदेशाची लूट करून तेथून वऱ्हाडांतील कारंजावर स्वारी केली. हें वऱ्हाडांतील कारंजा नगर म्हणजेच श्रीगुरुचरित्रांतील करंजनगर होय. हें त्या वेळीं अत्यंत भरभराटीस आलेलें असून तेथे अपार संपत्ति साठलेली होती. जवळ

जवळ पन्नास वर्षें या विभागांत शांतता नांदलेली असल्यामुळे कारंजाच्या संपत्तींत भरच पडत होती. महाराजांना कारंजाच्या स्वारींत केवळ कारंजांतूनच एक कोटि रुपयांची लूट मिळाली. या स्वारीचें सुरतेच्या इंग्रज वखारीच्या पत्रव्यवहारांत पुढीलप्रमाणे वर्णन आहे.

**मास्टर-सुरत-स्वाली** (दि. १९ डिसें. १६७०) 'आजची बातमी अशी आहे की, शिवाजी बऱ्हाणपुरावरून गेला. बादशाही खजिन्यांतील तीन लाख रुपये मिळाल्यामुळे जसवंतसिंगाने शिवाजीला शहरांत येण्यास बंदी केली म्हणून शिवाजी कारिंजाकडे वळला. कारंजा सधन आहे. तें त्याने लुटलें व तेथील सव थोर लोकांना धरून नेलें. एक बराच मोठा इसम मात्र स्त्रीवेष करून पळून गेला. जातांना शिवाजीने नंद्राबादचे व आसपासचे सर्वांकडून वसुलीची चौथाई आपल्याला भरण्याबद्दल लिहून घेतलें आहे.'

——(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. १३७०)

तत्कालीन गुंतागुंतीचें राजकारण व कारंजांतील लुटीचें स्वरूप समजण्याच्या दृष्टीने पुढचें पत्र अत्यंत उद्बोधक आहे. तें मोगलांच्या दरबारचा गोलंदाज जॉन ट्रॅटर याने सुरतेच्या प्रेसिडेंटला लिहिलेलें आहे. त्यावरून निरनिराळ्या राजसत्तांकडे नोकर म्हणून राहणारे इंग्रज किती सूक्ष्मपणें राजकारण न्याहाळीत हेंही स्पष्ट होतें. तें पत्र असें :——

'येथील राजकारणांतील बित्तंबातमी एक बादशहा, दुसरा मुअज्जम आणि तिसरा शिवाजी यांशिवाय कोणालाच नाही. परंतु शहाणे शहाणे राजे व उमराव यांचें असें मत आहे की, मुअज्जमाशिवाय दुसरा कोणी लायक वारस नसल्यामुळे बादशहा त्यालाच गादीवर बसविणार आहे. शाहजादा दिलेलखानावर चालून गेल्यावर आम्ही बऱ्हाणपूरास आलों. सर्व लष्कराला एक महिन्याचा पगार देण्याचा शाहजाद्याने हुकूम दिला. पण त्याच दिवशीं औरंगाबादेस परत फिरण्याचा बादशाही हुकूम आला तो त्याने मानिला. त्या वेळीं बादशहाजवळ लष्कर पुरेसें नसल्यामुळे मुअज्जम परत गेल्याचें

पाहून त्याला बरें वाटलें. नाहीतर मुअज्जम आज हिंदुस्थानचा सिंहासनाधीश झाला असता. भावी वारसा निश्चित झाला तथापि मुअज्जम राज्यारोहणार्थ उतावीळ झाला आहे. मात्र उघडपणें बंड न करितां शिवाजीशीं युद्ध चालू ठेवून त्याकरिता दक्षिणेकडे सैन्य न्यावें आणि उत्तरेस धाकटचा भावांच्या हाताशीं फार सैन्य राहूं देऊं नये अशी व्यवस्था तो करीत आहे.

सहा महिन्यांपूर्वी शिवाजी व मुअज्जम यांचें परस्परसंबंधाविषयीं आणि राजपुत्रावर उठविलेल्या कुभांडाविषयीं चौकशी करण्याकरिता पाठविलेला खानसामा उभय बाजूंना लावालावी करतो. 'दिलेरखान तुझा शत्रू आहे' असें मुअज्जमला सांगतो; तर उलटपक्षीं दिलेरखानाला जाऊन सांगतो की, 'तूं औरंगाबादेला येशील तर राजपुत्र तुला धरणार आहे.' त्यामुळे उभयतांत वैमनस्य माजलें आहे. खानसामा आग्ऱ्याला गेल्यावर राजपुत्र आणि दिलेरखान या दोघांच्या पत्रांवरून खानसामाचा नीचपणा उघडकीस आला. बादशहा त्याचा शिरच्छेदच करणार होता. परंतु बडचा बेगमेच्या रदबदलीमुळे शेवटीं त्याला काबूलला पाठविण्यांत आलें . . . शिवाजीने वऱ्हाडचें मुख्य शहर कारंजा लुटलें. तेथून उत्तम कापड, सोनें, रुपें इत्यादि एक कोटीचा माल त्याने ४००० बैल व गाढवें लादून नेला. इतरत्रही पुष्कळच लूट केली. सर्वांत जास्त लूट त्याने राजपुत्राच्या जहागिरींत केली. महाबतखान २० दिवसांत येईल व त्या वेळीं सर्व खरे प्रकार उघडकीस येतील.'

——(शिवकालीन पत्रसारसंग्रह क्र. १३७१)

या नंतर महाराजांनी वीस सहस्र सैन्यासह औशावर स्वारी करून तो प्रांत लुटला. आपलें जन्मस्थान जें शिवनेरी तें स्वराज्यांत समाविष्ट करून घेण्याचा महाराजांनी या वेळीं प्रयत्न केला. त्यांनी शिवनेरी दुर्गाला वेढा घातला. पण त्यांना या वेढचांत अपयश आलें.

या वेळीं मोगलांचे सरदार मात्र एक बाजूला चैन आणि दुसऱ्या बाजूला भांडणें करीत होते. वऱ्हाडचा मोगल सुभेदार खाने जमान

हा भिऊन, सारा वऱ्हाडचा धनकोश जात असतां, प्राणभयाने, कांही एक हालचाल करीत नव्हता. तो स्वस्थपणें देवगडला जाऊन राहिला. खानदेशचा सुभेदार दाऊदखान कुरेशी हा अहंमदनगरकडे या वेळीं कामगिरीवर गेला असून त्याचा मुलगा अहंमदखान हा बऱ्हाणपूरला कारभार पहात होता. दाऊदखानाच्या अनुपस्थितीचा लाभ घेऊन महाराजांचे पेशवे मोरोपंत पिंगळे यांनी पश्चिम खानदेश व बागलाणवर स्वारी करून तो प्रदेश लुटून फस्त केला.

या वेळीं महाराजा जसवंतसिंग हा शिवाजी महाराजांना प्रतिबंध करण्याच्या भानगडींत न पडतां शाहजादा मुअज्जमच्या खर्चासाठी मोठी रक्कम उभारण्याच्या खटपटीत होता. त्याने दाऊदखानाचा मुलगा अहंमदखान याच्याकडे खानदेशच्या धनकोशांतून पांच लक्ष रुपये देण्याविषयी मागणी केली. पण अहंमदखानाने त्याला असें स्पष्ट कळविलें की प्रत्यक्ष बादशहाच्या आज्ञेवांचून एक पैही मिळणार नाही. जसवंतसिंग यामुळे चिडला व त्याने बऱ्हाणपूर लुटण्याची अहंमदखानाला धमकी दिली.

या वेळीं दाऊदखान अंकाई-टंकाई जवळ होता. मुलाकडून त्याला ही वार्ता कळतांच तो त्वरेने बऱ्हाणपुराकडे वळला. फरदापुराजवळ येतांच त्याला मराठे वऱ्हाडांतून परतून बागलाणकडे गेल्याची वार्ता कळली. त्यासरशी तत्काळ दाऊदखान फरदापुराहून निघून मराठ्यांच्या पाठीवर बागलाणांत उतरला. या वेळीं शिवाजी महाराजांच्या नेतृत्वाखाली वऱ्हाडांत संचार करणारें सैन्य व मोरोपंतांच्या नेतृत्वाखाली खानदेश बागलाणांत असणारें सैन्य साल्हेरजवळ एकत्रित होऊन या सैन्याने साल्हेरच्या गडाला वेढा घातला. प्रत्यक्ष महाराजांच्या नेतृत्वाखाली वीस सहस्र मराठी सैन्याने गडावर मारा सुरू केला. दि. ५ जानेवारी १६७१ ला रात्रीं शिड्या लावून त्यांनी सैनिक आंत उतरविले. तेथील गडकरी फातुल्लाखान हा युद्धांत ठार झाला. त्याच्या मेहुण्याने महाराजांना शरण जाऊन गड त्यांच्या स्वाधीन केला. इकडे दाऊदखान त्वरेने मुल्हेरजवळ येऊन पोहोचल्यावर त्याला साल्हेरच्या वेढ्याचें

वृत्त कळलें. त्याचें सैन्य व साहित्य मागे राहिल्याने त्याला दुसऱ्या दिवसापर्यंत वाट पाहावी लागली. दुसऱ्या दिवशीं एका बाजूने सैन्य आलें व दुसऱ्या बाजूने साल्हेरला झालेल्या महाराजांच्या विजयाची वार्ता त्याला कळली. त्यासरशी किंकर्तव्यमूढ होऊन तो रागाने व निराशेने हात चोळीत कांचनमांचनकडे निघून गेला. यानंतर मुल्हेर, चोरगड, घोडप येथील गडांनाही मराठी सेनेने चपेटे लगावले. बागलाणभोवती मराठी सैन्य सतत घिरटया घालीत राहिल्याने तेथील मोगल अधिकारी नेकनामखान याची रसद बंद होऊन तो टेकीला आला.

महाराजांच्या या विक्रमशाली संचारामुळे त्यांचा धाक सर्वत्र निर्माण झाला होता. उदाहरणार्थ, त्यांच्या साल्हेरच्या विजयानंतरच्या इंग्रजांच्या पत्रांतील पुढील उल्लेख पहा .—

'दख्खनमध्यें त्याने मुलूख उद्ध्वस्त केला असून त्याचें सैन्य वेगानें इतस्ततः अप्रतिहत संचार करीत असतें. त्याची येथे नेहमीं भीति वाटत असल्यामुळें आत्मसंरक्षणार्थ खर्च आणि मेहनत करावी लागते.' —(शिवकालीन पत्रसारसंग्रह, क्र. १३७७)

'इतर हिंदी राजांप्रमाणेच शिवाजीशीं, आतां तो प्रबळ झाल्यामुळे सलोख्याचे संबंध राखावे. मुंबईचे लोकांनी स्नेहसंबंध ठेवावा.' —(शिवकालीन पत्रसारसंग्रह, क्र. १३७९)

शिवाजी महाराजांच्या या विजयाच्या वार्तांनी दिल्लीपति औरंगजेबाच्या अंतःकरणाला नागदंशासारख्या वेदना होत होत्या. सुरत, बागलाण, वऱ्हाड इत्यादि ठिकाणीं महाराजांनी रिते केलेले मोगलांचे धनकोष त्याचें हृदय जाळीत होते. शिवाजीने दक्षिणेंतील मोगली प्रदेशांत उडविलेल्या प्रलयाला पायबंद घालण्यासाठी त्याने आपला गाजलेला सेनापति महाबतखान याला त्वरेने मोठें सैन्य देऊन दि. २८ नोव्हेंबर १६७० मध्ये दक्षिणेंत पाठविलें. दि. ९ जानेवारी १६७१ ला गुजराथचा सुभेदार बहादूरखान यालाही दक्षिणेंत जाण्याची आज्ञा बादशहाने दिली. दिलेरखानाला

बहादूरखानाच्या बरोबर राहण्याची आज्ञा देण्यांत आली. दक्षिणेंतील पराभूत योद्धा दाऊदखान कुरेशी याला तर 'शिवाजीला सांपडेल तेथे चिरडून टाकावें' म्हणून बादशहाने लिहिलें. पण चिरडायला शिवाजी सांपडायला हवा व त्याला चिरडून टाकण्याइतकें बहादूरखानालाही अवसान हवें हें बादशहा विसरला. स्वतः दक्षिणेंत जावें असें औरंगजेबाला या वेळीं फार वाटत होतें. पण राजकारणाचें शस्त्र दुधारी आहे हें ओळखून बादशहाने शहाणपणाने तो विचार आपल्या डोक्यांतून काढून टाकला.

दि. ३ जाने. १६७१ ला महाबतखान बऱ्हाणपूरहून निघाला. आपल्या समवेत त्याने महाराजा जसवंतसिंगालाही घेतलें होतें. त्याचें व शाहजादा मुअज्जमचें आंतून बरें नव्हतें. रीतीप्रमाणे दि. १० जाने. ला औरंगाबादेला पोहोचून त्याने शाहजाद्याची भेट घेतली, व तो पुढे चांदोरकडे गेला. महाबतखान येताच दाऊदखान कुरेशीला त्याचा दुय्यम म्हणून नियुक्त करण्यांत आलें होतें. दाऊदखानाला त्याचें वैषम्य वाटलें, व अपमानाच्या जाणिवेने तो दिल्लीला परत जाण्याच्या प्रयत्नास लागला. पण बादशहाची तशी आज्ञा येईपर्यंत त्याला महाबतखानाच्या नेतृत्वाखालीं काम करणें क्रमप्राप्तच होतें. या वेळीं जसवंतसिंगाला मात्र बादशहाने दिल्लीला परत बोलाविलें होतें.

महाबतखान व दाऊदखान कुरेशी या जोडीने १६७१ च्या जानेवारीमध्ये शिवाजी महाराजांनी नुकताच सर केलेल्या अहिवंत किल्ल्याला वेढा दिला. एक महिनाभर वेढ्याचें काम चालू होतें. शेवटीं तो किल्ला दाऊदखानाने जिंकला. हें विजयाचें श्रेय दाऊदखानाऐवजी स्वतःकडे यावें अशी महाबतखानाची फार इच्छा होती. पण श्रेयाचा भागीदार स्वतःऐवजी दाऊदखान झाला हें पाहून त्याच्या अंगाचा तिळपापड उडाला. पहिल्यापासूनच त्या दोघांचें जमत नव्हतें. त्यांत या अहिवंत गडाच्या घटनेमुळे अधिकच भर पडली. वेढ्याचें व शिवाजीवरील आक्रमणाचें काम तसेंच टाकून महाबतखान तीन महिने गुलशनाबाद अथवा

नाशिक येथे जाऊन राहिला, व पुढे तो पावसाळ्यांत पारनेरला जाऊन राहिला. मोगली सैन्याने यानंतर जावळा, मार्कण्डगड, अचलगिरी हे आणखी चार गड जिंकले. वस्तुतः हे सर्व विजय दाऊदखान कुरेशीमुळे झाले, पण सेनापति महाबतखानावर औरंगजेबाचा विश्वास होता असें दिसतें. कारण त्याच्या मार्गात अडथळा नको म्हणून त्याने जून महिन्यांत दाऊदखानाला परत दिल्लीला बोलावून घेतलें.

परंतु ज्याच्यावर औरंगजेबाचा एवढा विश्वास होता तो महाबतखान या वेळीं काय करीत होता? तो सरदारांच्या मेजवान्या झोडीत व अफगाणिस्थानांतून आणलेल्या चारशे नृत्यांगनांच्या सहवासांत नाचरंग व विलास करीत दिवस घालवीत होता. या वर्षाच्या अतिवृष्टीमुळे जिकडे तिकडे रोगराई उत्पन्न होऊन मोगली प्रदेशांत मनुष्यें व पशुधन यांचा अपरिमित विनाश झाला. पण या सेनापतीला तिकडे लक्ष द्यावयास वेळच नव्हता. आठ महिने दक्षिणेमध्ये राहून महाबतखानाने कांहीच न केल्यामुळे बादशहाने रागावून त्याला उत्तरेंत परत बोलाविलें. महाबतखानाने शिवाजीशीं आंतून संगनमत केलें असलें पाहिजे असाही संशय औरंगजेबाला आल्याविना राहिला नाही.

हिवाळ्यांत बादशहाने बहादूरखान व दिलेरखान यांना शिवाजीचें पारिपत्य करण्याच्या आज्ञा दिल्या. दिलेरखानाच्या सैन्याचा पहिला तळ बागलाणमध्ये पडला. या सैन्यांत एक विलक्षण तेजस्वी पाचू होता. तो दिलेरखानाला पचण्यासारखा नव्हता. तो नेमका दिलेरखानाच्या गोटांतून निघून महाराजांच्या कंठांत येऊन पडला. त्या रत्नाच्या तेजाचें दर्शन पुढील प्रकरणांत घेऊं.

* * *

## प्रकरण दहावें

# मोगल सैन्याशीं युद्ध

गुजराथ प्रांताचा मोगल सुभेदार बहादुरखान याच्या समवेत मोगलांचा शूर सेनानी दिलेरखान याच्या सैन्यांत बुंदेलखंडांतील एक तरुण राजकुमार होता. या राजकुमाराचें नांव छत्रसाल बुंदेला असें होतें. या तरुण राजकुमाराच्या अंतःकरणांत स्वातंत्र्याची लालसा वास करीत होती. दिल्लीपति औरंगजेबाने चालविलेले अत्याचार त्याला सहन होणारे नव्हते. औरंगजेबाच्या क्रूर दृष्टीची झळ प्रत्यक्ष त्याच्या कुटुंबालाही लागलेली होती. परिस्थितीने अवश होऊन त्याला मोगलांच्याच सेवेंत राहावें लागलें होतें; पण आपल्या आकांक्षांच्या पूर्तीचें स्वप्न कसें साकार करतां येईल याचा तो विचार करीत होता. छत्रसालाचें थोडेसें पूर्ववृत्त येथे सांगणें उचित होईल.

बुंदेलखंडाच्या पूर्वेस महेवा अथवा महोबा या नांवाचें एक छोटेसें राज्य होतें. तेथील राजा चंपतराय याचा छत्रसाल हा चवथा पुत्र होय. त्याचा जन्म इ. स. १६५० मध्ये झाला. छत्रसालाच्या मातेचें नांव कालीकुमारी असें होतें. छत्रसालाचे वडील चंपतराय हे प्रखर स्वाभिमानी आणि स्वातंत्र्यप्रिय होते. अकबर-जहांगिराच्या वेळेपासून बुंदेलखंडावर मोगली आक्रमणाला प्रारंभ झाला होता. बादशहा शहाजहानच्या वेळीं हें आक्रमण अधिक उग्र झालें होतें. बुंदेलखंडांतील बहुतेक सर्व नरेश परिस्थितीच्या या लाटेला विरोध करण्याचें मानसिक सामर्थ्य संपल्यामुळे मोगलांच्या साम्राज्यसत्तेला शरण गेले होते, व यवन सम्राटाच्या कृपेला अधिक पात्र व्हावें अशी त्यांच्यांत अहमहमिका लागून त्यांतील कित्येकांनी आपल्या मुलीही दिल्लीच्या सम्राटांच्या भोगदासी बनविण्यास प्रारंभ केला होता. या सर्व परिस्थितीच्या आघातांना न डगमगलेला पुरुष केवळ महोब्याचा चंपतराय हाच

होता. त्याने बादशहा शहाजहानच्या अन्याय्य आक्रमणाविरुद्ध शेवटपर्यंत झुंज दिली. पुढे औरंगजेबाने आपल्या पित्याविरुद्ध जेव्हा बंड केलें तेव्हा शहाजहानचे सारे शत्रु त्याने आपल्या बाजूला वळविण्याचा प्रयत्न केला. त्यांतच महोब्याचा चंपतरायहि होता. आपल्या बादशाहींत चंपतरायाचें स्वातंत्र्य आपण राखूं असें आश्वासन देऊन औरंगजेबाने त्याला आपल्या पक्षाकडे वळविलें होतें. शामूगढच्या निर्णायक युद्धांत चंपतरायाने फार मोठा पराक्रम गाजविला व जयश्रीने औरंगजेबाच्या गळयांत माळ घातली. बादशहा झाल्यावर औरंगजेबाने चंपतरायला बारा सहस्र स्वारांची मनसबदारी दिली. पण केवळ एक वर्षच चंपतराय व औरंगजेब यांचे संबंध चांगले राहिले. चंपतरायाला मनसबदारी नको होती. त्याला हवें होतें स्वातंत्र्य. लाख आश्वासनें दिली असलीं तरी कोणत्याही हिंदु राजाचें स्वातंत्र्य मान्य करावयास धर्मवेडा औरंगजेब कधीच तयार नव्हता. चंपतरायाने स्वातंत्र्याची घोषणा करतांच त्याला मोठा विपरीत अनुभव आला. वंचना करण्यांत अग्रेसर असलेल्या बादशहाने पूर्वीचीं दिलेलीं वचनें विसरून आपल्या असंख्य सेनेकरवी चंपतरायाची पारध सुरू केली. बुंदेलखंडांतील इतर हिंदू नरेश चंपतरायाला साहाय्य करण्याऐवजी औरंगजेबालाच साहाय्य करून त्याच्या विरुद्ध उठले व चंपतरायाची मोठी दयनीय अवस्था झाली. तरीही त्या भीषण परिस्थितीसमोर कोणत्याही प्रकारें नमतें न घेतां शेवटपर्यंत तो स्वातंत्र्यवीर औरंगजेबाशीं झुंज देत राहिला. शेवटीं या विषम संघर्षाचा व्हावयाचा तोच परिणाम होऊन इ. स. १६६१ च्या ऑक्टोबरमध्ये समरांगणावर चंपतरायाने आपला देह ठेविला. आपल्या झुंजार पतीच्या वीरमरणाने उत्तेजित होऊन राणी कालीकुमारीने खड्गाने आपला कंठ कापून घेऊन परलोकीं प्रयाण केलें. औरंगजेबाची क्रूर रक्तपिपासा शांत झाली, व छत्रसाल आपल्या भावंडांसह उघडा पडला. कांही दिवसांनी छत्रसालाने अगतिक होऊन मिर्झाराजा जयसिंगाच्या सैन्यांत जागा पत्करली. इ. स. १६६५ च्या प्रारंभीं जयसिंग ससैन्य दक्षिणेंत शिवाजी महाराजांवर

आक्रमण करावयास निघाला असतां आपल्या पराक्रमाने आपणही आपला भाग्योदय करावा या हेतूने छत्रसाल त्याच्या सैन्यांत समाविष्ट झाला. जयसिंगाच्या या सैन्यांत छत्रसालाने पुरंदरच्या वेढ्याच्या वेळीं शर्थीचा पराक्रम गाजविला. पण दिलेरखानादि बड्याबड्या सेनानींच्या मानसन्मानांत व जयघोषांत छत्रसालाचें व्हावें तसें कौतुकही झालें नाही व त्याच्याकडे कोणी विशेष लक्षही दिलें नाही. ही गोष्ट छत्रसालाच्या मनाला लागून राहिली. तरीही तो त्या सैन्यांतच होता. पुढे महाराजांची आग्र्याहून सुटका झाल्यावर त्यांच्या अद्‍भुतरम्य व्यक्तित्वाकडे छत्रसालाचें तरुण मन आकर्षित होऊं लागलें. यानंतरच्या दक्षिणेंतील युद्धांत जयसिंगाची झालेली पीछेहाट व औरंगजेबाने त्याच्या केलेल्या शोचनीय अवस्थेंत त्याला आलेला मृत्यु छत्रसालाने पाहिला. जयसिंगानेच त्याला दिलेरखानाकडे सोपविलें होतें. दक्षिणेच्या सुभ्यावर शहाजादा मोअज्जमची नियुक्ति झाल्यावर दिलेरखानाने गोंडवनांत केलेल्या स्वारींत छत्रसाल त्याच्या बरोबर होता व त्याने तेथील देवगढच्या युद्धांत विलक्षण पराक्रम गाजविला. किंबहुना दिलेरखानाला देवगढच्या युद्धांत जो विजय मिळाला तो सोळा सतरा वर्षांच्या छत्रसालाच्या विलक्षण पराक्रमामुळेच मिळाला. या युद्धांत छत्रसालाला भयंकर जखमा झाल्या होत्या. स्वाभाविकपणेंच त्याची अशी अपेक्षा होती की, आपल्या पराक्रमाचें विशेष कौतुक होईल; आपल्या योग्यतेंत व सन्मानांत वाढ करण्यांत येईल; पण प्रत्यक्षांत काय झालें असेल ?

दिलेरखानाने या विजयाची वार्ता औरंगजेबाला कळविली. पण त्यांत छत्रसालाच्या पराक्रमाचा व कर्तृत्वाचा निर्देशसुद्धा केला नाही. बादशहाकडून दिलेरखानाचा सर्व प्रकारें गौरव करण्यांत आला. पण छत्रसालाची कोणत्याही प्रकारें वास्तपुस्तसुद्धा करण्यांत आली नाही. स्वाभाविकपणेंच त्याला अत्यंत खेद झाला. पराक्रमाची बूज न राखणाऱ्या क्षुद्र मनोवृत्तीच्या धन्याची सेवा करून काय करावयाचें हा तर विचार त्याच्या मनांत आलाच, पण त्याजबरोबर

आपल्या मातापित्यांच्या दारुण हत्त्येला कारणीभूत असलेल्या, आपल्या कुटुंबाची वाताहत करणाऱ्या व आपल्या राज्याची धूळधाण करणाऱ्या औरंगजेबाचा सूड कां घेऊं नये असे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. दिवसामागून दिवस जात होते. छत्रसालाचे विचार अधिकाधिक दृढ होत होते. पण ती गोष्ट शक्य कोटींतील आहे कीं नाही असें त्याला सारखें वाटत होतें. मनाच्या या विशिष्ट अवस्थेंत असतांना महाराजांना मिळालेले देदीप्यमान विजय व मोगलांची दक्षिणेंत होत असलेली दुर्दशा यांकडे या तरुण व महत्त्वाकांक्षी राजपुताचें चित्त वेधलें. औरंगजेबाच्या सत्तेला व सामर्थ्याला शह देऊन त्याच्याही सेनानींना यशस्वी रीत्या पराभूत करणारा आणि हिंदूची मान गौरवाने उंच करणारा एक पुरुष आहे; व तो मोगल साम्राज्यशाहीचा मद उतरवूं शकेल असें छत्रसालाला वाटलें. आपल्या आकांक्षांना मूर्तस्वरूप द्यावें म्हणून शिवाजी महाराजांची भेट घेण्याचें व आपला पराक्रम त्यांच्या महत्कार्याला समर्पण करण्याचें या तरुण राजपुत्राने ठरविलें. त्या वेळीं तो दिलेरखानाच्या छावणींत होता. व तेथून त्याला सहजपणें शिवाजी महाराजांकडे येणें शक्य कोटींतील नव्हतें. तो संधीची वाट पाहत होता. कित्येक महिन्यांनी त्याला ती संधि मिळाली.

महाबतखानाच्या अपयशानंतर औरंगजेबाने दि. ९ जानेवारी १६७१ ला गुजराथचा सुभेदार बहादुरखान, दिलेरखान, अमरसिंह चंदावत इत्यादि सरदारांना दक्षिणेंत उतरून शिवाजीवर चालून जाण्याची आज्ञा केली. बहादुरखान व दिलेरखान यांच्या सेना दक्षिणेंत उतरल्या व बागलाणला त्यांची छावणी पडली. दिलेरखानाच्या छावणींत छत्रसाल होता. त्याने एके दिवशीं शिकारीसाठी दिलेरखानाची परवानगी मागितली, व या निमित्ताने आपल्या पत्नीसह छावणी सोडून बराच मोठा वळसा घेऊन तो महाराजांना भेटला. महाराजांच्या गुप्तचरांकरवी त्यांना छत्रसालाच्या संबंधीचें सर्व वृत्त कळलेंच होतें. त्यांनी त्याचें उत्कृष्ट

स्वागत केलें. छत्रसाल त्यांना त्यांचा अंकित होऊन काम करण्याची संधि द्या असें विनवूं लागला. पण छत्रसालाने आपली मातृभूमि जें बुंदेलखंड तेथे स्वतंत्र हिंदुराज्य स्थापिल्यास तें त्याच्या दृष्टीने अधिक सुयोग्य व आपल्या दृष्टीने अधिक उपकारक होईल असें महाराजांना वाटलें. छत्रसालाच्या ठिकाणीं राज्यसंस्थापकाची योग्यता आहे हें महाराजांच्यासारख्या चाणाक्ष पुरुषाच्या तेव्हाच ध्यानांत आलें, व त्याला स्वतंत्रपणें वाव दिल्यास दक्षिणेप्रमाणेच उत्तरेंतही हिंदूंचा गौरव वाढविणारी आणि मोगल साम्राज्यशाहीचा विनाशकाळ जवळ आणणारी एक महान् शक्ति निर्माण होऊं शकेल असें त्यांना वाटलें. आपल्या व्यक्तित्वाचा बडेजाव व्हावा अशी कल्पनाच महाराजांच्या मनांत नसल्यामुळे त्यांनी छत्रसालाच्या अंतःकरणांतील औरंगजेबाविषयीचा राग व महत्त्वाकांक्षा चेतविली आणि त्याला असें मार्गदर्शन केलें की, ‘औरंगजेबाच्या सगळ्या शत्रूंनी दक्षिणेंत एकाच ठिकाणीं राहून औरंगजेबास त्रास दिला तर त्याचा अधिक उपयोग होणार नाही. मी ज्याप्रमाणे महाराष्ट्रांत उचल केली आहे त्याप्रमाणे तूंही बुंदेलखंडांत आपल्या जहागिरींत राहून मोगल मुलुखास त्रास देशील तर औरंगजेबास लौकर नरम करतां येईल. औरंगजेब बुंदेलखंडांत तुझ्यावर चालून गेला की, मी महाराष्ट्रांत दंगल उडवून देईन व तो माझ्यावर चालून आला की, तूं बुंदेलखंडांत धामधूम सुरू कर. याप्रमाणे आपणांस परस्परांस साहाय्य करतां येऊन मोगलांना हैराण करतां येईल.’

——(शिवाजी व शिवकाल, पृष्ठ १३७)

महाराजांच्या या मार्गदर्शनानुरूप छत्रसाल बुंदेलखंडांत गेला. व आपल्या कर्तृत्वाने त्याने बुंदेलखंड स्वतंत्र करून तेथे गौरवशाली हिंदुध्वज उभारला. महाकवि भूषण छत्रसालाच्या पराक्रमाचें वर्णन करतांना म्हणतोः——

‘इत जमुना उत नर्मदा इत चंबल उत टौंस ।
छत्रसालको लरनकी रही न कांहूं हौंस’ ।।

'यमुनेपासून नर्मदेपर्यंत व चंबलपासून टौंसपर्यंत छत्रसालाने आपलें खड्ग असें तळपविलें की, त्याच्याशीं लढण्याची योद्धयांची इच्छाच मरून गेली.'

भूषण कवीने शिवाजी महाराजांनंतर आपल्या काव्यशक्तीचा विषय केवळ छत्रसालालाच निवडलें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

शिवाजी महाराजांचें छत्रसालाशीं गुरुशिष्याचेंच नातें असल्यामुळे त्याचें स्वतंत्र राज्य हा महाराजांच्या स्वराज्याच्या आत्मीयतेचाच विषय होता. पुढे छत्रसाल वृद्ध झाल्यावर त्याच्यावर महंमद बंगशाच्या स्वारीचें भीषण संकट कोसळतांच त्याने आत्मीयतेने शिवछत्रपतींच्या स्वराज्याचे तत्कालीन सूत्रधार पहिले बाजीराव पेशवे यांच्याकडे साहाय्यार्थ अभियाचना केली; व बाजीरावांनीही त्याच आत्मीय संबंधाचें स्मरण ठेवून त्याला त्या संकटांतून वांचविलें व बुंदेलखंडाचें स्वातंत्र्य अबाधित राखलें.

या छत्रसाल प्रकरणावर सर जदुनाथ सरकार एका समकालीन लेखकाच्या लेखाधारें असा अभिप्राय व्यक्त करतात की 'यानंतर छत्रसाल थोडा नाराज होऊन बुंदेलखंडांत परत गेला. उत्तरेकडील लोकांवर शिवाजीचा विशेष विश्वास नसल्यामुळे तो त्यांना सैन्यांत हुद्दयाच्या जागा देत नसे. यामुळेंही छत्रसाल यास परत जावें लागलें असावें असें समकालीन इतिहासकार भीमसेन हा म्हणतो.'

—(शिवाजी व शिवकाल, पृष्ठ १३७)

भीमसेनाची दिलकास या नांवाची बखर आहे. हा भीमसेन औरंगाबादेचा राहणारा होता. बखर मुळामध्ये फारशींत असून तिचें इंग्रजी भाषांतर स्कॉटने इ. स. १७९४ मध्ये प्रसिद्ध केलें. मूळ ग्रंथाचें 'नांव नष्क इ दिलकाश' व लेखकाचें नांव 'भीमसेन बऱ्हाणपुरी.' शिवचरित्र निबंधावलीमध्ये तिच्यावर पुढीलप्रमाणे अभिप्राय व्यक्त करण्यांत आला आहे.

'अनेक मराठी बखरींप्रमाणेच व त्याहूनही कदाचित् अधिक कल्पनाप्रचुर, अनैतिहासिक व अविश्वसनीय आहे.'

—(शिवचरित्र निबंधावली, पृ. ३१६)

उत्तर हिंदुस्थानांतील लोकांवर महाराजांचा अविश्वास होता असें मानण्याचें दुसरें कोणतेंही उदाहरण जोंपर्यंत उपलब्ध होत नाही तोंपर्यंत या भीमसेनाच्या अभिप्रायाला कांही अर्थ उरत नाही. स्वतः शिवाजी महाराज व त्यानंतर छत्रपति संभाजी महाराजही उत्तर भारतांतील राजे महाराजांना आपल्या हिंदवी स्वराज्य स्थापनेच्या महत्कार्यांत ओढण्याचा प्रयत्न करीत होते. असें समकालीन अस्सल पत्रव्यवहारावरूनच सिद्ध होत असल्यामुळे भीमसेन बऱ्हाणपुरीच्या या विधानाला तसें महत्त्व उरत नाही. उलट महाराजांनी छत्रसालाला केलेलें मार्गदर्शन अनेक दृष्टींनी महत्त्वाचें होतें, हें राजकारणाचा कोणताही अभ्यासक सहज सांगूं शकेल.

असो. बहादुरखान बागलाणाहून अहमदनगरला आला व तेथून तो सुप्याकडे वळला. स. १६७१ च्या डिसेंबर महिन्याच्या शेवटीं दिलेरखानाने पुणें नगरावर स्वारी करून तें जिंकलें. मराठ्यांचा सूड उगवावा म्हणून पुण्यांत पाय ठेवतांच दिलेरखानाने नऊ वर्षांवरील सर्व लोकांना कंठस्नान घातलें. पण त्याचा महाराजांनी लवकरच वचपा घेतला. १६७२ च्या जानेवारी महिन्यांत महाराजांचा निवास महाड येथे होता. तेथे त्यांना मोगल सरदार इखलासखान याने साल्हेरीच्या गडास वेढा दिल्याची वार्ता कळली. सभासद हृदयंगम भाषेंत वर्णन करतांना लिहितो : ‘ मोरोपंत पेशवे यांनी त्रिंबकगडापासून सालेरी किल्ल्यापावेतो कित्येक किल्ले घेतले. हें वर्तमान दिल्लीस पातशहास कळलें. त्याने इखलासखान व बहिलोलखान यांस बोलावून आणून वीस हजार स्वारांनिशी सालेरीस रवाना केलें. ‘सालेरी घेऊन फस्त करणें ’ असें सांगितलें. तसें दिलेरखान यांस दहा हजार स्वारांनिशी अहिवंत किल्ल्यावर रवाना केले. दिलेलखान येऊन रवळाजवळचास लागले. मोठें युद्ध जालें. गड हातास आला नाही. मोरोपंत पेशवे यांनी उपराळियास मावळे लोक बारा हजार रवाना केले. त्यांनी जाऊन छापे घातले, रामाजी पांगेरा , हशमाचा हजारी याने कणेरगडाखाली निवडक

सातशे लोक घेऊन भांडण दिलें. दिलेलखानाच्या फौजेने पायउतारा होऊन चालून घेतलें. चौफेरा मावळे लोक वेढिले. एक प्रहर टिपरी जैसी शिमग्याची दणाणते तैसे मावळे भांडले. दिलेलखानाचे बाराशे पठाण रणास आणले. मग सातशे माणूस व रामाजी पांगेरा सर्वही उघडे बोडके होऊन लढले. एकएकास तीराच्या व बर्चीच्या, वीस वीस तीस तीस जखमा लागल्या, व लोक मेले. मोठें युद्ध जालें. मग दिलेलखान याने तोंडांत अंगुली घालून आश्चर्य केलें.

'त्याजवर इखलासखान नबाब याणी येऊन सालेरीस वेढा घातला आणि गडाखाले उतरला. हें वर्तमान राजियास कळोन राजियानी प्रतापराव सरनोबत, लष्कर देऊन मोगलाईंत पाठविले होते, त्यास पत्रें व जासूद पाठविले की, 'तुम्ही लष्कर घेऊन सिताबीने वरघाटे सालेरीस जाऊन, बेलोलखानावरी छापा घालून मारून चालविणें. आणि कोंकणांतून मोरोपंत पेशवे यांस हशमानिशी रवाना केले आहे ते इकडून येतील आणि तुम्ही वरघाटी येणें. असे दुतर्फा चालून घेऊन गनिमास मारून गर्दीस मेळविणें' अशीं पत्रें पाठविलीं. त्यावरून प्रतापराव लष्कर घेऊन वरघाटे आले; आणि मोरोपंत पेशवे कोंकणांतून आले. उभयतां सालेरीस पावले. एकातर्फेने लष्करांनी घोडीं घातली; एक तर्फेने (दुसऱ्या बाजूने) मावळे लोक शिरले; आणि मारामारी केली. चार प्रहर मोठें युद्ध जालें. मोगल, पठाण, रजपूत, रोहिले, तोफाची, हत्ती ऊंटे, आराबा घालून युद्ध जाहालें. दुतर्फा दहा हजार माणूस मुर्दा जहाले. घोडीं, हत्ती, उंट यास गणना नाही. रक्ताचे पूर वाहिले. रक्ताचा चिखल जाहाला. तो असा की, त्यांत रुतो लागले, असा कर्दन जाहाला. मारता मारता घोडे जिवंत उरले नाहींत. साहा हजार घोडे जिवंत सांपडले ते राजियाकडे गणतीस लागले. सवाशे हत्ती सापडले. साहा हजार उंटें सांपडलीं. मालमत्ता, खजीना, जडजवाहीर, कापड, अगणित बिछाई, हातास लागली.

बेवीस वजीर नामांकित धरले. इखलासखान व बेलोलखान पाडाव झाले. ऐसा कुल सुभा बुडविला. हजार दोन हजार सडेसडे पळाले. या युद्धांत प्रतापराव सरनोबत व आनंदराव व व्यंकाजी दत्तो व रूपाजी भोसले व सूर्यराव काकडे, शिदोजी निंबाळकर, खंडोजी जगताप, गोदंजी जगताप, संताजी जगताप, मानाजी मोरे, विसाजी बल्लाळ, मोरो नागनाथ, मुकुंद बल्लाळ यांनी बाजे वजीर व उमराव असे कस्त केले. मावळें लोकांनी कस्त केली. मोरोपंत व प्रतापराव या उभयतांनीं आंगीजणी (धाडस) केली. युद्ध करीत असतां सूर्यराव काकडे हा पंचहजारी लष्करी धारकरी जंबुरियाचा गोळा लागून पडला. वरकडही नामांकित शूर पडले. असें युद्ध होऊन फत्ते जाहाली. राजियांनी हें वर्तमान ऐकून बहुत खुशाल जाले. तोफा मारल्या. साखरा वाटल्या. खबर घेऊन जासूद आले त्यांचे हातीं सोन्याचीं कडीं घातलीं. प्रतापराव सरनोबत, मोरोपंत पेशवे, लष्करचे सरदार व मावळे यांस बक्षिसें दिधलीं. नाजावलेले वजीर, पाडाव जाले होते त्यांस 'वस्त्रें, व अश्व देऊन सोडणें' म्हणून हुकूम पाठविला. त्यावरून बेलोलखान व नबाब यांस वस्त्रें, अश्व देऊन सोडिले. दिलेलखान सालेरीहून चार मजलीवर होता. त्याणे ही खबर ऐकून माघारा पळोन गेला.' ––(सभासद पृष्ठ ७५)

साल्हेरच्या युद्धांत मोगलांच्या झालेल्या पराजयामागोमाग मोरोपंत पिंगळे यांनी मुल्हेर जिंकून तेथील गडांची योग्य ती व्यवस्था केली व इ. स. १६७२ च्या फेब्रुवारीमध्ये कोंकणांत प्रयाण केलें. या विजयाने मोगलांची सत्ता नामशेष होऊन महाराजांची सत्ता दृढमूल झाली. त्यांचा प्रभाव अतोनात वाढला. बागलाण महाराजांनी जिंकल्यामुळे सुरतेला त्यांचा सदाचा धाक उत्पन्न झाला. बहादूरखान व दिलेरखान यांची विलक्षण अपकीर्ति होऊन सत्तेचें केन्द्र या पुढे औरंगाबाद व विजापूर नसून तें राजगड व प्रतापगड असल्याची सामान्य लोकांचीही धारणा झाली. कै. दत्तोपंत आपटे याचें एक उदाहरण देतांना म्हणतात :—

'या अनुभवानंतर मोगली सरदारांनी आपल्या हातून शिवाजीचा

बंदोबस्त होत नाही असें पाहून विजापूरकरांना आपले स्नेही बनविण्याचा प्रयत्न केला व तेथे खवासखानाचें महत्त्व वाढल्यामुळे या कामीं त्यांना यश येणार असा रंग दिसूं लागला. पण याच वेळीं विजापूरकरांच्या मुलखांत धुमाकूळ घालणाऱ्याने शिवाजी महाराजांकडे आश्रयार्थ पाठविलेलें पत्र उपलब्ध आहे; त्यावरून सत्तेचें केन्द्र विजापुरास नसून प्रतापगडास गेलें आहे हें खवासखानाच्या लक्षांत आलें नसलें तरी इतर लोकांनी तें ओळखलें होतें हें स्पष्ट दिसून येतें तें असें :--

वाईचा देशमुख दत्ताजी पिसाळ याचा गंगाजी पिसाळ वगैरेंशीं भाऊबंदीचा तंटा सुरू होता. त्यांत आदिलशाही सुभेदार व कारकून यांनी भाऊबंदांची बाजू घेतली; व दत्ताजीच्या मुतालिकाला कैद केलें. तेव्हा दत्ताजीच्या तर्फे केदारजी सुरो हा विनंति करण्यासाठी शिवाजी महाराजांकडे गेला. वस्तुत: वाईच्या सुभेदाराविरुद्ध तक्रार करून दाद लावून घ्यावयाची तर केदारजीने विजापुरास जावयास पाहिजे होतें. पण त्यापेक्षा जवळ प्रतापगडास जाऊन लौकर दाद लागेल असें त्याला वाटलें. तो महाराजांकडे जाऊन म्हणाला की, 'तुम्ही आपला एक भला (=वजनदार) माणूस वाईच्या सुभेदाराकडे पाठवून सुभेदाराला गंगाजीची पाठी राखूं नको; दत्ताजीची देशमुखी चालवा; असें न कराल तर दत्ताजी तुमच्याशीं दावा करील, विलायतीस तसदी देईल, मुलूख ओस पाडील मग आम्हांस बोल नाही असें दाटदपटें देऊन सांगा. त्यावर त्यानें तें न ऐकलें तर साहेबीं (=शिवाजीने) दत्ताजीस राहण्यास जागा द्यावी. म्हणजे दहावीस घोडी करून, शर्तीनशी दावा करून वाई परगण्याच्या विलायतीस आजार देऊन, लुटून, नागवून, कळेल तो इलाज करून आपलें पारपत्य (=व्यवस्था) दत्ताजी करून घेईल' आणि असा आश्रय दिल्याबद्दल दरसाल ५०० होन प्रमाणे ४ वर्षांत २ हजार होन घेण्याचा करार मान्य करून शिवाजी महाराजांनी दत्ताजीला क़ौलनामा (=अभयपत्र) दिलें (ले. १२६७).

--(शिवचरित्र निबंधावलि, पृ. ३४५-३४६)

साल्हेरीच्या या युद्धाने मराठे मोकळ्या मैदानी युद्धांतही मोगलांना खडे चारूं शकतात ही गोष्ट सिद्ध झाली. गनिमी कावाच नव्हे तर उघड युद्धांतही आपण विजयी होण्याइतकें सामर्थ्यसंपन्न आहोंत असा आत्मविश्वास मराठी सैनिकांमध्ये उत्पन्न झाला ही अतिशय महत्त्वाची गोष्ट होती.

औरंगजेबाला ही पराजयाची वार्ता कळतांच तो संतापाने भान विसरला. त्याने बहादूरखान व दिलेरखान यांची झणझणीत शब्दांनी खरडपट्टी काढून त्यांना लिहिलें की, 'आमचा मुलूख शिवाजीने लुटला, तुमच्यासारख्या योद्धयांना युद्धांत अडविलें; साल्हेरीच्या युद्धांत तुम्ही लढून मेला कां नाही? जगला कसे? आदिल, कुतुब, फिरगी, हबशी, वगैरे सत्ताधारी त्याला भिऊन नजराणा पाठवितात. तेव्हां ते व तुम्ही एक होऊन चोहोंकडून त्याचा मुलूख काबीज करा. म्हणजे तो किल्ल्यावर किती दिवस बसून राहील? आपोआप जेरीस आलाच पाहिजे.' —(पर्णाल पर्वताख्यान)

त्यावर बहादूरखानाने औरंगजेबाला जें उत्तर पाठविलें तें मोठें मासलेवाईक आहे. खानाने लिहिलें : 'आपली आज्ञा प्रमाण आहे. परंतु हा शिवाजी खुद्द आपल्या राजधानीत येऊनही नमला नाही; आणि आपण त्याला इतक्या कडक बंदोबस्तांत ठेवलें होतें तरीही तो पक्ष्यासारखा कसा झटदिशी पळाला, हें आपणच कृपा करून आठवावें, म्हणजे आम्ही कर्तव्य करण्यांत कसूर करीत नाही हें आपणांस पटेल. तुमच्या सांगण्याप्रमाणे आम्ही खटपट करूं पण शत्रूच्या मुलुखांत शेंकडो खंडी धान्य उत्पन्न होतें; त्यामुळे आम्ही गडाखालचा मुलूख हस्तगत केल्याने गड जेरीस येतील असें वाटत नाही. प्रत्येक किल्ल्यावर शिवाजीचें २–३ हजारच सैन्य आहे. पण तें अचानक गडावरून खालच्या मुलुखावर झडप घालून उंदराप्रमाणे अशा सफाईने निघून जातें की त्याला अडविणें शक्य नाही. बरें आमचे घोडेस्वार सज्ज होऊन उभे असले तरी शिवाजी त्यांच्यावर बेधडक दौड करून येतो; व बहिरी ससाण्याप्रमाणे झडप घालतो. तेव्हां आम्ही सपाट प्रदेशांत राहून त्याचें निवारण कसें

करणार? आमच्याजवळ एक लाख घोडा असला तरी शिवाजीच्या डोंगराळ मुलुखांतून त्याचा पाठलाग करणें शक्य नाही. अशा स्थितींत त्याच्याशीं तह करणें हाच मार्ग आम्हांस प्रशस्त वाटून आम्ही एक चांगला भाषाभिज्ञ ब्राह्मण, वकील म्हणून पाठविला. तेव्हां शिवाजीने उलट, आमच्याकडे काजी हैदर नांवाचा यवन वकिलीस पाठविला आहे.' —(पर्णाल पर्वताख्यान)

हें पत्र वाचून औरंगजेबाच्या अंगाचा केवढा जळफळाट झाला असेल याची कल्पनाच केलेली बरी. पण करणार काय? या पत्रांतील एक अक्षर तरी खोटें होतें काय ?

इकडे महाराजांच्या वकिलाशीं कसें वागावें हें प्रथम बहादूरखान व दिलेरखान यांना कळेना. शेवटीं बादशहाचा राग आपल्यावर ओढवूं नये म्हणून त्यांनी त्याला अटकेंत ठेविलें पण त्याने कोणताही प्रश्न सुटणारा नव्हता.

बहादूरखानाचें महाराजांच्या सैन्यापुढे कांहीही न चालून तो बागलाणांतून पळ काढून अहमदनगरला निघून गेला. पण मनांतून राग आला असतांही औरंगजेबाला शेवटीं त्याच्याच गळ्यांत दक्षिणची सुभेदारी अडकवावी लागली. इ. स. १६७२ च्या मे महिन्यांत पराभवाने व अपकीर्तीने हताश होऊन शहाजादा मुअज्जम उत्तरेकडे निघून गेला. त्यामुळे दक्षिणच्या सुभेदारीवर कोणाला तरी नियुक्त करणें आवश्यक होतें. उत्तर हिंदुस्थानांत पेटलेल्या सत्नामी लोकांच्या बंडामुळे व एप्रिलमध्ये खैबरघाटांत पठाणांनी उठावणी केल्यामुळे हीं छातीवरचीं प्रकरणें सोडून औरंगजेबाला जातीने दक्षिणेकडे लक्ष देणें अथवा कोणी मातबर सेनानी पाठविणें अशक्यप्राय होतें. म्हणून त्यानें बहादूरखानालाच नवीं सुभेदारीचीं वस्त्रें देऊन खानजहान् बहादूरखान कोकलताश जाफरजंग' ही नवी पदवी दिली, व त्याच्या हाताखाली सत्तर सहस्र अश्वस्वार देऊन दिलेरखानाला साहाय्यक म्हणून दिलें. या नव्या कुमकेने धैर्य वाढून बहादूरखानानेही 'नाना हुन्नर करून शिवाजीस जेर करतो, पादशहांनी फिकीर न करावी' असें बादशहाला आश्वासन दिलें. पण

आश्वासनें व पदव्या यांनी शिवाजी महाराज कसे पराभूत होणार? बहादूरखानाच्या या स्वारीच्या वार्ता महाराजांच्या गुप्तचरांनी त्यांना सांगतांच ते म्हणाले : 'बहादूरखान पेंडीचें गुरूं आहे. त्याचा गुमान काय? त्यास आपल्या मुलुखांत यावयास दोन वर्षे लागतील. पेंडीचें गुरूं म्हणजे पैशांनी विकत घेतां येण्यासारखा मनुष्य. या उद्‌गावरून महाराजांचें शत्रूचा स्वभाव ओळखण्याचें सामर्थ्य कसें होतें याची यथार्थ कल्पना येते.

साल्हेरनंतर उन्हाळ्यांत व पावसाळ्यांतही महाराजांच्या स्वराज्यविस्ताराच्या कार्यक्रमाला खंड पडला नाही. जून महिन्यांत महाराजांचे पेशवे मोरोपंत पिंगळे यांनी जव्हार स्वराज्यांत समाविष्ट केलें. तेथे मोरोपंतांना सतरा लक्ष रुपयांचा धनकोष मिळाला. त्या मागोमाग त्यांनी रामनगरही जिंकलें. जव्हारचा राजा विक्रमशहा याच्यावर स्वारी करून जव्हार स्वराज्यांत समाविष्ट केलें. तेथे मोरोपंतांना सतरा लक्ष रुपयांचा धनकोष मिळाला. त्या मागोमाग त्यांनी रामनगरही जिंकलें. जव्हारचा राजा विक्रमशहा हा मोगलांच्याकडे पळून गेला व रामनगरचा राजा सोमशहा हा पोर्तुगीजांच्या आश्रयाला गेला. हे दोघेही कोळी राजे होते. धारराय नांवाचा याच परिसरांतील तिसराही एक कोळी राजा पदच्युत करण्यांत आला होता. विक्रमशहाचा मुलगा त्याला येऊन मिळाला. त्या दोघांनीही सैन्याची जमवाजमव करून स्वराज्याच्या प्रदेशाला उपद्रव द्यावयास प्रारंभ करतांच महाराजांच्या सेनानींनी त्यांना पकडून त्यांचा शिरच्छेद केला. याप्रमाणे जयसिंगाच्या स्वारीच्या वेळीं, उगवत्या सूर्याला दंडवत या न्यायाने महाराजांच्यावर उलटलेल्या व जयसिंगाकडे होऊन चालत गेलेल्या या विश्वासघातकी कोळी राजांना त्यांच्या कृतकर्माचें दारुण प्रायश्चित्त मिळालें.

जव्हार व रामनगर अधीन होतांच कल्याणहून उत्तर कोकणांत निर्वेधपणें जाण्याचा मार्ग मोकळा झाला होता. रामनगर (हल्लीचें धरमपूर) सुरतेपासून अगदीच जवळ असल्याने तेथे महाराजांची सत्ता प्रस्थापित होतांच सुरतेच्या धनिकांची मात्र पांचावर धारण बसली.

दुसऱ्यांदा सुरतेवर केलेल्या स्वारीनंतर परत जातांना प्रतिवर्षीं चार लक्ष रुपये खंडणी द्यावयास महाराजांनी सुरतेच्या धनिकांना बजाविलें होतें. तदनुसार महाराजांचे पेशवे यांनी रामनगरहून राजप्रतिनिधि या नात्याने सुरतेला खंडणीची मागणी करणारीं दोन पत्रें पाठविलीं. या दोन पत्रांचें उत्तर न आल्यामुळे तिसरें पत्र महाराजांनी स्वतः पाठविलें. तें पत्र असें :—

"तुम्हीं चौथाई वसूल, तावडतोब माझ्याकडे भरणा करावा, यासाठीं हें शेवटचें पत्र पाठवीत आहें. औरंगजेब बादशहा माझ्या प्रजेला त्रास देत असल्यामुळे त्याच्या पारिपत्यासाठी मला ही एवढी फौज ठेवणें भाग पडलें आहे. अर्थात् त्या फौजेसाठी होणारा खर्च त्याच्याच प्रजेकडून मी वसूल करणार. तरी चौथाईबद्दल चार लक्ष रुपये ताबडतोब पाठवून द्यावेत. ते न आल्यास मी स्वतः सुरतेस येऊन चौथाई वसूल करून घेईन. या कामीं प्रत्यक्ष औरंगजेबसुद्धां मला अडथळा करण्यास समर्थ नाही, हें तुम्ही लक्षांत ठेवा.' —(शिवाजी व शिवकाल पृ. १४३)

सुरत शहराची अवस्था खरोखरीच शोचनीय झाली होती. अथवा सुरत शहराचीच कशाला? साऱ्या मोगल साम्राज्याचीच ती अवस्था दिसत होती. औरंगजेबाचे एकूण एक अधिकारी लांचखाऊ, लोभी व अप्रामाणिक होते. त्यांच्या भरंवशावर कोणत्याही सत्तेला विजयी होतां येणें शक्यच नव्हतें. शिवाजीची स्वारी सुरतेस होणार हें ऐकतांच तेथील मोगल अधिकाऱ्याने ती सुवर्णसंधि आहे असें समजून साऱ्या व्यापाऱ्यांना एकत्रित केलें, व पांचशे स्वार आणि तीन सहस्र पायदळ इतकें नवें सैन्य सुरतेच्या संरक्षणासाठी ठेवणें आवश्यक आहे असें सांगून हिंदू व मुसलमान व्यापाऱ्यांकडून या नव्या सैन्याच्या व्ययासाठी पंचेचाळीस सहस्र रुपये गोळा केले. पण या पैशांचें त्याने केलें काय? एकही नवा सैनिक न ठेवतां सगळे पैसे त्याने घशांत घातले.

महाराजांचें तिसरें पत्र येतांच भयकंपित झालेल्या श्रीमंत व्यापाऱ्यांनी या मोगल अधिकाऱ्याला भेटून भडोचला निघून

जाण्याची अनुज्ञा मागितली. त्याने मध्यरात्रीपर्यंत त्यांना तिष्ठत ठेवून अनुज्ञा दिली; पण सकाळ उजाडतांच ती नाकारली. एवढ्या दुभत्या गाई भडोचला पाठवून देऊन आपलें लांच खाणें कसें चालणार? असेंच त्याला वाटत असावें. त्याने त्यांच्याशीं असें बोलणें केलें की शिवाजीला कांही पैसे देऊन आपण गळ्याशीं आलेल्या या संकटांतून स्वतःची सुटका करून घेणें चांगलें. त्याने, व्यापाऱ्यांनी एक लक्ष रुपये द्यावे व देसायांनी शेतकऱ्यांपासून दोन लक्ष रुपये मिळवून द्यावे म्हणजे आपण शिवाजीकडे पैशांचा भरणा करूं असें सांगितलें. एक दिवस व एक रात्र प्रदीर्घ वाटाघाटी होऊन शेवटीं तीन लक्षांऐवजी साठ सहस्र रुपये द्यावे असें त्या अधिकाऱ्याने सांगितलें. तीन लक्षांवरून साठ सहस्रांवर त्याने मारलेली उडी पाहतांच त्या व्यापाऱ्यांच्या व देसायांच्या हें तत्काळ ध्यानांत आलें की, शिवाजीला यापैकी कांहीही मिळणार नसून सारा पैसा हा अधिकारीच घशांत टाकणार आहे. पैशापरी पैसा जाऊन शिवाय संकटाचें खड्ग टांगतेंच राहणार हें पाहतांच एक पैहि न देतां ती मंडळी निघून गेली. लोकांनी पळून जाण्याचा प्रयत्न केला तों सुरतेच्या नगराधिकाऱ्याने वेशीचे दरवाजे बंद केले.

महाराजांचे सर सेनापति प्रतापराव गुजर यांनी या वेळीं वऱ्हाड व खानदेशांतील मोगली प्रदेश लुटला. सुरतेला रामनगर व तापीचें खोरें या दोन्ही मार्गांनी मराठे आपल्यावर स्वारी करतील अशी सारखी भीति वाटत होती. तेवढ्यांत प्रतापराव गुजरांनी आणखी एक दमदाटीचें पत्र सुरतेच्या अधिकाऱ्याला व तेथील धनिकांना पाठविलें. तें पत्र असें :—

'सुरत येथील कानूनगो, देसाई, व्यापारी महाजन व शेटे आणि इंग्रज, फ्रेंच व डच वखारीचे कप्तान आणि रयत लोक यांस कळावें की, सुरतेंतील व्यापारी मालावर सालोसाल जकातीचें उत्पन्न किती येतें, याचा पूर्ण तपास करून, चौथा हिस्सा शूर मराठी फौजेची खंडणी म्हणून घेत जावा अशी आम्हांस महाराज शिवाजी राजे

यांची आज्ञा झाली आहे आणि या कामावर त्यांनी माझी नेमणूक केली आहे. त्याबरहुकूम तुम्हा सर्वांस कळविण्यांत येतें कीं, बऱ्या बोलाने वागण्याची सुबुद्धि देव तुम्हांस देईल तर, आमचा गुमास्ता तुमच्याकडे जात आहे, त्यास सर्व कागद दाखवून, हिशेब चुकवून द्यावा. असें तुम्ही न कराल तर आमचे शूर शिपाई तुमच्या शहरावर लगेच झडप घालतील व घरें दारें जमीनदोस्त करून दुर्दशा उडवितील तुम्ही त्यांच्या कचाटयांतून पळून जाऊं शकणार नाही. बादशाह तुमचें रक्षण करील असें तुम्हांस वाटत असल्यास हा तुमचा भ्रम आहे. यापूर्वी दोनदा आम्ही तुम्हांस तुडविलें, तेव्हां त्यानें कोठे तुमचें रक्षण केलें? तटावरील तोफांचा धूर तुमच्या डोळयांवर येऊन त्या तुमचें रक्षण करतील असें तुम्हांस वाटत असेल तर आमचे शूर योद्धे पिंजलेल्या कापसाप्रमाणे त्या तटाच्या चिंधडया उडवितील, सालेर मुल्हेरचे बळकट किल्ले आम्ही काबीज करूं, अशी कोणास कल्पनाही नव्हती. परंतु महाराजांच्या पुण्य-प्रतापाने ते आमच्या शिपायांनी इतक्या लवकर जिंकले की, ही गोष्ट सांगण्यासही वेळच जास्त लागावा. तुमच्या सुरतेच्या तटाची काय किंमत? तुमचे नामवंत योद्धे दिलेरखान व बहादूरखान हे साल्हेरवरून मनगटें चावीत परत गेले, हें तुम्हांस ठाऊक आहेच. सुरतेवर एकदम फौज न धाडतां ही पूर्व सूचना मेहरबानीने आम्ही देत आहों. ईश्वराची तुम्हावर कृपा असेल तर हा हुकूम पाळण्याची तुम्हांस सुबुद्धि देईल नाहीतर तुमचे हाल तुम्ही जाणा.'

त्यावर सुरतेच्या अधिकाऱ्याकडून मोठा विनोद उत्पन्न करणारें पत्र प्रतापराव गुजर यांना गेलें. तें पत्र असें : 'दुष्टांनो, उंदरांनो, तुमच्या या उद्धटपणाबद्दल आमचे बादशहा तुमची जीभ कापून तुम्हांस दगडाखाली ठेचून काढतील हें तुम्हांस कळत कसें नाही?'

—(राजा श्री शिवछत्रपति भाग १ वा, पृष्ठ ७८)

या तऱ्हेच्या उत्तरांतून विनोदाशिवाय दुसरें कांहीच निष्पन्न होणारें नव्हतें.

महाराजांच्या या वेळच्या हालचालींनी सुरत व सभोवारच्या

प्रदेशांत, इतकेंच नव्हे तर दक्षिणेंतील मोगलांच्या सर्वच प्रदेशांत विलक्षण भय उत्पन्न केलें होतें. सुरतेंतील इंग्रज वखारवाल्यांना तर आपण मुंबईला पळून जावें असें वाटून त्यांच्या प्रेसिडेंटने तशी सिद्धताही चालविली होती. सुरतेच्या इंग्रजी पत्रव्यवहारांतील पुढील उतारा या दृष्टीने पाहण्यासारखा आहे.

'7th July. The trade of Suratt and of the whole country of Industan being totally obstructed by intestive trouble the whole body of the kingdom in disorder, the dangers and ruins of a civil war, growing daily more aud more evident threatening general ruine of all trade and of the city of Suratt chiefly, your president with the advice of his councell thought it high time to provide for the security of your estate and trade, and to improve the opportunity of raiseing your owne port. For seeing we cannot dispose of your goods and Suratt to any profit nor keep your estate on shoare with any security, through the continuall alarums of the enemy and covetous exactions of the governor and officers of the Towne, who taking advantage of the generall disorder and the king's ill government committ all violence without. controule and if not constantly fedd with great presents put dayly affrants upon us and disturbe your affaires, common prudence calls us to fly from dangers which we are not able to oppose, and to settle by degrees the body of your trade on your owne Island, where in truth it ought to be.

Our persons (as you truly feare) are in danger; for although for the honour of the Nacon, we shall not leave the house, yet you cannot expect that with a few youths here we can defend it against such a resolute enemy whose

designes are wholy bent to distroy this towne and port, nor have we any confidence from what overtures may have passed between you and the enemy; whome we know ever to have been treacherous; we have application only to Almighly God, the Author of peace, that he will defend us in the assaults of our enemys and preserve us to performe our respective charges faithfully.

—( Shivaji the great vol. 1 Part II page 340 – 341 )

'सुरतेचा आणि सर्व हिंदुस्थानचाच व्यापार अंतस्थ गोंधळामुळे पार बुडाला. विशेषत: प्रत्यक्ष सुरत शहर नष्ट होण्याचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं. त्यामुळे तुमची संपत्ति आणि व्यापार यांच्या रक्षणाकरितां स्वत:चें असें स्वतंत्र बंदर वसविण्याची वेळ आली आहे; असें प्रेसिडेंट व त्याचें सल्लागार मंडळ यांचें मत आहे. शत्रूबद्दल वारंवार हुली उठतात आणि शहरचा सुभेदार व अंमलदार हे लोभाने नगरवासीयांकडून द्रव्य उकळतात. त्यामुळे तुमचा माल किफायतशीर विकणें किंवा मालमत्ता किनाऱ्यावर नुसती सुरक्षित राखणें हेंही अवघड झालें आहे. ते सर्वसाधारण अंदाधुंदीचा आणि बादशाही मुलुखांतील बेबंदशाहीचा फायदा घेऊन बेतालपणें अत्याचार करतात. जर त्यांना मूल्यवान् नजराण्यांचा खुराक सतत दिला नाही तर प्रत्यही आमची मानखंडना करून तुमच्या व्यवहारांत व्यत्यय आणतात. या गोष्टींचा दूरवर विचार केला म्हणजे ज्या बाबतींत आम्ही प्रतिकार करण्यास असमर्थ आहोंत त्या संकटापासून दूर राहून, हळू हळू बराचसा व्यापार तुमच्याच स्वत:च्या बेटावर स्थिर करावा आणि तेथेच तो ठेवणें योग्य होईल, असें वाटूं लागतें.

हें पत्र दि. १४ जून १६७२ चें आहे. जून महिन्यांत मोरोपंत पिंगळ्यांच्या सैन्याचा तळ सुरतेपासून २५ मैलांवर असलेल्या रामनगरलाच होता. जुलै महिन्यांत मोरोपंत घाट उतरून नाशिकास आले. तें नगर लुटून त्यांनी तेथील मोगली अधिकार नष्ट केला. या वेळीं नाशिकला मोगलांच्या वतीने चार सहस्र सेना

घेऊन लखूजी जाधवाचा पणतू म्हणजे शिवाजी महाराजांच्या मामेभावाचा मुलगा ठाणेदार होता, व वणी-दिंडोरी येथे सिद्दी हिलाल हा ठाणेदार होता. मोरोपंतांनी या दोन्ही ठाणेदारांना एक एकटे गांठून त्यांचा पराभव केला. या युद्धांत अगणित मोगली सेना मारली गेली व सिद्दी हिलाल लुटला गेला. या दोघांच्याही पराभवाची वार्ता ऐकतांच बहादूरखानाला अतिशय संताप चढून त्याने त्यांची चांगलीच खरडपट्टी काढली. त्याचा परिणाम इतकाच झाला की जाधवराव व सिद्दी हिलाल हे दोघेहि ससैन्य महाराजांना जाऊन मिळाले. त्यांच्या मागोमाग आणखी दोघांनीहि त्यांचेंच अनुकरण केलें व ही अनुकरणाची परंपरा वाढत जाणार असा रंग दिसू लागला. तेव्हा मात्र दिलेरखान व बहादूरखान यांचें धाबें दणाणलें. हा प्रकार जर वाढत गेला तर हातीं असलेल्या गुजराथचें संरक्षण कसें करावें हाच प्रश्न त्यांच्यासमोर उभा राहिला.

सिद्दी हिलाल हा मुळांत महाराजांचाच सरदार होता. तो मोगलांच्या पक्षाला मिळाला तरी महाराजांशीं त्याचे संबंध सख्य-त्वाचे असून तो मोगलांच्या सैन्यांतील गुप्त वार्ता महाराजांना पुरवीत असे असें मुसलमान इतिहासकारांचें म्हणणें आहे.

इ. स. १६७२ च्या डिसेंबरमध्ये वऱ्हाड व खानदेशांत महा-राजांनी आपल्या सैन्याच्या छोटया छोटया तुकडया पाठविल्या. त्यांना अयशस्वी करण्यांत मात्र बहादूरखानाला यश मिळालें. त्याने मोठया मनसबीचा लोभ दाखवून महाराजांचे व्याही बजाजी निंबाळकर यांना आपल्या बाजूला वळवून घेतलें. महाराजांचा जांवई महादजी निंबाळकर यालाहि त्याने मोठी मनसब दिली. वऱ्हाडांतील व खानदेशांतील छोटयाशा व नगण्य विजयाचें स्मारक म्हणून बहादूरखानाने अहमदनगरापासून वीस कोसांवर वडगांवला एक गड बांधला व बादशहाच्या अनुज्ञेने स्वतःचें स्मारक म्हणून त्याला बहादूरगड असें नांव दिलें.

इ. स. १६७३ मध्ये शिवाजी महाराजांनी आपलें जन्मस्थान

जो शिवनेरी दुर्ग तो जिंकण्याचा पुनश्च एकवार प्रयत्न केला. या गडाचा गडकरी पूर्वी हिंदू ब्राह्मण होता. त्याचें नांव आबा भट असें होतें. पण तो या वेळीं बादशाही कृपा संपादन करण्यासाठी धर्मांतर करून मुसलमान झाला होता. आबा भटांचें अबदुल अझीज असें नामांतर झालें होतें. औरंगजेबाचा तो मोठा विश्वासू सेवक बनला होता. या बाटग्या गडकऱ्याला लांच देऊन धनप्रयोगाने गड घेण्याचा महाराजांनी प्रयत्न केला. पण या गडकऱ्याने महाराजांच्या जवळून भरपूर लांच घेतली, व त्यांना एके दिवशीं रात्रीं सात सहस्र अश्वदलासह यावें म्हणजे गड स्वाधीन करतों असें सांगून पाठविलें. त्याच वेळीं त्याने बहादूरखानाला असा निरोप पाठविला की, 'शिवाजीचें सैन्य येतांच वरून मी त्यांच्यावर मारा करतो व आपण ससैन्य येऊन खालून मारा करावा म्हणजे मधल्या दामटींत शिवाजीच्या सैन्याचा पूर्ण संहार करतां येईल.' ठरल्याप्रमाणे विश्वासाने महाराजांचें सैन्य गडावर चढलें. बहादूरखानहि ससैन्य किल्ल्याच्या पायथ्याशीं आला. एकाएकीं अबदुल अझीजने वरून व बदादूरखानाने खालून त्या सैन्यावर जोरकस मारा केला. या विश्वासघातकी आक्रमणांत मराठ्यांचें पुष्कळ सैन्य मृत्युमुखीं पडलें व उरलेलें पळून गेलें. आपलें जन्मस्थान शिवनेरी कांहीं महाराजांना मिळवितां आलें नाही.

मोगलांशीं याप्रमाणे युद्ध चालू असतांनाच महाराजांना विजापूरच्या राज्यांत हस्तक्षेप करण्याची संधि चालून आली. शत्रूचा संकटकाल तीच आपल्या वैभवाची संधि या न्यायाने राजनीतिविशारद शिवरायांनी तिचा सुयोग्य उपयोग करून घेतला. ती संधि म्हणजे विजापूरचा सुलतान अली आदिलशहा याचा मृत्यु होय. त्या वेळची विजापूरची अवस्था व महाराजांच्या राजकीय हालचाली यांकडे पुढील प्रकरणांत वळूं.

◆ ◆ ◆

प्रकरण अकरावें

# स्वराज्याची स्थापना

विजापूरचा सुलतान अली आदिलशहा याच्या मृत्यूने विजापूरच्या सत्तेंत महाराजांना हस्तक्षेप करण्याची जी संधि मिळाली तिचें वर्णन बुसातीने सलातिन या विजापूरच्या अधिकृत इतिहासांत पुढीलप्रमाणे आहे : 'अल्ली जिवंत होता तोंपर्यंत आदिलशाही दरबारांतील वैमनस्यें विशेष उघडकीस आलीं नाहीत. पण दरबारांत परस्परविरोधी पक्ष जोरांत होते. दियानतराव व मुख्य कारभारी अबदुल महंमद यांचें मुळापासून उघड उघड सख्य होतें, व या कारभाऱ्याचे हातीं सतत बारा वर्षें राज्यसूत्रें कायम टिकल्यामुळे दरबारांतील सर्व सरदारांवर त्याचा चांगला वचक होता. इतर मुत्सद्द्यांपैकी मिर्झा युसफखान हा खवासखानाचा द्वेष करी आणि धर्माजी पंडित हा वर सांगितलेल्या (अबदुल महम्मद व दियानतराव यांच्या) अधिकारारूढ पक्षाच्या विरुद्ध होता, व त्याची खटपट मुजफरखान याच्या तर्फे चाललेली असे. या तिरंगी सामन्यांत खवासखान अगर मुजफरखान यांचा हेतु अधिकारी पक्षास हाणून पाडण्याचा मात्र आहे; पण कारभाराची जबाबदारी अंगावर घेऊन ती पार पाडण्याचा वकूब त्यांच्या ठिकाणीं नाही हें अल्ली पूर्णपणें जाणून होता. अबदुल महमद याने बारा वर्षे धिमेपणाने कारभार करून व मोठमोठ्या अडचणींच्या प्रसंगांना तोंड देऊन आदिलशाही टिकविली असल्यामुळे अबदुलकरीम बहलोलखान वगैरे दरबारांतील सरदारांची त्याच्या विरुद्ध वागण्याची छाती नव्हती. हें सर्व लक्षांत घेऊन अल्लीने असें ठरविलें होतें की, 'शाहजादा शिकंदर यास आपल्या डोळ्यां-देखत गादीवर बसवून त्याचें कारभारीपण अबदुल महंमदाने पत्करलेलें आपण पाहावें.' अनेक मुत्सद्द्यांचाही असाच सल्ला पडला; व बादशहाने कारभाऱ्यांस तसें करण्याविषयी अनेक वेळां

आग्रहपूर्वक सांगितलें. पण कारभाऱ्याने ती गोष्ट मनावरच घेतली नाही. तो टाळाटाळी करूं लागला. याचें कारण या कारभाऱ्याला त्याच्या आईने असें बजावून सांगितलें होतें की, 'जो कारभारी नव्या शहाजाद्यास प्रथम गादीवर बसवितो तो शेवटीं लवकर मारला जातो. एवढ्याकरितां तूं या खटपटींत पडूं नकोस. आणि पडलास तर माझें दूध प्याला आहेस त्याचे उपकार तूं फेडले नाहीस असें मी समजेन.' या भोळ्या समजुती-मुळे हा कारभारी आपल्या अंतःकाळीं पुढील राज्यव्यवस्थेच्या कामीं उपयोगी पडूं शकत नाही अशी अल्लीची खात्री झाली. तेव्हां निरनिराळ्या पक्षांनी एकमेकांशीं भांडून यादवी युद्ध माजूं नये अशासाठी कारभाऱ्याच्याच संमतीने एक तात्पुरती योजना त्याने मरण्यापूर्वी करून ठेवली. ती अशी की, खवासखान हा शहाजाद्याचा पालक व गादीचा कारभारी असावा व अबदुल महमद याने शहादुर्ग व गुलबर्गा येथे राहून मोगलांशीं लढण्याची तयारी ठेवावी. अबदुल करीम बहलोलखान यांच्याकडे पन्हाळा व मिरज हे किल्ले देऊन शिवाजीशीं मुकाबला करण्याचें काम सोपवावें; मुझफरखान याने बैदनूरकराकडील मोहीम पार पाडावी आणि स्वतः अबदुल महंमदाने खवासखानाच्या हाताखालीं राहून तो सांगेल त्या कारभाराची अंमलबजावणी करावी. याप्रमाणे खवासखान व अबदुल महंमद यांच्यांत करारमदार ठरून बाद-शहाच्या मृत्यूनंतर दुसऱ्याच दिवसापासून ही व्यवस्था अंमलांत आणण्याचें ठरलें. त्याप्रमाणे बादशहा अगदी मरणोन्मुख झाला तेव्हा खवासखानाने मोठ्या व्यवस्थेने बादशाही महाल व दरबार यांचा बंदोबस्त केला. शेवटीं हिजरी १०८३ साबान १३ (२४ नोव्हेंबर १६७२) रोजीं पांच वाजतां बादशहाचा अंत झाला व पांच वर्षांचा शिकंदर आदिलशहा तख्तावर बसला. त्याबरोबर दुसरे दिवशीं अबदुल महंमदाने खवासखानाकडे निरोप पाठविला की, 'ठरल्याप्रमाणे शहादुर्ग किल्ला माझ्या ताब्यांत द्या.' पण खवासाने उत्तर पाठविलें की, 'बादशहा लहान लेकरूं, अज्ञान;

अशा स्थितींत राज्यांतील किल्ले कोणाच्याही स्वाधीन करण्यास मी कोण मालक ? वर्ष दोन वर्षे थांबा. तेवढ्यांत कांही तोड काढूं. या चालढकलीच्या जबाबाचें रहस्य अबदुल महंमदाने तेव्हांच ओळखले व त्याला फार वाईट वाटलें. दुसरे दिवशीं स्वतः खवासाने अबदुल महंमदाच्या घरीं जाऊन पुष्कळ साळसूद-पणाच्या गोष्टी सांगितल्या. पण गोड बोलण्याने फसण्याइतका अबदुल महंमद भोळा नव्हता. त्याने कारभारांतून अंग काढून घेतलें. आणि खवासाच्या नाकर्तेपणामुळे 'आपण जन्मभर कष्ट करून उभ्या केलेल्या राज्याची घडी बिघडत चालली हें दिसूं लाग-तांच त्याला विजापुरांत राहणेंही असह्य वाटून तो त्या शहरांतून चालता झाला.' ––(शिवचरित्र निबंधावलि, पृष्ठ ३४८, ३४९)

अबदुल महंमदाप्रमाणेच बहलोलखान याचेही अधिकार खवास-खानाने स्वतःकडेच घेतले व त्यामुळे राज्यांत सर्वत्र अंदाधुंदी माजली. अशी अनायासें चालून आलेली संधि शिवछत्रपतीसारखा राजनीति धुरंधर पुरुष कसा सोडील ? त्यांनी परिस्थिति ओळखून विजापूर दरबारांतील आपला वकील बाबाजी नाईक पुंडे याला परत बोलावून घेतलें आणि सैन्याची जमवाजमव चालविली. त्याच वेळीं वऱ्हाडच्या व तेलंगणच्या बाजूला असलेल्या सेनापति प्रतापराव गुजरांना व आनंदरावांना महाराजांनी अशी आज्ञा केली की, तुम्ही औरंगजेब व कुतुबशहा यांचा जितका प्रदेश लुटतां येईल तितका लुटून पिळलेल्या उसाप्रमाणे निःसत्त्व करून टाका, म्हणजे ते संधीस सिद्ध होतील; आणि यानंतर त्यांचा प्रदेश सोडून एकदम आदिलशाही प्रदेशांत दौड करा; व वाई-पासून लक्ष्मेश्वरापर्यंतचा प्रदेश ताब्यांत घ्या.

इकडे बाबाजी नाईक पुंडे विजापूरहून परत येतांच महाराजांनी अण्णाजी पंडित, कोंडाजी व गणोजी आणि मोत्याजी खळेकर यांना पन्हाळा गड सर करण्यासाठी पाठविलें. कोंडाजीने रात्रीं गुप्तपणें किल्ल्यावर स्वारी करावी व अण्णाजीने रत्नागिरीच्या अरण्यांत ससैन्य सज्ज असावें अशी ही योजना होती. दि. ६ मार्च १६७३ ला

रात्रीं भीषण अंधाराचें साम्राज्य सर्वत्र पसरलें असतां कोंडाजी फर्जंद पन्हाळ्याच्या पायथ्याशीं येऊन पोहोचला. त्याच्यासमवेत दोराच्या शिड्या, घोरपडी, मेखा, वगैरे साहित्य होतें. आपल्या बरोबरीच्या साहसी व शूर अशा निवडक केवळ साठ मावळ्यांना घेऊन तो शिड्यांच्या साहाय्याने गडावर चढला. अण्णाजी पायथ्याशीं होतेच. हे साठ लोक वर चढतांच निरनिराळ्या ठिकाणीं पांगले. व त्यांनी जोरजोराने रणशिंगें फुंकल्यावर किल्ल्यांतील लोकांना आपल्यावर शत्रु चालून आला आहे हें कळलें. त्या असावध लोकांत एकच गोंधळ उडाला. साऱ्या रात्रभर हातघाईची लढाई झाली. कोंडाजीने गडकऱ्याला ठार केलें. तेथील आदिलशाही कारकून नागोजी पंडित हा पळून गेला. प्रभातकालीं उषा ज्या वेळीं फाकली त्या वेळीं पन्हाळा स्वराज्यांत समाविष्ट झालेला होता. पन्हाळा जिंकल्यावर कोंडाजी फर्जदाने तेथील अधिकाऱ्यांना पकडून यथेच्छ चोप दिला व त्यांच्याजवळून द्रव्य कोठेकोठे ठेवलेलें आहे तें समजावून घेतलें. कोंडाजीच्या विजयाची वार्ता कळतांच अण्णाजीपंत ससैन्य गडावर आले व त्यानंतर स्वतः शिवाजी महाराज राजगडावरून पन्हाळ्यास आले आणि महाराजांनी तेथे एक महिनाभर वास्तव्य केलें. या वास्तव्यांत त्यांनी गडावर दारूगोळा व अन्य सामग्री भरपूर प्रमाणांत एकत्रित करून पन्हाळ्याला अजिंक्य स्वरूप प्राप्त करून दिलें. पन्हाळ्यावरील विजय हा शिवाजी महाराजांच्या भेदनीतीचा विजय असून त्यांच्या वाढत्या सामर्थ्याचें तें द्योतक होतें. जेधे शकावलीत असें लिहिलें आहे की, फाल्गुन वद्य १३ पनाला गड आणाजीपंतीं भेद करून घेतला. साठी लोक रवाना केले. त्यांनी पनाळा घेतला.' यावर भाष्य करतांना विख्यात इतिहाससंशोधक दत्तोपंत आपटे हे लिहितात, ' तात्पर्य, आदिलशाही नोकर मराठ्यांना भेदतां येऊं लागले. याची नैतिक मीमांसा येथे करण्याचें कारण नाही. पण ऐतिहासिक दृष्ट्या असें म्हणतां येईल की, आदिलशाही कमजोर होत चालली, मुत्सद्द्यांत वैमनस्य वाढलें, एखाद्या भागावर

शत्रूचा हल्ला आला असतां त्या भागाचा पाठपुरावा मध्यवर्ती सत्तेकडून होण्याची खात्री राहिली नाही. आणि मोठ्या इमानाने शेवटपर्यंत किल्ला लढविला तर बक्षीस किंवा त्याच्या उलट वागल्यास शिक्षा करण्याचें सामर्थ्य विजापूर दरबारांत नाही या गोष्टी उघड दिसत असल्यामुळे आदिलशाही नोकर मराठ्यांना भेदतां येऊं लागले. किंबहुना निग्रहानुग्रहाचें सामर्थ्य म्हणजे राजेपण हें विजापुरांतील तख्तावर बसलेल्या पोरांत नसून रायगडास बिनतख्ताच्या जागीं राहणाऱ्या शिवाजी नांवाच्या व्यक्तींत आहे व त्याच्याच आश्रयास जाण्यांत आपलें हित आहे ही गोष्ट त्या वेळीं सर्वांच्या लक्षांत येऊं लागली होती. शिवाजी हें भक्कम आश्रयस्थान आहे हें मोगलांकडे असलेल्या हिलाल व जाधवराव किंवा छत्रसाल यांना जर पटलें तर पन्हाळ्याच्या किल्ल्यांतील एखाद्यास तसें वाटलें याचें आश्चर्य वाटावयास नको. सारांश, इमान ही भावना नोकरांच्या अंतःकरणांत जागृत राहण्यास बादशाही व्यक्ति व त्याचें राज्ययंत्र जबरदस्त व व्यवस्थित चाललेलें दिसणें आवश्यक असे; तशी परिस्थिति शिवकालीन आदिलशाहींत राहिली नसल्यामुळे त्या राज्याची घडी विस्कळीत होत चालली.' ––(शिवचरित्र निबंधावलि पृ. ३५१ व ३५२)

शिवाजी महाराजांनी पन्हाळा घेतांच विजापूरच्या मुत्सद्द्यांत एकच धांदल उडाली. आधीच अबदुल महंमदासारख्या तोलाच्या मुत्सद्द्याला घालवून दिल्यामुळे लोक खवासखानावर चिडलेलेच होते. त्यांतच पन्हाळ्यासारखा महत्त्वाचा गड शत्रूच्या हातीं जाऊन आणखीही प्रदेश जाण्याचा संभव दिसूं लागल्यामुळे तर प्रत्येकजण खवासखानाला धारेवर धरूं लागला. त्याची सर्वत्र अतिशय नाचक्की झाली. खवासखानाला दोष देण्यांत सर्वांत मोठा पुढाकार बहलोलखानाने घेतला. त्या सरशीं बहलोलखानालाच पुढाकार देऊन शिवाजी महाराजांचें पारिपत्य करण्याची कामगिरी त्याच्यावर सोंपविण्यांत आली. बहलोलखान मोठें सैन्य घेऊन निघाला, व त्याने आपल्या सैन्याचा तळ तिकोट्याजवळ

उमराणी येथे दिला. उमराणी विजापुरापासून पश्चिमेस ३६ मैलांवर आहे. या वेळीं मोगलांशीं हातमिळवणी करूनही शिवाजी राजांचें पारिपत्य करण्याचा विजापुरी सत्तेने निर्धार केला होता. उमराणीला बहलोलखानाला खवासखानाने पत्रद्वारें कळविलें की 'सर्जाखान व मुजाफर मलीक रांगण्याच्या आसपास आहेत; त्यांना तुमच्या मदतीस येण्याविषयी कळविलें आहे; त्याचप्रमाणे आदवानीचा सिद्दीमसूद, कर्नूलचा अबदुल अजीज व नळदुर्गाकडचा खिदरखान पन्नी व दिलेलखान यांनाही मिळवून घेण्याची खटपट करा, आणि अशा रीतीने तुम्ही सर्व एकत्र मिळून नंतर शिवाजीला युक्तीने जिंका.'

बहलोलखानाच्या योजना महाराजांच्या गुप्तचरांकडून त्यांना कळल्या. त्याबरोबर त्यांनी प्रतापराव गुजर प्रभृति आपल्या सेनानींना, 'पहिलाच जोराचा तडाखा लगावून 'मारून फत्ते करणें' म्हणून आज्ञा दिली. रातोरात या सेनानींनी गुप्तपणें चाल करीत दोन दिवसांत शत्रूंना गांठलें. महाराजांचें सैन्य उमराणीजवळ एका जलाशयासमीप येऊन पोहोचलें. रणकुशल प्रतापराव गुजरांच्या ही गोष्ट तत्काळ लक्षांत आली की, येवढा एकच जलाशय शत्रूला पाणी पिण्यासाठी आहे. त्यांनी रात्रींच्या अंधारांत शत्रूचें सारें शिबिर वेढून टाकून त्याचे बाहेर जाण्यायेण्याचे मार्ग रोखले. सिद्दी हिलालखान आघाडीवर होता. त्याच्या मागे एक कोस अंतरावर विठोजी शिंदे होता. शत्रूच्या दोन्ही बाजूंवर कृष्णाजी भास्कर व विठ्ठल पीलदेव हे होते. सभोवती विसो बल्लाळ हा घिरट्या घालीत टेहळणी करीत होता. त्या एकुलत्या एक जलाशयाचा मार्ग पूर्णपणें रोखून धरण्यांत आला होता. सारी रात्र उलटेपर्यंत बहलोलखानाला आपण कोणत्या परिस्थितींत सांपडलों आहोंत याची कल्पना आली नाही. पण सकाळीं विजापुरी सैन्याचे हत्ती पाणी पिण्यासाठी जलाशयाकडे निघाले त्या वेळीं आपण शत्रुसैन्याच्या वेढ्यांत सांपडल्याची त्यास कल्पना आली. प्रतापरावांनी या सैन्यावर एकदम जोरकस हल्ला केला.

संध्याकाळपर्यंत घनघोर युद्ध होऊन सिद्दी महंमद बर्की हा विजापुरी सेनापति ठार झाला, व विजापुरी सैन्याची दाणादाण उडाली. सभासद म्हणतो, 'विजापुराहून बहलोलखान बाराहजार स्वारांनिशी हिकडे चाल करून आला. ही खबर राजियांस कळून कुल लष्कर प्रतापराव यांजबरोबर देऊन हुकूम केला की, विजापूरचा बहलोलखान येवढा वळवळ करीत आहे त्यांस मारून फत्ते करणें. त्याने दोन रात्री मोठमोठ्या मजली मारून उमराणीस नबाबास गांठलें. (दि. १५ एप्रिल) चौतर्फा राजियाचे फौजेने कोंडून उभा केला. पाणी नाही असा जेर केला. सकाळीं युद्धास सुरवात होऊन मगळा दिवसभर युद्धहि थोर जहालें. इतक्यांत अस्तमानहि जाहला. मग निदान करून नबाव पाणियावरी जाऊन पाणी प्याला. त्याजवरी प्रतापराव सरनोबत यांस अंतःस्थ कळविलें की, आपण तुम्हावरी येत नाही. पादशहाचे हुकुमाने आलो. याउपरी आपण तुमचा आहे. हरेक वक्ती आपण राजियाचा दावा न करी. ऐसें कितिएक ममतेचें उत्तर सांगोन सला केला.'

पाण्याच्या प्रश्नाने डोळे पांढरे होण्याची वेळ आलेल्या बहलोलखानाने प्रतापरावासमोर शरणागति पत्करून पुन्हा म्हणून आपण महाराजांच्या भानगडींत पडणार नाही, व त्यांचाच पाठपुरावा करूं असें दातीं तृण धरून सांगतांच प्रतापरावाचें उदार अंतःकरण विरघळलें. त्यांना शत्रूची जात व राजनीतीची गूढता कळली नाही. त्यांनी बहलोलखानाला त्याच वेळीं पकडून महाराजांच्या स्वाधीन करणें आवश्यक होतें. पण तसें न करतां पृथ्वीराज चव्हाणाच्या आत्मघातकी औदार्याचें अनुकरण करून त्यांनी बहलोलखानाला सोडून दिलें. महाराजांना ही गोष्ट कळतांच ते अत्यंत संतप्त झाले. त्यांनी प्रतापरावांची खरडपट्टी काढली व सरळ विचारलें, 'सला काय निमित्त केला?' मानी पण स्वामिनिष्ठ प्रतापरावाच्या अंतःकरणाला ही गोष्ट लागून राहिली. यानंतर प्रतापरावांनी भागानगर, देवगड, रामगिरी इत्यादि प्रदेशांत पुष्कळ पराक्रम गाजविला, पण महाराज कांही

त्यांच्यावर प्रसन्न झाले नाहीत. कारण बहलोलखान सुटून गेल्यावर ठरल्याप्रमाणे आपल्या वचनाला न जागतां सैन्याची चांगलीच सिद्धता करून पन्हाळा प्रदेशांत धुमाकूळ घालीत होता. त्याने इ. स. १६७३ च्या जून, जुलै व ऑगस्ट महिन्यांत ठिकठिकाणीं मराठ्यांचा पराभव करून त्यांना कानडांतून हुसकून लावलें. या वेळीं एका बाजूने मोगल आणि दुसऱ्या बाजूने बहलोलखानाचें सैन्य महाराजांच्यावर आक्रमण करीत होतें. पण या दोन्ही आक्रमणांना तुच्छ लेखण्याइतकें महाराजांचें सामर्थ्य वाढलें होतें, असें इंग्रजी पत्रव्यवहारावरून दिसतें. मुंबई कौन्सिलचा अध्यक्ष जिराल्ड आंजियर आपल्या दि. १५ सप्टेंबर १६७३ च्या पत्रांत लिहितो : 'एका बाजूने बहलोलखान व दुसऱ्या बाजूने मोगलांचें सैन्य अशा पेचांत शिवाजी असल्याने तो प्रतिकार करण्यास असमर्थ आहे आणि म्हणून त्याच्याशी लपंडाव करून सौजन्याने वागण्याचें कारण नाही असें सुरतवाले म्हणतात. वस्तुस्थिति अशी नसून शिवाजी दोघांनाही तोंड देण्यास समर्थ आहे. येवढेंच नव्हे तर नुकताच त्याने आदिलशाहीतील मध्यवर्ती आणि आणि महत्त्वाचा किल्ला सातारा घेऊन तेथील अमर्याद लूट बैलांवरून रायगडास नेली. वर सांगितलेले दोघेही सरदार त्याच्या मुलखांत या वर्षीं शिरतील हें खरें असलें तरी रसदेचा तुटवडा पडून ते दीर्घकाल राहूं शकणार नाहीत. शिवाजीच्या सैन्यापासूनही त्यांना फार त्रास होईल, शिवाय शिवाजीचा पुरा नाश व्हावा हा त्यांचा उद्देश नाही. कारण हे उमराव स्वतःच्या फायद्याकरता ह्या लढाया धोरणानें बादशाही खर्चाने चालवीत असतात. नेट धरून एकदा युद्धाचा निकाल लावावा असें त्यांना कधीच वाटत नाही. अशा परिस्थितींत डचांसारख्या प्रबळ शत्रूशीं युद्ध चालू असतांना शिवाजीला चिडविल्यास आमच्यावर महासंकट ओढवेल. शिवाजी लुच्चा आहे असें सुरतकरांचें म्हणणें आहे. परंतु त्यामुळे आम्ही त्याच्याशीं वैर केलेंच पाहिजे असें ठरत नाही.

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह, क्र. १५६३)

पावसाळा संपतांच गेलेला कानडा सर करण्यासाठी महाराजांनी आपलें सैन्य तिकडे पाठविलें. पण बहलोलखानाने या सैन्याची डाळ शिजूं दिली नाही. त्यामुळे शिवाजी महाराजांना प्रतापरावाचा अतिशय राग आला व त्यांनी रागावून प्रतापरावाला असा निरोप पाठविला की, ‘ बहलोलखानाशीं गांठ घालून त्यास बुडवून फत्ते करणें. नाहीतर तोंड न दाखविणें.’ स्वामिनिष्ठ प्रतापरावाच्या अंतःकरणाला आपल्या धन्याच्या या शब्दांचा मार असह्य झाला व बहलोलखानाच्या वंचक नीतीमुळे प्रतापरावांचा त्याच्या विषयीचा क्रोधही अनावर झाला. मनाला चटका लागून प्रतापरावाने दि. १४ फेब्रुवारी १६७४ ला नेसरीजवळ दोन टेकड्यामध्ये असलेल्या खिडींत बहलोलखानाला गांठलें. सर जदुनाथ सरकार या हृदयद्रावक प्रसंगाचें वर्णन करतांना म्हणतात : ‘प्रतापराव म्हणजे शिवाजीचा पराक्रमी सेनापति; पण शिवाजीच्या ताकिदीच्या पत्राने जें शल्य त्याच्या अंतःकरणांत बोचलें होतें त्यायोगे खिडींत बहलोलखानाला पाहतांच तो संतापाने इतका वेडा होऊन गेला की, आपण सेनापति आहोंत याचेंही त्याला भान राहिलें नाही व साध्या पाइकाप्रमाणे तो अवघ्या सहा जणांसह बहलोलखानाच्या अफाट सैन्यावर तुटून पडला. प्रतापरावाच्या या कृत्याने मराठी सेना तर विस्मयाने मूढ होऊन गेली. आणि हें काय होत आहे व आपण काय करावें हेंच तिला कळेना. इकडे प्रतापरावासह सहासात जणांची तर अफाट विजापुरी फौजेने केव्हाच चटणी उडवून दिली. मुख्य सेनापतीच पडल्यावर मराठी फौजेची दुर्दशा मग बघावयास नको. तिचीही धूळधाण होऊन गेली,’ —(शिवाजी व शिवकाल, पृष्ठ १४९, १५०)

प्रतापराव गुजरांच्या या हळव्या हौतात्म्याची वार्ता कानावर पडतांच महाराजांना अत्यंत दुःख झालें. त्यांनी प्रतापरावांच्या कुटुंबीयांना सांत्वना देऊन जवळ केलें. पुढे सहा वर्षांनी प्रतापरावांची मुलगी त्यांनी राजारामाला करून घेतली.

प्रतापराव रणांगणांत पडल्यावर त्यांचा दुय्यम सेनापति

आनंदराव याने सैन्य कसें बसें परत फिरविलें. महाराजांनी त्यालाच तात्पुरते सेनापतित्वाचे अधिकार देऊन बहलोलखानाचा रणमद उतरविण्याची आज्ञा केली. आनंदरावाने बहलोलखानाचा पाठलाग आरंभिला, तो पाठीमागून दिलेरखान आपला पाठलाग करीत आहे असें त्याला आढळून आलें. दिलेरखान व बहलोलखान हे दोघेही अफगाण असल्यामुळे त्यांचें विशेष सख्य होतें. या दोन कसलेल्या सेनानींशीं एकदम धडक देणें कठीण होईल हें ओळखून आनंदराव झपाट्याने कानड्याकडे निघून गेला. मोगल सेनानी दिलेरखान व आदिलशाही सेनापति बहलोलखान यांनी पाठलाग करण्याचा खूप प्रयत्न केला; पण प्रतिदिनीं ४५ मैल दौड मारणाऱ्या आनंदरावांच्या व त्यांच्या चपल सैन्याच्या बरोबर धाव घेण्यास मिजासी मुसलमानी सैन्य अर्थातच असमर्थ ठरलें. शेवटी बहलोलखान कोल्हापुराकडे निघून गेला.दिलेरखान मात्र पांच दिवस पन्हाळ्या-भोंवती घिरट्या घालीत होता. शेवटीं पन्हाळ्याला वेढा घालणें अशक्य आहे हें पाहून तो आपल्या तळावर निघून गेला.

आनंदरावांच्या मनांत बहलोलखानाच्या पारिपत्याचा विचार घोळत होताच. २३ मार्चला कानडी प्रदेशांत प्रवेश करून आनंदरावांनी बहलोलखानाच्या जहागिरीच्या काळजालाच हात घातला. त्या जहागिरींतील संपगांवची पेठ लुटून आनंदरावाने दीडलक्ष होनांची लूट मिळविली. ही लूट ३ सहस्र बैलांवर लादून ते परत येत असतां बहलोलखानाला ही वार्ता कळून तो अगदी पिसाळून गेला. त्याने दोन सहस्र अश्वस्वार, कांही पायदळ सैन्य व खिजरखान या नांवाचा एक सेनानी बरोबर घेऊन बंकापुराजवळ आनंदरावाला गाठलें. या पठाणाला पाहतांच प्रतापरावाच्या मृत्यूची आठवण होऊन आनंदरावांच्या नेतृत्वाखाली मराठी सेना बहलोलखानावर अक्षरशः तुटून पडली. पहिल्याच धडाक्यांत खिजरखानाचा भाऊ ठार झाला. मराठी तरवारींना भरपूर रक्तप्राशन करायला मिळालें. बहलोलच्या सैन्याचा पूर्ण मोड होऊन आनंदरावांना या लढाईंत पांचशे घोडे, दोन हत्ती व इतरही

पुष्कळ लूट मिळाली. विजयी आनंदराव स्वराज्यांत परत येतांच महाराजांनी त्याची पाठ थोपटली. त्याला तरी आणखी काय हवें होतें ?

स्थलयुद्धांतील या विजयामागोमाग जलयुद्धांतील विजयाची वार्ता महाराजांच्याकडे येऊन थडकली. महाराजांचा दर्यासारंग दौलतखान याने सातवळीचे खाडींत जंजिऱ्याच्या सिद्दीचा पराभव करून त्याचे शंभर साहाय्यक 'समुद्रास्तृप्यन्तु' केले. स्वत: सिद्दी संबल या युद्धांत घायाळ होऊन पळून गेला.

मार्च महिन्यांतील या दोन विजयांनंतर महाराजांनी ८ एप्रिल १६७४ ला आपल्या सैन्याची पाहणी करून प्रतापरावांच्या जागीं नव्या सेनापतीची नियुक्ति केली. या वेळीं मराठी सैन्याची छावणी चिपळूण येथे होती. महाराज स्वत: येवढ्यासाठी चिपळूणला गेले होते. त्यांच्या नव्या सेनानीचें नांव संभाजी अथवा हंसाजी मोहिते. त्याला हंबीरराव अशी पदवी देण्यांत आली. सभासद म्हणतो : 'लष्करची पाहणी करून लहान थोर लष्करास व पायदळ लोकांस खजीना फोडून वाटणी केली, आणि सरनौबतीस माणूस पाहतां हंसाजी मोहिते म्हणून पागेमध्ये जुमला होता. बरा शहाना, मर्दाना सबुरीचा, चौकस शिपाई, मोठा धारकरी पाहून त्यास 'हंबीरराव' किताबती देऊन सरनौबती सांगितली.' सरनौबत म्हणजे मुख्य सेनापति.

चिपळूणला महाराजांचा एक महिना निवास होता. या अवधींत त्यांनी विजापूरकरांचा केळंजा नांवाचा महत्त्वपूर्ण गड दि. २४ एप्रिलला जिंकून स्वराज्यांत समाविष्ट करून घेतला. या गडावर गंगाजी विश्वासराव कृदत्त या नांवाचा एक गडकरी होता. तो युद्धांत ठार झाला. केळंजा हा वाईजवळचा गड असल्यामुळे तेथून वाईला शह बसू शकत होता.

याप्रमाणे विजापूरच्या प्रदेशाला शिवराय विमुक्त करीत असतांनाच त्यांना आपल्या तेजस्वी भवानीचें टोंक मोगलांकडे वळविणें भाग पडलें. मोगलांच्या सैन्याने दिलेरखानाच्या नेतृत्वाखाली

शिवाजी महाराज विजापूरकरांशीं युद्धांत गुंतले आहेत असें पाहून इ. स. १६७४ च्या जानेवारीच्या उत्तरार्धांत कोकणांत उतरून तो प्रदेश भुईसपाट करण्याचें ठरविलें. शिवाजी महाराजांनी, दिलेर-खानाचें हें धोरण ध्यानांत येतांच, त्याचे कोकणांत जाण्याचे सर्व मार्ग, मोठमोठीं टेकाडें पाडून रोधून टाकले व जे आधीच अवघड मार्ग होते तेथे जागत्या सैनिकी चौक्या बसविल्या. तरीही दिलेर-खानाने कोकणांत उतरण्याचा प्रयत्न केलाच. पण त्याचें फळ एक सहस्र करोल पठाण सैनिकांचा जीव जाण्यांत होऊन त्याला अपयश घेऊन परत फिरावें लागलें. यानंतर महाराजांसमोर मोगली सेनेने या वर्षांत तरी डोकें वर काढलें नाही. पुढे लवकरच खैबर घाटां-तील अफगाण लोकांच्या उठावणीने भीषण स्वरूप धारण केल्या-मुळे, तेथील युद्ध स्वतःच्या देखरेखीखाली चालविण्यासाठी स्वतः बादशहा औरंगजेब दि. ७ एप्रिल १६७४ ला दिल्लीहून हसन अबदल येथे जाण्यास निघाला व दिलेरखानाला त्याने उत्तरेकडे बोलावून घेतलें. त्यामुळे दक्षिणेंत एकटा बहादूरखानच राहिला. या 'पेंडीच्या गुरूचें' महाराजांना कधीच कांही महत्त्व वाटत नव्हतें. त्यामुळे दक्षिणेंत मोगली सत्ता केवळ नाममात्र राहिली.

याप्रमाणे औरंजेबाने इ. स. १६७० मध्ये स्वतः होऊन संधिभंग केल्यानंतरच्या महाराजांच्या जययात्रेचा रोमांचकारी व स्फूर्ति-शाली इतिहास आहे. या चार वर्षांच्या कालखंडाला अनभिषिक्त भूपतीच्या विजयाचा कालखंड असें म्हणतां येईल. याच वर्षी शिव-रायांना, समंत्रक व विधिपूर्वक राज्याभिषेक होऊन शतावधि वर्षां-पूर्वी यावनी घणाघाताने भग्न झालेलें हिंदु सिंहासन पुनश्च सांधलें गेलें. या मंगलमय प्रसंगाकडे वळण्यापूर्वी ज्याचे अभिषिक्त राजे म्हणून शिवाजी महाराजांना राज्याभिषेक झाला त्या स्वराज्याच्या प्रदेशाची मर्यादा किती होती हें पाहणें उद्बोधक ठरेल.

सर जदुनाथ सरकार स्वराज्याच्या मर्यादेचें चित्र रेखाटतांना म्हणतात : 'अगदीं आरंभीं म्हणजे सन १६४७ मध्ये शहाजीची जी कांही थोडीशी जहागीर पुणें व पुण्याच्या पश्चिम बाजूला

होती तीच पुढच्या स्वराज्याचा पाया होय. पुढे सहा महिन्यांत विजापूरकरांचा पुण्याच्या दक्षिणेकडील कांही प्रांत शिवाजीने घेऊन आपली जहागीर वाढविली. त्यामुळे उत्तरेस घोडनदीपर्यंत हें चिमुकलें स्वराज्य जाऊन पोहोचलें. अर्थातच या बाजूचा मोगलांचा प्रदेश स्वराज्यांत नव्हता. जुन्नर, विसापूर, पारनेर या शिवाय वेडयावाकडया रेषेंत येणारा प्रांत स्वराज्यांत समाविष्ट झाला होता. जुन्नर व चांभारगोंदें मोगलाकडेच होतें. आणि चाकण मात्र स्वराज्यांत समाविष्ट झालें होतें. इंदापूर, बारामती आणि राजगड, तोरणा व बहुश: कोंडाणासुद्धा इतकी स्वराज्याची दक्षिण मर्यादा होती. पुढील दहाच वर्षात म्हणजे इ. स. १६५९ पर्यंत हें राज्य कितीतरी पटीने वाढलें. उत्तरेकडे डोंगर ओलांडून हें स्वराज्य देशावर पोहोचलें, आणि दक्षिणेस सातारा जिल्हा आणि कोकणांत माहुलीपासून महाडपर्यंत असें हें शिवाजीचें स्वराज्य विस्तीर्ण दिसूं लागलें. मात्र यांत बंदर व पश्चिम किनाऱ्याचा प्रदेश यांचा समावेश अजून व्हावयाचा होता. पश्चिम किनारा, बंदरें व प्रदेश ही विजापूरकर, सिद्दी आणि पोर्तुगीज यांच्या अधीन होतीं. ठाण्याच्या अगदी उत्तरेकडील व महाडच्या दक्षिणेकडील प्रदेशही अजून जिकावयाचा होता.

इ. स. १६५९ च्या नोव्हेंबरपासून सन १६६० च्या फेब्रुवारीपर्यंत जो प्रदेश त्यांनी जिकला त्यापैकी केवळ दक्षिण कोंकण त्यांच्याकडे राहिलें. बाकीचा प्रदेश लवकरच त्यांच्याकडून गेला. दक्षिण कोकणांत राजापूर व वेंगुर्ला या दोन बंदरांशिवाय रत्नागिरी तालुक्यांतील पश्चिम किनाऱ्यावरचीं सगळीं बंदरें त्यांच्या अधीन झालीं. व राजापूर व वेंगुर्ला हीं बंदरें इ. स. १६६३ मध्ये शिवाजीने घेतलीं. पुढे वाडीच्या सावंतांशीं त्यांचा संघर्ष होऊन त्यांचा बराच प्रांत शिवाजीने स्वराज्यांत समाविष्ट केला व दक्षिण कोकणाचें एकमात्र आधिपत्य त्यांच्याकडे आलें. कुलाब्याच्या पश्चिमेकडील किनाराही सिद्दीपासून त्यांनी हस्तगत केला.

इ. स. १६६५ मध्ये जयसिंगाशीं केलेल्या पुरंदरच्या संधीने महाराजांचा जो प्रदेश मोगलांच्या अधीन झाला होता तो इ. स. १६७० च्या संधिभंगानंतर लवकरच त्यांनी जिंकून घेतला. इ. स. १६६४ पासूनच महाराजांच्या स्वाऱ्या कारवार, हुबळी, बेदनूर-पर्यंत होऊं लागल्या होत्या. राज्याभिषेकाच्या वेळीं हा विभाग स्वराज्यांत पूर्णपणें समाविष्ट झालेला नसला तरी पुढे एक वर्षाच्या आंतच तो स्वराज्यांत आला.

इ. स. १६७१–७२ मध्ये बागलाण, जव्हार, रामनगर हे प्रदेश स्वराज्यांत आले. इ. स. १६७३ मध्ये पन्हाळा व कोल्हापूर हेही स्वराज्यांत समाविष्ट झाले. इ.स. १६७५ मध्ये फोंडाही स्वराज्यांत समाविष्ट होऊन हा राज्यविस्तार वरघाटी कर्नाटकांत जाऊन पोहोंचला होता.

या स्वराज्याची अंतर्गत व्यवस्था उत्कृष्ट असून सेना व प्रजा या दोघांच्याही कल्याणाकडे महाराजांचें अत्यंत सूक्ष्म लक्ष असे. चिपळूणहून सैन्याची पाहणी करून शिवाजी महाराज रायगडला परत आल्यावर त्यांनी आपल्या सेनाधिकाऱ्यांना लिहिलेलें पत्र या दृष्टीने अत्यंत उद्‌बोधक आहे. तें पत्र असें :—

'मशरुल अनाम राजश्री जुमलेदारानी व हवालदारानी व कारकुनानी दिमत पायगो मुक्काम मौजे हलवर्ण ता।। चिपळूण मामले दाभोळ प्रति राजश्री शिवाजी राजे सु।। अर्बास बैन व अलफ. कसबे चिपळुणी साहेबी लष्कराची विले केली आणि या उपरि-घाटावरी कटक जावें ऐसा मान नाही. म्हणून एव्हां छावणीस रवाना केलें. ऐसीयास, चिपळुणी कटकाचा मुक्काम होता या-करितां दाभोळच्या सुबे यांत पावसाळचा कारणें पागेस जागा व दाणा व वरकड केला होता तो कितेक खर्च होऊन गेला. व चिपळुणा आसपास विलातीत लष्कराची तसवीस व गवताची व वरकड हरएक बाब लागली. त्याकरितां हाल कांहीं उरला नाही. ऐसें असतां वैशाखाचे वीस दिवस, उनाळा, हेही पागेस अधिक बैठी पडली. परंतु जरूर जालें त्याकरितां कारकुनाकडून व गडोगडी गल्ला

असेल तो देववून जैसी तैसी पागेची बेगमी केली आहे. त्यास, तुम्ही मनास ऐसा दाणा, रतीब, गवत मागाल, असेल तोंवरी धुंदी करून चाराल, नाहीसें जालें म्हणजे मग कांहीं पडत्या पावसांत मिळणार नाही. उपास पडतील, घोडीं मरायास लागतील. म्हणजे घोडीं तुम्हीच मारिली ऐसें होईल. व विलातीस तसवीस देऊं लागाल. ऐशास, लोक जातील, कोण्ही कुणब्याचे येथील दाणे आणील, कोण्ही भाकर, कोण्ही गवत, कोण्ही फाटें, कोण्ही भाजी, कोण्ही पाले. ऐसें करूं लागलेंत म्हणजे जी कुणबी घर करून जीव मात्र घेऊन राहिले आहेत तेही जाऊं लागतील. कितेक उपाशी मरायला लागतील. म्हणजे त्याला ऐसें होईल की मोगल मुलकांत आलेल्याहूनहि अधिक तुम्ही! ऐसा तळतळाट होईल! तेव्हां रयतीची व घोडियांची सारी बदनामी तुम्हावरी येईल. हें तुम्ही बरें जाणून, सिपाही हो अगर पावखलक हो, बहुत यादी धरून वर्तणूक करणें. कोण्ही पागेस अगर मुलकांत गांवोगाव राहिले असाल त्याणीं रयतेस काडीचा आजार द्यावया गरज नाही. आपल्या राहिला जागांहून बाहीर पाय घालाया गरज नाहीं. साहेबी खजानांतून वाटणिया पदरी घातलिया आहेती. ज्याला जें पाहिजे, दाणा हो अगर गुरे ढोरे वागवीत असाल त्यांस गवत हो, अगर फाटें भाजीपाले, व वरकड विकावया येईल, ते रास घ्यावें, बाजारास जावें, रास विकत आणावें, कोण्हावरी जुलुम अगर ज्याजती अगर कोण्हासी कलागती करावयाची गरज नाही. व पागेस सामा केला आहे तो पावसाळा पुरला पाहिजे. ऐसे तजविजीने दाणा रतीब कारकून देत जातील तेणें प्रमाणेंच घेत जाणें, कीं उपास न पडतां रोज बरोज खायाला सांपडे आणि होत होत घोडीं तवाना होत ऐसें करणें. नसतीच कारकुनासी धसपस कराया अगर अमकेच द्या तमकेच द्या ऐसें म्हणाया, धुंदी करून खासदार कोठींत, कोटारांत शिरून लुटाया गरज नाही. व हालीं उनाळचाला आहे तइसें खलक पागेचे आहेत, खण धरून राहिले असतील व राहतील, कोण्ही आगटचा करितील, कोण्ही भलतेच जागा चुली, रंधनाळा करितील

कोण्ही तंबाकूला आगी घेतील, गवत पडिलें आहे ऐसें अगर वारें लागलें आहे ऐसें मनास नाना आणितां म्हणजे अविस्त्राच एखादा दगा होईल. एका खणास आगी लागली म्हणजे सारे खण जळोन जातील. गवताच्या लहळयांस कोणीकडून तरी विस्तो जाऊन पडला म्हणजे सारें गवत व लहळचा आहेत तितक्या एकेएक जाळों जातील. तेव्हां मग कांही कुणबियांच्या गर्दना मारल्या अगर कारकुनांस ताकीद करावी तैसीं केलीत तऱ्ही कांहीं रवण कराया एक लाकूड मिळणार नाही, एक रवण होणार नाही. हें तो अवघियाला कळतें. या कारणें, बरी ताकीद करून, खासे खासे असाल ते हमेषा फिरत जाऊन रंधनें करिता, आगट्या जाळिता, अगर रात्रीस दिवा घरांत असेल, अविस्त्राच उंदीरवात नेईल, ते गोष्टी न हो. आगीचा दगा न हो, रवण, गवत वांचेल ते करणें. म्हणजे पावसाळा घोडी वाचली. नाहीतर मग, घोडी बांधावी नलगेत, खावयास घालावें नलगे, पागाच बुडाली! ! ! तुम्ही निसूर जालेत! ! ! ऐसें होईल. या कारणें तपशिलें तुम्हांस लिहिलें असे. जितके खासे खासे जुमलेदार, हवालदार, कारकून आहा तितके हा रोखा तपशिलें ऐकणें, आण हुशार राहाणें. वरचेवरी रोजाचा रोज खबर घेऊन ताकीद करून येणें प्रमाणे वर्तणूक करितां ज्यापासून अंतर पडेल ज्याचा गुन्हा होईल, बदनामी ज्यावर येईल, त्यास—मराठ्याची तो इज्जत वाचणार नाही, मग रोजगार कैसा?—खळक समजों जास्ती केल्या वेगळ सोडणार नाहीं. हें बरें म्हणून वर्तणूक करणें.'

—(छ. १२ सफर ११ राजवाडे खंड, ८–२८)

वैनतेयाच्या सूक्ष्मग्राही व व्यापक दृष्टीने साऱ्या स्वराज्याला प्रजावत्सल महाराजांनी आदर्श राज्याचें स्वरूप द्यावयाचा कसा आटोकाट प्रयत्न चालविला होता, त्यांची विचारशक्ति किती सूक्ष्म व दूरचा विवेक करणारी होती व सेनेंतील आणि व्यवस्थाविभागांतील प्रत्येक गोष्टीवर त्यांचें किती सूक्ष्म लक्ष असे या सर्व गोष्टींची यथार्थ कल्पना प्रस्तुत पत्राने येते. ज्या सैन्याला इतक्या सूक्ष्मतम गोष्टींतही जातीने लक्ष घालणारा अधिपति लाभला तें

सैन्य, असामर्थ्यशील बनविणाऱ्या सर्वप्रकारच्या दुर्गुणांपासून अलिप्त व जयशाली बनविणाऱ्या सर्व प्रकारच्या सद्‌गुणांनी युक्त ठरावें हें स्वाभाविकच होय. ज्या प्रजेला इतका वत्सल अधिपति लाभला ती प्रजा आपल्या राजाकडे पिता, देवाचा अवतार या भावनांनी पाहणें हेंही स्वाभाविकच होय. मोगलांशीं व इतर शत्रूंशीं चालू असणाऱ्या या संघर्षाच्या काळांतही स्वराज्याची अंतर्गत व्यवस्था उत्कृष्ट राखण्यासाठी व स्वराज्यांचें प्रत्येक अंग दृढतम बनविण्यासाठी हा 'जाणता राजा' किती तत्पर असे याची साक्ष द्यावयास हें पत्र पुरेसें आहे.

या जय यात्रेच्या कालखंडांत महाराजांनी दुर्ग हे राज्यांग, आपल्या यशस्वितेचें अमोघ साधन म्हणून सुदृढ बनविलें. या वेळीं त्यांनी गडावर सुधारणा व नव्या संरक्षक व्यवस्थांच्यासाठी एक-लक्ष पंचाहत्तर सहस्र होन व्यय केला. पुढील राजपत्रक या व्ययाच्या तपशिलाची कल्पना देतें.

प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ।।

जाबितातह इमारती करणें. सन इसन्ने कारणें इमारती करावयाचा तह केला असे कीं गबाळ हुन्नरवंद लावून पैका पावत नाही, हुन्नरवंद गवगवा करितां काम करीत नाहीत, याबद्दल तह केला की नेमस्तच इमारती करावी.

होन, १,७५००० म।। एक लाख पंचाहत्तरी हजार होन रास

५०००० रायगड. त्याचा तपशील

| | | | |
|---|---|---|---|
| ३५००० | दि।। घरें. | १०००० | सिंहगड |
| २०००० | तळी २ | १०००० | सिंधुदुर्ग |
| १०००० | गच्ची. | १०००० | विजयदुर्ग |
| ५००० | किल्ले. | १०००० | सुवर्णदुर्ग |
| | | १०००० | प्रतापगड |
| ३५००० | | १०००० | पुरंधर |
| १५००० | तट | १०००० | राजगड |
| | | ५००० | प्रचंडगड |
| ५०००० | | ५००० | प्रसिद्धगड |

| | | | |
|---|---|---|---|
| ५००० | विशाळगड | ३००० | कोरीगड |
| ५००० | महीपतगड | २००० | सारसगड |
| ५००० | सुधागड | २००० | महीधरगड |
| ५००० | लोहगड | १००० | मनोहरगड |
| ५००० | सबळगड | ७००० | किरकोळ |
| ५००० श्रीवर्धनगड व मनरंजन | | | |
| | | १,७५,००० | |

येणे प्रमाणे एक लाख पंचाहत्तरी हजार होन खर्च करणें. मोर्तब-सूद (मर्यादेयं विराजते) —(राजवाडे खंड ८–२२)

योद्धा म्हणून महाराजांची कीर्ति या वेळीं दिगंत पसरलेली असून पाऊण लाख अश्वदळांचें खडें सैन्य त्यांच्याजवळ असल्याचा सभासद उल्लेख करतो. अमात्यांच्या आज्ञापत्रांत 'चाळीस हजार पागा, साठ सत्तर हजार शिलेदार, दोन लक्ष पदाति' हें सेनाबळ व त्याचा आधार असलेलें 'कोटयवधि खजिना, तसेंच उत्तम जवाहीर' हें अर्थबळ महाराजांनी संपादन केल्याचा उल्लेख आहे. केवळ गनिमी काव्याच्या पद्धतीनेच नव्हे तर उघड स्थळयुद्धांत मोगल साम्राज्याच्या सेनानींचा रेंच उतरविण्याइतकें महाराजांचें सैनिकी सामर्थ्य झालेलें होतें.

आरमाराचें नवीन सेनांग महाराजांनी निर्माण केल्याचा उल्लेख मागे केलाच आहे. सभासद म्हणतो : 'त्यास राजियांनीं जहाजें पाणियांतील सजिविली. गुलाबा व तरांडी व तारवें, गलबतें, शिबाडें पगार आदि नाना जातींचीं जहाजें करून दर्यासागर म्हणोन मुसल-मान सुभेदार व माय नाईक म्हणोन भंडारी असे दोघे सुभेदार करून, दोनशे जहाजें एक सुभा, असें आरमार सजलें. त्यास व शिद्दीचे जहाजांस युद्ध होऊन शिद्दीचीं जहाजें पाडाव केलीं. युद्ध बहुत जाहलें. दर्यांत तरांडे फिरेना असें जालें. त्यावर हमेषा युद्ध करीत चालले. मग चोरून मारून हबशी सामान नेत होता. राजियाचीं जहाजें जागां जागां बंदरें शहरें, मोंगलाई व फिरंगी व वलंदेज, इंग्रज, किलाताव ऐसा सत्तावीस पादशाहा पाणियांत आहेत

त्यांचीं शहरें बेदनूर, सौदें, श्रीरंगपट्टण ऐसी दर्या किनारे नाना शहरें मारून पोट भरीत चाललें. जागां जागां युद्ध करीत मालमत्ता मेळवून आपलें पोट भरून राजियास रसद द्रव्यें जिन्नस आणून देऊं लागले. ये रीतीने सातशें जहाजें पाण्यांतील झाली. समुद्रामध्ये एक लष्कर झालें.'

नुकताच सिद्दीसंबूलचा पराजय करून व टोपीकरांना धाक पोहोचवून महाराजांच्या आरमारी सामर्थ्याचा वचक दर्यासारंगाने शत्रूंच्या प्रत्ययास आणून दिल्याचा उल्लेख केलाच आहे.

या अनभिषिक्त भूपतीच्या या वैभवशाली जययात्रेने भारतांतील सारे हिंदूनेत्र नव्या आशा आकांक्षांच्या पूर्तीच्या प्रत्ययाने पल्लवित झाले. इतके दिवस दुर्गतींत काढलेल्या धर्माला आता चांगले दिवस येतील म्हणून साधुसंतांचे नेत्र महाराजांच्याकडे आकृष्ट झाले होते. त्यांच्या आश्चर्यकारक पराक्रमामुळे स्वाभिमानी धर्मनिष्ठ व राष्ट्रभक्त कवींच्या प्रतिभा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाभोवती आपले विलास केंद्रित करूं इच्छीत होत्या. तंजावरहून महाराजांच्या यशोदुंदुभीचा नाद श्रवण करून जयराम कवीसारखा प्रतिभासंपन्न पुरुष महाराष्ट्रांत आला, व महाराजांच्यावर त्याने विविध भाषांतून महाकाव्य लिहावयास प्रारंभ केला. त्यांच्या अजेय सामर्थ्यसंपन्नतेचें वर्णन करतांना एक कवि म्हणतो,

सरित्पतीचें जल मोजवेना ।
मध्यान्हिचा भास्कर पाहवेना ।
मुठींत वैश्वानर बांधवेना ।
तैसा शिवाजी नृप जिंकवेना ।।

चकत्यांच्या सिंहासनाला आपल्या खड्गाच्या टोकाने कंपायमान करणाऱ्या या पुरुषाकडे उत्तरभारतातील महाकवि भूषण त्यांच्या आग्र्याच्या सुटकेनंतर आकृष्ट झाले. हेतुतः महाराजांच्या दर्शनासाठी ते महाराष्ट्रांत आले, व महाराजांच्या विभूतिमत्त्वाने ते इतके भारावले की शिवराज भूषणासारख्या अमर ग्रंथाची त्यांनी निर्मिति केली. महाराजांचा प्रौढप्रताप व त्यांचें निष्कलंक चारित्र्य

यांचा या महाकवीवर किती विलक्षण प्रभाव पडला होता याची कल्पना येण्यासाठी भूषणांची दोन कबित्ते येथे देतों. ते म्हणतातः—

'चंदन मैं नाग, मद भरयो इंद्र नाग, बिष भरो सेसनाग कहै उपमा अबस को? भोर ठहरात न कपूर बहरात, मेघ सरद उड़ात बात लागे दिसि दस को ।। शंभु नीलग्रीव भौंर पुंडरीक ही बसत, सरजा सिवाजी सन भूषण सरस को? छीरधि मैं एक पंक, कलानिधि मैं कलंक, याने रूप एक टंक ए लहैं न तव जस को'।। ४८

'इंद्र जिमि जंभ पर बाड़व सुअंभ पर रावन सदंभ पर रघुकुल राज है । पौन बारिबाह पर संभु रतिनाह पर ज्यों सहसबाह पर राम द्विजराज है । दावा द्रुम दंड पर चीता मृगझुंड पर भूषन बितुंड पर जैसे मृगराज है । तेज तम अंस पर कान्ह जिमि कंस पर त्यों मलिच्छ बंस पर सेर सिवराज है ।। ५६

—(भूषण ग्रंथावलि, पृष्ठ १५ व १७)

'चंदनांत नाग आहे, इंद्राच्या गजेंद्रांत मदाचा दोष आहे, शेष विष भरलेला आहे. शरद्ऋतूसमोर मेघांचें चालत नाही. भगवान् शंकर शुभ्र वर्णाचे असले तरी त्यांचा गळा निळा (कृष्ण वर्ण) आहे. कमल भोवऱ्यांत राहतें, क्षीर समुद्रांतही चिखल आहे, चंद्र मोठा कलानिधि असला तरी तो कलंकी आहे. हे राजा शिवाजी, तुझ्या निष्कलंक यशाप्रमाणे निर्दोष असें कांही आहे काय?

जंभासुराला ज्याप्रमाणे इंद्र, समुद्राला ज्या प्रमाणे वाडवाग्नि गर्विष्ठ रावणाला ज्याप्रमाणे रघुकुलराज रामचंद्र, मेघाला जसें वादळ, मदनाला जसे शंकर, सहस्रार्जुनाला ज्याप्रमाणे परशुराम, झाडांना ज्याप्रमाणे दावाग्नि, हरिणांना ज्याप्रमाणे चित्ता, अंधाराला ज्याप्रमाणे प्रकाश, कंसाला ज्याप्रमाणे श्रीकृष्ण त्याचप्रमाणे म्लेंच्छांना नरव्याघ्र शिवाजी आहे. जर उत्तर भारतीय भूषणाची ही अवस्था तर ज्यांनी शिवरायांना मंत्रोपदेश करून

धर्मराज्याच्या प्रतिष्ठापनेची प्रेरणा दिली, अफझलवधाच्या समयीं प्रत्यक्ष सूचना दिल्या, ज्यांच्या भिक्षेच्या झोळींत शिवरायाने सारें स्वराज्य टाकलें, आग्न्याला जातांना ज्यांनी आशीर्वाद दिला व सुरक्षित परत येण्यांत ज्यांनी प्रत्यक्ष साह्य केलें, त्या श्रीसमर्थ रामदासांचें अंत:करण आपल्या या समर्थ शिष्याच्या या महान् जयगर्जितांनी केवढें उचंबळून आलें असेल? हिंदुराष्ट्राच्या या अन-भिषिक्त भूपतीचें व्यक्तिचित्र रेखाटतांना श्रीसमर्थ म्हणतात :—

'नरपति हयपति गजपति । गडपति, भूपति,
जळ पति । पुरंदर आणि शक्ति । पृष्ठभागी ।।
यशवंत कीर्तिवंत । सामर्थ्यवंत, वरदवंत ।
पुण्यवंत नीतिवंत । जाणता राजा ।।
आचारशीळ, विचारशीळ । दानशीळ धर्मशीळ
सर्वज्ञपणे सुशीळ । सकळां ठायी ।।
धीर उदार गंभीर । शूर क्रियेसी तत्पर
सावधपणे नृपवर । तुच्छ केले ।।

तात्पर्य, हिंदवी स्वराज्य सिद्ध झालें होतें. पण त्या स्वराज्याला वैध स्वरूप नव्हतें. त्याचीं सप्तांगें परिपूर्ण व समृद्ध असलीं तरी अभिषिक्त राजाशिवाय त्याला घटनात्मक स्थैर्य नव्हतें. म्हणून महाराजांनी याच वर्षी ज्येष्ठ शुक्ल त्रयोदशीला स्वत:ला राज्या-भिषेक करून घेतला. त्यांत व्यक्तिगत महत्त्वाकांक्षा होती काय?



## प्रकरण बारावें

# राज्याभिषेकाची आवश्यकता

पुण्यश्लोक श्री शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकामागे त्यांच्या वैयक्तिक महत्त्वाकांक्षेच्या परिपूर्तीचा हेतु असण्याची शक्यताच नव्हती हें त्यांच्या ध्येयवादी जीवनाचें जें आतापर्यंत पर्यालोचन केलें आहे त्यावरून सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. हिंदूंच्या स्वतंत्र धर्मराज्याच्या उभारणीचें जें ध्येय त्यांनी साकार करीत आणलें होतें त्याला तत्कालीन परिस्थितींत राज्याभिषेकावांचून दुसऱ्या कोणत्याही मार्गानें घटनात्मक स्थैर्य व प्रतिष्ठापद लाभणें शक्य नव्हतें. म्हणून ते या निर्णयावर आले. राज्याभिषेकाच्या आवश्यकतेची पुढीलप्रमाणे कारणमीमांसा करतां येईल.

(१) वस्तुतः श्रीशिवाजीमहाराजांचें हिंदवी स्वराज्याचें अभिलषित इ. स. १६७४ या वर्षी बहुतेक पूर्ण झालेलें होतें. त्यांच्या अचाट पराक्रमाचा धाक साऱ्या यवन व अन्य सत्तांना वाटूं लागला होता. अनेक दृढमूल सत्ताधारी त्यांच्या पायाशीं करभार समर्पून त्यांच्या कृपेची याचना करीत होते. अगणित संपत्ति, अनेक नवे प्रदेश, उत्कृष्ट सेना, उत्कृष्ट सिंधुसैन्य, उत्कृष्ट दुर्ग नि जलदुर्ग यांचे ते स्वामी होते. सहस्रावधि लोकांचें जीवित व कल्याण त्यांच्या अधीन होतें. आपल्या प्रदेशांतील लोकांचें ते श्रद्धाकेंद्र व साऱ्या भारतांतील लोकांचें ते महान् आशास्थान बनून राहिले होते, आणि असें असलें तरी यथाशास्त्र व यथाविधि राजा ही पदवी त्यांना प्राप्त झालेली नसल्यामुळे राजकीय संबंधांत इतर सत्ता व बादशहा यांच्याशीं वागतांना त्यांना प्रत्यक्ष व्यवहारांत मोठीच अडचण उत्पन्न होत असे. औरंगजेब त्यांना एक लहानसा भूस्वामी समजत असे. विजापूरचा आदिलशहा दिवसेंदिवस महाराजांहून कितीही क्षीणबल होत असला तरी आपल्या पदरच्या सरदाराचा एक बंडखोर व डोईजड झालेला पुत्र याहून दुसऱ्या

कोणत्याही दृष्टीने महाराजांकडे पाहत नसे. गोवळकोंड्याच्या कुतुबशहाचीहि दृष्टि याहून वेगळी असण्याचें कारण नव्हतें. महाराजांच्या राजेपणाला 'दंडेली' शिवाय अन्य वैध स्वरूप या क्षणापर्यंत नसल्यामुळे इंग्रज, डच, फ्रेंच, पोर्तुगीज हे परकीय लोकही आपल्या पत्रव्यवहारांतून महाराजांचा निर्देश 'लुटारू' 'बंडखोर' 'दरवडेखोर' या शब्दांनीच करीत असत. त्यांच्याकडे पाहण्याची ही यावनी सत्ताधाऱ्यांची व परकीय लोकांची दृष्टि बदलण्याचा त्यांनी या लोकांच्या डोळ्यांदेखत स्वतःला संस्कारपूर्वक, यथाशास्त्र व विधियुक्त राज्याभिषेक करवून घेणें हाच एकमात्र मार्ग होता. या अभिषेकानंतर स्वतंत्र सार्वभौम सत्ताधारी या नात्याचें त्यांचें अस्तित्व सर्वांना मान्य करणेंच भाग होतें व इतर बादशहांशीं ते स्वतंत्र हिंदवी स्वराज्याचे प्रतिनिधि म्हणून वैध रीतीने राजकीय व्यवहार करूं शकत होते.

(२) महाराजांचें स्वतंत्र राजेपण त्यांच्या कर्तृत्वाने कितीही सिद्ध झालें तरी जोंपर्यंत ते यथाशास्त्र राजा ही पदवी संस्कारपूर्वक ग्रहण करीत नव्हते तोंपर्यंत प्रत्यक्ष आपल्या प्रजेकडूनही त्यांना राजनिष्ठेची अपेक्षा करतां येत नव्हती व त्या अपेक्षेवांचून जगांतल्या कोणत्याही राज्याला स्थिरपदता प्राप्त झाली आहे काय ?

(३) राजपद हें त्या काळीं तरी लोकांच्या श्रद्धेचा विषय होता. हें पद वंशपरंपरा चालणारें असल्याने व सामान्यतः राजवट बदलली तरी नवी येणारी राजवटहि पुष्कळ व्यावहारिक गोष्टींत मागच्या राजवटीचाच क्रम चालविण्याचा संकेत पाळीत असल्याने राजाने दिलेल्या देणग्या, सनदा, वतनें व संधिपत्रें यांना पुष्कळसें टिकाऊ स्वरूप असतें. महाराज यथाशास्त्र राजे नसल्यामुळे त्यांना कोणालाही कायम टिकणाऱ्या देणग्या देतां येत नव्हत्या, सनदा देतां येत नव्हत्या, त्यांच्या पत्रकाला राजपत्रकाचा मान नव्हता, आज्ञेला सामर्थ्यवंताच्या आज्ञेचें स्वरूप असलें तरी राजाज्ञेचें स्वरूप नव्हतें. कोणत्याही संधिपत्रावर त्यांना राजा या नात्याने

हस्ताक्षर करतां येत नव्हतें. यामुळे प्रजेच्या मनांतील त्यांच्याविषयीच्या श्रद्धेला टिकाऊ स्वरूप प्राप्त होत नव्हतें. राज्याभिषेक संस्कार हाच त्या वेळीं या गोष्टींवरील खरा तोडगा होता.

(३) महाराजांनी जिंकलेल्या व स्वराज्यांत समाविष्ट करून घेतलेल्या प्रदेशावर त्यांची निष्कंटक सत्ता चालत असली तरी विधिपूर्वक राज्याभिषेक झाल्याशिवाय या प्रदेशावरही त्यांचें सर्वमान्य स्वामित्व उत्पन्न होऊं शकत नव्हतें. राज्याभिषेक संस्कारावांचून या त्यांच्या स्वामित्वाला अपहारकत्वाशिवाय दुसरें स्वरूप प्राप्त होऊं शकत नव्हतें.

(५) अतिशय मोठी अडचण ही होती की, त्यांच्या स्वातंत्र्यध्वजाखाली एकत्रित झालेलें सैन्य हें कोणत्या तरी राजाची प्रजा असल्यामुळे व शिवाजी महाराज हे राजे नसल्यामुळे, राजद्रोहाच्या मुद्रेचे सदाचे अंकित होते. महाराज विधियुक्त राजे होणें हाच या अडचणीचा खरा निरास होता, व राज्याभिषेक संस्कार हाच त्याचा खरा मार्ग होता.

(६) भोसले हे इतर मराठे सामंतांप्रमाणे प्रथम बादशाही कृपेचे अंकित म्हणूनच मोठे झाले. पण पुढे शिवाजी महाराजांमुळे भोसले कुळाचें महत्त्व कल्पनातीत वाढलें. त्यामुळे शिर्के, मोहिते, निंबाळकर, जाधव इत्यादि अन्य मराठा सरदारांना त्यांचा स्वाभाविकपणेंच मत्सर वाटूं लागला. हे मत्सरी सरदार आपला मोठेपणा दाखविण्यासाठी स्वतःला मोठ्या अहंकाराने मोगल अथवा इतर आदिलशाही सिंहासनाचे राजनिष्ठ सेवक म्हणवून घेत व शिवाजी महाराजांना बंडखोर, लुटारू म्हणून नांवें ठेवीत. यथाशास्त्र राज्याभिषेक करवून घेण्याने स्वजातीय मत्सरी लोकांचीं तोंडें आपोआप बंद होऊन स्वराज्याच्या स्वामीची सर्वातिशायीप्रभुसत्ता त्यांना मान्य करणेंच भाग पडणार होतें. या सरदारांतही मोगल अथवा अन्य यावनी सत्तांनी अंगावर फेकलेलीं राजपदाच्या बिरुदाचीं हाडकें चघळणारे अनेक लोक होते. पण अभिषेकाने प्राप्त होणारें राजेपण व परक्या सत्ताधाऱ्यांनी दिलेलें हें राजेपण यांतील

अंतर सर्वच जण जाणत होते. या घटनेने शिवाजी महाराज हे या तथाकथित राजांना राजेपण देणाऱ्या औरंगजेब, कुतुबशहा, आदिलशहा यांच्या बरोबरीने मांडी ठोकून बसणार होते.

तात्पर्य, हिंदवी स्वराज्याच्या परिपूर्ण झालेल्या ध्येयाला स्थिरता प्राप्त होऊन नव्या युगाच्या निर्मितीचा दुंदुभिध्वनि दिक्कोन गर्जवीत उठावा या भव्योदात्त आकांक्षेने प्रेरित होऊन महाराजांनी राज्याभिषेक समारंभाचा निर्णय घेतला. या समारंभाचें महत्त्व अनेक इतिहासलेखकांनी आपापल्या पद्धतीने विशद करून सांगितलें आहे. विख्यात इतिहाससंशोधक श्री. वा. सी. बेंद्रे आपल्या 'श्रीशिवराजाभिषेक' या पुस्तकांत लिहितात, 'छत्रसिंहासनाच्या धर्मसिद्ध प्रतिष्ठेने हिंदवी राज्यसंस्थेला सांस्कृतिक, राजकीय आणि नैतिक अथवा सामाजिक श्रेष्ठ दर्जा व स्थैर्य प्राप्त होण्याचें सामान्य उद्दिष्ट या राज्याभिषेकामागे होतें. त्याचबरोबर वर्णाश्रम-धर्माच्या आचारवैशिष्टयामुळे सोसाव्या लागणाऱ्या अडचणी दूर होणार होत्या. हा प्रत्यक्ष व फार महत्त्वाचा फायदा होता. राज्य म्हणजे संपादिलेली लहानमोठी जहागीर म्हणून समजली जात होती. असे लहानमोठे जहागीरदार बरेच होते. महाराजांचे खास व्याही, जावईहि राजे म्हणवून घेणारे जहागीरदार होते. राज्यांतील नियंत्रणाला ही परिस्थिति घातूक होती. राज्यकार-भारांत तीमुळे सुसूत्रता आली नसती. शिस्तीने कारभार चालण्यांत अडचणी आल्या असत्या. त्या दूर करण्याची आवश्यकता पूर्वीच भासूं लागली होती. राजा या शब्दाने राज्यसंस्थेचा प्रतिनिधि म्हणून जो सहज आदर किंवा पूज्यभाव उत्पन्न व्हावयास पाहिजे होता तो होत नसे. राज्याभिषेक विधीने मात्र महाराजांना वर्णाश्रम धर्मपद्धतीप्रमाणे आपोआपच श्रेष्ठ स्थान प्राप्त होऊन छत्रचामरयुक्त अधिकाराने महाराजांस वेगळें स्थान व निराळी कर्तबगारी व्यक्त होऊं लागली. सभासद लिहितो त्याप्रमाणे, 'मऱ्हाटा पातशहा येवढा छत्रपति झाला ही गोष्ट कांही सामान्य नाही.' हीच राज्याभिषेकाची खरी कामगिरी. राजे म्हणविणाऱ्या

मराठ्यांना आपल्यासारख्याच एका राजाचे नोकर होण्यांत किल्बिष वाटत होतें तें दूर होणें हिंदवी स्वराज्याच्या संघटनेच्या दृष्टीने आवश्यक होतें तें साधलें.

राज्यकारभारांतील दुसरी मोठी अडचण म्हणजे ब्राह्मण गुन्हेगारांच्या शासनाबाबतचें परावलंबित्व. कोणताहि वाद ब्राह्मणांनी उपस्थित केला तर शिवाजी महाराजांना निर्णय घेण्याला रूढीने मान्यता नव्हती. ब्रह्मवृंदांस जमवून किंवा काशीस्थ ब्राह्मणांकडून सर्व वाद तोडवावे लागत. तत्संबंधीची आज्ञा पंडितरावाच्याच नांवाने काढणें भाग असे. इतर जमातींना त्यामुळे ताप होई. त्यांच्यावर अन्यायही होत असे. त्यांतून रघुनाथ पंडितराव राजनिष्ठेने कांही धडपड करी, तर त्याचा इतर ब्राह्मण द्वेष करीत. ब्राह्मण मंडळींना रघुनाथ पंडितरावाचा कसा हेवा वाटत होता यासंबंधी गोविंद कवीन्द्र लिहितो :—

पंडितानां गुणध्वंसाद्विप्राणां मानखंडनात् ।
उपमर्दात्कवीन्द्राणां गणकानां प्रहासतः ॥११॥
रघुनाथः क्षयाविष्टो विशिष्टोऽपि धरातले ।
प्रययावतिवेगेन दिदृक्षुरमरावतीम् ॥१२॥

सारांश, अभिषिक्त राजा म्हणून प्रतिष्ठा नसल्याने शिवाजी राजांना सामाजिक व धार्मिक बाबतींत सत्ता नव्हती. हा रूढीचा दंडक राजकारभारांत आडवा येऊं लागला. अशा परिस्थितींत उभारलेलें राज्य वाढत्या तेढीने लयास जाण्याची धास्ती वाटूं लागली. प्रजेलाहि हा जाच जाणवत होता. समकालीन परमानन्द कवीन्द्र या परिस्थितीचें वर्णन करतो :—

प्रसभाद्धृतवित्तेभ्यः प्रवृतेभ्यः प्रणाशने ॥
बिभ्युरेभ्यस्ततस्तेभ्यो व्याघ्रेभ्यो गोव्रजा इव ॥
मृत्पात्रसंग्रहाः शीर्णवल्कलावृतविग्रहाः ।
निःस्वीभूय बभुस्तत्र तपस्विन्य इव प्रजाः ॥

—(अनुपुराण, ले. कवीन्द्र परमानन्द, श्लो. ५५ व ५६)

परन्तु या मंडळींना दूर करण्यापलीकडे त्यांस शिक्षा करण्याचा

अधिकार नव्हता. इतर जातीयांना कडक शासन तत्काळ मिळत असे. सारांश, छत्रसिंहासनाची प्राणप्रतिष्ठा करून साधिकार राजपद मिळविण्याखेरीज श्रेष्ठ जातींतील गुन्हेगाराना शासन करण्याचा अन्य उपाय राहिला नव्हता. ही राजप्रतिष्ठा झाल्या-नंतर मात्र शिवाजी व संभाजी राजांनी आपल्या न्यायाधीशांकडून किंवा कारकून सरकारकूनाकडून चौकशी करवून अथवा जातीने चौकशी करून कडक शासन देण्यांत मागेपुढे पाहिलें नाही. राज्या-भिषेक होतांच अगदी पंधरा दिवसांतच शिवाजी महाराजांनी जातीधर्माच्या व्यवस्थेबद्दल आज्ञापत्रें आपल्या नांवाने काढलीं आहेत.'–(श्रीशिवराजाभिषेक, ले. वा. सी. बेन्द्रे, पृ. १७ व १८)

विख्यात इतिहाससंशोधक डॉ. बाळकृष्ण म्हणतात :—

'The consolidation of his new Government by evoking the deepest national sentiments of the people of Maharashtra, was not a small gain from this magnetizing act of installation.

This new Hindu Kingdom was to become the sacred symbol of freedom from Moslem oppression, of Hindvi Swaraja and Aryan culture. Under the crushing weight of the Mogul Empire and the Bijapur Kingdom, Swarajya was nothing more than a dream and a chimera, but now it was to become an undisputed reality. Shivaji, in installing himself, reinstated the dethroned culture and religion of the Hindus. Therefore he and his successors have rightly been called "Hindupati Padshah" and the state governed by them has come to be known as the "Hindupad Padshahi" the Government of the protectors of the Hindus.

The Hindu kingdoms of the north, even the Solar dynasty of Udaipur, had become tributaries of the Moguls. The ancient Hindu Empire of Vijayanagar was dismembered into

petty principalities. The last monarch, having lost his capital Vellore was a fusitive in the woods. Thus not a single Hindu independent kingdom was in existence in 1674.

An independent Hindu kingdom was like an island in the sea of Moslem conquests. It was a beacon light for all Hindus to rise against their oppressors, and come under the protecting umbrella of the Chhatrapaties. or to establish their own Swarajya everywhere

It is said that there cannot be a king without a kingdom. Here there was a kingdom without a king. The hero who, by his dauntless struggles of twenty years, had created this kingdom was by the act of coronation to be recognized its crowned king. In fact, coronation was the wisest step to organize, stabilize and sanctify the state, to inaugerate the new era of intellectual and religious reformation and to mark the beginning of a new cycle in the political existence of the country, which was to be characterised by the decline of the moslems and the rise of the Hindus.

—( Shivaji the Great, By Dr. Balkrishna Vol. II—Part 1 P. 4, 5, 6 )

'राज्याभिषेकामुळे, महाराष्ट्रांतील जनतेच्या अंत:करणांत खोल राष्ट्रीय भाव जागृत करून नवीन राज्यांत अंतर्गत एकसूत्रीपणा उत्पन्न करतां आला हा कांही कमी लाभ नाही.

नवीन हिंदुराज्य हें मुसलमानांच्या अत्याचारांपासून हिंदवी स्वराज्य व आर्यसंस्कृति यांच्या मुक्ततेचें पवित्रतम प्रतीक होणार होतें. मोगल साम्राज्याच्या चिरडून टाकणाऱ्या वजनामुळे व विजापूरच्या सुलतानांच्या दडपणामुळे स्वराज्याला स्वप्न अथवा कल्पनेचा खेळ यांहून अधिक महत्त्व नव्हतें. पण आता ती न टाळतां येण्यासारखी प्रत्यक्ष वस्तुस्थिति झालेली होती. शिवाजी

महाराजांनी स्वतःला राज्याभिषेक करून घेण्याने हिंदूंचा पदच्युत धर्म व संस्कृति यांची पुनश्च गौरवासनावर प्रतिष्ठापना केली म्हणून महाराज व त्यांचे वारस यांना 'हिंदुपति पादशहा' ही लावण्यांत येणारी संज्ञा पूर्णपणें सार्थ ठरली. ते ज्या राज्याचे सूत्रचालक होते तें 'हिंदुपदपादशाही' या नांवाने विख्यात झालें. हिंदुपदपादशाही म्हणजे हिंदूंच्या संरक्षकांचें राज्य.

उत्तरेकडील सर्व हिंदु राजे मोगलांचे खंडणी देणारे मांडलिक बनले होते. उदयपूरच्या विख्यात सूर्यवंशानेही हीच भूमिका स्वीकारलेली होती. विजयनगरचें प्राचीन हिंदुसाम्राज्य नष्ट होऊन अनेक छोटया राज्यांमध्ये त्याचीं शकलें रूपांतर पावलीं होतीं. या साम्राज्याचा शेवटचा वारस आपली राजधानी जें वेलोर तें हातचें जातांच रानोमाळ भटकत होता. याप्रमाणे इ. स. १६७४ मध्ये पृथ्वीच्या पाठीवर कोठेही स्वतंत्र हिंदुराज्य अस्तित्वांतच नव्हतें. मुसलमानांच्या विजयाच्या समुद्रांत स्वतंत्र हिंदु राज्याचें अस्तित्व एखाद्या आश्रयद्वीपासारखें होतें. परकी अत्याचारी आक्रमकांच्याविरुद्ध हिंदूंना उठावणी करण्याची प्रेरणा देणारा दीपस्तंभ म्हणजे हा राज्यारोहणसमारंभ होय. हा राज्याभिषेक अशी उठावणी करणाऱ्या लोकांना 'या, तुम्हाला छत्रपतींच्या छत्रछायेखाली आश्रय मिळेल अथवा स्वतंत्रपणें स्वतःच्या क्षेत्रांत नवें स्वराज्य निर्माण करा' असेंच सुचवीत होता.

असें सांगतात की, राज्यावांचून राजा असूंच शकत नाही. येथे मात्र अशी वस्तुस्थिति होती की स्वतंत्र राज्य निर्माण होऊनही त्याला कोणी राजा म्हणून नव्हता. ज्या नेत्याने वीस वर्षें अविश्रांत संग्राम करून हें राज्य निर्माण केलें होतें, तो राज्याभिषेकाच्या समारंभानंतर या राज्याचा अभिषिक्त राजा म्हणून ओळखला जाणार होता. खरें म्हणजे हिंदवी स्वराज्य सुसंघटित, एकसूत्रित, सुदृढ व घटनात्मक स्थैर्य प्राप्त झालेलें करण्याच्या दृष्टीने राज्याभिषेक संस्कार करणें हें अत्यंत दूरदर्शीपणाचें होतें. धार्मिक व वैचारिक क्षेत्रांतील नव्या युगाला या घटनेने प्रारंभ

होणार होता. देशाच्या राजकीय अस्तित्वाच्या दृष्टीने सुरू झालेल्या नव्या युगाची राज्याभिषेक संस्कार ही नांदी होती. मुसलमानी सत्तेचें अधःपतन व हिंदूंचें पुनरुत्थान हें या नव्या क्रान्तिकारक युगाचें स्वरूप होतें.'

राज्याभिषेकाची कल्पना पुण्यश्लोक श्रीशिवाजी महाराजांच्या अंतःकरणांत स्फुरण्याची ही कारणमीमांसा आहे.

शास्त्रोक्त राज्याभिषेकाची कल्पना महाराजांच्या मनांत स्फुर-तांच त्यांनी त्या दृष्टीने आपल्या सभोवारच्या लोकांच्या मनो-वृत्तीचा ठाव घ्यावयास प्रारंभ केला. राज्याभिषेकाच्या या कल्पनेचा सर्वांनाच आनंद झाला. महासती राजमातेचा महाराजांना आशी-र्वाद मिळाला. सद्‌गुरु श्रीसमर्थांचा त्यांना आशीर्वाद मिळाला. ज्यांच्या कर्तृत्वाच्या व पराक्रमाच्या भरंवशावर स्वराज्याचें मंदिर उभारण्यांत आलें होतें त्या महाराजांच्या मुत्सद्द्यांची व सेना-पतींची त्यांना अनुकलता होतीच, व स्वराज्यांतील जनतेला तर आपला राजा छत्रसिंहासनाधीश्वर व्हावा या कल्पनेइतकें अन्य काय स्फूर्तिप्रद असूं शकेल?

शिवकालानंतर पुष्कळ दिवसांनी लिहिलेल्या बखर वाङ्मयांतील वर्णनावरून महाराजांच्या या राज्याभिषेकाला महाराष्ट्रांतील ब्राह्मणांनी विरोध केला, शिवाजी महाराज हे क्षत्रिय नसून शूद्र असल्यामुळे ते राज्याभिषेकाचे अधिकारी नाहीत असें या ब्राह्म-णांचें मत होतें व महाराष्ट्रांतील ब्राह्मण असे विरोधी असल्यामुळे काशीच्या विद्यापीठांतील सर्वमान्य व सर्वश्रेष्ठ पंडित गागाभट्ट यांना आणवून राज्याभिषेक करावा लागला असा समज सर्वत्र पसरलेला आहे. आजच्या ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाला परिपुष्ट करण्याचें एक अमोघ साधन म्हणून हा समज पुष्कळ दिवस उपयोगांत आणण्यांत येत असे. इतकेंच नव्हे तर कथा, कादंबऱ्या व चित्रपटांतूनही बहुजन समाजावर हाच संस्कार करण्याचे प्रयत्न झालेले आहेत. पण हा समज मुळांतच अनैतिहासिक व निराधार आहे. बखर वाङ्मयांतील ज्या उल्लेखांवरून हा अपसमज प्रच-लित झाला त्याची तपासणी करणें सत्यासत्य निर्णयाच्या दृष्टीने

अत्यंत आवश्यक आहे. कृष्णाजी अनंत सभासद या घटनेचें वर्णन करतांना म्हणतो :—

'पुढे वेदमूर्ति गागाभट म्हणून वाराणशीहून राजियाची कीर्ति ऐकून दर्शनास आले. भट गोसावी, थोर पंडित, चार वेद, सहा शास्त्रें, योगाभ्याससंपन्न, ज्योतिषी, मांत्रिक, सर्व विद्येने निपुण, कलियुगींचा ब्रह्मदेव असा पंडित. त्यांस राजे व सरकारकून सामोरे जाऊन, भेट घेऊन, सन्मानें आणिलें. त्यांची पूजा नाना प्रकारें, रत्नखचित अलंकार, पालखी, घोडे, हत्ती देऊन पूजिलें. गागाभट बहुत संतुष्ट झाले. भट गोसावी यांचे मतें मुसलमान पातशहा तक्तीं बसवून, छत्र धरून, पातशाही करितात आणि शिवाजी राजे याणीहि चार पातशाही दबावल्या आणि पाऊण लाख घोडा लष्कर गडकोट असें असतां त्यास तक्त नाही. याकरितां मराठा राजा छत्रपति व्हावा असें चित्तांत आणिलें, आणि राजियासी मानिलें. अवघे मातबर लोक बोलावून आणून, विचार करितां सर्वांचे मनास आलें. तेव्हां भट गोसावी म्हणूं लागले की, तक्तीं बसावें. तेव्हां राजियाच्या वंशाचा शोध करितां राजे शुद्ध क्षेत्रीं (क्षत्रिय) शिसोदे, उत्तरेहून दक्षिणेस एक घराणें आलें, तेंच राजियाचें घराणें असें शोधिलें. उत्तरेच्या क्षत्रियांचे व्रतबंध होतात त्याप्रमाणें व्रतबंध करावा. हा विचार आधी करून भट्ट गोसावी यांनी राजियांचा क्षेत्रीं (क्षत्रियांस युक्त अशा विधीने) व्रतबंध केला. शुद्ध क्षत्रीय आधी केला. अपार द्रव्यधर्म केला. कुल आपले देशांतून परदेशांतून वैदिक ब्राह्मण (विशेषतः सामवेदी ब्राह्मण) थोर थोर क्षेत्रींहून (क्षेत्रांतून) मिळाले तो सर्वहि समुदाय राहून घेतला. प्रत्यहीं मिष्टान्न भोजनास घालूं लागले.'

—(सभासदी बखर पृ. ६८)

सभासदाची बखर ही बखरवाङ्मयांत सर्वांत प्राचीन बखर आहे. या बखरींतील उपर्युक्त वर्णनांत श्रीशिवाजी महाराज हे शूद्र असल्याच्या तर काय पण कोणत्याच सबबीवर ब्राह्मणांनी महाराजांच्या राज्याभिषेक समारंभाला विरोध केल्याचा उल्लेख

नाही. उलट देशीं परदेशींचे ब्राह्मण तेथे जमा झाले व 'पन्नास सहस्र वैदिक ब्राह्मण मिळाले. या वेगळे तपोनिधि व सत्पुरुष, संन्यासी, अतिथि, मानभाव, जटाधारी, योगी, जंगम नाना जाती मिळाले.' असें सभासद म्हणतात. सभासदाच्या उपर्युक्त वर्णनावरून जीं अनुमानें निघतात तीं पुढीलप्रमाणे :—

(१) काशीचे महापंडित गागाभट्ट यांचा व श्रीशिवाजी महाराजांचा प्रत्यक्ष परिचय राज्याभिषेकापूर्वी नव्हता. किंबहुना त्यांनी महाराजांना पूर्वी पाहिलेलेंही नव्हतें.

(२) शिवाजी महाराजांच्या पराक्रमाची, धर्मपरायणतेची व स्वराज्यसंस्थापनेच्या प्रयत्नांची कीर्ति मात्र गागाभट्टाच्या कानांपर्यंत पूर्वींच पोहोचलेली होती. त्यामुळे असा महापुरुष प्रत्यक्ष डोळ्यांनी पहावा या उद्देशाने हेतुतःच गागाभट्ट वाराणसीहून महाराष्ट्रांत आले.

(३) ज्याप्रमाणे गागाभट्टांनी महाराजांना पूर्वी पाहिलेलें नव्हतें तरी ते त्यांच्या कर्तृत्वाच्या व पराक्रमाच्या कीर्तीने आकृष्ट होऊन त्यांच्याकडे आपण होऊन आले त्याचप्रमाणे गागाभट्टांचें अलौकिक पांडित्य व त्यांचा अधिकार यांची कीर्ति महाराजांच्याहि कानीं गेलीच होती; त्यामुळे महाराज स्वतः होऊन सर्व मंडळींसह त्यांना सामोरे गेले व त्यांचा मोठा आदरसत्कार करून त्यांनी त्यांना सन्मानाने आपल्याकडे आणलें.

(४) राज्याभिषेक संस्कार करवून घेण्याची मूळ कल्पना महाराजांची नव्हती. ती गागाभट्टांचीच होय. यवनांना पराभूत करून धर्माचें संरक्षण करणाऱ्या भीमपराक्रमी पुरुषाला राज्याभिषेक व्हावा व निराशामय परिस्थिति जाऊन ईश्वरी कृपेने सर्व प्रकारची अनुकूलता प्राप्त झाली असल्यामुळे हिंदूंचा स्वतंत्र राजा व स्वतंत्र सिंहासन निर्माण व्हावें असें या दीर्घदर्शी व प्रतिभासंपन्न पंडिताच्या मनांत आलें. स्वत. गागाभट्टांनीच महाराजांच्या मनांत राज्याभिषेकसंस्काराचें महत्त्व ठसविलें व महाराजांनाही सूक्ष्म विचारांतीं ती सूचना अत्यंत स्वागतार्ह वाटली.

(५) श्रीशिवाजी महाराजांनी त्यांना महत्त्वाच्या वाटणाऱ्या सर्व लोकांशीं या संबंधांत विचारविनिमय केला तेव्हा त्यांना सर्व लोक अनुकूल आहेत असें दिसून आलें.

(६) राज्याभिषेक हा एक संस्कार आहे व तो क्षत्रियांचा संस्कार आहे. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणे महाराजांचें क्षत्रियत्व सिद्ध झाल्याविना हा संस्कार कसा करतां येणार ही शास्त्रीय स्वरूपाची तांत्रिक अडचण महाराजांच्या मार्गांत उभी राहिली. वस्तुतः सभासदाच्या लिहिण्याचा रोख येवढाच आहे. पण अशी अडचण ब्राह्मणांच्या विना दुसरे कोण उपस्थित करूं शकणार? स्वतः गागाभट्ट तर शिवाजी महाराजांना राज्याभिषेक झालाच पाहिजे या मताचे; इतकेंच नव्हे तर तेच या मताचे खरे जनक व प्रेरक. त्यामुळे ते ही अडचण उपस्थित करूं शकणें शक्य नाही. अशा भोळ्या तर्कपद्धतीने महाराष्ट्रांतील ब्राह्मणांना वेठील धरलें व त्यांच्या गळ्यांत या शंकेचें लोढणें घातलें. पुढे त्याला अतिरजित स्वरूप देऊन ब्राह्मणांनी राज्याभिषेकाला विरोध केल्याची हाकाटी सुरू झाली व तें एक प्रकरणच होऊन बसलें. सभासदाला या अडचणीचें तांत्रिक व शास्त्रीय स्वरूप माहीत होतें असें दिसतें. ब्राह्मणांच्या विरोधाचें स्वरूप असतें तर सभासदाला तसें स्पष्ट लिहावयास कोणतीच अडचण नव्हती. बखरकार रंजित वर्णनें करीत असले तरी कोणाच्याही भीतीने ते सत्य लिहावयास कचरत नसत हें ध्यानांत घेणें अवश्य आहे.

(७) या तांत्रिक अडचणींचा कांही परिहार होऊं शकतो काय तें पाहण्यासाठी महाराजांच्या वंशाचा शोध करण्यांत आला. (हा शोध गागाभट्टांनी स्वतंत्रपणें केला की महाराजांच्या परिवारापैकी अन्य कोणी केला याचा उल्लेख सभासद करीत नाही. त्याच्या लिहिण्याच्या पद्धतीवरून या संबंधांत कोणतेंही अनुमान काढणें धाडसाचें ठरेल.) या शोधांत असें निष्पन्न झालें की, श्रीशिवाजी महाराज हे शिसोदे वंशांतील राजपूत म्हणजेच शुद्ध क्षत्रिय असून त्यांचे मूळ पुरुष उत्तरेंतून दक्षिणेकडे येऊन स्थायिक झाले.

(८) क्षत्रियत्वाच्या अडचणीचा याप्रमाणे परिहार झाल्यावर आणखी एक शास्त्रीय अडचण उपस्थित झाली. राज्याभिषेक हा शास्त्रीय संस्कार आहे व क्षत्रिय हा द्विज असल्यामुळे त्याचा उपनयन संस्कार झाल्याविना अन्य कोणताही संस्कार करतां येत नाही. पण ही अडचण कांही मोठी अपरिहार्य नव्हती. महाराजांचा वंश शुद्ध क्षत्रियाचा आहे हें एकदा ठरल्यावर गागाभट्टांनी त्यांचा क्षत्रियोचित व्रतबंध संस्कार केला, व नंतर राज्याभिषेक संस्कार झाला.

सभासदाच्या बखरीवरून महामहोपाध्याय डॉ. पां. वा. काणे यांनी असें अनुमान काढलें आहे की, 'गागाभट्ट यांनी राजे शिसोदे वंशांतील आहेत असा शोध लावून त्यांचा व्रतबंध केला.' (शिवाजी निबंधावली, भाग १ ला, पृ. १५) पण सभासदाचें वाक्य सूक्ष्मपणें पाहिलें तर त्यावरून गागाभट्टांनी हा शोध लावला असें सभासद म्हणत नाही हें ध्यानांत येईल. तो केवळ 'शोधिलें' येवढेंच म्हणतो. कोणी शोधिलें या संबंधांत तो पूर्णपणें मुग्ध आहे.

सभासदाच्या बखरीनंतर शके १७४० मध्ये लिहिण्यांत आलेल्या **शिवदिग्विजय** या ग्रंथांत राज्याभिषेकाचें वर्णन आलें आहे. तें वर्णन सभासदाच्या वर्णनाहून वेगळ्या प्रकारचें आहे. शिवदिग्विजयकारांच्या मतें शिर्के, मोहिते, महाडीक प्रभृति मराठी सरदारांना शिवाजीराजे हे आपल्याचसारखे एक मराठे घराण्यांतील पुरुष वाटत असल्यामुळे त्यांचे सेवक अथवा अंकित म्हणून काम करणें कमीपणाचें वाटत असे. स्वराज्याच्या अंतर्व्यवस्थेच्या दृष्टीने ही स्थिति योग्य नाही हें ध्यानांत येतांच शिवाजी महाराजांनी तिच्या परिहारासाठी काय उपाययोजना करावी असें आपले विश्वासू सेवक बाळाजी आवजी चिटणीस यांना विचारलें. बाळाजी आवजींनी त्यांना असें सांगितलें की, जो छत्रसिंहासनाधीश्वर राजा असतो त्याला लोक ईश्वरसदृश मानतात. आपण धार्मिक पद्धतीने राज्याभिषेक करवून घेऊन स्वतः छत्रसिंहासनाधीश्वर व्हावें म्हणजे या अडचणीचा खरा परिहार होईल. हा महत्त्वाचा समारंभ तशाच

धार्मिक क्षेत्रांत महत्त्व पावलेल्या व्यक्तींकडून होणें आवश्यक होतें. म्हणून बाळाजी आवजींनीच असें सुचविलें की, 'काशीस गागाभट्ट महासमर्थ ब्राह्मण आहेत त्यांचे आज्ञेने जें करणें तें केलें असतां राजमान्य निर्बाध होतें. त्याजकडे कोणी पाठवून तेथून शास्त्रार्थ आणवून त्यांचे हातून हा विधि केला असतां उत्तम. नंतर बाळाजी आवजी चिटणिसांनी काशीला रामचंद्र बाबांना गागाभट्टाकडे पाठविलें. गागाभट्टांनी सारें ऐकून घेऊन असें सांगितलें की, "कांही क्षत्रियान्वय असला पाहिजे तेव्हां राज्याभिषेकास अधिकार.' त्यामुळे बाळाजी आवजींनी स्वतंत्रपणें शोध करून शिवाजी महाराजांचा उदेपूरच्या राजघराण्याशीं संबंध असल्याचें गागाभट्टांना कळविलें. महाराजांच्या क्षत्रियत्वाची याप्रमाणे चिटणिसांकरवी निश्चिति झाल्यावर भालचंद्रभट्ट पुरोहित व सोमनाथभट्ट कात्रे हे गागाभट्टांना आणावयास काशीला गेले. कांही ब्राह्मण पंडितांसह गागाभट्ट शके १५९५ मध्ये साताऱ्याला आले. त्यांनी महाराजांची भेट घेतली. सर्व बोलणें होऊन गागाभट्टांनी राज्याभिषेकाचें आध्वर्यवत्व करण्याचें मान्य केलें व महाराजांचा व्रतबंध करण्याचा निर्णय घेतला. तदनुसार शके १५९६ ज्येष्ठ शु।।५ स गुरुवारीं महाराजांचा व्रतबंध झाला. या उपनयन संस्काराचे वेळीं श्रीसमर्थ रामदास स्वामी उपस्थित होते.

तात्पर्य, शिवदिग्विजयाच्या मतें (१) राज्याभिषेकाची कल्पना स्वतः महाराज व गागाभट्ट या दोघांचीही नसून ती बाळाजी आवजी चिटणीस यांची आहे. (२) गागाभट्ट व शिवाजी महाराज या दोघांचीहि परस्परांना माहिती नसून ती माहितीसुद्धा चिटणिसांनीच करून दिलेली आहे. (३) गागाभट्टांना काशीहून माणसें पाठवून आणवावें लागलें. (४) महाराज क्षत्रिय आहेत हें सिद्ध झाल्याविना त्यांना धर्मशास्त्राप्रमाणे राज्याभिषेक होऊं शकणार नाही असें स्वतः गागाभट्टांचेंच म्हणणें होतें. (५) महाराजांचा शिसोदे वंशाचा म्हणजेच क्षत्रियत्वाचा शोध चिटणिसांनीच लावून तशी गागाभट्टांची खात्री पटविली तेव्हां कोठे पुढील गोष्टी होऊं

शकल्या. म्हणजे राज्याभिषेकाचें प्रकरण हा सर्व बाळाजी आवजी चिटणिसांच्या प्रतिभेचा खेळ आहे.

चित्रगुप्तविरचित शिवाजी महाराजांच्या बखरींत शिवराज्याभिषेकाची घटना विस्ताराने वर्णिली आहे. पण आपण सभासदाच्या बखरीचा 'भावगर्भ चित्तांत संपूर्ण मनन करून' ही बखर लिहिली असल्याचें लेखक म्हणत असल्याने दोन्ही बखरींत महत्त्वाच्या गोष्टींसंबंधाने संपूर्ण एकवाक्यता आहे. चित्रगुप्ताच्या मताप्रमाणे गागाभट्ट स्वतःच महाराजांची कीर्ति ऐकून वाराणशीहून स्वराज्यांत आले. महाराजांनी त्यांचा उत्कृष्ट सत्कार केला. स्वतः गागाभट्टांनीच महाराजांना म्हटलें, 'संपूर्ण पृथ्वी यवनमय होऊन सिंहासनारूढ यवन जहाले. सार्वभौमत्व अगदी यवन करूं लागले. तुम्ही पराक्रमें दक्षिणेंतील चारी पातशहा जिंकिलें. धन्य तुमचे पराक्रमाची. यास्तव तुम्हांस तक्तारूढ करावें, संपूर्ण अधिपाधिप तुम्हांस या जगीं छत्रपति म्हणवून तुमचें राज्य व्हावें ही इच्छा मनापासून उत्कंठित जहाली आहे. तुम्ही सिंहासनाधीश्वर जहालियाविना जगीं भूषण प्रताप नाही. एतद्विषयीं ईर्षा संपूर्ण ब्राह्मणवृंदास लागली आहे.'

तात्पर्य, चित्रगुप्ताच्या मताप्रमाणे राज्याभिषेकाची कल्पना स्वतः गागाभट्टांची असून त्यांनी ती महाराजांच्या मनांत पटविली. ब्राह्मण राज्याभिषेकाच्या मुळीच विरुद्ध नसून उलट महाराजांनी यथाशास्त्र सिंहासनाधीश्वर व्हावें अशी ब्राह्मणांनाच खरी तळमळ लागून राहिली होती. महाराजांचा वंश म्हणजे चितोडच्या राण्यांचा वंश होय असा शोध लागून त्यांना गोप्रसव करून व्रतबंधयुक्त शुद्ध क्षत्रिय करण्यांत आलें असें चित्रगुप्त म्हणतो. चित्रगुप्ताच्या मतें महाराजांना राज्याभिषेक 'चंद्रगुरु योगिणी यथास्थित विलोकून घबाड वोहरा (होरा ?) अमृतसिद्धि योग ज्येष्ठ मास शुद्ध त्रयोदशी मन्दवासर आनंद नामसंवत्सरीं परम सुमुहूर्तीं झाला. सभासदाच्या बखरींत दिवस दिलेला नाही. शिवदिग्विजयांत पौर्णिमा तिथि व गुरुवार हा दिवस दिलेला आहे. पण तें चूक आहे. चित्रगुप्ताने दिलेला दिवसच बरोबर आहे.

मल्हार रामराव चिटणीसकृत श्रीशिवछत्रपतींचें चरित्र राज्याभिषेक शक १३७ मध्ये लिहिलेलें असल्यामुळे उपर्युक्त बखरींच्या तुलनेने पुष्कळच अर्वाचीन आहे. या चरित्रांत महाराजांना गागाभट्ट अथवा बाळाजी आवजी चिटणीस यांपैकी कोणीच राज्याभिषेकाची कल्पना सुचविलेली नसून त्यांना स्वत:लाच आपण महाराणा सजणसिंह यांच्या वंशांतील शुद्ध राजपूत क्षत्रिय आहोंत याची जाणीव होती, व म्हणून राज्य संपादन होतांच आपण यथाशास्त्र राज्याभिषेक संस्कार करून सिंहासनाधीश्वर व्हावें असें वाटूं लागलें असें वर्णन आहे. त्यांनी या संबंधांत कुलस्वामिनी श्री जगदंबेची प्रार्थना केली व जगदंबेने त्यांना स्वप्नांत अनुकूल दृष्टान्त दिला. मग महाराजांनी मातु:श्री जिजाबाईसाहेब व सद्गुरु श्रीसमर्थ रामदास यांची अनुज्ञा घेतली. या वेळीं पंडितधुरीण गागाभट्ट हे अनायासें पैठणला आलेले होते, व तेही महाराजांची कीर्ति ऐकूनच आलेले होते. हें बाळाजी आवजी चिटणिसांना कळतांच त्यांनी महाराजांना अशी प्रार्थना केली की, गागाभट्टांना व पैठणच्या पंडितांना येथे आणवून त्यांच्याकडेच या कार्याचें धार्मिक नेतृत्व द्यावें. महाराज हे 'उदेपूरच्या राणाजीचे घराण्यांतील वंश सिसोदे कुळपरंपरा पुरुष पिढ्या लावून या प्रांतीं हिंदुस्थानांतून आले' हा शोध लागलाच होता. ज्येष्ठ शुद्ध पंचमीला महाराजांचा व्रतबंध झाला व नंतर त्यांना राज्याभिषेक झाला. तात्पर्य, चिटणिसांच्या मतें : (१) राज्याभिषेकाच्या कल्पनेचे श्रीशिवाजी महाराज हे स्वत:च जनक असून आपल्या राजपूतत्वाची म्हणजेच विशुद्ध क्षत्रियत्वाची त्यांना जाणीव होती. (२) गागाभट्ट महाराजांची कीर्ति ऐकून स्वत:च दक्षिणेंत आले होते .(३) चिटणिसांनी त्यांची व महाराजांची गाठ घालून दिली.

संवत १८८६ मध्ये बडोदें येथे लिहविलेल्या शिवाजी प्रताप या बखरींत वर्णिलेल्या राज्याभिषेकाच्या वृत्तांत गागाभट्टांना आणावयास चांद्रसेनीय कायस्थ प्रभूंचे कुलाचार्य टकले यांना पाठविण्यांत आल्याचा उल्लेख आहे तर मल्हार रामराव चिटणिसांच्या बखरींत

केशव पंडित, भालचंद्र भट पुरोहित (बाळाजी आवजी चिटणिसांचें गुरुस्थान) व सोमनाथ कात्रे यांना पाठविल्याचा उल्लेख आहे.

असो. बखरवाङ्मयांतील हे उल्लेख तपासतांना अन्य मार्गांनी राज्याभिषेकासंबंधांतल्या कांही महत्त्वाच्या गोष्टींवर प्रकाश पडतो काय तें पाहणें अवश्य आहे. त्यांतील सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे महाराष्ट्रांतील ब्राह्मणांऐवजी शिवछत्रपतींनी गागाभट्टांसारख्या काशीच्या पंडिताची राज्याभिषेक विधि पार पाडण्यासाठी केलेली योजना होय. यावरूनच राज्याभिषेकाला महाराष्ट्रांतील ब्राह्मणवर्गाचा विरोध होता ही कल्पना पुढे आलेली आहे.

वस्तुस्थिति अशी आहे की, श्रेष्ठ व्यक्तीच्या जीवनांतील कोणताही सर्वश्रेष्ठ प्रसंग पार पाडण्यास्तव दुसऱ्या तशाच श्रेष्ठ व्यक्तीची, नेहमीच प्रांतादिनिरपेक्ष भावनेने योजना करण्यांत येते. त्यामुळे त्या समारंभाचेंही महत्त्व वाढतें व तो लोकांच्या चिरस्मरणांत राहतो. आजहि पंडितराज राजेश्वरशास्त्री अथवा पुण्याचे समाजशास्त्रज्ञ पंडित गो. म. जोशी यांचा सत्कार समारंभ पुण्यांत व्हावयाचा असला व महाराष्ट्रांत हवे तितके पंडित विद्यमान असले तरी दिल्लीहून उपराष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन् यांचीच अध्यक्षपदीं योजना करण्यांत येते व त्यासाठी हवा तितका प्रयत्नही करण्यांत येतो नि हवी तितकी वाटही पाहण्यांत येते. याला कोणी अयुक्त समजत नाहीत. जी भावना या घटनेच्या मुळाशीं आहे. तीच राज्याभिषेक गागाभट्टांच्या हाताने करविण्याच्या मुळाशींही आहे, त्यामुळे श्री. गो. म. जोशी यांचा डॉ. राधाकृष्णन् यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार समारंभ करण्याने पुण्यांतील व महाराष्ट्रांतील विद्वानांचा समारंभाला विरोध होता असें जसें सिद्ध होऊं शकत नाही तसेंच गागाभट्टांनी राज्याभिषेकाचें आध्वर्यवत्व स्वीकारण्यांत महाराष्ट्रांतील ब्राह्मणांचा या समारंभाला विरोध होता असेंही सिद्ध होऊं शकत नाही. सामान्यतः असें वाटण्याचें खरें कारण गागाभट्टांची योग्यता व तत्कालीन धर्मधुरीण व पंडितांत त्यांचें असणारें स्थान यांची कल्पना नसणें, हें

होय. आज भारतीय समाजांत विद्वान् व सर्वमान्य व्यक्ति म्हणून डॉ. राधाकृष्णन् यांचें जें स्थान आहे त्याहून कितीतरी पटीने अधिक श्रेष्ठ व सर्वमान्य असें गागाभट्टांचें शिवकालीन समाजांत स्थान होतें. शिवछत्रपतींसारख्या स्वपराक्रमाने, निराशेच्या शून्यांतून स्वराज्याचें ब्रह्मांड निर्माण करणाऱ्या अवतारी पुरुषाच्या राज्याभिषेकासारख्या हिंदुराष्ट्राच्या इतिहासांतील महन्मंगल प्रसंगीं गागाभट्टासारख्या अलौकिक पांडित्यसंपन्न धर्माचार्याची नियुक्ति होऊं नये तर कोणाची व्हावी ? कोण होते हे गागाभट्ट ?

गागाभट्टांचा वंश भट्टवंश या नांवाने काशींत प्रसिद्ध असून आपल्या पांडित्याने, कर्तृत्वाने व योग्यतेने हा वंश चिरस्मरणीय झालेला आहे. परवापर्यंत काशीच्या पंडितांत पहिल्या आसनाचा मान या घराण्याचा असून इतकी पिढ्यान्‌पिढ्या अलौकिक पांडित्य-परंपरा टिकविणारें घराणें दुसरें झालें नाही असें म्हटलें तरी चालेल. या वंशाचें गोत्र विश्वामित्र असें असल्यामुळे त्याला गाधिवंश असें म्हणतात. 'गाधिवंशानुचरित्' या नांवाचें या वंशांची माहिती देणारें एक काव्यही आहे. या वंशांतील सर्वांत प्राचीन पुरुष 'श्रीनागपाश' हा असून तोही भट्ट म्हणजे महापंडित होता. त्याचा पुत्र चांगदेवभट्ट व त्याचा पुत्र भट्ट गोविंद हा होय. हें घराणें मूळचें दक्षिणेंतील असल्यामुळे घराण्याच्या दृष्टीने गागा-भट्टांचा व महाराष्ट्राचा संबंध नवा नाही हें ध्यानांत येईल. श्रीरामकृष्ण भट्टांच्या ज्योतिष्टोम पद्धतींत भट्ट गोविंदाचें वर्णन 'दक्षिणेंतील अगस्ति' या शब्दांत केलेलें आढळतें या भट्ट गोविंदांचे पुत्र रामेश्वर भट्ट हे होत. हे आपल्या पांडित्याने दिग्विजयी ठरले असून गाधिवंशानुचरितांत यांच्या पासूनच भट्ट वंशाचें विशेष वर्णन केलेलें आढळतें. रामेश्वर भट्ट हे पैठणला राहत असून 'त्रिस्थली सेतु' व 'रसप्रदीप' या ग्रंथांत त्यांचें वर्णन पुढीलप्रमाणे केलेलें आहे:—

'विश्वामित्रकुलोदधौ विधुरिवाखण्डः कलानां निधिः ।
वाग्गुम्फे निखिलेऽपि यस्य वसुधा शिष्यप्रशिष्यैश्चिता ॥

विद्यापद्मविकासनैकतरणिः श्रीभट्टगोविंदजः ।
संख्यावद्गणनाग्रणीर्विजयते श्रीभट्टरामेश्वरः ।।
अभूत्कुशिकनंदन प्रथितवंश दुग्धाम्बुधौ ।
सुधाकर इवाकरः किल कलाकलापस्य यः ।।
रमारमणभावनो भुवनबिन्दुवृन्दारकः ।
व्रजध्वजपुरन्दरो विबुधभट्टरामेश्वरः ।। '

रामेश्वरभट्ट हे विश्वामित्र गोत्ररूपी सागरांतील अखंड चंद्र, सर्व कलांचे केवळ निधि असे असून त्यांच्या शिष्यप्रशिष्यांनी सर्व भूमि व्याप्त झालेली होती. रामेश्वर भट्ट म्हणजे सर्व विद्यारूपी कमलांचा विकास करणारे केवळ भास्करच होते. श्रीहर्षाच्या नैषधीय चरिताशीं स्पर्धा म्हणून त्यांनी ' रामकुतूहल ' या नांवाचें काव्य लिहिलें. रामेश्वरभट्ट पैठणला राहत असतांना साऱ्या भारत-वर्षांतून त्यांच्याकडे अध्ययनासाठी विद्यार्थ्यांच्या झुंडीच्या झुंडी येत असत. पैठणहून ते संगमनेरला गेले. अहमदनगरच्या राज-सभेंतील जाफर मलिक नांवाच्या उमरावाच्या मुलाला रामेश्वर-भट्टांनी महारोगापासून मुक्त केलें असें भट्टवंश काव्य व गाधि-वंशानुचरित या दोन ग्रथांत वर्णिलें आहे. रामेश्वरभट्टांना पुत्र नव्हता. कोल्हापूरची देवता महालक्ष्मी ही त्यांची कुलदेवता होय. तिच्या कृपेने पुत्र प्राप्ति व्हावी म्हणून ते कोल्हापूरला तिच्या आराधनेसाठी गेले. तेथून विजयनगरचा सम्राट् कृष्णदेवराय यांच्या राजसभेंत गेले असतां त्यांचा मोठा सत्कार करण्यांत आला. विजयनगरहून ते द्वारकेच्या यात्रेला गेले असतां शके १४३५ च्या चैत्र महिन्यांत त्यांना पहिला पुत्र झाला. त्याचें नांव नारायण भट्ट. यानंतर रामेश्वर भट्टांना ःीधर व माधव या नांवाचे आणखी दोन पुत्र झाले. ब्रह्मा, विष्णु व महेश यांच्या सहित तुरीय ब्रह्म जसें शोभावें त्याप्रमाणे रामेश्वरभट्ट आपल्या तीन पुत्रांसहित शोभत असें रामेश्वरभट्टांचा नातू व माधवभट्टाचा पुत्र रघुनाथ-भट्ट याने आपल्या 'कालतत्त्वविवेचन ' नांवाच्या ग्रंथांत म्हटलें आहे. द्वारकेला चार वर्षें राहून रामेश्वर भट्टांनी तेथील पंडितांना

महाभाष्य व सुरेश्वराचार्यांचें वार्तिक या ग्रंथांचे पाठ दिले. तेथून पैठणला परत येऊन त्यांनी चार वर्षांनंतर काशीला प्रयाण केलें व नंतर ते तेथेच स्थायिक झाले. काशीच्या वास्तव्यांत रामेश्वर-भट्टांजवळ ज्या अनेकांनी अध्ययन केलें त्यांत त्यांचे जे शिष्य विशेष प्रसिद्धीस आले ते म्हणजे मधुसूदन सरस्वती यांचे गुरु माधव सरस्वती, महेश ठक्कर, शंकरमिश्र, दामोदर सरस्वती व कोंकणचे अनंतभट्ट चितळे हे होत. रामेश्वरभट्टांचे ज्येष्ठ पुत्र नारायणभट्ट यांनी सर्व अध्ययन आपल्या पित्याजवळच केलें. त्यांची माता रामेश्वर भट्टांच्या निधनानंतर सती गेली. प्रसिद्ध राजा तोडरमल्ल याच्याशीं नारायण भट्टांची मैत्री होती व वाग्-युद्धांत त्यांनी अनेक गौड व मैथिल पंडितांना जिंकलें होतें. अकबर बादशहाच्या राज्यकालांत नारायणभट्टांनी, पूर्वी मुसलमानांनी उद्ध्वस्त केलेल्या काशी-विश्वेश्वराची पुन्हा प्रतिष्ठापना केली हें त्यांचें ऐतिहासिक महत्त्वाचें कार्य होय. दिनकरोद्योतांत त्यांच्या या कामगिरीचें वर्णन करतांना म्हटलें आहे :—

'काश्यां पातकिविद्रुतं भगवतो विश्वेश्वरस्याचलम् ।
लिङ्गं भाग्यवशात् सुखाय जगतां संस्थापयामास यः ।।

नारायण भट्टांची गाढ विद्वता व तपस्या यामुळे त्यांना 'जगद् गुरु' हें विशेषण अत्यादराने लावण्यांत येत असे. नारायणभट्टांनी शास्त्रदीपिका या पार्थसारथि मिश्रांच्या ग्रंथाच्या कांही भागावर टीका लिहिलेली असून अन्त्येष्टिपद्धति, अयन-निर्णय, आतुरसंन्यास विधि, आरामोत्सर्गपद्धति आह्निकविधि, काशीमरणमुक्तिविचार, कालमाधवव्याख्या, गोत्रप्रवरनिर्णय, तिथिनिर्णय, त्रिस्थली सेतु, तुलापुरुष महादान प्रयोग, दिव्यानुष्ठान पद्धति, प्रयोगरत्न, रुद्र पद्धति असे अनेक ग्रंथ लिहिले. त्यांचे अनेक ग्रंथ आज प्रचारांत असून धर्माचाराच्या निर्णयासंबंधांत ते प्रमाणभूत मानण्यांत येतात. नारायभट्टांचे बंधु श्रीधरभट्ट व माधवभट्ट हेही गाढे पंडित व ग्रंथकार होते.

नारायणभट्टांना रामकृष्णभट्ट, शंकरभट्ट व गोविंदभट्ट या

नांवाचे तीन पुत्र होते. रामकृष्ण भट्ट हे गाढे पंडित असून त्यांनी जीवत्पितृककर्मनिर्णय, ज्योतिष्टोमपद्धति, विभागतत्त्व, मासिक श्राद्धनिर्णय, तन्त्रवार्तिक टीका इत्यादि अनेक ग्रंथ लिहिले. वयाच्या ५२ व्या वर्षी त्यांचें निधन झालें व त्यांची पत्नी उमा त्यांच्याबरोबर सती गेली.

नारायणभट्टांचे द्वितीय पुत्र शंकर भट्ट हेही महामीमांसक असून द्वैतनिर्णय, मीमांसा बालप्रकाश, धर्मप्रकाश, निर्णयचंद्रिका, व्रत मयूख, विधिरसायनदूषण इत्यादि त्यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. भाट्ट व प्राभाकर या दोन भिन्न मीमांसक मतांचें एकीकरण करून दाखविणें ही त्यांची शास्त्राच्या क्षेत्रांतील महत्त्वाची कामगिरी होय. शंकरभट्टांनीच 'गाधिवंशानुचरित' हा भट्ट वंशाची माहिती देणारा ग्रंथ लिहिलेला आहे. वैय्याकरणांत सर्वमान्य असलेल्या सिद्धान्तकौमुदी या ग्रंथाचे कर्ते भट्टोजी दीक्षित हे शंकरभट्टांचे शिष्य होते एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

नारायणभट्टांचे कनिष्ठ बंधु माधवभट्ट यांना विश्वनाथ, रघुनाथ व प्रभाकर हे तीन पुत्र असून ते सारे महामीमांसक व ग्रंथकार होते.

नारायणभट्टांचे ज्येष्ठ पुत्र रामकृष्णभट्ट यांना दिनकरभट्ट अथवा दिवाकरभट्ट, कमलाकरभट्ट व लक्ष्मणभट्ट या नांवाचे तीन पुत्र होते. दिनकरभट्ट हे महापंडित व तपस्वी होते. कमलाकरभट्टांनी आपल्या विख्यात 'निर्णयसिन्धु' या ग्रंथांत आपल्या ज्येष्ठ भ्रात्यासंबंधी असे उद्‌गार काढले आहेत की 'बिंदुमाधवाच्या चरणीं ज्याने आपला देह मिलिंदायमान केला, त्या ज्येष्ठ भ्रात्याला मी वंदन करतों.' दिनकरभट्टांनी शास्त्रदीपिकेवर भाट्ट दिनकरी, शांतिसार, भाट्ट दिनकरोद्योत हे ग्रंथ लिहिले. त्यांचे धाकटे बंधु कमलाकर यांनी तर धर्मशास्त्र साहित्यांत अमर साहित्याची भर घातलेली आहे. सर्व शास्त्रांत ते पारंगत असून त्यांनी एकंदर बावीस ग्रंथ लिहिले. त्यांचे प्रमुख ग्रंथ म्हणजे निर्णयसिन्धु, शूद्रकमलाकर, विवादताण्डव, काव्यप्रकाशव्याख्या, गोत्रप्रवरदर्पण, इत्यादि होत.

त्यांच्या निर्णय सिन्धूने भारताचें सर्वसामान्य धार्मिक जीवन नियंत्रित केलें आहे असें म्हणावयास हरकत नाही. तिसरे बन्धु लक्ष्मण भट्ट यांनी कमलाकर भट्टांजवळच अध्ययन केलें असून आचाररत्न, गोत्रप्रवररत्न इत्यादि ग्रंथ लिहिले आहेत.

रामकृष्णांचे उपर्युक्त महातपस्वी ज्येष्ठ पुत्र जे दिनकरभट्ट अथवा दिवाकरभट्ट यांचे चिरंजीव गागाभट्ट होत. वरील भट्ट वंशाच्या माहितीवरून भारताच्या धार्मिक जीवनांत भट्ट वंशाचा काय अधिकार होता या गोष्टीची कल्पना येईल. गागाभट्टांचें खरें नांव विश्वेश्वरभट्ट असें होतें. पित्याने लहाणपणीं त्यांना 'गागा' असें लाडाने नांव दिलें व तेंच पुढे प्रचलित झालें. आपल्या दिनकरोद्योत या ग्रंथांत स्वतः गागाभट्टच ही माहिती देतांना म्हणतात,

'मीमांसार्णवकर्णधारविबुधः श्रीभट्टनारायण. ।
तद्वंशस्य करीरतां भजति यो विश्वेश्वराख्यः कृती ॥
गागाभट्ट इति प्रथां दिनकरात्प्राप्तः पितुर्लालनात् ।
तेनाचारनिबन्धनो दिनकरोद्योतोधुना पूर्यते ॥

'मीमांसाशास्त्ररूपी महासागरांत जे कर्णधार म्हणून प्रसिद्ध आहेत त्यांच्यांत सर्वश्रेष्ठ असलेल्या नारायणभट्टांच्या वंशांत मी उत्पन्न झालों. माझें खरें नांव विश्वेश्वर असतांनाही माझे वडील भट्टदिनकर यांनी लाडाने गागाभट्ट असें माझें नांव ठेवलें व तेंच रूढ झालें. तो मी गागाभट्ट हा पित्याचा अपूर्ण राहिलेला ग्रंथ दिनकरोद्योत पूर्ण करीत आहे.'

गागाभट्ट हे आपल्या वंशाच्या कीर्तींत भर टाकणारे गाढे पंडित असून 'कलियुगींचा ब्रह्मदेव' वाटण्याइतका त्यांचा प्रभाव होता. मीमांसाकुसुमांजलि, भाट्टचिंतामणि, राकागम, दिनकरोद्योत, निरूढपशुबन्धप्रयोग, पिण्डपितृयज्ञप्रयोग, कायस्थधर्मप्रदीप, सुज्ञान, दुर्गोदय, शिवार्कोदय, श्लोकवार्तिक हे त्यांचे ग्रंथ त्यांचें गाढें पांडित्य व धर्मशास्त्रावरील अधिकार सांगणारे आहेत.

शिवराज्याभिषेकासारख्या अलौकिक समारंभाच्चें आध्वर्यवत्व त्यांना देण्यांत येण्याचें खरें कारण त्यांची स्वतःची व त्यांच्या वंशाची ही असामान्य योग्यता होय.

यावर दोन प्रश्न उर्वरित राहतात, ते असे :–(१) गागाभट्टांनी केवळ महाराजांची कीर्ति ऐकूनच दक्षिणेंत येऊन त्यांना राज्याभिषेकाचा आग्रह केला की महाराज व गागाभट्ट यांची परस्परांना राज्यभिषेक प्रसंगापूर्वीच माहिती होती ? व (२) राज्याभिषेकापूर्वी गागाभट्टांचा महाराष्ट्राशीं प्रत्यक्ष कांही संबंध होता काय ?

पुढील प्रकरणांत आपण यांकडे वळू.



प्रकरण तेरावें

# शास्त्रीय अडचणींचा परिहार

श्रीशिवछत्रपति व गागाभट्ट यांचा संबंध राज्याभिषेकाच्या विशिष्ट घटनेच्या वेळींच प्रथम आलेला नसून तो पुष्कळ पूर्वी आलेला आहे. महाराजांची गागाभट्टांना व गागाभट्टांची महाराजांना पूर्वीपासूनच चांगली माहिती होती. इतकेंच नव्हे तर शिवाजी महाराजांच्या विषयी एक विशिष्ट प्रकारची श्रद्धाही गागाभट्टांच्या अंतःकरणांत होती. अलीकडे विख्यात इतिहाससंशोधक श्री. वा. सी. बेन्द्रे लिहितात : 'गागा भट्ट व शिवाजी महाराज यांचा राज्याभिषेकापूर्वी जो संबंध आला, त्याबद्दल कांही विपर्यास केला गेला असल्याने त्याविषयी थोडी चर्चा करणें जरूर आहे. हे संबंध नीटसे माहीत नसल्याने बखरकार हे शिवाजी व गागाभट्ट यांचा नवीनच संबंध जडला असें समजून लिहितात. गागाभट्टास राज्याभिषेकासाठी आणण्याचा आणि त्यांचें मन वळवून तो विधि साजरा करण्यास उद्युक्त करण्याचा खटाटोप करण्यास त्यांस द्रव्यलालूचही दाखवावी लागली असें भासवितात. पण गागाभट्टांचें

घराणें मूळचें दक्षिणेंतील असून पैठणचे अनंतदेवभट्ट हे त्यांचे गुरुबंधु होते. त्यामुळे ते अधूनमधून पैठणास येत असत. गागाभट्टांचा कोकणच्या सामाजिक वादांशींही पूर्वी बराच संबंध आला होता. शेंडेगोळक यांच्यावरील ग्रामण्यनिर्णयांत त्यांचा प्रथम संबंध आढळतो. त्या नंतर गागाभट्ट कोकणांत इ. स. १६६३ त आले. तेव्हा इ.स. १६६४ च्या सुरवातीस श्येनवी जातीच्या भांडणाचा निर्णय, त्यांनी अनेक काशीस्थ व महाराष्ट्रांतील पंडित उपाध्याय इत्यादिकांची, शिवाजी महाराजांच्या विनंतीवरून राजापुरांत सभा करून दिला. तो देतांना इंदूरहून आधारग्रंथ येईपर्यंत तरी त्यांचें वास्तव्य इकडे झालें होतें. बरोबर अनंतदेव भट्टही होते. त्यानंतर कायस्थ प्रभूबाबत निर्णय सन १६६९ ते १६७२ त दिले. 'कायस्थ धर्मप्रदीप' ग्रंथ लिहून त्यांच्या षोडश संस्कारांच्या अधिकारांचें विस्तृत विवेचन केलें. याही निर्णयांत 'सद्‌गुरू अनंतदेवभट्ट स्वामींचा संबंध असल्याचा रघुनाथ पंडितरावांनी उल्लेख केला आहे. या निर्णयावरून यातीयातींच्या धर्मव्यवहाराबद्दल त्यांची किती प्रागतिक प्रवृत्ति होती हें सुस्पष्ट होतें. गागाभट्ट व शिवाजी महाराज यांची इ. स. १६६३ त तरी चांगलीच ओळख झाली होती. त्यांच्या 'श्येनवी जातिनिर्णयास' 'शिवप्रशस्ती' जोडण्याइतका शिवाजी राजांविषयी त्यांना आदर वाटू लागला होता यांत शंका नाही. या प्रशस्तींत गागाभट्टांनी शहाजी राजे यांचा असा उल्लेख केला आहे :–

तस्यामभूद्विमलराजकुलांबुराशौ ।
उद्यत्प्रभूतशुभकीर्तिघनप्रकाशः ॥
लोकैः सदा हृदि धृतो गुणसंनिविष्टः ।
श्रीशाहजीति नृपतिर्भुवनैकरत्नम् ॥२॥

त्यानंतर शिवाजी महाराजांची स्तुति येते :—

तस्यात्मजः शिव इति प्रथितप्रभावः ।
सिद्धांगनाजनसमाजसमिद्धकीर्ति. ॥
दाने यमः सुकृतिनां क्षिपति स्म दैन्यम् ।
सैन्येन वैन्यसदृशः प्रतिभूपतीनाम् ॥३॥

यस्मिन्नसाधारण धैर्यशौर्य–।
गांभीर्यसौंदर्यगुणैकधुर्ये ।।
गिरीन्द्रभीमानुजसिंधुराज–।
स्मराश्च साधारणतां भजन्ते ।।
दानाय द्रविणार्जनं जनपरित्राणाय वीरव्रतम् ।
सत्याय प्रियभाषणं हरिपदध्यानाय चेतःस्थितिः ।।
यत्सख्येन च चक्रवर्तिपदवीं याता नृपा भूरिश. ।
दिल्लीन्द्रः क्षयमाप यस्य कलहाल्लंकेशतुल्योपमः ।।५
असौ शिवाजी रुचिरेण धाम्ना ।
नाम्ना च रूपेण च संगतार्थः ।।
रोषातुरे चक्षुषि यद्विपक्षो ।
नितान्तकान्तारसमाश्रितोऽभूत् ।।६।।
विश्राणनेषु व्यसनं यदीयम् ।
विद्याप्रसंगेषु विनोदसौख्यम् ।।
यस्यावदातं च यशोवितानम् ।
दिग्मडलो मंडपमातनोति ।।७।।

गागाभट्ट शहाजीराजे यांची स्तुति करतांना त्यांना राजकुलांतील व नृपति अशीं विशेषणें लावतात. शिवस्तुतीचाही विचार केला तर या प्रशस्तीनंतर दहा वर्षांनी भोसले घराणें क्षत्रिय आहे हें पटविण्यासाठी धावपळ करण्याची गागाभट्टांना खास गरज नव्हती. यानंतर शिवाजी महाराज आग्र्याहून निसटून वाराणशीस गेले. तेव्हा दोनच वर्षांपूर्वी घनिष्ठ संबंध जडलेल्या गागाभट्टांची भेट शिवाजी महाराजांनी घेतली असणें पूर्णपणें संभवतें. त्यानंतर पत्रव्यवहारही झालेला आहे. शिवाय इ. स. १६७३ अखेरपर्यंत शिवाजीराजांचा लौकिक सर्वतोमुखी झाला असतां हिंदुधर्माभिमानी गागाभट्टांना काशीस त्यांची दखल नसेल असें म्हणतां येणार नाही. सारांश, गागाभट्ट व शिवाजी महाराज यांना एकमेकांविषयी चांगलाच आदर होता. आणि गागाभट्ट आपल्या

गुरुबंधूंकडे आल्यानंतर महाराजांची भेट घेतल्याशिवाय राहिले नसावेत. आपल्या दौऱ्यांत राजेरजवाड्यादि यजमानांची भेट घेण्याचा शास्त्रीपंडितांचा त्या वेळीं परिपाठ होता. गागाभट्ट सहज दक्षिणेंत आले असें सभासद सांगतो. शिवराज्याभिषेककल्पतरूतील निश्चळपुरीही तेंच सांगतो.

तादृशे समये प्राप्तो गागाभट्टस्तु नासिकम् ।

थोर पंडितांचें आगमन झाल्याचें कळतांच त्यांना सन्मानाने निमंत्रण देऊन त्यांची पूजा करणें हा त्या कालीं एक शिष्टाचार होता. गागाभट्ट नाशिकहून पैठणास गेले. तेथे त्यांस महाराजांकडील निमंत्रण मिळालें. या गुरुबंधूंच्या मनांत तेथेच ही राज्याभिषेकाची कल्पना आली. परंतु हें गागाभट्टांचें आगमन इ. स. १६७३ च्या शेवटीं झालें असावें. त्या नंतर सभासद लिहितो त्या प्रमाणे गागाभट्टांनीच 'मराठा राजा छत्रपति व्हावा असें चित्तांत आणिलें, व त्यानुसार बोलणें झालें.'

आर्यसंस्कृतीच्या अनुरूप हिंदवी स्वराज्याची इमारत उभारली गेलेली पाहून गागाभट्टासारख्या विद्वान् व अत्यंत प्रागतिक पंडिताला या मंदिरांत राज्यसिंहासनाची न्याय व धर्मशास्त्राप्रमाणे सविध प्राणप्रतिष्ठा करण्याची निकड व महती पटल्यास व ती घडवून आणण्याची आतुरता वाटल्यास नवल नाही. त्यांत त्यांना त्यांच्या गुरुबधूंचा म्हणजे अनंतदेवभट्टांचाही पाठिंबा मिळालासें दिसतें. सभासद सांगतो :–

'गागाभट्टांनी आपला विचार सांगितला व तो राजियास मानवला.

— (श्रीशिवराजाभिषेक, प्रस्तावना पृ. ११, १२, १३)

तात्पर्य, गागाभट्ट व श्रीशिवाजी महाराज यांचा परस्परांचा राज्याभिषेकाच्या कमींत कमी एक तप म्हणजे बारा वर्षें तरी आधीपासून प्रत्यक्ष व उत्कृष्ट परिचय होता. महाराजांच्या धर्मराज्यप्रतिष्ठापनेच्या उदात्त हेतूमुळे गागाभट्टांच्या मनांत त्यांच्याविषयी श्रद्धा वसत होती; व अपूर्व राजनीतिकुशलतेने, पराक्रमाने व साहसाने त्यांनी प्रबल यावनी सत्तांचीं सिंहासनें उलथून टाकून

आपला हेतु सफळ केल्यामुळे श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या प्रमाणेच गागाभट्टांचेंही हृदय आनंदाने व उत्साहाने भरून गेलें होतें. त्यामुळे त्यांनी महाराजांच्या राज्याभिषेकाची भव्योदात्त कल्पना स्वयंस्फूर्तीने महाराजांच्या गळीं उतरविणें अत्यंत स्वाभाविक होतें ज्याच्या पांडित्याचा धर्मसमस्यांच्या निर्णयासाठी पूर्वीपासूनच महाराष्ट्रांत अधिकार चालत होता अशा या भारतविख्यात पंडित वंशांत जन्म घेतलेल्या धर्माचार्यांकडून हा महन्मंगल समारंभ होणें महाराजांनाही स्वाभाविकपणेंच अधिक योग्य वाटलें. त्यामुळे गागाभट्टांच्याकडे या समारंभाचें आध्वर्यवत्व आलेलें आहे. चिटणिसांनी त्यांचें नांव सुचविण्याची बखरींतली कल्पना केवळ कपोलकल्पित आहे हें यावरून ध्यानांत येईल. जशी ही कल्पना कपोलकल्पित आहे तशीच महाराज क्षत्रिय वंशांतील आहेत कीं नाही असा संशय उत्पन्न झाल्यामुळे गागाभट्टांना अथवा चिटणिसांना शोधाशोध करावी लागली हीही कल्पना कपोल-कल्पितच आहे.

स्वत: गागाभट्टांना राज्याभिषेकाच्या दहा वर्षें तरी पूर्वी शिवाजी-महाराज हे विशुद्ध राजवंशांतील म्हणजेच क्षत्रियवंशांतील आहेत हें पूर्णपणें माहीत होतें, हें आपण वर पाहिलेंच आहे. महाराजांच्या तरी मनांत याविषयी कांही संशय होता काय? महाराजांचे वडील शहाजी राजे भोसले यांनी कर्नाटकांतून विजापूर दरबारला लिहि-लेल्या एका खरमरीत पत्रांत 'आम्ही तो राजपूत' असा साभिमान निर्देश केलेला आहे. (हें पत्र प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या खंडांत समग्र उद्धृत केलेलें आहे.) आपल्या राजपूतपणाची कल्पना पितृपरंपरे-पासूनच महाराजांना होती. सभोवारच्या लोकांना माहिती होती. शहाजीराजांचा राजकवि जयराम याने आपल्या राधामाधवविलास-चंपूंत शहाजी राजांना 'सिसोदिया अवतंस' असें म्हटलें आहे. शिवाजी महाराजांचे ज्येष्ठ बंधु राजे संभाजी यांना त्याने क्षत्रियगोत्री' असें विशेषण लावलें आहे. तात्पर्य, भोसले हे नुसतेच क्षत्रियनसून ते शिसोदिया वंशांतील राजपूत आहेत या गोष्टीचीसुद्धां सर्व लोकांना

कल्पना होती. आणखी एक निर्विवाद पुरावा या संबंधांत देण्यासारखा आहे. तो म्हणजे भूषण कवीच्या शिवराजभूषण या ग्रंथाचा होय.

भूषण हा भारतांतील शिवकालीन महाकवि होय. हा महाकवि प्रखर हिंदुत्वाभिमानी असून त्याने हिंदुराष्ट्राच्या पुनरुत्थानासाठी अग्रेसर झालेल्या धर्मवीरांविना दुसऱ्या कोणावरही आपल्या प्रतिभेचीं पुष्पे न उधळण्याचा कृतनिश्चय केलेला होता. श्रीशिवाजी महाराजांच्या अद्भुत विक्रमगाथा ऐकून तो महाराजांच्या दर्शनासाठी इ. स. १६६२ मध्ये आला. महाराज आग्र्याहून रोमांचकारी इतिहास निर्माण करून परत रायगडला आल्यावर महाकवि भूषणाने त्यांच्या पावन यशाचें वर्णन करण्यासाठी आपला शिवराजभूषण हा अलंकारशास्त्रावरील ग्रंथ लिहावयास प्रारंभ केला व राज्याभिषेकप्रसंगाच्या एक वर्ष आधीं म्हणजे इ. स. १६७३ मध्ये भूषणाने आपला हा ग्रंथ पूर्ण केला. या ग्रंथाच्या प्रारंभींच भूषण शिवछत्रपतींच्या वंशाचें वर्णन करतांना लिहितो :—

'राजत है **दिनराजकोबंस** अवनि अवतंस ।
जामैं पुनि पुनि अवतरे कंसमथन प्रभुअंस ।।४।।
महाबीरता बंस मैं भयो एक अवनीस ।
लियो बिरद '**सीसौदिया**' दियो ईस कोसीस ।।५।।
ताकुल मैं नृपबृंद सब उपजे बखत बुलंद ।
भूमिपाल तिन मैं भयो बडो 'मालमकरंद' ।।६।।
ताते सरजा बिरद भी सोभित सिहप्रमान ।
रन-भू-सिला **सुभौंसिला** आयुषमान खुमान ।।८।।
भूषन भनि ताके भयो भुव-भूषन नृप साहि ।
रातौ दिन संकित रहैं साहि सबै जगमाहि ।।९।।
एते हाथी दीन्हें मालमकरंद जूके
नंद जेते गनि सकति बिरं चहू फीन तिया ।
भूषन भनत जाकी साहिबी सभाके
देखें लागें सब और छितिपाल छिति मैं छिया ।।

साहस अपार हिंदुवानको अधार धीर,
सकल **सिसौदिया सपूत कुलको** किया ।
जाहिर जहान भयो साहिजू खुमानबीर
साहिनको सरन सिपाहिन कोतकिया ॥१०॥
दशरथ जूके राम भे बसुदेवके गोपाल ।
सोई प्रगटे साहिके श्रीसिवराज भुपाल ॥११॥
उदित होत सिवराजके मुदित भये द्विज देव ।
कलियुग हट्यो मिट्यो सकल म्लेच्छनका अहमेव ॥१२॥
साहिनके उमराव जितेक सिवा सरजा सबलूटि लए है ।
भूषन ते बिन दौलति व्है कै फकीर व्है
देस बिदेश गये है ॥
लोग कहैं इमि दच्छिन जेय सिसौदिया
रावरे हाल ठए है ।
देत रिसाय कै उत्तर यों
हमही दुनियाँ ते उदास भए हैं ॥३१५॥
——(शिवराज भूषण)

'सर्व पृथ्वीचें भूषण म्हणून सूर्यवंश प्रसिद्धच आहे. या वंशांत कंसाला ठार मारणाऱ्या भगवतांनी वारंवार अवतार घेतलेला आहे. या वंशांत एक महान् वीर राजा पूर्वी होऊन गेला. या राजाने परमेश्वराला आपलें सीस म्हणजे मस्तक दिल्यामुळे या वंशाचें नांव '**सीसौदिया**' असें रूढ झालें. या वंशांतील सारेच राजे आपापल्या काळचे पराक्रमी व कर्तृत्ववान् पुरुष म्हणून विख्यात होते. त्यामध्ये मालमकरंद अथवा मालोजी हा अतिश्रेष्ठ राजा होऊन गेला. त्या पुरुषसिंहाला 'सरजा' ही उपाधि अत्यंत शोभत होती. रणभूमीवर तो शिलेसारखा दृढ असल्यामुळे त्याला भौंसिला (भोसले) असें म्हणत. त्याला पृथ्वीचें जणू भूषणच असा शहाजी नांवाचा पुत्र झाला. त्याच्या पराक्रमामुळे जगांतील सर्व राजे मनांतून भयभीत असत. मालोजीने आपलें उत्तराधिकारित्व त्याला दिलें. त्याच्या गुणांचें वर्णन ब्रह्मदेव व सरस्वतीही करूं शकणार नाही.

त्याच्या राजसभेंतील वैभवासमोर सारे राजे तुच्छ वाटत. त्याचें साहस अपार होतें. हिंदूंना तो धैर्यशाली वीर मोठा आधार वाटत असे. त्याने संपूर्ण **सिसौदिया** वंशाचा सुपुत्र ठरावें असें कर्तृत्व प्रकट केलें. बडे बडे नृपति त्याला शरण आले. ज्याप्रमाणे दशरथापासून श्रीरामचंद्र अथवा वसुदेवापासून भगवान् श्रीकृष्ण, त्याच प्रमाणे शहाजीराजांपासून श्रीशिवाजी प्रकट झाले. शिवराजाचा उदय होतांच सर्व देव व ब्राह्मण आनंदित झाले. कलियुग बाजूला सरलें व म्लेच्छांचा सर्व अहंकार पार नष्ट झाला. बादशहाच्या कित्येक उमरावांना शौर्यशाली शिवाजीने जिंकून, लुटून पूर्णपणें नागविले. सारी संपत्ति गेल्यामुळे ते फकीर होऊन देशदेशांतराला पळून गेले. लोक त्यांना विचारूं लागले की, सिसौदिया वंशांतील दक्षिणविजेता शिवाजीराजाने तुमची ही दशा केली काय? त्यावर ते लाजून खोटेंच उत्तर देत, 'नाही, नाही; आम्हांलाच वैराग्यामुळे बाह्य वैभवाविषयी औदासीन्य प्राप्त झालें आहे.'

तात्पर्य, भूषणासारख्या उत्तर भारतांतील कवीला राज्याभिषेकाच्या कितीतरी पूर्वीपासून शिवाजी महाराजांचें शिसोदिया हें कूळ, त्यांचें राजपूतत्व व क्षत्रियत्व यांचें संशयरहित ज्ञान आहे. त्यामुळे महाराजांच्या राजपूतत्वाचा, क्षत्रियत्वाचा व शिसोदिया कुळाचा कोणालाही शोध करीत बसण्याचें कांहीही कारण राज्याभिषेकाच्या वेळीं तरी नाही.

श्री. बेन्द्रे यांनी तत्कालीन महाराष्ट्रांतील ब्राह्मणांविरुद्धची ही कपोलकल्पित ओरड पुराव्यानिशी खोडून काढली; पण आपल्या विवेचनांत सरकारकुनांच्या माथीं मात्र नसते दोषारोप त्यांनी चिकटविलेले आहेत. गाय वांचवून वासरांवर प्राणघातक वार करण्यासारखाच हाही प्रकार आहे. ते लिहितात, 'बखरकारांच्या लिहिण्यांत कालक्रमाच्या ज्ञानाभावीं एकाच गांवीं किंवा एकाच तऱ्हेच्या पण निरनिराळ्या वेळीं घडलेल्या प्रसंगांची गल्लत आढळते. ते सर्वच प्रसंग मिळून एकच घटना असें वर्णन असतें. धर्मशास्त्राप्रमाणे राज्याभिषेक करण्यांत कांही क्षुल्लक अडचणी

आल्या. त्यांच्याशीं मागील व नंतरच्या याती-यातींच्या तंट्यांचे प्रसंग जोडून त्या सर्व ग्रामण्यांच्या अनुषंगाने शिवाजी महाराजां-विरुद्धही एक कल्पित फड उभा केला आहे. कांही बखरकार हा ग्रामण्याचा घोळ वर्ष सव्वावर्ष चालला होता असेंही समजतात. आपण ज्या गोष्टी करावयाच्या त्याचा बभ्रा होऊं द्यावयाचा नाही हा महाराजांचा स्वभाव. इंग्लिश फॅक्टरी रेकॉर्डस्‌मध्ये अशीं किती तरी बातमीपत्रें आहेत की, रायगडावर गेलेल्या त्यांच्या मडळींना असें दिसून आलें की, शिवाजीच्या सामान्यही हालचालींची नक्की बातमी सरकारकुनांनाही लागत नसे मग इतरांची काय कथा? शिवाय रायगडावर फक्त कामापुरतेच लोक जात व परत पाचाडास मुक्कामास येत. रायगडाकर फक्त किल्लेकरी मंडळी व महाराज नसले तर संभाजी किंवा सरकारकून असे. ब्राह्मण भिक्षुकांची त्या वेळीं गडावर किंवा पाचाडास वस्ती नव्हती. तेथे मंडळी राहत तीं सर्व नोकरपेशांतील मंडळींचीं कुटुंबें होतीं. हीं नोकरपेशी माणसें महाराजांविरुद्ध बोलूं शकतील अशी तत्कालीन परिस्थिति नव्हती. तेव्हा ब्राह्मणांनी जमावाने महाराजांस विरोध करणें शक्य नव्हतें. सहस्र ब्राह्मण एकत्र करण्यास परराज्यांतील व दूरच्या क्षेत्राक्षेत्रांतील मंडळींना आणावें लागलें. त्यावरून कोंकणांत ब्राह्मणांचा भरणा कितीसा असेल याची कल्पना करतां येईल. त्या काळीं ब्राह्मण मंडळी मुलकी नोकऱ्यांचे मागे होती. सारांश, ग्रामण्याची भाषा बोलून विरोध करणें त्या काळीं ब्राह्म-णांच्या आहाराबाहेरचें होतें.' याप्रमाणे ब्राह्मणांसंबंधीची वस्तुस्थिति मांडल्यावर सरकारकुनांवर घसरतांना श्री. बेन्द्रे लिहितात : 'जे सरकारकून स्वराज्यनिष्ठ होते त्यांना या विचारांत श्रेष्ठ मान-प्रतिष्ठेचें बीज दिसल्याने आनंद झाला. परंत स्वार्थनिष्ठ मंत्र्यांना मात्र जे वर्णाश्रमाच्या नांवाखाली स्वतःला शासनातीत असल्याचें मानून स्वैराचार करीत होते त्यांना, आपल्या जन्मजात स्वातंत्र्याला धोका उत्पन्न होत असल्याची जाणीव झाली. गागाभट्ट व अनंत-देवभट्ट यांच्याशीं शास्त्रार्थाने वाद घालण्याइतकी त्यांच्याजवळ

विद्याही नव्हती व बुद्धिही नव्हती. त्याचप्रमाणे आर्थिक व्यवहारांत आणखी एक मराठ्यांची जमात शह देणार याचीही त्यांना खात्री वाटूं लागली. या भीतीने कांही जातिनिष्ठ सरकारकुनांनी शिवाजी महाराजांच्या प्रचलित आचारधर्मांतील वैगुण्यांवरून तांत्रिक अडचणी उभ्या करण्याचा प्रयत्न केला असणें संभवनीय आहे. परंतु राजांच्या मनांत भरलेल्या गोष्टीस विरोध करणें व त्याचबरोबर गागाभट्ट व अनंतदेवभट्ट यांच्याशीं तोंड देणें हेंही तितकेंच दुर्घट व अनर्थावह होतें. हें जाणून त्यांनी जुळतें घेण्याचा प्रयत्न केला असावा. सारांश, जो कांही विरोध झाला असेल तो अप्रत्यक्ष किंवा वादविवादात्मक असावा.'

येथे श्री. बेन्द्रे हे सरकारकून मंडळींचा विरोध असावा असें केवळ अनुमान काढीत आहेत, तेंही कोणतेंही प्रमाण न देतां, व तो विरोधही अप्रत्यक्ष म्हणजेच सारहीन होता असेंही म्हणत आहेत. पण पुढच्याच परिच्छेदांत या अनुमानाला एकदम सिद्धान्ताचें स्वरूप देऊन ते लिहितात : 'सरकारकून मंडळींनी ज्या तांत्रिक अडचणी दाखविल्या त्यांतील मुख्य म्हणजे संस्कारलोपाची. ही बाब त्या वेळीं सर्वच जातींच्या पुढे होती. शिवाजी महाराजांचा व्रतबंध झाला नव्हता. ज्या अर्थी हा मुख्य संस्कार झालेला नाही त्या अर्थी कुल क्षत्रिय असलें तरी तें आचाराने शूद्र झालें आहे, परंतु महाराजांचें मौंजीबंधन राज्याभिषेकापूर्वी केल्यास 'देशकाल विप्लवाने' जडलेला हा दोष नाहीसा होऊन ते छत्रसिंहासनास अधिकारी असे शुद्ध क्षत्रिय होतील असा गागाभट्ट व अनंतदेवभट्ट यांचा अभिप्राय सर्वांस मान्य झाला. नंतर दुसरी अडचण आली की, क्षत्रियांच्या उपनयनसंस्काराची कमाल मर्यादा बावीस वर्षेंच आहे. महाराजांस वय अधिक झालें आहे. अर्थात् यातींचेही लोप झालेले संस्कार पुन्हा सुरू करण्यास निर्णय देणारे गागाभट्ट व अनंतदेवभट्ट यांनी प्रायश्चिताची तोड काढून दिली, आणि शास्त्रार्थही ('अग्रजा बाहुजा वैश्याः स्वावधेरूर्ध्वमद्धतः') ('ज्योतिर्निबंध, सिद्धान्तविजय) दिला असला पाहिजे. त्यानंतर तिसरी

अडचण म्हणजे छापे वगैरे घालतांना महाराजांकडून ब्रह्महत्याही झाली असावी, त्यास शुद्धि नाही. परंतु गागाभट्टांनी 'मात्स्याच्या' आधाराने 'तुलादाना'व्यतिरिक्त 'तुलापुरुषदानाने' हा दोष नाहीसा होतो हें सिद्ध केलें. गागाभट्टांचा आजा विख्यात नारायण-भट्ट यांनी हा प्रयोग-ग्रंथ पूर्वी तयार केलेला होता. अर्थात् या प्रायश्चितविधीची आयत्या वेळीं सर्वांच्या समाधानार्थ आवश्यकता भासल्याने राज्याभिषेकाच्या महोत्सवविधींत या प्रायश्चित्तविधीचें गालबोट लावून घेण्यास गागाभट्टास तयार व्हावें लागलें. या वादविवादाची माहिती एका डचपत्रांत येते. अहिंदू माणसाला या शास्त्रार्थावर झालेल्या भांडणांतील भूमिका समजण्यासारखी नव्हती तरीही त्याने सामान्यतः ती निर्दशित करून तत्कालीन वस्तु-स्थितीचा बोध करून देण्याचा प्रयत्न केला आहे. क्षत्रियवर्ण व द्विजत्वाचे सस्कार व कुलाचार यांतील बारकाई त्याला समजणें शक्य नव्हतें. हा वेंगुर्ल्याचा डच वखारवाला १३ आक्टोबर १६७४ च्या पत्रांत लिहितो .—

'Suasy ( Shivaji ) ...... said that he could not be crowned until he had abandoned his present caste of Bhosla and taken the caste of Kettary ( Kshatriya ) and it was fitting that they should induct him into that caste. Thereupon, the learned men answered that that could hardly be as his ancesters had always been Bhonslas. Suasy ( Shivaji ) replied that the Bhonslas were descended from the Kettary ( Kshatriya ) caste and that that he wished could certainly be done. So the other party, taking into consideration that Suasy ( Shivaji ) could not be crowned unless he first became a Kettary ( Kshatriya ) and that he had promised not to act or rule tyrannically and badly as before, on the 8 th June ( New style ) last with great ceremony, they granted him the caste of Kettary ( Kshatriya ), and intended also to initiate him into the rules of the caste, but he demanded to be taught the Brahman rule. This, however, they refused, but one of the chief among them completed ............ '

(शिवाजी म्हणाला की, त्याने सध्याची स्वतःची भोंसला ही जात सोडून क्षत्रिय जातीचा स्वीकार केल्याविना त्याला राज्याभिषेक करतां येणार नाही. व ब्राह्मणांनी त्याला क्षत्रियत्व देणें प्रसंगाच्या दृष्टीने अत्यंत योग्य होते. तेव्हा विद्वान् लोकांनी असें सांगितलें की, त्याचे पूर्वज भोसले असल्यामुळे त्याला ती जात कशी सोडतां येईल ? शिवाजीने असें सांगितलें की भोसले हे मुळांत क्षत्रियच आहेत, व म्हणून क्षत्रिय होण्यांत जात बदलविण्याचा प्रश्नच येत नाही. तेव्हा विद्वान् लोकांनी शिवाजीला प्रथम क्षत्रिय केल्यावांचून राज्याभिषेक करतां येत नाही हें ओळखून व पूर्वीप्रमाणे वाईट पद्धतीने व अत्याचारीपणाने पुढे राज्य करणार नाही असें शिवाजीने वचन दिलेलें असल्यामुळे दि. ८ जूनला अपेक्षित मोठा समारंभ झाला. त्यांनी शिवाजीला क्षत्रियत्वाचे अधिकार दिले व त्या जातीच्या चौकटींत बसविण्याची सिद्धता केली; पण त्याने ब्राह्मणी संस्कार आपणांस करावे अशी मागणी केली. त्या विद्वान् लोकांनी ही गोष्ट मात्र पूर्णपणें नाकारली. पण त्यांच्यांतील मुख्याने तोही संस्कार विधिपूर्ण केला.)

'शिवाजी महाराजांच्या पदरीं कांही कऱ्हाडे व शृंगारपूरचे पंडित होते. परंतु ते सर्व शिवाजीचाच पुरस्कार करणारे होते. त्यांचे खेरीज तेथे कोणी विद्वान् ब्राह्मण नव्हते की, जे गागाभट्टांशीं वाद सांगूं शकतील. त्यामुळे विशेष भानगड न होतां हा राज्याभिषेक विधि गागाभट्टांनीच अध्वर्यु होऊन पार पाडावा असें ठरलें.' —— (श्री शिवराजाभिषेक, पृ. १५–१६)

श्री. बेन्द्रे यांनी आधाराला घेतलेलें उपर्युक्त डच व्यापाऱ्याचें पत्र वस्तुस्थितीवर खरा प्रकाश पाडण्यास असमर्थ आहे हें त्यांनीच मान्य केलें आहे. संस्कारयुक्त क्षत्रियत्वास्तव जो उपनयन संस्कार करावयाचा त्यालाच हा डच व्यापारी ब्राह्मण्याचे संस्कार समजलेला आहे. ब्राह्मण्याच्या संस्काराचा या साऱ्या प्रकरणांत कोठेच संबंध नसून मौंजीबन्धन या द्विजत्वाच्या संस्काराचाच होता.

महाराजांच्या क्षत्रियत्वासंबंधी वादच नव्हता, व श्रीशिवाजी महाराज क्षत्रिय असले तरी व गागाभट्ट हे केवढेही प्रागतिक विचारांचे पंडित असले तरी एकदा राज्याभिषेक हा धार्मिक व शास्त्रोक्त संस्कार आहे हें मान्य केल्यावर तो शास्त्रविधीच्या चौकटींत बसविणेंच आवश्यक होतें. तो शास्त्रविधीच्या चौकटींत बसवावयास गागाभट्टासारख्या महामीमांसकासमोर तीन दुर्लंघ्य अडचणी उभ्या राहिल्या. पहिली महत्त्वाची अडचण म्हणजे महाराज हे द्विज (क्षत्रिय) असले तरी कोणत्याही संस्काराचा अधिकार व द्विजत्व ज्यामुळे प्राप्त होतें तो उपनयन संस्कारच महाराजांचा झालेला नव्हता. दुसरी अडचण म्हणजे आता उपनयन संस्कार करावयाचा तर क्षत्रियांच्या उपनयन संस्काराची अधिकांत अधिक वयोमर्यादा जी बावीस वर्षे, ती तर महाराजांनी उल्लंघिली होतीच; पण त्यांचे विवाह होऊन त्यांना मुलेंबाळेंही झालेलीं होतीं. तिसरी महत्त्वाची अडचण म्हणजे राज्याभिषेकाला राणी लागणार होती. महाराजांचे विवाह समंत्रक म्हणजे वैदिक मंत्रांचा उपयोग करून झालेले नसल्यामुळे पट्टमहिषीचा संस्कार राणीला कसा करावयाचा ? आणखीही एक अडचण होतीच; व ती म्हणजे ब्रह्महत्यादि दोषांचें निर्मूलन. या साऱ्या गोष्टीशिवाय धार्मिक राज्याभिषेक संस्कार करतां येणार नाही हें महामीमांसक गागाभट्ट व त्यांचे गुरुबंधु अनंतदेवभट्ट यांना स्वतःलाच कळत होतें, व म्हणूनच त्यांचे परिहार या थोर पुरुषांनी शास्त्रीय आधारानेच काढून राज्याभिषेकाचा मंगल प्रसंग घडवून आणला. सर्वांच्या मनांतली गोष्ट शास्त्रीय चौकटींत कशी बसवावयाची असा हा प्रश्न होता. आजही एखादी महत्त्वपूर्ण व जनहिताची गोष्ट विधिनिबंधांच्या अथवा घटनेच्या चौकटींत कशी बसवावयाची असा प्रश्न उत्पन्न होतोच. व कुशल निबंधपंडित आपल्या प्रतिभेने ही गोष्ट विधिनिबंधांच्या व घटनेच्या चौकटींत बसवून दाखवितातही. गागाभट्टांनी आपल्या प्रतिभेने ही गोष्ट त्याकाळी घडविली हें त्यांचें हिंदवी स्वराज्यावरील महदुपकार होत. पण गागाभट्टांच्या

या कार्याची महत्ता सिद्ध करावयास बेन्द्रे यांनी महाराजांची एकनिष्ठेने सेवा करणाऱ्या बिचाऱ्या सरकारकुनांना वेटीला धरण्याचें कांहीही कारण नाही. बखरकारांनी एक चूक केली तर बेन्द्रे दुसरी करीत आहेत! ज्यांच्याजवळ शास्त्रार्थ करण्याची बुद्धिही नव्हती व विद्याही नव्हती, असें बेन्द्रे स्वतःच म्हणतात, ते सरकारकून निव्वळ शास्त्रीय स्वरूपाच्या व शास्त्रज्ञांनाच कळूं शकणाऱ्या अडचणी मात्र उपस्थित करूं शकण्याइतके बुद्धिसंपन्न शास्त्रज्ञ व विद्यासंपन्न होते असें बेन्द्रे यांना पुन्हा उलटून म्हणावयाचें आहे काय ? सरकारकून हा केवढ्या योग्यतेचा पुरुष आहे हें रामचंद्रपंत अमात्यांनी आपल्या आज्ञापत्रांत वर्णिलें आहे. रामचंद्रपंत अमात्य म्हणतात : 'प्रधान म्हणजे राज्यरक्षणगृहाचे स्तंभ आहेत. प्रधान म्हणजे नृपसत्ताप्रसारक. प्रधान म्हणजे प्रजापालन धर्मसंरक्षणाचे अध्यक्ष. प्रधान म्हणजे सरकारकून त्याची भीड सर्वांपेक्षा अधिक ठेवावी. आधी सरकारकुनी देणें ती बहुत विचारून, मनुष्यपरीक्षा करून, केल्या कर्मामध्ये फिरून आपणांस संकट न पडे असें बरे शोधून, लक्षणिक मनुष्य वाढवीत वाढवीत नियोजित कार्यधुरंधर पाहून मग सरकारकुनी सांगावी. सरकारकून पदवी सामान्य नव्हे. नृपपदवी उपरी सरकारकुनाची पदवी. तदनुरूपच यथोक्त नृपगुणतुल्य सरकारकुनाचे गुण असावे. सरकारकून म्हणजे कुलीन, कृतकर्मे, कार्याकार्यविचक्षण, शास्त्रज्ञ, राजधर्मविशारद, पापभीरु, स्वामीसेवकभाव जाणून वर्तेत, दैवतैकनिष्ठ, दर्शनीय, सदय, शूर, सधैर्य, समंजस, स्फुटवक्ता, निरालस्य, निराग्रही, निर्व्यसनी, निष्पाप, पुण्यशील, उद्योगशील, अतीत, अनागत कार्यसूचक, अलालुची, अहिंसक, साम, दान, भेद, दण्ड, संधिविग्रह, मित्रभेद, मित्रसंधानादि अनेक उपाये शत्रुसंधानी चतुर, इत्यादी गुणसंपन्न असे पाहून त्यास सरकारकुनी सांगावी. या गुणांविपरीत अंगहीन, चोरी करणार, खोटें बोलणार अशास इतर मामले न सांगावे. तेथे सरकारकुनी तर महत्पदे न सांगावी. एतदर्थी संशय काय आहे ?'

सरकारकून कसा असावा या विषयीचे शिवछत्रपतींच्या परिसरांतील एका महान् मुत्सद्द्याचे हे विचार आहेत. अशा स्थितींत स्वार्थी, राष्ट्रद्रोही व आपल्या स्वार्थासाठी स्वराज्याच्या स्थिरपदतेला संकटांत लोटावयास सिद्ध असलेल्या पुरुषांना शिवाजी महाराजांसारखा द्रष्टा पुरुष सरकारकुनाच्या पदावर चढवील काय ? महाराजांना काडीइतकीही मनुष्यपरीक्षा नव्हती असें आपण यांत सिद्ध करीत आहोंत व कोणालाही कोणत्याही पदावर चढविण्याइतके महाराज बावळे होते असें अप्रत्यक्षपणें म्हणत आहोंत हें बेन्द्रे यांच्या ध्यानांतही आलेलें दिसत नाही ! स्वार्थी व स्वराज्यद्रोही लोक महाराजांच्या वेळीं व त्यांच्या हातून सरकारकुनाच्या जागीं नियुक्त होतील काय ? त्यांचें खरें स्वरूप महाराजांच्या ध्यानांत आल्याविना राहील काय ? थोड्याशा विलंबासाठी नेताजीसारख्या आपल्या सरसेनापतीला पदच्युत करणारे, प्रतापराव गुजरांसारख्या एकनिष्ठ सरसेनापतीला तरवारीच्या धारेवर धरणारे व मोरया गोसाव्यासारख्या साधूलाही त्याची योग्य मर्यादा दाखविणारे श्रीशिवाजी महाराज अशा सरकारकुनांना योग्य ती कडक शिक्षा निदान पदच्युत केल्याविना राहिले असते काय ? बेन्द्रे यानी निष्कारण महाराजांनाही धक्का लागेल अशा पद्धतीने हें जें सरकारकुनांना वेठीला धरलें आहे त्याचें कारण त्यांच्या छत्रपति संभाजी महाराजांविषयीच्या अतिरिक्त प्रेमांत दडलेलें आहे. कसें तें आम्ही पुढे दाखविणारच आहोंत. पण त्यासाठी राज्याभिषेकापासूनच ते सरकारकुनाविषयी एक भूमिका सिद्ध करीत आहेत. पण ती पूर्णपणें अनैतिहासिक आहे.

महाराजांच्या राज्याभिषेकाच्या मार्गांत ज्या अडचणी होत्या त्या विशुद्ध शास्त्रीय स्वरूपाच्या होत्या; व त्यांचा परिहारही महामीमांसक गागाभट्टांनी विशुद्ध शास्त्रीय पद्धतीनेच केलेला आहे. महाराष्ट्रांतील ब्राह्मण व सरकारकून यांच्या विरोधाचा येथे कांही संबंध नव्हताच. तीं सारीं कपोलकल्पित भारुडें आहेत हें येथे लक्षांत घेतलें पाहिजे.

असो. राज्याभिषेकाच्या या महन्मंगल प्रकरणांशीं संबद्ध अशा रूढ समजुतींचा – विशेषतः अनैतिहासिक पण अनर्थावह समजुतींचा विचार करणेंच आवश्यक होतें म्हणून तो केला. आता आपण महाराजांच्या व भारताच्या इतिहासांतील या सुवर्णपृष्ठाकडे वळूं.

इ. स. १६७४ च्या प्रारंभीं गागाभट्टांचें नाशिकला आगमन झालें व पूर्वपरिचयामुळे महाराजांनी त्यांचा मोठा सन्मान करून त्यांची भेट घेतली. त्या वेळीं या हिंदुधर्माचा एकमात्र आधार असलेल्या अनभिषिक्त भूपतीच्या जयदुंदुभीचा नाद ऐकून त्या प्रतिभासंपन्न महापंडिताच्या मनांत राज्याभिषेकाची कल्पना चमकून उठली, व ती त्यांनी महाराजांच्या गळीं उतरविली. महाराजांनाही त्यांनी उभारलेल्या कार्याची पूर्तता या शास्त्रविधीनेच होणारी आहे असें दिसून आल्यामुळे त्यांनी ती मान्य केली, व गागाभट्टांच्याकडेच या महान् संस्काराचें आध्वर्यवत्व दिलें. राज्याभिषेक संस्काराच्या आड येणाऱ्या तीन दुर्लंघ्य अडचणींचा मागे उल्लेख केलाच आहे. त्यांचा शास्त्रीय पद्धतीने परिहार करण्यासाठी राज्याभिषेकापूर्वी महाराजांचा उपनयन संस्कार करणें, त्याहीपूर्वी उपनयनाचा काल उलटून गेल्याविषयीचे व उपनयनाआधीच विवाहादि गोष्टी झाल्याविषयीचे जे संस्कारशास्त्राशीं संबद्ध असे दोष त्यांच्याविषयीचें प्रायश्चित्त करणें, पट्टमहिषीचा अभिषेक समंत्रक करतां यावा म्हणून उपनयन संस्कारानंतर महाराजांचें त्यांच्या राण्यांशीं पुन्हा समंत्रक विवाह करणें, ब्रह्महत्त्यादि पातकांच्या क्षालनार्थ प्रायश्चित्त विधि करणें, राज्याभिषेक विधीची सुव्यवस्थित मांडणी करणें या सर्व गोष्टींची आवश्यकता होती; व मीमांसाशास्त्राप्रमाणे या सर्व गोष्टी शास्त्रीय चौकटींत बसविणें व त्यासाठी शास्त्रार्थ सांगणें ही गोष्ट सामान्य नव्हती. पंडितवर्य गागाभट्ट या सिद्धतेसाठी पैठणास गेले. तेथे ते स्वतः व त्यांचे गुरुबंधु अनंतदेवभट्ट चितळे यांनी राज्याभिषेक प्रयोग व प्रायश्चित्त प्रयोग शास्त्रीय पद्धतीने लिहून सर्व सिद्धता केली, व गागाभट्ट सर्व सिद्धतेनिशी रायगडला आले. समकालीन लेखक निश्चळपुरी आपल्या 'शिवराज्याभिषेक कल्पतरूं'त लिहितो :—

'तादृशे समये प्राप्तो गागाभट्टस्तु नाशिकम् ॥
स तु पूर्वजकीर्त्याप्तमहाकीर्तिः स्वतश्च हि ।
तथैव तमपि ज्ञात्वा कारणं कृतवान् शिवः ॥
आगते सविधे तस्मिन्नभिषेकाय उद्यतः ।
राजराजः शिवः साक्षादादरं कृतवान् मुदा ॥'

'शिवरायांचा साराच जीवनमार्ग कंटकाकीर्ण असल्याचा प्रत्यय त्यांना याही वेळीं आला. त्यांच्या एक राणी काशीबाईसाहेब या सुमारास आजारी पडल्या व त्यांचा आजार वाढत जाऊन दि. १६ मार्चला त्यांचें निधन झालें. महाराजांना कितीही दुःख झालें असलें तरी अशा कडू गोळ्या वारंवार गिळूनच ते मार्ग काढीत आले होते. त्याप्रमाणे त्यांचे व्यवहार सुतक संपल्यावर पुनश्च सुरू झाले. या वेळीं इंग्रजांच्या वतीने राजापूरच्या लुटींतील हानीच्या भरपाईविषयी बोलणें करण्यासाठी नारायण शेणवी हा रायगडावर आला होता. तो आपल्या दि. ४ एप्रिल १६७४ ला मुंबईच्या डेप्युटी गव्हर्नरला लिहिलेल्या पत्रांत म्हणतो : 'मंगळवार दि. २४ मार्चला रायरीला पोचलों, व त्याच दिवशीं निराजी पंडितांची भेट घेण्याकरिता पायथ्याच्या पाचाड गांवीं गेलों. चौकशी केली. तेव्हा निराजी गडावर होता असें समजलें. म्हणून माझ्या आगमनाची वर्दी गडावर राजाकडे एका नोकराकरवी पाठविली. त्याच दिवशीं निराजीचा हुकूम नोकराने असा आणिला की, 'शिवाजीचें पत्नीच्या मृत्यूचें सुतक फिटेपर्यंत तुम्ही आमच्याच घरीं राहावें.' असे रिकामपणीं पांच दिवस घालविले. मध्यंतरीं निराजी पाडव्याकरितां (२८ मार्च) आपल्या घरीं आला. दुसऱ्या दिवशीं त्याने मला आपल्याबरोबर नेऊन एका प्रशस्त घरांत माझी सरबराई केली. तेथे आणखी पांच दिवस राहिलों. काल तीन तारखेला दोन प्रहरीं निराजी मला दरबारांत शिवाजीसमोर घेऊन गेला. स्वागत व कुशल प्रश्न झाल्यावर मी राजापूरबद्दल प्रश्न काढला. निराजीने अपेक्षेपलीकडे आमची तरफदारी केली, आणि शिवाजीने ताबडतोब कारकुनांना हुकूम लिहिण्यास सांगितलें.

राजापूरची भरपाई तीन हप्त्यांनी व्हावयाची; २५०० होन राजापूरच्या जकातींतून, २५०० होन येत्या १ सप्टेंबरला सुरू होणाऱ्या पहिल्या वर्षी आणि ५००० होन त्यानंतर दोन वर्षांच्या अवधींत द्यावयाचे. अशा स्वरूपाचे कागद तीन चार दिवसांत तयार झाल्यावर ते आदिल मोदी याच्या हातीं सविस्तर हकीकत सांगून पाठवीन.... नव्या वर्षारंभीं जूनमध्ये स्वतःला राज्याभिषेक करून घेण्याच्या इराद्याने सोनें व हिरे यांचें एक भव्य सिंहासन शिवाजी बनवीत आहे. या समारंभाकरिता असंख्य विद्वान् ब्राह्मणांना बोलावून तो मोठा दानधर्म करणार आहे. या पुढे तुम्ही सिद्दीला कोणत्याही प्रकारें जवळ केल्यास शिवाजीशीं जमणार नाही असें त्याने पहिल्या भेटींतच मला सांगितलें..... आतां ऑक्झिंडेन बरोबर चांगला नजराणा देऊन त्याला लगेच पाठवावा. निराजी पंडिताचे सांगण्यावरून, तुम्ही शिवाजीच्या नजराण्यांत अरबी घोडा न पाठवितां मूल्यवान् रत्नें राज्यारोहणाच्या वेळीं धारण करण्यासाठी पाठवावी, हें बरें दिसतें.'

— (शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. १६२५)

राज्याभिषेकापूर्वी महाराजांनी निरनिराळ्या क्षेत्रीं जाऊन तेथील देवतांचें दर्शन घेतलें. मे महिन्यांत ते प्रथम चिपळूणला गेले व तेथे त्यांनी आसुरी सत्ताधिपांचें एकवीस वेळां निखन्दन करणाऱ्या भगवान् परशुरामांची मोठ्या भक्तिभावाने पूजा केली. जें कार्य महाराजांनी सोळाव्या शतकांत केलें तेंच कार्य भगवान् परशुरामांनी प्रागैतिहासिक काळीं केलें. भारताची पतनावस्था पाहून शिवरायांचे सद्गुरु श्रीसमर्थ यांनी परशुरामांचीच प्रथम आळवणी केली होती. आता कार्य सिद्धीला गेल्यावर श्री महाराजांनी या देवतेची पूजा बांधणें यथायोग्यच होतें. परशुराम क्षेत्राहून महाराज दि. १२ मेला रायगडला परत आले व चार दिवसांनंतर प्रतापगडला 'श्रीरामवरदायिनी माते'च्या दर्शनार्थ गेले. तुळजापूरची भवानी हें महाराजांचें कुलदैवत. पण ती अतिशय दूर पडत असल्यामुळे महाराजांनी त्या मातेचीच स्थापना प्रतापगडावर

केली. बलिदान हें देवीच्या पूजेचें महत्त्वाचें अंग. महाराजांनी अफझलखालाचा 'बडा बळी' देऊन भवानी मातेचा पूर्वीच आशीर्वाद मिळविला. पुष्कळ वेळां ती महाराजांच्या शरीरांत संचार करून व त्यांच्याच वाणीचा उपयोग करून संकटसमयीं त्यांना मार्गदर्शन करी असें म्हणतात. प्रतापगडावर येऊन महाराजांनी भवानी मातेची पूजा केली व तिला सव्वा मण वजनाचें सुवर्णाचें छत्र समर्पण केलें. या वेळीं महाराजांच्या दर्शनासाठी व तहाच्या वाटाघाटीसाठी आलेला इंग्रजांचा वकील हेन्री ऑक्झिंडेन दि. १९ मेच्या वृत्तांत लिहितो :—

'Sett to forwards for Rairy, and about nine of the clock came to Puncharra ( Pachad ), a towne at the foot of Rairy hill, where we understood that Sevagee was departed thence to Purtaab Gurr to visit the shrine of Bowany, a Pagode of great esteem with him and celebrate some ceremonies there in order to his coronation, having carried with him severall presents, and among the rest a golden sombrero which he has dedicated to the Pagodes use.'

–[Shivaji the great By Dr. Balkrishna Vol. II part I Page 819 ]

(आम्ही पुढे रायरीला यावयास निघालों व रायरीच्या पायथ्याशीं असलेल्या पाचाडला सकाळीं ९ वाजतां येऊन पोहोचलों. तेथे असें समजलें की राजा त्याचें महान् श्रद्धाकेंद्र असलेल्या प्रतापगडच्या भवानी देवीच्या दर्शनासाठी गेला आहे. तेथे राज्याभिषेकाशीं संबंधित असे कांही धार्मिक विधि तो करणार आहे. त्याने आपल्या समवेत देवीला अर्पण करण्यासाठी पुष्कळ वस्तु नेलेल्या असून त्यांत सुवर्णाची छत्री आहे. ती तो देवीला अर्पण करणार आहे.'

ऑक्झिंडेनने वापरलेल्या Sombrero या शब्दाचा अर्थ काय करावा यासंबंधांत मतभेद आहेत. छत्र, सोन्याचा किरीट व कलश असे तीन अर्थ श्री. बेन्द्रे यांनी केलेले आहेत. पण त्यावर स्पष्टीकरण करतांना ते म्हणतात की, 'परंतु ऑक्झिंडेन बरोबर गेलेला

जॉन फ्रायर हा देवीच्या देवळावर लावण्यासाठी सव्वा मण किंवा एकवीस शेर वजन सोन्याचा Lumbrico होता असें म्हणतो. त्यावरून ही टोपीसारखी छत्री नसून नागमोडीसारखा दिसणारा कळस असावा व L च्या जागी S चुकीने वाचलें गेलेलें असावें.'

—(श्री शिवराजाभिषेक, प्रस्तावना. पृ. २०)

विख्यात संशोधक डॉ. बाळकृष्ण यांनी आपल्या ग्रंथाच्या एका तळटीपेंत या विषयावर केलेलें स्पष्टीकरण समाधानकारक मानावयास प्रत्यवाय नाही. ते लिहितात —

'Fryer reads Lumbrico. But Sombriro is an umbrella as is clear from another passage of his book. 'The English President has a Mirchal ( Morchaal ) to keep off the sun as the ombrans have, none but the Emperor have a Sumbrero among Moguls. ( Travels in India in the 17th century. Edition 1698, Page 86. ).

-- (Shivaji the Great : By Dr. Balkrisna. Vol II, P. I, P. 9)

(फ्रेअर Lumbrico असा शब्द ऑर्क्झिडेनने लिहिला आहे असें वाचतो. पण Sombriro म्हणजे छत्र हें त्याच्या पुस्तकांतीलच दुसऱ्या एका परिच्छेदावरून स्पष्ट होतें. तो लिहितो . इंग्रजांचा अध्यक्ष उन्हाच्या निवारणासाठी अन्य उमराव वापरतात असेंच मोर्चेल वापरतो. मोगलांचा केवळ बादशहाच छत्र वापरतो. दुसरा कोणीही नाही.'

तात्पर्य महाराजांनी सव्वामण वजनाचें कुलदेवतेला सुवर्ण छत्र समर्पण केलें. प्रतापगडावरून दि. २१ ला महाराज परत रायगडावर आले. गागाभट्टांनी वस्तुत: या समारंभाचें आध्वर्यवत्व पत्करलें असलें तरी प्रत्यक्ष सर्व विधि त्यांनी भोसल्यांचे कुलोपाध्याय प्रभाकरभट्ट यांचे चिरंजीव बाळंभट्ट यांच्या हस्तेंच करावयाचें ठरविलें. तदनुसार महाराजांनी देवतादर्शनाचा व देवतापूजनाचा विधि त्यांच्या मार्गदर्शकत्वानेच पार पाडला.

राज्याभिषेकाच्या सिद्धतेंत राजधानीचा निश्चय ही सर्वांत महत्त्वाची बाब होती. हिंदवी स्वराज्याच्या या प्राणप्रतिष्ठापकाने हिंदवी स्वराज्याच्या राजधानीचा मान रायगडला द्यावयाचें ठरविलें. असें कां ठरविलें असेल?



प्रकरण चौदावें

# राज्याभिषेक महोत्सव

राजधानी ही राज्याचें एक प्रकारें केंद्र असतें, व त्यामुळे राजधानीचा मान कोणत्याही स्थळाला देण्यापूर्वी त्याच्या सुरक्षिततेचा व शत्रूचे हात तेथपर्यंत कसे पोहोचूं शकणार नाहीत या गोष्टीचा प्रामुख्याने विचार करावा लागतो. प्राचीन भारतीय राजनीतिशास्त्रज्ञ शुक्राचार्य राजधानीसंबंधी आपला अभिप्राय व्यक्त करतांना म्हणतात :—

नानावृक्षलताकीर्णे पशुपक्षिगणावृते ।
सुबहूदकधान्ये च तृणकाष्ठसुखे सदा ।।२१३
आसिंधुनौगमाकूले नातिदूरमहीधरे ।
सुरम्यसमभूदेशे राजधानीं प्रकल्पयेत् ।।२१४
अर्धचंद्रां वर्तुलां वा चतुरस्रां सुशोभनाम् ।।

—(शुक्रनीति, अ. १)

'ज्या स्थळीं नाना प्रकारचे वृक्ष, वेली व झुडपें आहेत, ज्या ठिकाणीं जनावरें व पक्षी विपुल आहेत, पाणी, धान्य, गवत, जळाऊ लाकडें यांचा सुकाळ आहे, समुद्रापर्यंत होडयांनी पोहोचण्याची ज्या ठिकाणापासून सोय आहे, जो प्रदेश डोंगरापासून फार दूर नसून सपाट व सृष्टिसौंदर्ययुक्त आहे, त्या ठिकाणीं राजाने आपली राजधानी करावी.'

येथे हें लक्षांत ठेवलें पाहिजे की, शुक्राचार्यांनी हा नियम सामर्थ्यसंपन्न असलेल्या व स्वस्थ परिस्थितींतील राजांसाठी सांगितलेला आहे. शिवाजी महाराजांनी स्वराज्यसंस्थापना करतांना ज्या शत्रूंना परास्त केलें ते त्यांच्या भोवताली पसरलेले असून स्वराज्याच्या नरडीवर नख देण्याच्या अखंड सिद्धतेंत होते. या आपल्या बलाढ्य शत्रूंचे हात जेथे मुळीच पोहोचूं शकणार नाहीत अशा टिकाणीं आपली राजधानी करणें स्वराज्याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने महाराजांना अत्यंत आवश्यक होतें. स्वराज्याची सुरक्षितता महाराजांच्या दुर्गसंपत्तीवर अवलंबून होती. त्यामुळे केवळ डोंगरापासून फार दूर नसलेल्या प्रदेशांतच नव्हे तर प्रत्यक्ष डोंगरी किल्ल्यावरच त्यांची राजधानी असणें आवश्यक होतें, व तोही डोंगरी किल्ला पुरंदर व सिंहगडासारखा वारंवार शत्रूचें आक्रमण होणारा नको होता. शिवछत्रपतींच्या अंत:करणांत राजधानीसंबंधीचे हे विचार अगदी प्रथमपासूनच घोळत होते. तंजावरच्या शिलालेखांत महाराजांनी जावळी स्वाधीन करून घेण्यांतील रहस्य सोनोपंत डबीर व महाराज यांच्या संवादाच्या रूपाने वर्णिलें आहे. त्याचा सारांश पुढीलप्रमाणे : 'शहाजी राजे परम शूर व योग्यतावंतही असतां व निजामशाही, आदिलशाही इत्यादी मुसलमान बादशाहींची उत्तम प्रकारें सेवा करूनही मानमान्यतेपलीकडे त्यांना कांही प्राप्ति न होतां, वृद्धापकाळीं साताऱ्यास येऊन राहावें लागलें! शहाजी राजे यांनी जरी आदिलशाहीचीं अनेक कामें केलीं असलीं व आम्ही जरी त्यांचे पुत्र असलों तथापि आदिलशाही बादशहाचे चित्तांत आम्ही जड झालों असून आम्हांस तोडावें म्हणूनच आहे. तसेंच निजामशाही राज्य बळकाविणाऱ्या औरंगजेबासही आम्ही एक शल्य होऊन आहों. आम्हांस तोडावें म्हणावयाचेंच आहे. हे दोन प्रबळ शत्रुमध्ये आम्ही पुरंदर गडांत असून राज्य करावें म्हणजे आम्हांस कदापि चालणार नाही. एखादे वेळेस दगा करून आम्हांस बुडवितील. याकरिता आम्ही बाहेर निघून या दोघांसही आवरावें तेव्हाच आमचा टिकाव

होईल.' (शिवाजीची राजनीति, पृ. १८९–१९०) महाराजांचें म्हणणें ऐकून सोनोपंत डबिरांनी त्यांना जावळीचें दुर्गम स्थळ घ्यावयाचा विचार सांगितला; व जावळीमुळेच महाराजांच्या हातीं रायगड लागला. मूळचाच हा दुर्गम गड महाराजांनी भावी राजधानीच्या दृष्टीने अधिकच दुर्गम बनविला व राज्याभिषेकाच्या वाटाघाटींच्या वेळीं ही आपली राजधानी महाराजांनी निश्चित केली. सभासद म्हणतो : 'गड बहुत चखोट, चौतर्फी गडाचे कडे ताशिल्याप्रमाणे दीड गांव उंच, पर्जन्यकाळीं कडियावर गवत उगवत नाही; आणि धोंडा ताशीव एकच आहे असें देखोन बहुत संतुष्ट झाले आणि बोलले तख्तास जागा हाच गड करावा.'

——(सभासदी बखर, पृ. ७१)

रायगडचा माथा बराच विस्तृत असल्यामुळे राजधानी या दृष्टीने तेथे सर्वांत अधिक व्यय करून राजप्रासाद, अमात्यांचीं निवासस्थानें, उत्कृष्ट बाजारपेठ व धान्य आणि दारूगोळा यांच्या संग्रहासाठी उत्कृष्ट कोठारें आदि महाराजांनी बांधविलीं होतीं. रायगडावर किती व्यय झाला याचा निर्देश मागे केलाच आहे. सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रांत रायगडावर राजधानी म्हणून केलेल्या बांधकामाचें वर्णन पुढीलप्रमाणे आढळतें : 'रायगड जागा बहुत थोर, बाकी, बेलाग, किल्ला फार चांगला, राजधानीस योग्य स्थल जाणून किल्ल्याचें काम इमारत आबाजी सोनदेव यास सांगून कडे तासविले, बंदिस्त केले आणि बेलाग केला. आणि आंत राज्-मंदिर, दौलत-बंक, प्रगट सभा व मंत्रसभा, धर्मसभा, व चित्रसभा व आदर्श मंदिर ऐशीं नांवें ठेऊन त्याप्रमाणे जागे बहुत तरतुदीचे व महाल राण्यांचे निराळे निराळे, याप्रमाणे खासगत राहण्याची जागा करविली. तशीच जागा घोडियांस राहण्याची चिरेबंदी लादणीचीं घरें, गजशाला, पाकशाला, कोठी वगैरे अठरा कारखाने, बारा महाल यांचीं स्थळें करविलीं. बाजार दुरस्ता चिरेबंदी जोतीं घालून करविला. मातबर सरकारकून, सरदार व कारकून लोक

यांस घरें सरकारच्या इमारती करून ठेविले. ज्याची जशी योग्यता तशीं घरें करून दिली.'

—(सप्तप्रकरणात्मक शिवचरित्र, पृ. १७२)

यांपैकी बारा महाल व अठरा कारखाने यांचें स्वरूप आजच्या लोकांस एकदम कळणें शक्य नाही. आज ज्याला कारखाना म्हणतात त्याचा या अठरा कारखान्यांशीं संबंध नाहीं व महाल म्हणजे आपण मोठा प्रासाद समजतों त्या अर्थानेही बारा महाल हा शब्द वापरलेला नाही. शिवछत्रपतींच्या काळीं निरनिराळ्या खात्यांना महाल व कारखाने म्हणत. कारखाने या संज्ञेने ओळखण्यांत येणाऱ्या खात्यांची संख्या अठरा असे व महाल संज्ञेने ओळखण्यांत येणाऱ्या खात्यांची संख्या बारा असे. महाराजांनी या शब्दांचे यावनी स्वरूप बदलून बारा महालांना द्वादश कोश व अठरा कारखान्यांना अष्टादश शाला अशीं नांवें दिलीं. इतकेंच नव्हे तर या वेगवेगळ्या खात्यांचीही यावनी नांवें बदलून त्या जागीं संस्कृत नांवें प्रचारांत आणलीं. द्वादश कोश अथवा बारा महाल यांच्या मूळ संज्ञा व महाराजांनीं त्याला दिलेल्या संज्ञा पुढीलप्रमाणे :—

(१) अंतःपुर (दरुणी महाल)
(२) द्रव्यभांडार (महालपोते)
(३) धान्यागार (महाल कोठी)
(४) अश्वधन (महालपागा)
(५) गोधन (महालथटी)
(६) आरामक्षेत्रें (महाल शेरीबाग)
(७) टंकशाला (सातवा महाल)
(८) शिबिकादियाने (आठवा महाल
(९) मंदिरें (इमारत महाल)
(१०) (महाल सौदागिरी)
(११) (महाल चौबिना)
(१२) वसनागार (जामदारखाना)

अष्टादश शाला व अठरा कारखाने

(१) गजशाला (हत्तीमहाल अथवा पीलखाना)
(२) धान्यसंग्रह (अंबारखाना)
(३) भेरीदुंदुभी (नगारखाना)
(४) यंत्रशाला (तोफखाना)
(५) वैद्यशाला (शरबतखाना)
(६) पानीयशाला (आबदारखाना)
(७) उष्ट्रशाला (शुतरखाना)
(८) शिबिरशाला (फरासखाना)
(९) खेटकशाला (शिकारखाना)
(१०) मल्लशाला (तालीमखाना)
(११) रत्नशाला (जवाहीर खाना)

(१२) पाकशाला (मुदबखखाना)
(१३) शस्त्रशाला (शिलेखाना)
(१४) तांबूलशाला (शराबखाना)
(१५) रथशाला (गाडीखाना)
(१६) (जिन्नसखाना)
(१७) लेखनशाला (दप्तरखाना)
(१८) नाटकशाला (नटखाना)

असो. महाराजांनी हिंदवी स्वराज्याच्या राजधानीचा मान ज्या रायगडला दिला त्याचें महत्त्व वर्णन करतांना डॉ. बाळकृष्ण म्हणतात :—

'The Raigurh Hill, rising about 3000 feet above sea level, is completely chipped off from the Western Ghauts. Its precipitous rocks make it inaccessible from three sides, while on the fourth, strong fortifications made it impregnable to Shivaji's enemies, but easy of access to his friends. This frowning fortress, secluded by encircling hills, is nearly equidistant from Bombay, Poona and Satara, and thus it curiously commands the sea and the land around it. Then, it is only a few miles from Mahad which, in those days, as a busy seaport whence Shivaji could conveniently secure war material and keep up communications with the chain of his seaports. It was far away from the plains which the vast armies of Aurangzeb could easily desolate. Guarded by the invulnerable defences of Torna and Rajgarh, it could long defy the hostile forces. Thus Shivaji, like the Eagle of the hills, with his penetrating eyes could from his eyrie descry his prey in all directions, but no one could approach the Lion's Den. More truly, it may be said that like an invisible Dragon, Shivaji issued forth from this 'king of Forts' to give blows to all his enemies, but eluded their blows by vanishing away to his fortifications whence he bade 'defiance to the Emperor, Gulconda, Duccan,

Portuguese and all the world, magnifying himself in his strongholds, installed Maharajah two years since.' It was on account of some such advantages that Shahaji and Shivaji selected it for the capital of the infant Maratha empire.'

—( Shivaji the great vol. II, Part 1, page 213)

ग्रोसने ( Grose ) तर रायगडसंबंधी असा अभिप्राय प्रकट केलेला आहे की, 'This must be the most completely impregnable place in the Universe. It is represented as a fortified mound of rocks, extremely high, and so steep, as by no one narrow pathway, to be accessible to human footing.'

—( Grose's Voyage of E. Indies ( 1772 ) Vol. I, P. 88. )

राज्याभिषेकाच्या वेळीं प्रत्यक्ष रायगडावर असलेला इंग्रजांचा वकील ऑक्झिडेन याने आपल्या दैनंदिनींत रायगडाचें वर्णन करतांना म्हटलें आहे : 'Leaving Puchara ( पाचाड ) about 3 of the clock in the afternoon, wee arrived at the topp of that strong mouutain about sunn sett, which is fortified by nature more than art, being of very difficult access, and but one advance to it, which is guarded by two narrow gates, and fortified with a strong high wall, and bastions there to. All the other part of the mountaine is a direct precipice, so **that it is impregnable exept the treachery of some in it bretrayes it.'**

—( Shivaji the Great Vol. II, Part I, Page 11 )

अशी ही छत्रपतींनी ठरविलेली स्वराज्याची राजधानी होती. राज्याभिषेकांतील मुख्य भाग म्हणजे सिंहासनारोहण होय. त्यासाठी सुवर्ण सिंहासन करण्याचें काम रामाजी प्रभू चित्रे यांनी केलें. या सिंहासनाचें प्राचीन साहित्यांतील वर्णन वाचूनच आपणास आपलें काम भागवावें लागणार हें उघड आहे. सिंहासनाचें

वर्णन करतांना सभासद लिहितो : 'तख्त सुवर्णाचें बत्तीस मणांचें सिद्ध करविलें. नवरत्नें अमोलिक जितकीं कोशांत होतीं त्यामध्ये. शोध करून मोठीं मोलाचीं रत्नें तख्तास जडाव केलीं. जडित सिंहासन सिद्ध केलें.' सर जदुनाथ सरकार सभासदाच्या वर्णनावर आपला अभिप्राय व्यक्त करतांना म्हणतात : 'बत्तीस मण म्हणजे चौदा लक्ष रुपयांचें सोनेंच झालें. रत्नांची किमत त्याशिवाय. हें सिंहासन तयार करीत असतांना दिल्लीचें मयूर सिंहासन शिवाजीच्या दृष्टीपुढे असावें.' --(शिवाजी व शिवकाल, पृ. १५९)

महाराजांचें हें सिंहासन प्रत्यक्ष पाहिलेला इंग्रजांचा वकील ऑक्झिंडेन त्याचें वर्णन करतांना म्हणतो : 'थोडाच वेळ आम्ही सिंहासनासमोर होतों. तेवढ्या वेळांत सिंहासनाच्या दोन्ही बाजूला सुवर्णांकित भाल्याच्या टोकावर अनेक अधिकारदर्शक व राजसत्तेचीं चिन्हें असल्याचें आम्ही पाहिलें. उजव्या हाताला दोन मोठमोठ्या दातांच्या मत्स्यांचीं सुवर्णाचीं शिरें होतीं. डाव्या हाताला अनेक अश्वपुच्छें व एका मूल्यवान् भाल्याच्या टोकावर सम पातळींत लोंबणारी सोन्याच्या तराजूचीं पारडीं, न्यायचिन्ह म्हणून तळपत होतीं.' --(शिवकालीन पत्रसारसंग्रह. पत्र क्र. १६४३)

सिंहासनाच्या अष्ट दिशांना आठ रत्नजडित स्तंभ असून मस्तकावर धरण्यासाठी जडावाचें व मोतीलग झालरीचें छत्र सिद्ध करण्यांत आलें होतें.

प्रतापगडावरून महाराज परत आल्यावर राज्याभिषेकाच्या एकेका धार्मिक विधीला प्रारंभ झाला. या सुमंगल महत्पर्वासाठी रायगडला महत्त्वाचे पाहुणे, ब्राह्मण व स्वराज्यमंदिराच्या पायाभरणीसाठी क्षणशः व कणशः जीवन जाळलेले अनेक लोक यांची एकच गर्दी उसळली असली तर त्यांत नवल नाही. पण या संबंधांत बखरकारांनी केलेलीं वर्णनें मात्र हास्यास्पद व अतिरंजित आहेत. मल्हार रामराव चिटणीस यांनी अतिरंजिततेचा उच्चांक गाठून या संबंधांत साऱ्या बखर लेखकांना मागे टाकलें आहे. पांच ते दहा लक्ष पाहुणे व पन्नास सहस्र ब्राह्मण असें त्यांनी वर्णन केलें

आहे. पाहुण्यांत एकदम पांच लक्षांनी वाढ होणें म्हणजे चिटणिसांच्या दृष्टीने कांहीच नाही. पण ज्यांनी रायगड प्रत्यक्ष पाहिला आहे त्यांना, इतके लोक तेथे सामावण्याची शक्यता नाही हें सहजच ध्यानांत येईल. सर जदुनाथ सरकार लिहितात : 'समारंभासाठीं हिंदुस्थानांतील सर्व ठिकाणचे विद्वान् ब्राह्मण मुद्दाम बोलाविण्यांत आले होते. आणि हा अभूतपूर्व समारंभ पाहण्यासाठी शेकडों लोक आपण होऊन आले. एकंदर अकरा हजार ब्राह्मण सकुटुंब सपरिवार रायगडावर जमले होते. म्हणजे त्यांचीच संख्या पन्नास हजारांजवळ गेली होती. त्या सर्वांना पंच पक्वान्नांचें जेवण नित्यही मिळत असे. त्याशिवाय इतर पाहुणे, सरदार व आप्तमंडळी, राज्यांतील बहुतेक अंमलदार, इतर राजांचे वकील, परदेशी व्यापारी व प्रवासी ही सगळी मंडळी मिळून सुमारे पन्नास हजारांची संख्या झाली होती. याप्रमाणे राज्यारोहणासाठी सरासरी एक लक्ष लोक जमले असून प्रत्यही दोन वेळां रायगडावर लक्ष भोजन होत होतें. आणि स्वाऱ्या करण्यांत, देश जिंकण्यांत जसें शिवाजीचें चातुर्य पदोपदीं दिसतें, तसेंच तें या एक लक्ष लोकांच्या राहण्याची व जेवणखाणाची बरदास्त ठेवण्यांतही दिसतें. इतक्या लोकांच्या सुखसोयींचा आगाऊ पूर्ण विचार करून सर्व व्यवस्था करण्यांत निःसंशय शिवाजीची दूरदृष्टि प्रतीतीस येते, असें तत्कालीन इंग्रज लेखकांनीही लिहून ठेविलें आहे.'

—(शिवाजी व शिवकाल, पृ. १५६)

श्री. बेन्द्रे यांच्या मतें या महोत्सवासाठी एक सहस्र ब्राह्मणांचा समूह जमला होता. अर्थात् हे म्हणजे राज्यांतील व दूरदूरचे महाराजांनी हेतुतः निमंत्रिलेले निरनिराळ्या वेदांचे व शाखांचे पढिक ब्राह्मण होत. सर्व पवित्र मृत्तिकांचा संग्रह करण्यांत आला. गागाभट्टांच्या आज्ञेप्रमाणे भारतांतील सर्व पवित्र नद्यांचें व सागरांचें पाणी आणविण्यांत आलें. चातुर्मास्यापूर्वी समारंभ पार पाडणें आवश्यक असल्यामुळे ज्येष्ठ महिन्यांत मुहूर्त ठरविणें क्रमप्राप्त झालें.

दि. २१ मेला महाराज प्रतापगडावरून रायगडला आले व एक आठवड्यानंतर महाराजांना संस्कारित करून घेण्यासाठी वेदमूर्ति गागाभट्टांनी त्यांचा उपनयन संस्कार केला. दि. २९ मेला महाराजांचें मौंजीबंधन झालें. शकावलींत असा उल्लेख आहे की, 'ज्येष्ठ शुध ४ घटी ५ राजश्रींची मुंज झाली.' कांही ठिकाणीं महाराजांचा उपनयनसंस्कार चतुर्थी व पंचमीला झाला असा उल्लेख आहे. त्यावर श्री. बेन्द्रे यांनी केलेलें स्पष्टीकरण कोणालाही पटण्यासारखें आहे. ते लिहितात 'हा विधि निव्वळ धर्मशास्त्रासाठी व्हावयाचा होता, तर त्याला दोन दिवस कां लागावे अशी शंका उत्पन्न होते. परंतु या उल्लेखांत चूक नसून या दोन्हीही तिथी एकाच दिवशीं आल्या होत्या. शुक्रवारीं चतुर्थी सूर्योदयानंतर अवघी सहा घटिका होती व पांचव्या घटिकेला मुंज लागली व होमादि विधि पुढे दोन तास चालले. साहजिकच मुख्य विधि पंचमींतच गेला.' —(श्रीशिवराजाभिषेक, प्रस्तावना पृ. २२)

श्री शिवरायांचा हा उपनयन संस्कार गागाभट्टांनी क्षत्रियांच्या पद्धतीने केला हें उघडच आहे. पण केवळ इतिहासच जे पाहतात व त्याच्याशीं संबद्ध असलेल्या अन्य शास्त्रांकडे पाहत नाहीत त्यांची महाराजांच्या या उपनयन संस्काराकडे पाहण्याची दृष्टि अशास्त्रीय वर्णनाकडे प्रवृत्त होते. उदाहरणार्थ, श्री. बा. मो. पुरंदरे यांच्या 'श्रीराजा शिवछत्रपति' या बखरवजा शिवचरित्रांतील उपनयन संस्काराचें वर्णन पहा. श्री. पुरंदरे यांनी शिवचरित्रावरील सुंदर बखर (एकता मासिक) सजवितांना उपलब्ध आधारग्रंथांचा अधिकांश उपयोग केलेला आहे. पण उपनयन संस्कार हा धार्मिक विधि असल्यामुळे त्याचा उलगडा करतांना केवळ शिवचरित्रावरील साहित्य न पाहतां धर्मशास्त्र पाहण्याची आवश्यकता आहे हें ते विसरले. ते लिहितात 'शुद्ध चतुर्थी उजाडली. स्त्रियांची, पाहुण्यांची, शास्त्रीपंडितांची मंगल वर्दळ सुरू झाली. मुहूर्ताची घटिका घंगाळांत हेलावूं लागली. हजारो वैदिक ब्राह्मणांच्या, अग्नीच्या व सूर्याच्या साक्षीने महाराज मुंजीसाठी सिद्ध झाले.

मुंज मुलाचें वय त्या वेळीं अवघे चव्वेचाळीस वर्षांचें होतें! मुंज-मुलाचीं एकूण दहा लग्नेंही आधीच झालीं होतीं! मुंजमुलाला सहा मुली आणि दोन मुलगे झालेले होते! आणि आता त्या कन्यापुत्रांच्या देखत वडिलांची मुंज साजरी होत होती! हा योग कांही न्याराच हं! गागाभट्टांनी व बाळंभट्टांनी सर्व पौरोहित्य केलें. वाद्यें दणाणलीं. पंचारत्या झाल्या. महाराजांच्या गळ्यांत यज्ञोपवीत आलें. अग्नीच्या साक्षीने महापवित्र गायत्री मंत्राची महाराजांनी दीक्षा घेतली. आता महाराज संस्कारयुक्त क्षत्रिय झाले. या गायत्री मंत्राचें केवढें माहात्म्य आणि सामर्थ्य आहे, हें माहीत आहे का? मर्हषि विश्वमित्रांनी या मंत्राच्या पुरश्चरणानेच प्रतिसृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्य मिळविलें होतें. 'ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि। धियो यो नः प्रचोदयात्। (तें सूर्याचें दिव्य तेज आम्ही सदैव चिंतितों. तें दिव्य तेज आमच्या बुद्धीला प्रेरणा देवो.) असा आहे हा मंत्र.'

—(राजा शिवछत्रपति. भाग ९ वा, पृ. १४०)

भाषेच्या व जिव्हाळ्याच्या दृष्टीने हें सगळें वर्णन चांगलें असलें तरी तें अशास्त्रीय म्हणून अनैतिहासिक व चूक आहे. शिवछत्रपतींना जो संस्कार करावयाचा होता तो ब्राह्मणांचा उपनयन संस्कार करावयाचा नसून क्षत्रियांना करावयाचा उपनयन-संस्कार होता, व तो करणारे गागाभट्ट हे महामीमांसक व धर्म-शास्त्रपंडित होते. श्री. पुरंदरे यांनी जो गायत्रीमंत्र उल्लेखिलेला आहे तो क्षत्रियांचा गायत्रीमत्र नसून ब्राह्मणांचा आहे. ब्राह्मण, क्षत्रिय. वैश्य या त्रैवर्णिकांचे उपनयनसंस्कार होत असले तरी त्या प्रत्येकाचे गायत्रीमंत्र वेगवेगळे आहेत. ब्राह्मणांच्या गायत्रीमंत्राचा वापर क्षत्रियांच्या उपनयन संस्काराच्या वेळीं करणें धर्मशास्त्रा-विरुद्ध असल्यामुळे महामीमांसक गागाभट्ट ही चूक कधीही करणार नाहीत हें उघडच आहे. आपण ज्याला गायत्रीमंत्र म्हणतों त्याचें वास्तविक नांव सावित्रीमंत्र असें आहे. सावित्रीमंत्र म्हणजे सूर्याचा मंत्र. ब्राह्मणांचा सावित्रीमंत्र गायत्रीछंदांत असल्यामुळें

त्या मंत्रालाच गायत्रीमंत्र म्हणूं लागले, व पुढे सर्वांच्याच सावित्रीमंत्रालाही गायत्रीमंत्र हें नांव रूढ झालें. क्षत्रियांचा सावित्रीमंत्र त्रिष्टुभ्वृत्ताचा असून तो पुढीलप्रमाणे आहे :—

'आ कृष्णेन रजसा वर्तमानो निवेशयन् अमृतं मर्त्यं च ।
हिरण्मयेन सविता रथेना देवो याति भुवनानि पश्यन् ॥'
—(ऋग्वेद १, ३५, २)

'कृष्णवर्ण अंतरिक्षांतून मार्ग आक्रमण करीत आणि अमर्त्य व मर्त्य या सर्वांना आपापल्या उद्योगांस प्रवृत्त करीत सर्व भुवनांचें अवलोकन करणारा सविता हा आपल्या सुवर्णमय रथांत बसून आगमन करीत आहे.' हा मंत्र ब्राह्मणांच्या मंत्राप्रमाणे सविता देवतेला केवळ 'बुद्धि दे रघुनायका' (धियोयोन प्रचोदयात्) अशी मागणी करीत नसून त्याचें अंधकाराला भेदून विजयाचा मार्ग आक्रमण करणें, सर्वांना कार्यप्रवृत्त करणें व सुवर्णरथांत आरूढ होणें या सर्वांचें स्मरण करतो. क्षत्रियांच्या कर्तव्याच्या दृष्टीने त्यांच्या या उपासनामंत्राची योजना करण्यांत आली आहे. वैश्यांचा सावित्री मंत्रही त्यांच्या वर्णकर्तव्याप्रमाणेच वेगळा व त्यास अनुरूप असा आहे. असो. गागाभट्टांनी क्षत्रिय असलेल्या महाराजांचा उपनयन संस्कार ज्याप्रमाणे क्षात्र पद्धतीनेच केला त्याचप्रमाणे त्यांना ब्राह्मणांच्या गायत्रीमंत्राचा उपदेश न करतां वर उल्लेखिलेल्या, क्षत्रियांच्या सावित्री अथवा गायत्री मंत्राचाच उपदेश केला हें निर्विवाद आहे.

मौंजी बंधनानंतर अपराह्णकालीं, कालातिक्रमाने उपनयन संस्कार झाल्याचें प्रायश्चित्त म्हणून गागाभट्टांनी तुलादानविधि व ब्रह्महत्यादि पातकांच्या क्षालनार्थ 'तुलापुरुषदान विधि' महाराजांच्या हातून करविले. सुवर्ण, रौप्य, सप्तधान्यें इत्यादिकांनी महाराजांची तुला करून तें तें द्रव्य व पदार्थ ऋत्विजांना दान करण्यांत आले. तुला पुरुषदानविधींत सुवर्णाची महाविष्णूची प्रतिमा करून तिची प्रतिष्ठापना, पूजा व होम झाल्यावर ती ब्राह्मणांना दान करण्यांत

आली. निश्चळपुरी गोसावी हा तांत्रिक त्या वेळीं रायगडावर होता. तो या विधींचा उल्लेख करतांना म्हणतो :—

प्रायश्चित्तं पूर्वं पापशमनायाथ कारितम् ।
गागाभट्टेन राज्ञोऽपि गोदानैर्बहुदक्षिणैः ।।
श्वोभाविन्यपदेशे च मुहूर्ते शत्रुनाशकाः ।
ततस्तुलासमारंभो ब्राह्मणानां सुखावहः ।।
शिवराजमहोत्साहे तुलापुरुषसंज्ञके ।।

या प्रायश्चित्त विधींचें दान घेण्याचा अधिकार गागाभट्टांनी केवळ ऋत्विजांनाच दिल्यामुळे रायगडावर जमलेले निश्चळपुरी-सारखे जापक व तांत्रिक रुष्ट झाले. त्यांचा अशास्त्रीय हस्तक्षेप गागाभट्टांनी चालू दिला नाही.

या समारंभाच्या वेळीं इंग्रजांचा वकील ऑक्झिडेन रायगडावर होता. तो या दिवशींच्या विधीचें वर्णन करतांना लिहितो :–

'This day the Rajah according to the Hindoo custome was weighed in gould and Paiyed about 16,000 Pagotnas, which money, together with one hundred thousand more, is to be distributed after his coronation unto the Braminys, who in great number are flockt hither from all the adjacent countrys.'

(Oxinden's Narrative,English Factory Records, No.486,P.374)

दि. १३ ऑक्टोबर १६७४ ला वेंगुर्ल्याच्या डच वखारीचा अधिकारी Abraham to Feber याने आपल्या गव्हर्नर जनरलला पाठविलेल्या पत्रांत या दिवशींच्या राज्याभिषेक विधीचें वर्णन करतांना म्हटलें आहे :—

'The freebooter Suasy has been making preparations for sometimes past for having himself crowned king, and in the month of June (New style) everything was ready and the Brahmans and Bhutts (who are learned men of the highest caste), and 11000 persons from many places round about

with their wives and children, were assembled to perform the ceremony, according, to the custom of the country, near the castle of Rairy ......... this however, they refused, but one of the chief among them complied, and Suasy ordered, 7000 pagodas to be given to him as a present. This day was given up to the ceremony ( Upanayan ) and a sum of 17000 pagodas distributed to the crowd which had collected to withness it. On the 14th June ( 4th New Style ) Suasy made a great distribution to the learned men, for the washing away of the sins he had committed, of gold to the weight of his body ( weighing 17000 pagodas or about 160 pounds ) and the same of silver, copper, spelter, tin, lead, and iron, and of very fine linen, camphor, salt, nails, nuts, and mace, with the same quantity of other native spices, butter, sugar, etc. of all fruits and all sort of eatables, betel and arrack included, he also gave to the weight of his body. Two of the learned men proposed 1600 pagodas in addition on account of the sin Suasy might have committed by his burnings, involving the death of women, children, cattle and Brahmans.'

—( Dutch Records, Vol. XXXIV, No. 841 )

शनिवार दि. ३० मे १६७४ ज्येष्ठ शु. ६ ला महाराजांनी आपल्या विवाहित राण्यांशीं पुन्हा समंत्रक विवाह केला. महाराजांचे या राण्यांशीं पूर्वीच विवाह झाले असले तरी ते विशुद्ध क्षत्रिया-प्रमाणे वैदिक मंत्रांच्या संस्कारांनी झालेले नव्हते. उपनयन या वैदिक संस्काराप्रमाणेच राज्याभिषेकापूर्वी विवाह हा वैदिक संस्कार होणेंही अत्यावश्यक होतें. म्हणून त्याच राण्यांशीं वैदिक संस्काराच्या स्वरूपांत महाराजांचा विवाह झाला. धर्मशास्त्राचा हा बारकावा ऑक्झिडेनसारख्या परक्या इंग्रजाच्या ध्यानांत येण्यासारखा

नसल्यामुळे विवाहसंस्कार झाला याचा अर्थ महाराजांनी नवीं लग्नें केलीं असा त्याने केला व फारशी आणि इंग्रजी कागदपत्रांना शिरोधार्थ समजून इतर प्रमाणांना तुच्छ मानणाऱ्या सर जदुनाथ सरकारांनी आपल्या शिवाजीवरील ग्रंथांत तीच चूक केली. सरकार लिहितात : 'शिवाजीने एक लग्न केलें व नंतर थोडे दिवसांनी आणखी दोन लग्नें केलीं.' —(शिवाजी व शिवकाल पृ. १६२)

पण हें पूर्णपणें अनैतिहासिक आहे. महाराजांनी नवीं लग्नें केलेलीं नसून पूर्वीच्याच राण्यांशीं समंत्रक विवाहसंस्कार राज्याभिषेक विधीची आवश्यक सिद्धता म्हणून केलेला आहे. शिवचरित्र साधनांत अत्यंत महत्त्वाचें साधन जे शकावल्या त्यांत असा उल्लेख आहे की 'ज्येष्ठ शु. ६ शनिवारीं **समंत्रक** विवाह केला.' ऑक्झिंडेन दि. ८ जूनला महाराजांनी विवाह केल्याचें लिहितो.

'The Rajah was married to a fourth wife without any state or ceremony.'

सर जदुनाथ सरकारांनीही याच गोष्टीची री ओढलेली आहे. पण ही गोष्ट खरी नाही. जेधे शकावलींत तिचा उल्लेखही नाहीं. राज्याभिषेक समारंभाच्या वेळीं तेथे उपस्थित असलेला महान् तांत्रिक निश्चळपुरी याच्या वर्णनाने या गोष्टीवर उत्कृष्ट प्रकाश पडतो. निश्चळपुरी लिहितो :—

एवं धृतव्रतो राजा **योषिद्भिस्ताभिरेवहि** ।
विवाहितो नराणां तु पश्यतां परमोत्सवम् ॥४४॥
—(राज्याभिषेक कल्पतरु, शाखा ३)

'या प्रमाणे उपनयन संस्कार झाल्यावर राजाने आपल्या त्याच राण्यांशीं पुनश्च (समंत्रक) विवाह केले. पाहणाऱ्या लोकांना तो मोठाच सोहळा वाटला.'

महाराजांच्या राज्याभिषेक समारंभाला या विवाह दिनापासूनच प्रारंभ झाला. विवाहानंतर महाराजांनी राज्याभिषेकासंबंधीचा पुढील संकल्प सोडला.

मम प्रजापरिपालनाधिकारसिद्धिद्वारा परमेश्वर-
प्रीत्यर्थं साम्राज्यादिकफलप्राप्तर्थ्यं गणेशपूजनं
तदंगत्वेन ब्राह्मणैः पुण्याहवाचनं मातृकावसोर्द्धारा-
पूजनं नांदीश्राद्धं पुरोहितवरणादिकं च करिष्ये।

—(गागाभट्टकृत राजाभिषेक प्रयोग पृ. ११)

गागाभट्टांच्या राजाभिषेक प्रयोगाच्या पोथीवरून या महन्मंगल प्रसंगीं प्रत्येक दिवशीं कोणकोणतीं धार्मिक कृत्यें झालीं याचें श्री. बेन्द्रे यांनी तपशीलवार वर्णन केलें आहे. त्यांतील कांही भाग येथे वाचकांच्या जिज्ञासातृप्तीसाठी उद्धृत करतों :—

'याप्रमाणे प्रथम गणेशपूजन, कलशसंस्थापन, व नंतर पुण्याहवाचन, यजमानास अभिषिचन, षोडश मातृकापूजन, नांदीश्राद्ध, पुरोहितवरण(मधुपर्क), रक्तसूत्रकंकण व पट्टबंधन इत्यादि विधि झाले. नंतर ऋत्विग्वरणाविना विनायकशांति होमासहित झाली. बलि दिला. शेवटीं आचार्यांना दान, वस्त्रें व इतर ऋत्विजांना यथाशक्ति दक्षिणा दिल्यावर 'विनायकांबिकयोरुत्तरपूजा' झाली. आचार्यांस नमस्कार करून विभूति लावल्यानंतर 'अग्निविसर्जन' केला. पहिल्या दिवसाचा विधिसमारंभ संपला. या प्रथम भागांत महाराजांच्या नांवाचा उल्लेख आला आहे तो असा :—

'विष्टर अर्चेत . . . अतिसृष्टो द्वेष्टयां योऽस्मान्
द्वेष्टि यं च वयं द्विष्मः । शिववर्मणः च दातुः ॥'

**रविवार ३१ मे द्वितीय दिन** :— पूर्व रात्रीं महाराजांनी आवश्यक फलशाकाहार, भूशय्या व ब्रह्मचर्य पाळलें. दुसऱ्या दिवशीं ऐन्द्रीशांतीचें कार्य ठरलें होतें. त्याप्रमाणे 'करिष्यमाण राजाभिषेकांगत्वेन ऐन्द्रीशांति करिष्ये ॥' असा संकल्प सोडून कार्यारंभ केला. प्रथम कुंडांत अग्निप्रतिष्ठा झाली. इंद्राणीचें पूजन, चतुष्कुंभ स्थापन व त्यांत बलिदान होऊन ऐन्द्रीशांतिविधि पूर्ण झाला. आचार्य व ऋत्विग् यांना यथाशक्ति हिरण्यदक्षिणा दिली. याही पोथीच्या भागांत शिवाजी महाराजांचा उल्लेख आहे. 'ब्रह्मचारिणं शिववर्मणः काममिमं राजा राजाभिषेकं संवर्द्धय वैश्रवणाय राज्ञे नमः'

या शांतीनंतर 'ऐन्द्रीशान्त्यङ्गत्वेन ऐशानयागं करिष्ये' असा संकल्प सोडून 'ऐशानयाग' झाल्यावर या दिवसाचा विधिकार्य समारंभ संपला.

**सोमवार १ जून तृतीयदिन** .— तिसऱ्या दिवसाच्या कार्याला 'ऐन्द्रीशान्त्यंगत्वेन ग्रहयज्ञं करिष्ये' या संकल्पाने प्रारंभ झाला. ग्रहयज्ञानंतर नक्षत्रहोम केला. धेनुशंखादि दक्षिणा ग्रहयज्ञाबद्दल व घृतादि दक्षिणा नक्षत्रहोमाबद्दल दिल्यानंतर ब्राह्मणभोजन झालें.

**मंगळवार २ जून चतुर्थदिन** :– मंगळवार व नवमी हे दोन्हीही योग राज्याभिषेकाच्या कोणत्याही कार्यास निषिद्ध किंवा वर्ज्य असल्यामुळे हा दिवस भाकड मोडावा लागला.

**बुधवार ३ जून पंचमदिन** :— पांचव्या दिवसाचें कार्यही 'ऐन्द्री शान्त्यंगत्वेन नक्षत्रयज्ञं करिष्ये' या संकल्पानंतर सुरू झालें. उत्तर पूजनानंतर आचार्यांना ज्या प्रतिमा द्यावयाच्या त्या दिल्या.

**गुरुवार ४ जून षष्ठमदिन** .– रात्रीं निर्ऋति याग. या भागांत इतर यागद्रव्यांत पक्व व अपक्व मांस, मत्स्य व सुरा यांचेंही बलिदान झालें. कृष्णवस्त्र धारण करून हा विधि केला. कृष्णपुष्प गंधांनीच पूजा केली. हें कार्य उरकल्यानंतर स्नान करून, शुभ्रवस्त्र परिधान करून पुण्याहवाचन झालें. गाई, दक्षिणा वगैरे देणें झाल्यावर या दिवसाचा कार्यक्रम संपला.

नंतर मुख्य राज्याभिषेक विधीस प्रारंभ झाला. शुक्रवारीं २२ घटिका ३५ पळें द्वादशी होती. त्रयोदशीचा मुहूर्त असल्याने सायंकाळपासून पहाटेपर्यंत हा धार्मिक विधि चालला. राजाभिषेक सिंहासनारोहण व राजदर्शन असे तीन समारंभ त्रयोदशीस झाले. त्रयोदशी शनिवारी १९ घटिका ४९ पळेंपर्यंत होती. ऑक्झिंडेन लिहितो :—

'June 5th. Neragy Pundit ( Niraji Raoji Pandit ) sent me word that on the morrow about 7 or 8 in the morning the Rajah Sevajee intended to ascend his throne and he would take it kindly if I came to congratulate him therein.

. . . डच वखारवालाही वेंगुर्ल्याहून या समारंभाबद्दल माहिती देतो की :—

'On the 15th of June (5th New Style) all the fitting ceremonial having been accomplished he (Suasy) washed his body with water from the Ganges, which had been brought for the purpose, and gave to each Brahman that day 100 pagodas and to the chief of them 5000 pagodas and promised to give him 2000 pagodas a year. On the 16th (i. e. 6th New Style) of June he seated himself on the New Throne which had been made ready, and was invested by the assembly with the name Sivaraj.'

उपरिनिर्दिष्ट दोन्ही पत्रांवरून असें दिसतें की, राजदर्शन समारंभ ६ जून रोजीं सकाळी ७–८ चे सुमारास करण्याचें ठरलें असावें. त्या पूर्वी पहिले दोन समारंभ उरकले. शकावल्या व बखरी यांतील नोंदी सिंहासनारोहणाचा मुहूर्तकाल निर्दाशित करतात. शकावलीतील नोंद सूर्योदयात् तिथिगणनेने दिली आहे. पंचांगांत ही पद्धति स्वीकारलेली असते. ज्योतिषदृष्टचा मुहूर्त व चंद्रसूर्य यांच्या राशी नक्षत्रांच्या गतीवरून मोजतात व दर्शवितात. शकावलींतील नोंद 'ज्येष्ठ शुद्ध १२, शुक्रवार घटी २१, पळे ३४, विष्कंभ ३८, घटिका ४०, पळे सि. ४२. तीन घटिका रात्री उरली.' (शनिवार सूर्योदयापूर्वी तास सव्वातास म्हणजे नेहमी ज्या वेळेला गर्गाचार्यांचा मुहूर्त म्हणून संबोधतात ती वेळ) तेव्हा शिवाजी राजे सिंहासनी बैसले. छ. १० रबिलावल (शुक्रवारीं सायंकाळीं सुरू होतो.) सु॥ खमस सबैन अलफ (आरबी किंवा फसली सन १०८४)'

या वरून राजाभिषेकविधि शुक्रवारीं सकाळीं व सायंकाळीं झाला. खास राजाभिषेकाच्या विधीस शुक्रवारीं सूर्यास्ताचे समयीं प्रारंभ झाला, व तो रात्रभर चालला, शनिवारीं पहाटें सिंहासनारोहणविधि झाला. सकाळीं ७–८ वाजतां राजदर्शन वगैरे दरबारी

समारंभ झाला. वरील स्पष्टीकरणाने इतिहासलेखकांच्या लिहिण्यांत द्वादशी आणि त्रयोदशी व शुक्रवार आणि शनिवार यांचा घोटाळा कां झाला आहे हें कळेल. वास्तविक हा कालदर्शनपद्धतीचा फरक आहे. मूळ प्रसंगाच्या कालाचा नाही.

शुक्रवारीं सकाळीं ऐन्द्रीशान्ति झाली व सायंकाळीं राजाभिषेक विधीस प्रारंभ झाला. गणेशपूजन, स्वस्तिवाचन, मातृकापूजन, वसोद्धारापूजनानंतर नांदीश्राद्ध, नारायणपूजन, व आज्यहोम केला. आज्याहुति दिल्यानंतर राजाभिषेक विधीस प्रारंभ झाला. यजमान सपत्नीक आल्यानंतर मंडपपूजा झाली. महावेदीभोवती प्रत्येक दिशेस चार चार कुंभ स्थापिले. पूर्वेस सुवर्णकुंभ, दक्षिणेस रजतकुंभ, पश्चिमेस ताम्रकुंभ, व उत्तरेस मातीचे कुंभ ठेवून त्यांतील एकेकांत घृत, दुग्ध, दधि व जल भरलें. पूर्वेच्या कुंभांत फक्त मधु व इतरांत जल भरलें. ते कुंभ पल्लवपुष्पांनीं सुशोभित करून त्यांच्या गळयास वस्त्रवेष्टन करून ठेविलें. औदुंबर शाखांची आसंदी केली होती ती स्थापिली. त्याशिवाय अनेक नद्यांच्या व सागरांच्या पाण्यांचे कुंभ आणि रत्न, गंध, पुष्प, फल इत्यादि ओषधिपूर्ण जलांचे कुंभ जवळ ठेविले. नंतर महावेदीवर अग्नीची व ग्रहांची प्रतिष्ठा केली. त्यानंतर सर्वप्रधानहोम केला. या होमाचे प्रसंगीं सर्ववेदीय व शाखीय ब्राह्मणांनी वेदमंत्रांचा घोष केला. जापकांनी जप व द्वारपाळांनी द्वारजप (जयघोष) त्याच वेळीं केला या सर्वांच्या जागा प्रथम नेमून दिल्या होत्या, व कोणी कोणते मंत्र म्हणावयाचे तेंही ठरवून दिलें होतें. अशा तऱ्हेने पूर्णाहुति दिल्या. नंतर यजमान अभिषेकशालेंत गेले. सुगंधी तैलें व चूर्णें यांनी व उष्णोदकांनी महाराजांचें समंत्र स्नान झालें. नंतर महाराज शुक्लवस्त्र परिधान करून व गंधमाल्यादि पदार्थांनी स्वतःला अलंकृत करून पीठावर आले. त्या ठिकाणीं निरनिराळ्या पुण्यक्षेत्रांतील पावन मृत्तिका उच्च मंत्रघोषांत त्यांना लावून पंचामृतस्नान घालण्यांत आलें. त्यानंतर महाराजांनी पुनश्च शुक्लवस्त्र परिधान करून चंदनाची उटी लावली, वेदमंत्राचा मंगलघोष चालू असतां मंडपांत प्रवेश केला.

वेदीवर प्रतिष्ठापित केलेल्या आसंदीवर पावलांचा स्पर्श होऊं न देतां, दोन गुडघे टेकून त्यांनी विधिपूर्वक आरोहण केलें. व अभिषेकास प्रारंभ झाला. या ठिकाणीं महाराजांना आचार्य व सांवत्सर पुरोहित यांनी समंत्र अभिषिचन केलें. नंतर त्यांनी आसंदीखाली उतरून अग्नीजवळ येऊन प्रार्थना केली. तेथून अभिषेक शालेंतील सुवर्णसिंहासनावर आरोहण केलें. याप्रमाणे वैदिक विधीप्रमाणे इंद्र म्हणून केलेल्या अभिषेकाने प्रतिमहेंद्र झालेला राजा सिंहासनावर बसविल्यानंतर अमात्यमंडळाने महाराजांना आपला अभिषिक्त राजा मानून तेथून पुन्हा मंगल घोषांत त्यांना अभिषेक शालेंत नेण्यासाठी ते त्यांच्याजवळ आले. अमात्य मंडळांतील ब्राह्मण अमात्यांनी महाराजांचा हात धरला व

महते क्षत्राय महते आधिपत्याय महते जानराज्याय
एष वो भरता राजा सोमोऽस्माकं ब्राह्मणानां राजा।

हा मंत्र म्हणत निरनिराळ्या पवित्र जलांनी महाराजांना अभिषेक करण्याकरिता ते अभिषेकशालेंत घेऊन गेले. महाराजांचे सर्व अधिकारी त्या ठिकाणीं उपस्थित होते. या वेळीं जडावाचा कंबरपट्टा महाराणी सोयराबाईने घातला होता. युवराज संभाजी महाराणी सोयराबाई व महाराज सुवर्णासनावर बसले. आठ दिशांना अष्टप्रधान उभे होते. पूर्वेला पंतप्रधान मोरोपंत पिंगळे घृतपूर्ण सुवर्णकलश घेऊन उभे राहिले. आग्नेयेस अनाजीपंत पंतसचिव छत्र घेऊन उभे राहिले. दक्षिण दिशेला सेनापति हंबीरराव मोहिते दुग्धपूर्ण रौप्य कलश घेऊन उभे राहिले. नैर्ऋत्येस त्र्यंबकपंत सुमंत व्यजन (पंखा) घेऊन उभे राहिले. पश्चिमेस रामचंद्रपंत अमात्य दधिपूर्ण ताम्रकलश घेऊन उभे राहिले. वायव्येस दत्ताजीपंत मंत्री मोर्चेल घेऊन उभे राहिले. उत्तरेस रघुनाथपंत पंडितराव मधुपूर्ण सुवर्णकलश घेऊन उभे राहिले. इशान्येस निराजीपंत न्यायाधीश हे दुसरें मोर्चेल घेऊन उभे राहिले उजव्या बाजूला पत्रलेखक बाळाजी आवजी व डाव्या बाजूला गणक लेखक चिमणाजी आवजी हे उभे राहिले. पुनश्च निरनिराळ्या कुंभांतील उदकांनी क्रमशः महाराजांना अभिषेक सुरू झाला. मंत्रघोष चालू होता.

'इमं देवा असपत्नं सुवध्यं महते क्षत्राय महते ज्येष्ठाय महते राजातराजस्योंद्रियाय·· विष एष वोमी राजा सोमो अस्माकं ब्राह्मणानां राजा----'

या अभिषिचनांत सर्व वर्णांनी एकत्रित भाग घेतला होता. अभिषेकानंतर पुत्रवती सुवासिनींनी ह्या आपल्या बंधुरायाला परम श्रद्धेने व प्रेमाने ओवाळलें. महंमद बिन कासीमच्या आक्रमणापासून त्यांच्या चारित्र्यावर रोखलेलें खड्ग मुठीपासून तोडून टाकणाऱ्या या अवतारी पुरुषाविषयी त्या साध्वीच्या मनांत केवढी अपार श्रद्धा असेल! महाराजांनी पुनश्च स्नान केलें. नंतर काशाच्या परातींतील घृतांत मुखावलोकन करून व ब्रह्मवृंदांना दक्षिणा व अमात्यांना देणग्या देऊन महाराजांनी नवे वस्त्रालंकार अंगावर धारण केले. महाराज तेथून मंडपांत आले व त्यानंतर गागाभट्टा-बरोबर रथाजवळ गेले. रथविषयक सर्व अवयवांची पूजा करून महाराजांनी अश्वांची पूजा केली; व त्याच्यावर ध्वज आणि छत्रांची स्थापना करून महाराजांनी रथावर आरोहण केलें. समंत्र धनुष्य धारण करून त्यांनी सर्व धार्मिक विधि केला. त्यानंतर मंडपांत परत येऊन सुवर्णासनावर आरूढ होऊन त्यांनी अक्षक्रीडा केली. हे सर्व विधि होईपर्यंत प्रभातकाळ होत आला होता. प्रभात काळींच सिंहासनारोहणविधि होता. उत्कृष्ट वस्त्रेंभूषणें धारण करून महाराज राजसभेंत यावयास निघाले. सभामंदिर सर्व दृष्टींनी उत्कृष्ट शृंगारलें होतें. तेथील भिंतीवर धर्माज्ञेप्रमाणे निरनिराळीं बत्तीस शुभलक्षणी चिन्हें व शुभ वृक्षांचीं चिन्हें काढलीं होतीं. सभागृहाला भरजरी छत असून त्याला मोत्यांची झालर लावलेली होती. खाली मोठमोठे रुजामे पसरलेले होते व मध्यभागीं स्वराज्याचें रत्नजडित सुवर्णसिंहासन ठेवलेलें होतें. या सिंहासनाचें वर्णन मागे केलेलेंच आहे. राजसभेंतील गर्दी व तेथील प्रत्येकाच्या चेहऱ्यावरील संमिश्र सुखद भावनांचें तांडव यांचें काय वर्णन करावें!

राजसभेच्या सुभव्य प्रवेशद्वाराच्या उंच माथ्यावर दुंदुभी झडत होत्या. प्रवेशद्वाराच्या बाहेरच्या अंगाला दोन्ही बाजूंना दोन शुभ-लक्षणी गज सुवर्णालंकार अंगावर घातलेल्या स्थितींत झुलत होते. या प्रवेशद्वाराच्या रेषेंत सिंहासनाचा चौथरा असून त्यावर आणखी एक चौथरा होता व त्या चौथऱ्यावरील मध्यभागीं एका सुंदर मंडपींत सिंहासन होतें. सिंहासन व प्रवेशद्वार यांच्यांत प्रदीर्घ अंतर असूनही सिंहासनापाशी हळू आवाजांत सहज बोललें तरी तें प्रवेशद्वारापाशी सुस्पष्ट ऐकू जावें अशी योजना होती. ढाल तरवार व धनुष्यबाणांची पूजा करून कोदंडधारी महाराज सभे-कडे यावयास निघाले. येतांना त्यांनी कुलदेवतांना वंदन केलें. आचार्य गागाभट्ट, कुलोपाध्याय बाळंभट्ट यांच्यासहित सर्व ब्रह्मवृंदांना त्यांनी प्रणाम केला आणि महाराणी, युवराज यांच्यासह आपल्या पुण्यपावन मातेच्या चरणावर मस्तक ठेवण्यासाठी महाराज तिच्याजवळ आले. आई म्हणजे महाराजांचें काय नव्हतें! वयाच्या बाराव्या वर्षी आपलें बोट धरून पुण्याच्या लालमहालांत प्रवेश करणारा शिवबा भारताच्या वास्तुदेवतेचें शतकाशतकांचे पांग फेडीत राजराजेश्वर म्हणून स्वपराक्रमाने सिंहासनारोहण करणार या कल्पनेनेच त्या मातेला केवढी धन्यता वाटली असेल ! येवढ्यासाठीच ती माता जगली होती. आईसाहेब या वेळीं ऐंशी वर्षांच्या होत्या व आपल्या नेत्रांनी हा सोहळा पाहण्यासाठीच त्या जणू जिवंत होत्या. सर जदुनाथ सरकार मायलेकरांच्या या भेटीचें चित्र रेखाटतांना भाव-विवश होऊन लिहितात : 'मनुष्यजन्मांत अधिकांत अधिक जें ऐश्वर्य मिळणें शक्य आहे तें शिवाजीने स्वपराक्रमाने प्राप्त करून घेतलें होतें. ज्या देशांत तो जन्मला तेथील शत्रूंना पादाक्रान्त करून तो सशास्त्र राज्यावर आरोहण करणार होता. शिवाजी हा अजिंक्य योद्धा असून जिजाबाईला शिवाजीपेक्षाही प्रिय असलेल्या धर्माचा तो संरक्षक असल्याबद्दल त्याची प्रसिद्धि झाली होती. हिंदुस्थानच्या अर्वाचीन इतिहासांत अशा दोनच भाग्यवती माता दिसतात. एक पंधराव्या शतकांतील आंध्र राजा शातकर्णी याची मातोश्री गौतमी

देवी व दुसरी सतराव्या शतकांतील ही जिजादेवी होय,' या समारंभानंतर अवघ्या बाराच दिवसांनी जिजाबाई मृत्यु पावली. यावरून हा समारंभ पाहण्यासाठीच परमेश्वराने तिला आजपर्यंत जिवंत ठेवले होतें, असें म्हणावें लागतें. निस्सीम मातृभक्त, पौरजनांचा त्राता, त्यांच्या सुखदुःखांत संविभागी, शकयवनपल्लव यांचा नाश करणारा, गोब्राह्मणप्रतिपालक, चातुर्वर्ण्यरक्षक, अनेक समरांत शत्रुसमुदायास पराजित करणारा, सत्पुरुषांचें आश्रयस्थान, श्रीचें अधिष्ठान व दक्षिणापथाचा राजा हीं सगळीं गौतमीपुत्र शातकर्णीचीं नाशिकच्या शिलालेखांतील विशेषणें शिवाजीसही पूर्णपणें लागू पडतात. ('महादेव्या गौतमी बालश्री मातु. राजराजस्य श्रीशातकर्णेः गोतमे पुत्रस्य आविपन्न मातृ-शुश्रूषाकस्यपौरजननिर्विशेषसम-सुखदुःखस्य शक-यवन-पल्लवनिषूदनस्य द्विजावर-कुटुम्बविवर्धनस्य खखरातवंशनिरवशेषकारवस्य-विनिर्वातित चातुर्वर्णसंकरस्य अनेक समरावजित शत्रुसंघस्य सत्पुरुषाणां आश्रयस्य श्रिया अधिष्ठानस्य दक्षिणापथेश्वरस्य)' —(शिवाजी व शिवकाल, पृ. १५८)

असो. मातृचरणांना वंदन करून व शुभाशीर्वाद घेऊन, महाराजांनी अष्टप्रधान व चिटणीस यांच्यासह, सुवर्णदंड हातीं घेतलेले प्रतिहारी 'इत इतो देवः' म्हणून मार्गदर्शन करीत आहेत अशा थाटांत राजसभेंत पदन्यास केला. सहस्रावधि आतुरलेले डोळे त्यांच्यावर खिळले असतांना महाराजांनी सिंहासनाला वंदन करून त्याला पादस्पर्श न करतां वेदमंत्रांच्या घोषांत त्यावर आरोहण केलें. वाद्यांच्या गजरांनी, तोफांच्या आवाजाने व दुंदुभींच्या घनगंभीर ध्वनीने दशदिशा गर्जून उठल्या. महाराजांच्यावर पुष्पें, सुवर्णपुष्पें, लाज, अक्षता यांची एकच वृष्टि झाली. जिकडे तिकडे 'शिवाजी महाराज की जय' या घोषाने वातावरण दुमदुमून गेलें. रत्नपुष्पांची वृष्टि होऊं लागली. नृत्यांगना व गायक, भाट व बंदीजन आपापल्या कलांचा आविष्कार करूं लागले. स्वराज्यांतील सर्व गडांवरून राज्यारोहणाच्या वेळीं तोफांची सरबत्ती सुरू झाली. नंतर सोळा सुवासिनी व सोळा कुमारिकांनी

महाराजांना पंचारती ओवाळली. पंडितवर्य गागाभट्ट यांनी मोत्यांचा तुरा वर लाविलेला भरजरीचा राजमुकुट हातांत घेऊन तो स्वहस्ताने महाराजांच्या मस्तकावर ठेविला व मोत्यांची झालर लाविलेलें रत्नजडित राजछत्र महाराजांच्या मस्तकावर धारण करून उच्च स्वरांत शिवाजी महाराज हे छत्रसिंहासनाधीश्वर व संस्कारयुक्त राजे झाल्याचें घोषित केलें. धर्माला राजा लाभला. रामचंद्राचें सिंहासन पुनरुज्जीवित झालें.

गागाभट्टांनी मस्तकावर छत्र धारण करतांच ब्राह्मणांनी शुभाशीर्वादांची वृष्टि केली. त्या वेदोनारायणापुढे धर्मावतार महाराजांनी आपलें मस्तक लवविलें. यानंतर पंतप्रधान मोरोपंत पिंगळे यांनी सिंहासनाधीश्वर राजाला प्रणाम करून आठ सहस्र होन महाराजांच्या मस्तकावर ओतले. मुख्य हिशेबनीस यांनी सात सहस्र होन व दोन सर कारकुनांनी प्रत्येकी पांच पांच सहस्र होन आणून महाराजांच्या मस्तकावर ओतले. याप्रमाणे महाराजांना सुवर्णस्नान घालण्यांत आलें. उर्वरित अधिकाऱ्यांनी महाराजांना प्रणाम केला व ते सिंहासनाच्या उभय बाजूंना रांगा करून उभे राहिले. युवराज संभाजी, मुख्य पुरोहित पंडितवर्य गागाभट्ट व पंतप्रधान मोरोपंत पिंगळे हे सिंहासनाच्या जोत्यांवर बसले होते. हिंदुराष्ट्राच्या या राजराजेश्वराला नजराणे समर्पण करून सामंत-वर्ग कृतार्थता अनुभवीत होता.



## प्रकरण पंधरावें

# हिंदुराष्ट्रनिर्मितीचें कार्य

शतकांशतकांनंतर पुनरुज्जीवित झालेल्या त्या हिंदुसिंहासनावर विराजमान झालेल्या छत्रपतींच्या चरणाशीं जीं अनेक मस्तकें नम्र होत होतीं त्यांत इंग्लिश राष्ट्राच्या प्रतिनिधीचेंही मस्तक होतें. इंग्रजांचा वकील हेन्री ऑक्झिडेन याला राजदर्शनासाठी निराजीपंतांनी नारायण शेणव्यासह या सुमंगल दिवशीं सकाळीं ७–८ च्या समयीं नेलें. त्याने महाराजांना विनम्र अभिवादन करून एक तेजस्वी हिऱ्याची मुद्रिका व साडेसोळाशे रुपयांच्या अन्य वस्तु इंग्रजी राष्ट्राच्या वतीनें अर्पण केल्या. युवराज संभाजी, पंतप्रधान व अन्य अधिकाऱ्यांनाही त्याने ३०६५ रुपयांच्या भेटी अर्पण केल्या. महाराजांनी सस्मित मुद्रेनें या इंग्रज वकिलाला सिंहासनाजवळ बोलावून वस्त्रें देवविलीं व निरोप दिला. ऑक्झिडेन या राजदर्शनाचें वर्णन करतांना म्हणतो :—

'About 7 or 8 of the clock went to court and found the Rajah seated in a magnificent Throne and all the Nables waiting on him ( in ) very rich attire. His sonne sombagy Rajah, Peshava Maro Punditt and a Braminy (Gagabhatta) seated on the ascent under the throne. The rest as well officers of the army as others, standing with great respect. I made my obeysance at distance and Naransinay ( नारायण सेणवी ) held up the diamond rings which was to be presented him. He presently took notice of us and enordered coming nearer, even to the foote of the throne, where being vested we were desired to retire, which wee did, but not so soone but that I took notice. On each side of the throne, there hung ( according to the Moores manner ) on heads of

guilded lances many emblems of Government and dominion, as on the right hand were two great fishes heads of gould with very large teeth; on the left hand several horses tails, a pair of gould scales on a very rich lance head poized equally, an emblem of justice, and as wee returned at the palace gate there was standing two small elephants on each side and two paire horses with gould bridles and rich furniture, which made us admire which way they brought them up the hill, the passage being so difficult and hazardous .........'

राजसभेंतील या सोहळ्यानंतर छत्रपतींची स्वारी राजवैभवांत मिरवणुकीने देवदर्शनास जावयास निघाली. सुवर्णालंकारांनी शृंगारलेल्या एका शुभलक्षणी अश्वावर आरूढ होऊन महाराज राजांगणांत आले व तेथे सर्व प्रकारच्या मूल्यवान् साज चढविलेल्या गजराजाच्या पाठीवरील उत्कृष्ट अंबारींत बसले. या हत्तीवर सरसेनापति हंबीरराव मोहिते हे हातीं अंकुश घेऊन माहूत म्हणून बसले होते. महाराजांच्या अंबारीच्या मागच्या बाजूला पंतप्रधान मोरोपंत पिंगळे सोन्याचे मोर्चेल घेऊन बसले. समोर हिंदवी स्वराज्याचा भगवा ध्वज डौलाने अतराळांत फडकत होता. राज-दुंदुभी झडत होत्या, शिगें ललकारत होतीं, मंगलवाद्यें वाजत होतीं. सारे अधिकारी व सामंत हत्तीला वेढून चालत होते. राजमार्गा-वरील घरें उत्कृष्ट मंगल चिन्हांनी सुशोभित केलेलीं व शृंगारलेलीं होतीं. ती वैभवशाली मिरवणूक चालू असतां सुवासिनी महाराजांना पंचारती ओवाळीत होत्या व त्यांच्यावर फुलें, लाह्या, दही, दूर्वा, अक्षता यांचा वर्षाव चालू होता.

रायगडावरील सर्व देवतांचीं यथाविधि दर्शनें घेऊन महाराज परत सभाद्वारीं आले. त्यांनी राजमंदिरांत प्रवेश करून प्रथम कुलदेवतांना प्रणिपात केला व नंतर आपल्या देवतातुल्य मातुःश्रींच्या पायांवर मस्तक ठेविलें. गहिवरलेल्या स्वरांत 'आपले आशीर्वादे

मनोरथ सिद्धीस गेले' येवढेंच वाक्य त्यांनी उच्चारलें. राजमातेन्ला त्यांनी वस्त्रें समर्पण केलीं. राजस्त्रियांनी महाराजांना ओवाळलें. महाराजांनी त्यांना रीतीप्रमाणे बहुमोल वस्त्रालंकार समर्पण केले. यानंतर आप्तेष्टांसह भोजन करून महाराजांनी सर्वांना निरोपाचे विडे दिले.

या समारंभानंतर महाराजांनी अपार दानधर्म केला व अपरिमित देणग्यांचा साऱ्या कर्तृत्वसंपन्न सेवकांवर व सहकाऱ्यांवर वर्षाव केला. डचांच्या दप्तरांत लिहिलें आहे की,

'On the 17th ( 7th New Style ) of June a general gift of largesses was begun to all the assembled envoys and learned men; 3 or 4 rupees to each and 1 or 2 to women and children. This distribution continued for 12 days, and every day Suasy feasted the people. It is said that the ceremony and distribution of largesses cost 1,50,000 pagodas.'

—( No. 841, Dutch Factory records, Vol. XXXIV (

तडीतापसी, विद्वान् पंडित, ब्राह्मण, संत, महंत इत्यादि सर्वांच्यावरच महाराजांनी देणग्यांचा वर्षाव केला. या कर्माच्या सर्व ऋत्विजांना महाराजांनी पांच पांच सहस्र रुपये दक्षिणा दिली. आणि ज्या महापुरुषाने छत्रपतींनी स्थापन केलेल्या स्वराज्याला घटनात्मक स्थैर्य व शास्त्रीय प्रतिष्ठा प्राप्त करून दिली त्या आचार्य गागाभट्टांना तर काय द्यावें आणि काय नाही असें महाराजांना होऊन गेलें. महाराजांनी चोवीस सहस्र होन केवळ दक्षिणा वाटण्यांत खर्च केले. त्यांपैकी सात सहस्र होन केवळ गागाभट्टांना दिले. सभासद म्हणतो, 'कित्येक नवरत्नादिक सुवर्णकमलें व नाना सुवर्णफुलें, वस्त्रें उदंड दिधलीं. दानपद्धतीप्रमाणे षोडश महादानें इत्यादिक दानें केलीं. अष्टप्रधानांस लक्ष होन, दर आसामीस त्याखेरीज एक एक हत्ती, घोडा, वस्त्रें, अलंकार असें देणें दिलें.'

या राज्याभिषेकप्रसंगीं संपूर्ण खर्चाची संख्या 'एक करोड बेचाळीस लक्ष होन झाले' असें सभासद म्हणतो. सरकार म्हणतात,

'म्हणजे दहा कोटी दहा लक्ष रुपये खर्च झाला असें दिसतें आणि लाख, दीड लाख लोकांना एक महिनाभर सुग्रास भोजन, दक्षिणा, देणगी, इतर धर्मादाय, सुवर्णसिंहासन, कचेरीचा व नगराचा शृंगार, मेजवान्या, जिजाबाईच्या मृत्यूनंतर लहान प्रमाणांत कां होईना पण दुसरा समारंभ या सर्वांना इतका खर्च होणें साहजिक दिसतें.'

— (शिवाजी व शिवकाल, पृ. १६२)

शिवाजी महाराजांच्या या राज्याभिषेकाने हिंदुराष्ट्राचें पुनरुत्थान स्थिरपद झालें. मुख्यतः गागाभट्टांच्या पांडित्याला स्वराष्ट्रभक्तीची धार असल्यामुळे ही गोष्ट घडून येऊं शकली. त्यामुळे गागाभट्टांच्या स्मृतीला राष्ट्राने कृतज्ञतापूर्वक श्रद्धांजलि समर्पण केली पाहिजे. गागाभट्टाविषयी साऱ्या राष्ट्राने कृतज्ञ राहिलें पाहिजे. श्री. बेन्द्रे यांनी गागाभट्टाविषयी कृतज्ञता व्यक्त करतांना आपल्या श्री-शिवराजाभिषेकाच्या प्रास्ताविकांत जे उद्गार काढले आहेत ते या दृष्टीने अत्यंत यथार्थ आहेत. श्री. बेन्द्रे लिहितात, 'श्री छत्रपति शिवाजी महाराजांनी हिंदवी स्वराज्याची उभारणी केली आणि गागाभट्टांनी या स्वराज्यासाठी सुवर्णसिंहासनाच्या विधिपूर्वक प्राणप्रतिष्ठेने धर्मसिद्ध अशी राज्यसंस्था स्थापून महाराष्ट्रास सुसंघटित राष्ट्रीय संस्कृति प्राप्त करून दिली. तीन चार शतकें अनियंत्रित यावनी पादशाही सत्तेचा कटु अनुभव घेत असतांही श्रेष्ठ हिंदुसंस्कृतीला डोकें वर काढणें अखिल भारतांत अशक्य झालें होतें. परंतु तीच यावनी सत्ता अगदी प्रभावाच्या शिखरास पोहोचत असतांनाच शिवाजी महाराजांनी आपली बुद्धि, युक्ति, सहिष्णुता व शक्तिसामर्थ्य यांनी अल्पावधींत आर्यसंस्कृतीचें पुन-रुज्जीवन केलें. हा शिवाजी महाराजांचा पराक्रम जसा अद्वितीय, आदर्श आहे तसाच तो हिंदुस्थानांतील सामाजिक आणि राजकीय क्रान्तींतील एक श्रेष्ठ आदर्श म्हणून इतिहासांत कायमचा स्थिर झाला आहे. या पराक्रमामागे शिवाजी महाराजांनी बीजांकुरित केलेली प्रभावी संघटना आणि राष्ट्रीयत्वाची जाणीव हीं प्रमुखत्वें आहेत. स्वत. औरंगजेबाच्या दक्षिणेंतील अयशस्वी स्वारींतील

अनुभवी व कसलेल्या नेतृत्त्वाखालील यावनी पातशाहींतील फूट व अननुभवी तरुण राष्ट्रनेत्यांमागील शिवशाहींतील जूट ही जी घटना संभाजी व राजाराम यांच्या वीस बावीस वर्षांच्या कालांत स्पष्टपणें निदर्शनास आली. तिच्या योगाने शिवछत्रपतींनी प्रेरित केलेली संघटना व जागृत केलेलें राष्ट्रीयत्व यांच्या सकस फलप्राप्तीची साक्ष पटते. या राष्ट्रीय संघटनेला धार्मिक संस्काराने शुद्ध व प्रतिष्ठित करणें म्हणजे ती समाजाच्या हृत्पटलावर चिरंजीव करणें होय. हें थोर कार्य यावनी सम्राटांनाही मान्य अशा सद्‌गुरु घराण्यांतील श्रेष्ठ द्रष्टा पंडित गागाभट्ट यांनी केलें. शिवाजी महाराजांच्या ज्या संघटनात्मक कार्यामुळे महाराष्ट्रांत राजकीय, सामाजिक व पारमार्थिक संस्कृतीचीं मूल्यें खोलवर रुजलीं गेलीं, त्याच महाराष्ट्राच्या हृत्पटलावर राजसंस्थेच्या उत्क्रान्त संस्कृतीचें प्रतिबिंब चिरंजीव करण्याचें कार्य या शिवराजाभिषेक विधींत आहे. कारण त्या घटनेने राज्यव्यवहारांत अखिल समाजाला समानतेच्या पातळीवर आणलें; व धार्मिक आणि व्यावहारिक पारतंत्र्याला आळा घालण्याचें एक तंत्र निर्माण केलें. काशीस्थ गागाभट्ट व पैठणचे अनंतदेवभट्ट यांचा निःस्वार्थी मानवतेचा जिव्हाळा शिवाजी महाराजांच्या सांस्कृतिक कार्यांत सहज साहाय्यक झाला; आणि शिवराजाभिषेकाने सतराव्या शतकांत राजकीय, सामाजिक, धार्मिक आणि व्यावहारिक संघटनेचें एक उत्तम व प्रभावी साधन महाराष्ट्राच्या हातीं आलें.'

— (श्री शिवराजाभिषेक, प्रास्ताविक, पृ. १ व ४२)

श्री शिवाजी महाराजांनी राष्ट्रनिर्मितीचें कार्य यशस्वी करून दाखविलें हें ज्यांना पटेल त्यांना महाराजांच्या राज्याभिषेकाचें खरें महत्त्व काय होतें याची कल्पना येईल. ही कल्पना ज्यांना येईल त्यांनाच गागाभट्टांच्या कार्याचेंही खरें चिरंतन महत्त्व ध्यानांत येईल. पण इतिहासपंडितांतही ज्यांना शिवाजी महाराजांनी राष्ट्रनिर्मितीचें कार्य केलें हेंच मुळी मान्य नाही, त्यांना प्रस्तुत राज्याभिषेक म्हणजे एका व्यक्तीने आपल्या महत्त्वाकांक्षेच्या

परिपूर्तीचा केलेला उत्सव येवढेंच वाटणार! असेही कांही इतिहासकार असतील काय? आहेत. पाश्चात्य इतिहासलेखक तर आहेतच; पण त्यांच्यावर अवास्तव भिस्त ठेवणारे कै. जदुनाथ सरकार यांच्या सारखेही लोक आहेत. या सर्व लोकांच्या आक्षेपांना अत्यंत स्पष्ट शब्दांत साधार उत्तर देऊन स्वातंत्र्यवीर सावरकरांनी आपल्या प्रखर व प्रेरक शब्दांत महाराजांचें राष्ट्रनिर्माणकार्य व राज्याभिषेकविधीचें महत्त्व सांगितलेलें आहे. तें त्यांच्याच शब्दांत येथे देतो, म्हणजे गागाभट्टांच्या कार्याचें चिरंतन महत्त्व सहजच स्पष्ट होईल. स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी श्रद्धानंद पत्रांत दि. ५–५–१९२७ ला 'छत्रपतींचा जयजयकार' या नांवाचा एक लेख लिहिला आहे. त्यांत ते लिहितात :—

प्रो. जदुनाथ सरकार ह्यांनी दि. १ मे १९२७ च्या क्रॉनिकल पत्राच्या शिवाजी अंकामध्ये एक लेख लिहिला आहे. त्यामध्ये शिवाजीनें राष्ट्र निर्माण केलें काय? असा एक प्रश्न टाकून त्याचें उत्तर नकारात्मक दिलेलें आहे. दीड शतकानंतर शिवाजीनें उत्पन्न केलेलें राज्य गेलें आणि १८१८ सालीं पेशव्यांचा पराभव झाल्यावर घराकडे फिरणाऱ्या सैन्याला जनतेने संत्रस्त केलें असें मनरो नांवाच्या इतिहासकाराचें म्हणणें आहे आणि त्या एका सद्गृहस्थाच्या म्हणण्यावरून शिवाजी महाराज हे राष्ट्रनिर्माते नव्हते असें प्रा. सरकार सिद्ध करूं पाहत आहेत. वादविवादाकरितां वरील सर्व म्हणणें जरी खरें धरलें तरी काय सिद्ध होतें? केवळ स्थापन केलेलें राज्य लवकर बुडालें म्हणून काय त्यांनी राष्ट्र निर्माण केलें नाही? मराठ्यांच्या २५ वर्षांच्या स्वातंत्र्ययुद्धांत राजारामाचे वेळीं जी चिकाटी, जें धाडस, जी अपूर्व राष्ट्रभक्ति दिसून आली ती काय शिवाजीने राष्ट्र निर्माण केलें नसतें तर दिसून आली असती? आपल्या वतनावर पाणी सोडण्यांस जर राष्ट्रीय दृष्टि नसती तर काय खंडो बल्लाळ सिद्ध झाले असते? राष्ट्रीय दृष्टि नसती तर संताजी घोरपडे, धनाजी जाधव, परसोजी भोसले, पानसंबळ आणि इतर अनेक शत शत तरुण

महाराष्ट्रवीर लोखंडाचे चणे खातां खातां, रक्त सांडीत सांडीत, स्वातंत्र्यसमर चालवूं शकले असते काय? एक फितुरीचें कृत्य जरी केलें असतें, तरी मोगलांनी कोणत्याही क्षुद्र पाइकाला नाईक केलें असतें आणि नाईकाला सरदार बनविलें असतें; परंतु या सर्व पारतंत्र्याच्या वैभवावर लाथ मारून सबंध जन्मभर रानावनांतून वणवण करीत महाराष्ट्राचे दोन लाख वीर सैन्य पंचवीस वर्षेपर्यंत मारीत मरत हिंडलें असतें काय? आपापसामध्ये चुरशीने लढणारे धनाजी-संताजी मुसलमानांचें सैन्य येतांच, जर राष्ट्रीय वृत्ति नसती तर, काय एकत्र होऊन व वैर विसरून जाऊन मुसलमानांशीं लढले असते? इतकेंच कशाला, परंतु मनरोसाहेब ज्या शेवटच्या पेशव्यांच्या दिवसांबद्दल गोष्ट बोलतो त्याच दहा बारा वर्षांच्या आगे मागे भागानगरच्या निजामाच्या दरबारांत असलेल्या गोविंदपंत काळे या राष्ट्रभक्त वकिलाचें, नाना-महादजींचा समेट झाल्यावर नानांना आलेलें अत्यंत मार्मिक आणि देशभक्तीने ओतप्रोत भरलेलें पत्र मनरो साहेबांनी पाहिलें आहे काय? त्यांनी जरी तें वाचलें नसलें तरी श्री. यदुनाथ सरकारांनी तरी तें वाचलें असेल ना! पर्शियन ग्रंथांवरून व मोगली उर्दू दप्तरांतील बाडांतूनच काय ती ज्यांनी मराठ्यांची भूमिका अभ्यासिली असे पूर्वग्रहदूषित, अहंकारविमूढ नि मराठी इतिहासाचें हृद्गत न समजणारे श्री. जदुनाथ या पत्राचा जरा शांतपणाने विचार कशाला करतील? मनरो काय म्हणतो तेंच तेवढें त्यांचें वेदवाक्य! पुन्हा दीडशे वर्षेपर्यंत शिवाजीने प्रचलित केलेल्या हिंदवी साम्राज्याच्या ध्येयाने महाराष्ट्रवीर जे लढले तो दीडशे वर्षांचा काळ काय अगदी अत्यल्प झाला! मग ह्याच विधानानुसार गेल्या महायुद्धांत कंबर मोडलेलें जर्मनीचें राष्ट्र ज्याच्या प्रयत्नाने एकसंध संघटित साम्राज्य झालें होतें त्या प्रिन्स बिस्मार्कलाही केवळ दीडशे वर्षें तर राहो, पण शंभर वर्षें सुद्धा त्याची संघटना टिकली नाही म्हणून राष्ट्रपित्याच्या टिपणींतून काढून टाकावें लागेल! अजरामर राज्य असें कोणाचेंच टिकलें नाही म्हणून राष्ट्रनिर्माता असा जगांत कोणीच झाला नाही

म्हणावयाचा ! समर्थ आणि शिवाजी ह्यांनीच महाराष्ट्रास व्यक्तिमत्त्वाची जाणीव दिली, एकजीव केलें, एकराष्ट्र केलें.

या भूमंडळाचे ठायी । हिंदू ऐसा उरला नाही ।
मराठा तितुका मेळवावा । आपुला महाराष्ट्र धर्म वाढवावा ।।
ये विषयी न करता तकवा । पूर्वज हासती ।

ही हाक सह्याद्रीच्या शिखरावरून रामदासाने पुकारली. शिवाजीने शपथ घेतली ती हिंदवी (हिंदु) राज्य स्थापण्याची ! 'तुम्ही हिंदु, आम्ही हिंदु' म्हणून शिवाजीनेच जयसिंगाला सांगितलें. विस्कळीत महाराष्ट्रांतली रत्नें वेचून वेचून त्यांची माळ गुंफिली. 'दिल्लीन्द्रपदलिप्सव:' सैन्यें दिल्लीच्या रोखें चालू लागली. रामदास-शिवाजीच्या पिढीचेच हे सारे शब्द आहेत. रामदास-शिवाजीच्या ह्या स्फूर्तीनेच मराठ्यांच्या तीन पिढ्या लढत राहिल्या. 'अरे, पाहता काय ? हिंदुपदशाहीचा दिवस उजाडला' म्हणून गर्जत बाजीरावाने दिल्लीचे दरवाजे तोडले, भाऊने दिल्लीचें तख्त फोडलें, भीमथडीचे घोडे सिंधूचें पाणी प्याले ! विजयी भगवा झेंडा अटकेवर फडकावला ! ! असलें राष्ट्रीय उत्थान अर्वाचीन हिंदु इतिहासांत महाराष्ट्राबाहेर कुठे दिसलें काय ? राष्ट्र निर्माण करणें तें हेंच. हेंच शिवाजीने केलें. पण तें श्री. जदुनाथांना काय कळणार ? शूर मर्दाचा पोवाडा शूर मर्दाने गावा ! इतरांना त्यांतील रहस्य कळणार नाही.

'प्रा. महाशयांनी हिंदु समाजांतील जाति-उपजातींचें अवडंबर माजवून तो अप्रस्तुत विषयही ह्या वादांत घुसडून देण्याचें धाष्टर्य करावें हें पाहून कोणासही विषाद वाटेल; परंतु ह्या जाति-उपजातींचें लोढणें गळ्यांत असतांनाच श्री शिवाजी महाराजांनी प्रत्येक जाति आणि उपजातिकडून देशाधर्माच्या नांवाने हिंदुपदपादशाहीसाठी पिढ्यानुपिढ्या पराक्रम गाजविला तो काय राष्ट्रीय वृत्तीची प्रेरणा केल्यावांचून ? शिवाजी राष्ट्रनिर्माता होता ह्याचें हेंच तर उत्कृष्ट प्रत्यंतर आहे.

'शिवरायाने केवळ राजकीय दृष्टयाच आपल्या राष्ट्राचें पुनरुज्जीवन केलें असें नाही, तर सामाजिक उदारता दाखवून बदलत्या काळाप्रमाणे रूढीला बदलून आपली परंपरा अविकृत ठेवण्याची जी तत्परता दाखविली ती पाहून आजच्या सुधारकालासुद्धा मान खाली घालावी लागेल. ज्याप्रमाणे राजकीय आणि सामाजिक उत्थानाला शिवाजीने चैतन्य दिलें होतें, त्याचप्रमाणे राष्ट्राला प्राणाप्रमाणे असलेलें वाङमयही त्यांनी उत्तेजित केलें होतें.

मनुष्याचा उत्सवप्रिय असलेला स्वभाव जाणून शिवरायाने गत स्वातंत्र्याचें पुनरुज्जीवन नि हिंदुपदपादशाहीचें पुण्याहवाचन रायगडाच्या पुण्यभूमीवर सिंहासनारोहणाचा समारंभ घडवून आणून केलें. अनेक शतकेंपर्यंत हिंदुस्थानच्या दैवीं, उभीं असलेलीं हिंदुसिंहासनें खचून गेलेलीं पाहण्याचें होतें. राजमुकुट हिंदूंच्या हातांत येत होते; परंतु ते परक्यांच्या मस्तकाला भूषित करण्याकरितां काय ते! छत्रचामरें ते पाहत होते; परंतु तीं स्वतःच्या हातांनी परक्यांच्या मस्तकावर ढाळावीं लागत होतीं! आणि हाय! हें असें हृदयविदारक दृश्य एक नव्हे, दोन नव्हे, सतत पांचशे वर्षे हिंदुजातीच्या ललाटीं लिहिलें होतें; परंतु शेवटीं शिवाजीने मनु पालटविला. त्याने हिंदुजातीच्या इतिहासांतील आणखी एक अद्‌भुत रोमहर्षण प्रसंग गागाभट्टांच्या हस्तें स्वतःला विधियुक्त राज्याभिषेक करवून घेऊन घडवून आणला.

'धन्य तो दिवस, की ज्या दिवशीं शिवनेरीच्या पडक्या दुर्गांत जन्मास आलेलें, तोरणा गडावर अडखळणारें, एक यःकश्चित् भासलें जाणारें उनाड पोर अखिल हिंदुराज्याचें स्वामी झालें. हिंदुजातीचें भाग्य पुनरपि उदयाला आलें. हिंदु हें नांव जगांत जिवंत उरलें!

तो धन्य दिवस हाच! – हिंदुपदपादशाह शिवछत्रपतींना आज राज्याभिषेक होत आहे! या! पुण्यसरितांनो, आपल्या पवित्र जलांनी आपलीं पात्रें भरभरून रायगडच्या राजवाड्याकडे या! आणि या हिंदु छत्रपतीवर राज्याभिषेक करा! पश्चिम समुद्र नि

पूर्व समुद्र हे तुझे दोन्ही बाहु उभारून, हे हिंदुमहासागरा, तुझ्या कोषागारांतील अशेष रत्नामोत्यांचीं उपायनें ह्या हिंदुपदपाद-शहाच्या चरणांवर अर्पण कर!'

—— (छत्रपतींचा जयजयकार, पृ. १६ ते २०)

राज्याभिषेकाच्या सुमंगल दिवसापासून श्रीशिवछत्रपतींनी नव्या युगाचें मानचिन्ह म्हणून 'राज्याभिषेक शका'ला प्रारंभ करून तो कागदोपत्रीं घालण्याची प्रथा पाडली. शालिवाहनानंतर दुसरा शककर्ता भारतांत उत्पन्न झाला. महाराजांनी आपल्या नव्या शकाला 'शिवशक' हें व्यक्तिवाचक नांव न देतां 'राज्याभिषेक शक' हें घटनावाचक नांव दिलें. त्यांच्या व्यक्तित्वाचा समष्टिजीवनांत व भारतीय मूल्यांत कसा संपूर्णपणें विलय झाला होता याचें हें महान् निदर्शनच होय. शिवराज्याभिषेक हें भारतीय अस्मितेच्या पुनरुज्जीवनाचें एक प्रतीक असल्यामुळे राज्याभिषेका-नंतर महाराजांनी राष्ट्रजीवनांत घुसलेल्या सर्व परकीय पदचिन्हांना पार पुसून टाकावयाचें ठरविलें. त्या वेळीं राज्यकारभारांतील अधिकाऱ्यांचीं नांवें फारशींत म्हणजे यावनी भाषेंत रूढ होतीं. महाराजांनी अष्टप्रधानसंस्थेचें पुनरुज्जीवन करून आठही अधि-काऱ्यांचीं फारशी नांवें बदलून संस्कृत नांवें त्या जागीं रूढ केलीं. महाराजांचें हें अष्टप्रधान मंडळ पुढीलप्रमाणे होतें.

(१) मुख्य प्रधान (पेशवा)
(२) अमात्य (मुजुमदार)
(३) मंत्री (वाकनीस)
(४) सुमंत (डबीर)
(५) सचिव (सुरनीस)
(६) पंडितराव अथवा राजपुरोहित
(७) सेनापति
(८) न्यायाधीश

यांचीं कामें पुढीलप्रमाणे असत :——

(१) **मुख्य प्रधान** – याणी सर्व राजकार्य करावें. राजपत्रावरी

शिक्का करावा. सेना घेऊन युद्धप्रसंगीं स्वारी करावी. तालुका स्वाधीन होईल त्याते रक्षून बंदोबस्त करून आज्ञेने वर्तावे. सर्व सेना सरदार याजबरोबर जावे. सर्वसंमते चालावे.

(२) **अमात्य** – याणी सर्व राज्यांतील जमाखर्च चौकशी करून दफ्तरदार फडणीस यांचे स्वाधीन असावे. लिहिणें चौकशीने आकारावें. फडणिसी, चिटणिसी पत्रावर निशाण करावें. युद्धप्रसंग करावे. तालुका जतन करून आज्ञेंत चालावे.

(३) **सेनापति** – याणी सर्व सैन्य रक्षण करून युद्धप्रसंग स्वारी करावी. तालुका स्वाधीन होईल तो रक्षून हिशोब रुजू करून आज्ञेने वर्तावे. फौजेचें लोकांचें बोलणें बोलावें. सर्व फौजेचे सरदार याणी त्याजबरोबर चालावें.

(४) **पंडितराव** – याणी सर्व धर्माधिकार धर्म अधर्म पाहून विवक्षा करावी. शिष्टांचे सत्कार करावे. आचार, व्यवहार, प्रायश्चित्त पत्र होतील त्याजवर संमतचिन्ह करावें. दानप्रसंग, शांती, अनुष्ठान तत्काळ करावें.

(५) **न्यायाधीश** – याणी सर्व राज्यांतील न्याय अन्याय मनास आणून बहुत धर्मे करून न्याय करावे.

(६) **सचिव** – याणी राजपत्रें शोध करून उणे अक्षर मजकूर शुद्ध करावीं. युद्धप्रसंग करून तालुका स्वाधीन होईल तो रक्षून आज्ञेंत वर्तावें. राजपत्रावर चिन्ह संमत करावें.

(७) **मंत्री** – याणी सर्व मंत्रविचार राजकारणे यांतील सावधानतेनें विचार करावें. आमंत्रण, निमंत्रण, वाकीनिशी यांचे स्वाधीन. तालुका जतन करून युद्धादिक प्रसंग करावे. राजपत्रावर संमत चिन्ह करावें.

(८) **सुमंत** – याणी परराज्यांतील विचार करावा. त्यांचे वकील येतील त्यांचा सत्कार करावा. युद्धादिक प्रसंग करावे. राजपत्रावर संमतचिन्ह करावें.

शिवाजी महाराजांचे अष्टप्रधान पुढीलप्रमाणे होते :— (१) मुख्य प्रधान – मोरोपंत पिंगळे. (२) अमात्य – नारो नीलकंठ व

रामचंद्र नीलकंठ. (३) मंत्री – दत्ताजी त्रिंबक. (४) सुमंत – रामचंद्रपंत सोनदेव डबीर. (५) सचिव – अण्णाजीपंत. (६) राजपुरोहित अथवा पंडितराव – रघुनाथपंत. (७) सेनापति – हंबीरराव मोहिते. (८) न्यायाधीश – निराजी रावजी.

बाळाजी आवजी चिटणिसांना आपल्या प्रधानमंडळांत घ्यावें अशी श्रीशिवाजी महाराजांची अतिशय इच्छा होती. पण महाराजांनी तशी इच्छा प्रकट करतांच बाळाजींनी त्यांना हात जोडून अशी प्रार्थना केली की, मला वंशपरंपरेने चिटणिशीच द्यावी. त्यांचा आग्रह पाहून महाराजांना त्यांचें म्हणणें मान्य करावें लागलें. मल्हार रामराव चिटणीस यांच्या बखरींत पुढीलप्रमाणे उद्‌बोधक मजकूर आहे : "बाळाजी आवजी यांस तुमची सेवा बहुत निष्ठेने जाली, व राज्याचे वृद्धीस उपयोग बहुत जाले. यास्तव अष्टप्रधानांतील पद योजना करणार म्हणोन आभिषेकापूर्वी सांगितलें. ते समयीं 'मी कारकून लिहिणार, दरखदार, मजला प्रधानांतील पद नलगे. चरणांचें सान्निध्य व अक्षयी कृपा (असावी. सन्निध) सेवा घडणें यास थोरले पद घेऊन थोरले सेवेस जाणें (तर) चरणांचा वियोग घडेल. माझी सर्व जोड चरणांची सेवा! यापरता लाभ मानीत नाही!! स्वामी कृपा करणार, त्या अर्थी चिटणिसी स्वामींनी दिल्ही हेच अक्षयी वंशपरंपरेने वतनी करून देऊन चालावी ऐसे अभयपत्र करून, दोन्ही धंदे कारखानिशी व जमेनिशी माझे निसबतीस आहेत. ते व चिटणिसी अक्षयी करून द्यावी.' (अशी विनंति केली.) त्याजवरून महाराजांनी कृपाळू होऊन चिटणिसीचीं वस्त्रें बहुमान देऊन पत्र शपथबद्ध करून दिलें. सहा हजार होन तैनात केली. त्यास कांही मोकासे लावून दिले. फडणीस चिमणाजी आवजी यास तीन हजार होन तैनात केली." (शककर्ते श्रीशिवछत्रपति महाराज यांचें सप्तप्रकरणात्मक चरित्र, पृ. ३४२-४३)

श्री शिवाजी महाराजांचें या संबंधांत पत्रही उपलब्ध आहे. हें पत्र ज्येष्ठ वद्य प्रतिपदा शके १५९६ चें (९ जून १६७४) तें असें –

**श्री शिवाजी राजे – बाळाजी आवजी प्रभु चिटणीस**

तुम्ही स्वामीसेवा निष्ठेने करून श्रमसाहास पुरे केले. राज्यवृद्धीचे कामीं आला. त्यावरून तुम्हावर कृपाळु होऊन अष्ट प्रधानांतील पद द्यावें मनीं धरलें असतां, तुम्ही विनंति केली की, आपणाकडे चिटणीसीचा दरक चालत आहे. हा अक्षय वतनी वंशपरंपरेने संन्निध व सर्व राज्यांतील चालवावा. कारखानिसी व जमेनिसी दोन धंदे राज्यांतील आपल्याकडे दिले, ते अक्षय असावे. यावरून तसे तुम्हाकडे दिले असे. स्वामीचे वंशीचा कोणीही अन्यथा करणार नाही. लिहिलेप्रमाणे सदरहू प्रयोजनाचे व्यापाराची सेवा करून पुत्रपौत्रीं अनुभविणें.'

—— (शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. १६५४)

महाराजांनी केवळ अष्टप्रधानांचीं नांवेंच नव्हे तर राज्यव्यवहारांतील सर्वच यावनी शब्दांना अर्धचंद्र देऊन त्या जागीं संस्कृत प्रतिशब्द रूढ करण्याचें ठरविलें होतें. त्या दृष्टीने त्यांनी रघुनाथ पंडितरावांना राजव्यवहारकोश सिद्ध करण्याची आज्ञा दिली. रघुनाथ पंडितरावांनी राजव्यवहारकोशाच्या उपोद्घातांत असें म्हटलें आहे की, ——

कृते म्लेच्छोच्छेदे भुवि निरवशेषं रविकुला–
वतंसेनात्यर्थं यवनवचनैर्लुप्तसरणीम् ।
नृपव्याहारार्थं स तु विबुधभाषां वितनितुं ।
नियुक्तोऽभूद्विद्वान्नृपवरशिवच्छत्रपतिना ॥
सोऽयं शिवछत्रपतेरनुज्ञां मूर्धाभिषिक्तस्य निधाय मूर्ध्नि ।
अमात्यवर्यो रघुनाथनामा करोति राजव्यवहारकोशम् ॥
विपश्चित्संमतस्यास्य किं स्यादज्ञविडंबनैः ।
रोचते किं क्रमेलाय मधुरं कदलीफलम् ॥

'या आर्यावर्तांत म्लेच्छ सत्तेचा उच्छेद करून स्वतंत्र हिंदु राज्य स्थापित केल्यानंतर श्रीशिवछत्रपतींनी आपल्या विद्वान् अमात्य वर्गांतील ज्या रघुनाथ पंडित नामक विख्यात पंडिताला आज्ञा

केली की यवन भाषेच्या वर्चस्वाने अगदी लुप्तप्राय झालेल्या आपल्या स्वकीय विबुध भाषेचें पुनरुज्जीवन करण्यासाठी बहिष्कार्य शब्दांस संस्कृत प्रतिशब्द दिलेला राजव्यवहारापुरता एक कोश करावा,– तो रघुनाथ पंडित, त्या आज्ञेनुरूप, हा राजव्यवहारकोश रचीत आहे. श्रीशिवछत्रपतीसारख्या अनेक थोर आणि ज्ञानी पुरुषांना संमत असलेल्या ह्या प्रयत्नास मूर्ख लोक जरी हसले तरी त्यांस कोण भीक घालतो! कांटे खाणाऱ्या उंटाला मधुर अशा केळ्यांची रुचि ती काय असणार?

भाषेचा प्रश्न राष्ट्रजीवनाशीं संबद्ध आहे. राष्ट्रीयत्वाची संवेदना अखंड जागृत असावयास व्यवहारांत स्वराष्ट्राच्या भाषेचा नित्य वापर असणें उपयोगाचें ठरतें. महाराजांच्या दीर्घदर्शी प्रतिभेने हें पूर्णपणें ओळखलें होतें. आपल्या मुद्रेचीं सोन्याचीं व तांब्याचीं नाणींही त्यांनी तत्काळ प्रचलित केलीं. त्या नाण्यांवर 'राजा शिवछत्रपति' अशीं अक्षरें घातलीं होतीं. भगवद्ध्वज हा राज्याचा ध्वज निश्चित केला. जी मुद्रा त्यांनी वयाच्या पंधराव्या वर्षी प्रचलित केली होती तीच त्यांनी पुढे चालविली. ती मुद्रा म्हणजे : 'प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता । शाहसूनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते।' ही होय. पंधराव्या वर्षी हिंदवी स्वराज्याच्या शुक्ल प्रतिपदेची जी चद्रकोर दिसतसुद्धा नव्हती ती एकेका कलेने दृष्टिगोचर होतां होतां आनंदनाम संवत्सरीं ज्येष्ठ शुक्ल त्रयोदशी या दिवशीं पूर्ण चंद्रांत रूपांतरित झाली. यासाठीच ती राजमुद्रा तशीच ठेवणें उचित होतें. संस्कृत भाषेमध्ये भारतीय अस्मितेचीं सारीं बीजें सामावलेलीं आहेत हें महाराज ओळखत होते; व म्हणून पूर्वमीमांसेपासून तर ज्योतिषशास्त्रापर्यंत सर्व शास्त्रांचें विकसन व पुनरुत्थान घडवून आणावयास त्यांनी उत्तेजन दिलें. त्यांचे आचार्य गागाभट्ट यांनी महाराजांच्या आज्ञेने, पूर्वमीमांसेच्या बारा अध्यायांवर 'शिवार्कोदय' या नांवाचा ग्रंथ लिहिला. स्वभाषेच्या व धर्मशास्त्राच्या शुद्धीबरोबरच पंचांगशुद्धीसाठी महाराजांनी कृष्ण ज्योतिषाकडून 'करणकौस्तुभ' या नांवाचा ग्रंथ लिहविला. कृष्ण दैवज्ञ ग्रंथाच्या आरंभीं लिहितो,

प्रकुरु तत्करणं ग्रहसिद्धये ।
सुगमदृग्गणितैक्यविधायि यत् ।।
इति नृपेन्द्रशिवाभिधनोदितः ।
प्रकुरुते कृतिकृष्णविधिज्ञराट् ।।

गागाभट्टांनी आपल्या शिवार्कोदयांत महाराजांच्या प्रेरणेचा उल्लेख करतांना म्हटलें आहे :—

श्रीमद्भोसलवंशभूषणमणिक्षोणीशशाहत्मज –
च्छत्राधीशशिवक्षितीशयशसः स्तंभो निखातोऽपरः ।
गागाभट्टमनीषिणाधिधरणिग्रंथः शिवार्कोदयो
येनाबद्धयशोध्वजेन सकलैवाश्वेति लोकत्रयी ।।

नव्या क्रांतीच्या उदयाचीं हीं सारीं प्रसादचिन्हें होतीं. शिवाजी महाराजांच्या या राज्याभिषेकाने त्यांच्या शत्रूंना अन्नपाणी गोड लागेनासें झालें. 'बंडखोर शिवाजी' आता आपल्या मांडीशीं मांडी ठोकून बसणारा सनदशीर व शास्त्रसंमत असा हिंदूंचा बादशहा झाला. आपल्या सिंहासनाला समानतेच्या नात्याने आव्हान देणारें नि वागविणारें हिंदूंचें स्वतंत्र सिंहासन निर्माण झालें ही गोष्ट त्यांच्या सदाच्या डोकेदुखीला कारणीभूत होणारी अशीच होती. सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रांत श्री. मल्हार रामराव चिटणीस यांनी या पातशहांच्या मनोवृत्तीचें अतिशय मनोवेधक चित्र रेखाटलें आहे. ते लिहितात :—

'राज्याभिषेक होऊन तख्त केलें हें भागानगरीं व विजापुरीं वर्तमान गेलियावरी, कळोन भागानगरकर (यांची) मैत्रीच होती, त्यांणीं संतोष मानिला; विजापूरकर भयभीत (होत्साते त्यांनी) बाह्यात्कारें संतोष दाखवून वस्त्रें, जवाहीर, हत्ती, घोडे महाराजांस पाठविले. दिल्लीचे पादशहा रणथंबोहर येथे होते त्यास सर्व वर्तमान समजलें. ते पादशाहा बहुत खपा होऊन दिलगीर जाले. आणि 'खुदानें वर देऊन आम्हांस बाराशें वर्षें पादशाहात दिल्ही ती मर्यादा अवकाश असतां हिंदूंची पादशाहात आम्हांस दिल्ही ती आजच पुन्हा हिंदूंची हिंदूंस देऊन तख्त दुसरें पृथ्वीवर हिंदूंचें

जालें. या उपरि चांगली गोष्ट पुढे व्हावयाची व हें तख्त मोडा-वयाचें कठीण गोष्ट आहे. सुलतान रुकनदीन याचे कुलांत उत्पन्न होऊन आपले कारकीर्दींत हे गोष्ट घडली! व्यर्थ उत्पन्न जालों!! शिवाजीनीं राणाजीचे कुळीं उत्पन्न होऊन पुन्हां छत्र सिंहासन तख्त केलें, ते धन्य जाले!' म्हणोन तीन दिवसपर्यंत बाहेर दरबारास आले नाहीत. 'मक्केस निघून जावें किंवा येच समयीं मसलत करावी तरि बळें करून ते अधीक जाले.' म्हणून जनान्यांत राहिले. तेव्हां सर्व वजीर व अमीर यांणीं अर्ज करून 'हे गोष्ट ईश्वरी इच्छेची आहे. आपलाही प्रताप, ताले थोर आहेत. प्रयत्ने करून सर्व गोष्टी करितां येतील, म्हणून समाधान करून दरबार करविला. बाहेर आले.' (शककर्ते श्रीशिवछत्रपति महाराज यांचें सप्तप्रकरणात्मक चरित्र, पृ. ३४४)

महाराजांचें वाढतें बळ व परिस्थितीचीं पावलें इंग्रजांनी मात्र ओळखलीं होतीं, व त्यामुळे महाराजांशीं संधि करावयाला ते या वेळीं अत्यंत उत्सुक होते. सर्व कोकणपट्टी महाराजांच्या अधीन असल्यामुळे महाराजांच्या अनुकूलतेवांचून तिकडच्या बंदरांत व्यापार करतां येणें सुलभ नव्हतें. महाराजांनाही असा तह या वेळीं हवा होता. कारण त्यामुळे मुंबईकर इंग्रजांच्या प्रदेशांत महाराजांना आपल्याकडच्या व्यापाऱ्यांच्या वखारी थाटतां येणार होत्या. राज्याभिषेकाच्या वर्षीं इंग्रजांनी महाराजांशीं संधि कर-ण्याच्या प्रयत्नांना यश येऊन नारायण शेणव्याच्या द्वारें इ. स. १६७४ च्या एप्रिलमध्ये कच्चें संधिपत्र करण्यांत आलें. इंग्रजांचा वकील हेन्री ऑक्झिंडेन याची संधि पक्का करण्यासाठी राज्याभिषेकाच्या वेळीं रायगडावर पाठवणी करण्यांत आली. दि. १३ मे ते १६ जून पर्यंत ऑक्झिंडेन रायगडावर राहिला. ऑक्झिं-डेनने बरोबर येतांना कोणता नजराणा द्यावा याच्याही बारीक सारीक सूचना त्याला करण्यांत आल्या होत्या व त्याने त्या पाळल्या. नारायण शेणवी याने सुरत कंपनीला या संबंधांत लिहिलें होतें : 'आतां ऑक्झिंडेनबरोबर चांगला नजराणा देऊन त्याला लगेच

पाठवावा. निराजी पंडिताचे सांगण्यावरून, तुम्ही शिवाजीच्या नजराण्यांत अरबी घोडा न पाठवितां मूल्यवान् रत्नें राज्यारोहणाच्या वेळीं धारण करण्यासाठी पाठवावीं हें बरें दिसतें. नजराणा चांगला १०००–१२०० रुपयांचा पाठवा.'

——(शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. १६२५)

राज्याभिषेकाच्या वेळीं इंग्रजांनी पुढीलप्रमाणे नजराणा द्यावयाचें निश्चित केलें.

| | | |
|---|---|---|
| 'शिवाजी राजाला – | १ हिरेजडित शिरपेंच किं. | रु. ६९० |
| | २ हिरेजडित सलकडी | रु. ४५० |
| | २ मोती (रती १० १/१०) | रु. ५१० |
| | एकूण | रु. १६५० |

शिवाजीचा पुत्र संभाजीराजा याला–

| | |
|---|---|
| दोन लालखचित सलकडी | रु. १२५ |
| एक कंठी ८ हिऱ्यांची– | रु. २५० |
| | रु. ३७५ |

| | |
|---|---|
| मोरो पंडित–दोन मोठीं मोत्यें | किं. रु. ४०० |
| अण्णाजी पंडित–दोन सोन्याचे गोफ वजन ७ तोळे | किं. रु. १२५ |
| निराजी पंडित–दोन पामऱ्या | किं. रु. ७० |
| रावजी सोमनाथ–दोन पामऱ्या | किं. रु. ७० |
| एकूण | रु. २६९० |

——(शिवकालीन पत्रसारसंग्रह प. क्र. १६४०)

इंग्रजांनी संधि पुढील प्रमाणे सुचविला :—

'श्रीछत्रपति शिवाजी राजे व ऑन. इं. ई. इं. कंपनी यांमधील शांतता, सहकार्य आणि सलोखा राखण्याविषयी ( इंग्रजांनी सुचविलेलीं) तहाचीं कलमें :–

(१) उभयतांमध्ये आजपासून पक्क्या व अभंग सलोख्याचा तह असावा.

(२) सर्व शत्रुत्व नष्ट व्हावें आणि उभयपक्षी कोठल्याही भागांत लूट करणें, छापे घालणें इत्यादि प्रकारें नुकसान करूं नये.

(३) शिवाजीचे राज्यांत संचार, रहिवास व व्यापार या बाबतींत इंग्रजांना पूर्ण स्वातंत्र्य असावें. इंग्रजांनी नित्याच्या जकाती देऊन सरकाराशीं आज्ञाधारकपणें वागावें. शिवाजी राजांच्या प्रजेला मुंबई बेटावर याच प्रकारच्या सवलती मिळाव्या.

(४) परस्परांच्या बंदरांत आलेलीं परस्परांचीं जहाजें व्यापाराकरिता आलीं नसतां अडचणीमुळे आश्रयाला आलीं असतील तीं जकात घेतल्याशिवाय जाऊं द्यावीं. दुर्दैवाने फुटून किनाऱ्याला लागलेल्या गलबतांची जप्ती न करतां तीं मालकांचे हवाली करावीं.

(५) उभयपक्षांच्या जकातदारांनी वगैरे शिरस्त्यापेक्षा बक्षिसें इत्यादि व्यापाऱ्यांकडून लुबाडून घेऊ नयेत.

(६) कोणा इंग्रजावर शिवाजीच्या मुलखांत अन्याय झाला तर त्याला त्वरेने न्याय मिळावा. इंग्रजांच्या मुलखांतही शिवाजीच्या प्रजेला तसाच न्याय मिळावा.

(७) कोणाही खाजगी व्यक्तीच्या आगळिकीमुळे या सलोख्यांत व्यत्यय येऊं नये. गुन्हेगारालाच फक्त शिक्षा व्हावी. न्यायाला विरोध किंवा निष्कारण दिरंगाई झाल्याशिवाय जप्ती आदिकरून प्रकार होऊं नयेत.

(८) मोगलांच्या किंवा अन्य मुलखांतील इंग्रजांच्या वखारी स्वारीच्या वेळीं शिवाजीच्या लोकांनी वाचवाव्या. लूट झाल्यास शिवाजीने भरपाई करावी.

(९) परस्परांनी परस्परांच्या समुद्रावर पकडलेला माल मालकीबद्दल पुरावा झाल्यास सोडून द्यावा.

(१०) इंग्रजांनी राजापुरास वाटेल तेव्हा रहावें. राजाने आपल्या खर्चाने घर द्यावें. आयात निर्यातीच्या वेळीं फक्त एकदाच जकात

दिल्यावर मालाची वाहतूक करण्यास, मालाला देशांत कोठेही हरकत करूं नये.

(११) आयात निर्यात मालावर शेकडा २½ टक्के जकात इंग्रजांनी द्यावी. माल विक्री न होतां परत गेला तर त्यावर व कोणत्याही प्रकारचे लाकूड सामानावर जकात मुळीच भरूं नये.

(१२) इंग्रजांना खरेदीविक्रीचें पूर्ण स्वातंत्र्य असावें. सुभेदार, जकात घराचे दरोगे यांनी आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करूं नये.

(१३) देशी व्यापाऱ्यांनी खरेदीविक्रीच्या बाबतींत इंग्रजांशीं केलेले करार पाळण्यास त्यांना शिवाजीच्या अधिकाऱ्यांनी भाग पाडावें. तशी व्यवस्था न झाल्यास कर्जफेड किंवा कराराची पूर्ती होईपर्यंत इंग्रजांना अशा गुन्हेगारास घरांत अडकवून ठेवण्याची कायद्याने परवानगी असावी.

(१४) राजापूरची वखार मोडकळीस आल्यामुळे तिची दुरुस्ती इग्रजांनी करून दुरुस्तीचा खर्च जकातींतून घ्यावा.

(१५) इंग्रजांची डच, फ्रेंच, पोर्तुगीज व इतर कोणाशीं लढाई जुंपल्यास शत्रूंना शिवाजीने मदत करूं नये आणि त्यांच्यापासून इंग्रजांच्या मालमत्तेचें व लोकांचें संरक्षण करावें. त्यांच्या मुलखांतील कंपनीची इस्टेट कोणी जप्त केल्यास शिवाजीने भरपाई करावी.

(१६) कोणत्याही दर्जाच्या माणसाने इंग्रजांच्या वखारींत जबरदस्तीने प्रवेश करूं नये. इंग्रजांचें देशांतील कोणाशीं वितुष्ट आल्यास ते सामोपचाराने संपवावें. रक्तपातापर्यंत गोष्टी विकोपास गेल्यास देशी माणसाचा गुन्हा असल्यास शिवाजीतर्फे शिक्षा देण्यांत यावी. इंग्रजांचा गुन्हा असल्यास त्यांना बेड्या घालून मुंबईच्या गव्हर्नराचा हुकूम येईल त्याप्रमाणे इंग्रजांनी शिक्षा द्यावी. देशी व्यापाऱ्यांचा इंग्रज नोकराशीं हिशेबाच्या बाबतींत मतभेद झाल्यास वखारीच्या मुख्याकडे नेऊन त्याचा निकाल व्हावा.

(१७) इंग्रजांचा नोकर शिवाजीच्या मुलखांत गेल्यास तो इंग्रजांचे हवाली परत द्यावा.

(१८) मुंबई जवळच्या मुलखांतून जकात भरल्याशिवाय बेटावर सर्पण आणण्याची परवानगी असावी.

(१९) परस्परांचीं नाणीं परस्परांच्या मुलखांत अप्रतिहत चालावीं.

(२०) शिवाजी इंग्रजांच्या मुंबईच्या प्रजेला ज्या सवलती देईल त्याच सवलती इंग्रजांनी शिवाजीच्या सर्व प्रजेला द्याव्या.

——(शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्रक्रमांक १६४१)

या प्रमाणे श्रीशिवछत्रपतींच्या राज्याभिषेकाने कल्पनेंतही नसलेल्या एका महान् युगपरिवर्तनाचा प्रारंभ झाला. त्यासाठी आसुसलेलीं दीर्घदर्शी द्रष्टयांचीं व संतमहंतांचीं हृदयें एक प्रकारच्या तृप्तीने भरून गेलीं आणि महाराष्ट्रांतील तत्कालीन युगद्रष्टयांचा सम्राट् म्हणून ज्यांना म्हणतां येईल त्या श्रीसमर्थ रामदासांच्या तोंडून गर्जना बाहेर पडली :—

‘स्वप्नीं जें देखिलें रात्रीं । तें तें तैसेंचि होतसे ।
हिंडता फिरता गेलो । आनंदवनभूवनी ॥
स्वधर्माआड जीं विघ्नें । तीं तीं सर्वत्र ऊठिलीं ।
लाटिलीं कुटिलीं देवें । दापिलीं, कापिलीं बहु ॥
विघ्नाच्या उठिल्या फौजा । भीम त्यावरि लोटला ।
र्भांडिलीं, र्चिडिलीं रागें । रडविलीं बडविलीं बळें ॥
खौळले लोक देवाचे । मुख्य देवचि ऊठिला ।
कळेना काय रे होते । आनंदवनभूवनी ॥
स्वर्गीची लोटली जेथे । रामगंगा महानदी ।
तीर्थासी तूळणा नाही । आनंदवनभूवनी ॥
त्रैलोक्य चालिल्या फौजा । सौख्य बंदिविमोचने ।
मोहीम मांडिली मोठी । आनंदवनभूवनी ॥
अनेक वाजतीं वाद्यें । ध्वनिकल्लोळ ऊठिला ।
छबीने डोलती ढाला । आनंदवनभूवनी ॥
कल्पांत मांडिला मोठा । म्लेंच्छदैत्य बुडावया ।
कैपक्ष घेतला देवी । आनंदवनभूवनी ॥

बुडाले सर्वही पापी । हिंदुस्थान बळावलें ।
अभक्तांचा क्षयो जाला । आनंदवनभूवनी ।।
येथून वाढला धर्मु । रमाधर्म समागमे ।
संतोष मांडिला मोठा । आनंदवनभूवनी ।।
बुडाला औरंग्या पापी । म्लेंच्छसंहार जाहला ।
मोडिलीं मांडिलीं क्षेत्रें । आनंदवनभूवनी ।।
उदंड जाहलें पाणी । स्नानसंध्या करावया ।
जपतप अनुष्ठानें । आनंदवनभूवनी ।।
लिहीला प्रत्ययो आला । मोठा आनंद जाहला ।
चढता वाढता प्रेमा । आनंदवनभूवनी ।।
बंड पाषांड उडाले । शुद्ध अध्यात्म वाढले ।
राम कर्ता राम भोक्ता । आनंदवनभूवनी ।।
देवालयें दीपमाळा । रंगमाळा बहूविधा ।
पूजिला देव देवांचा । आनंदवनभूवनी ।।
गीत संगीत सामर्थ्यें । वाद्यकल्लोळ ऊठिला ।
मिळाले सर्व अर्थार्थी । आनंदवनभूवनी ।।
येथुनी वांचती सर्वें । ते ते सर्वत्र देखती ।
सामर्थ्य काय बोलावे ? । आनंदवनभूवनी ।।

✦ ✦ ✦

प्रकरण सोळावें

# मोगलांशीं व विजापूरकरांशीं युद्ध

राज्याभिषेकाच्या मंगल प्रसंगानंतर महाराजांना अवघ्या पंधरवड्याच्याही आंत मातृवियोगाचें दुःख सहन करावें लागलें. राजमाता जिजाबाई या वेळीं अतिशय थकल्या होत्या. आपल्या

धर्मरक्षक व प्रतापी पुत्राच्या राज्याभिषेकाने जीवनांतील सर्वोच्च आनंदाचें वैभव व इतिकर्तव्यतेचें समाधान तिने अनुभविलें होतें. दि. १७ जून १६७४ ज्येष्ठ वद्य नवमी बुधवारीं मध्यरात्रीं राजमाता जिजाबाईचें देहावसान झालें. ज्या स्थळीं त्यांचें दहन झालें तेथे (पाचाडला) त्यांची समाधि बांधण्यांत आली. महाराजांच्या मनावर हा वज्राघातच झाला होता. पण ती अवश्यंभावी घटना सहन करणेंच क्रमप्राप्त होतें व झालें तेंच योग्यही होतें. मातुश्री जिजाबाईनी जातांना महाराजांच्या पदरांत पंचवीस लक्ष होनांची (एक कोटि रुपये)मायेची पुरचुंडी स्वराज्यमंदिराच्या स्थैर्यासाठी घातली.

असो. राज्याभिषेक समारंभाच्या वेळीं निश्चळपुरी या नांवाचे एक तांत्रिक महंत रायगडावर उपस्थित होते. गागाभट्टांच्या विधिविधानांत त्यांना कोठेंच स्थान व मान प्राप्त न झाल्यामुळे ते अतिशय रागावले होते. त्यांनी, गागाभट्टांनी तांत्रिक विधीची अवहेलना केल्यामुळे जिजाबाईचा मृत्यु व अन्य कांही अपशकुन झाले असल्याचा प्रचार सुरू केला. म्हणून महाराजांनी त्यांच्या समाधानासाठी तांत्रिक सिंहासनारोहणविधि स्वतंत्रपणें केला. ललिता-पंचमीच्या सुमुहूर्तावर दि. २४ सप्टेंबरला हा विधि पार पाडण्यांत आला. त्याचें केवळ तांत्रिक स्वरूप लक्षांत न आल्यामुळे पुष्कळांनी त्याला ‘राज्यारोहणाचा दुसरा समारंभ’ असें नांव दिलें आहे.

या राज्यारोहणासाठी मर्यादातीत व्यय झाला होता. म्हणून तो भरून काढण्यासाठी महाराजांनी सर्व वृत्तिवंतांवर(वतनदार) सिंहासन पट्टी या नांवाच्या कराची आकारणी केली. पुणें प्रांताने मोगलांच्या स्वाऱ्यांत अतिशय हानि सहन केलेली असल्यामुळे त्याच्यावर हा कर बसविण्यांत आला नाही. इतरत्रही सर्वसाधारण माणसांवर हा कर नसून देशमुख,देशकुळकर्णी, पाटील, गांवकुळकर्णी अशा अधिकारपदस्थांवर व धनिकांवरच हा कर होता हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

राज्याभिषेकाने हिंदुराष्ट्राचें अस्तित्व महाराजांनी सिद्ध केलें

असलें तरी त्याच्या संरक्षणासाठी सावधपणें दिग्विजय करणें आवश्यक होतें. स्वराज्याच्या हृदयावर खड्गाचें टोक सदैव रोखलेल्या मोगल व विजापूरच्या सत्तेकडे लक्ष पुरविणेंही महाराजांना आवश्यक होतेंच. यांपैकी विजापूरच्या सत्तेंत शिव-छत्रपतींना प्रत्यक्ष विरोध करण्याचें सामर्थ्य आता उरलेलें नव्हतें. मोगली सत्तेला मात्र हात दाखविणें आवश्यक होतें. महाराजांनी त्यासाठी पावसाळ्यांतच आपल्या सैन्याच्या हालचालींना प्रारंभ केला.

या वेळीं बहादूरखान कोकलताश हा मोगलांचा दक्षिणेंतील सुभेदार असून त्याचा सेनानिवेश पुण्याच्या पूर्वेस ४८ मैलां-वर पेडगांव येथे होता महाराजांच्या सेनानींनी आपल्या सेनेच्या दोन टोळ्या केल्या. पहिल्या दोन सहस्रांच्या टोळीने बहादूर खानाच्या सेनानिवेशावर आक्रमण केलें, त्यासरशी खानाने तें परतवून लावून साऱ्या सैन्यानिशी त्यांचा पाठलाग करण्यास प्रारंभ केला. खान पाठलाग करीत वीस-पंचवीस कोस दूर गेल्यावर मागे राहिलेल्या दुसऱ्या सात सहस्रांच्या मराठी सैन्याने त्याच्या संरक्षण-हीन सेनानिवेशावर आक्रमण करून तो निवेश सावकाशपणें लुटला. या लुटींत महाराजांना एक कोट रुपये व दोनशे उत्कृष्ट घोडे मिळाले. हे घोडे बहादुरखानाने बुद्धया औरंगजेब बादशहाला भेट देण्यासाठी जमविले होते असें म्हणतात. इंग्रजी पत्रव्यवहारांत म्हटलें आहे : 'औरंगाबादेहून अशी बातमी आली आहे की, शिवाजीने बहादूरखानाच्या छावणीवर हल्ला करून लूटमार केली. बादशहाकरिता जमविलेले जातिवंत दोनशे घोडे व सुमारें एक कोटीचा खजिना लुटून, त्याचे सर्व तंबू त्याने जाळून टाकले. शिवाजीच्या २००० घोडेस्वारांनी बहादूर खान व त्याचे सैन्य यांस हूल दाखवून २०–३० कोस दूर नेल्यावर इकडे मागे ७००० घोडेस्वारां ी हा पराक्रम केला अशी बोलवा आहे.'

––(शिवकालीन पत्रसारसंग्रह पत्र क्र. १६६४)

राज्याभिषेकामुळे विजापूरकरही कुरापत काढण्याची शक्यता आहे हें महाराजांनी ओळखलें होतें. त्यांनी अनाजीपंतांना विजापूरकरांच्या फोंडा या दुर्गावर पाठविलें. पण तेथील दुर्गपाळ महम्मदखान हा सावध असल्यामुळे प्रथम मराठ्यांना यश आलें नाही. गडकऱ्याला बाहेरून सुभेदाराचें साह्य येत असल्याचें पाहून मराठी सैन्य कोल्हापूर बेळगांव मार्गाने कुडाळला गेलें, व जलमार्गाने ४० गलबतें वेंगुर्ल्याकडे पाठविण्यांत आलीं. एप्रिलपर्यंत थांबून एप्रिल मध्ये दोन सहस्र अश्वदळ व सहा सहस्र पायदळ सैन्यानिशी मराठ्यांनी पुनश्च फोंड्याला वेढा घातला. या वेळीं गडकरी महम्मद खान याची स्थिति फार नाजूक झाली होती. त्याच्या जवळ चार महिन्यांहून अधिक काळ टिकेल असा अन्नसामग्रीचा साठा नव्हता. विजापूर व गोवा येथून साहाय्य मिळविण्याचे गडकऱ्याने प्रयत्न केले; पण त्यांत यश येण्याचें चिन्ह दिसेना. तरीही खानाने कांही दिवस गड लढविला. मध्यंतरीं पोर्तुगीजांनी गडांतील लोकांना साह्य केल्याचें कळतांच मराठ्यांनी त्यांना अशी तंबी दिली की ते पुनश्च त्या भानगडींतच पडले नाहीत. मराठा सेनानींनी अर्धा शेर वजनाचा एक असे सोन्याचे ५०० तोडे करविले व जे शिडीवरून गडाच्या तटावर चढून जातील त्या वीरांना तोडे देण्यांत येतील असें घोषित केलें. त्यासरशी मराठा वीरांना अधिकच स्फुरण चढलें व दि. १७ एप्रिलला भगवा ध्वज फोंड्यावर फडकूं लागला.

राज्याभिषेकानंतर ऑक्टोबर महिन्यांत महाराज स्वतः स्वारीवर निघाले. खानदेशच्या प्रदेशाकडे त्यांचें या वेळीं लक्ष होतें. धरणगांवला इंग्रजांची वखार होती. जवळपास कोठे तरी स्वतः शिवाजी राजे आले आहेत अशा वार्ता त्या वेळीं उठल्या असल्यामुळे त्या वखार वाल्यांची घाबरगुंडी उडाली असल्यास त्यांत नवल नाही. या विभागाचा मोगल अधिकारी कुतुबुद्दीनखान खेशगी याचा पराभव करून त्याचे शेकडो लोक मराठ्यांनी कापून काढले. स्वतः तो औरंगाबादला पळून गेला. तेथील इंग्रज वखारवाल्यांनी महाराजांशीं मैत्री असल्याच्या सबबीवर आपली वखार वांचविण्याचा पुष्कळ

प्रयत्न केला. पण त्यांचें कांही न ऐकतां मराठ्यांनी त्यांचीही वखार लुटून पार फस्त केली. त्यांनी आपलें रडगाणें मुंबईकर अधिकाऱ्यांना कळविलें. त्यांनी आपला ऑस्टिन् नांवाचा वकील हानीच्या भरपाईची मागणी करण्यासाठी महाराजांकडे पाठविला. पण युद्धनीतीप्रमाणे शत्रुप्रदेशांत केलेल्या लुटीची नुकसान भरपाई ती काय मिळणार? शिवछत्रपतींनी या वेळीं ब-हाणपूरपर्यंत धडक मारली.

भूमीप्रमाणेच सागरावरही या वेळीं छत्रपतींची जययात्रा चालू होती. जंजिऱ्याचें अवघड दुखणें सावरण्यासाठी राजापुरीच्या तोंडावर 'कांसा' नांवाचें बेट जिंकून त्यांनी तेथे पद्मदुर्ग बांधला. पद्मदुर्गाचें बांधकाम महाराजांनी हबशांच्या आगीच्या माऱ्यांत पूर्ण केलें. आपले आरमारावरचे अधिकारी दर्यासारंग व दौलतखान यांना पद्मदुर्गाच्या संरक्षणासाठी महाराजांनी या वेळीं युद्धचा तातडीने नियुक्त केलें होतें. या वेळीं अधिकाऱ्यांनी चुकारपणा केल्यास महाराज त्यांना कसें चापीत व अनुशासनाच्या कामांत ते किती कडक असत याचें एक निदर्शन घडून आलें. दर्यासारंग व दौलतखान यांचें आरमार पद्मदुर्गाच्या संरक्षणाचें काम करीत सागरांत रहावयाचें म्हणजे त्यावर धान्य व पैसा मुबलक असणें आवश्यक होतें. त्यामुळे पेशवे मोरोपंत पिंगळे यांनी प्रभावळीचे सुभेदार जिवाजी विनायक यांना आरमाराची कुमक सरकारी साठ्यांतून करण्यासाठी तत्काळ आज्ञा केली. पण सुभेदार जिवाजीपंतांनी या आज्ञेचें तत्परतेने परिपालन केलें नाही. त्याचा चमत्कारिक परिणाम होऊन दर्यासारंगाने महाराजांना आपल्याला जिवाजी पंतांकडून अपेक्षित साह्य मिळत नसल्याचें कळविलें. त्याची महाराजांना भयंकर चीड आली. सरकारी कोठागार समृद्ध असतांना, निष्ठावंत कारागीर तोफांच्या आगींत पाय रोवून जलदुर्गाची बांधणी करीत असतांना व सागरांत शत्रूला थोपवून धरण्यासाठी सेनानी जिवाचें रान करायला उद्युक्त झाला असतांना त्याचेच पाय मागे ओढणाऱ्या या सुभेदाराला महाराज लिहितात :—

श्री शंकर प्रसन्न

दि. १८ जानेवारी १६७५

मशहुरुल हजरत राजश्री जिवाजी विनायक सुबेदार व कारकून सुबे मामले प्रभावळी प्रती राजश्री शिवाजी राजे दंडवत. सुहुरसन खमस सबैज व अलफ दौलतखान व दरियासारंग यांसी ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंत पेशवे यांणी वराता सुबे मजकुरावरी दिधल्या. त्यांस तुम्ही कांही पावले नाहीं, म्हणोन कळो आलें. त्यावरून अजब वाटलें की ऐसे नादान थोडे असतील! तुम्हास समजलें असेल की याला ऐवज कोठें तरी ऐवज खजाना रसद पाठविलिया मजरा होईल म्हणत असाल. तरी पद्मदुर्ग वसवून राजापुरीच्या उरावरी दुसरी राजपुरी केली आहे. त्याची मदत व्हावी. पाणी, फाटी आदिकरून सामान पावावें. या कामास आरमार बेगीने पावावें, तें नाहीं. पद्मदुर्ग हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील. आणि तुम्ही ऐवज न पाववून, आरमार खोळंबून पाडाल! एवढी हरामखोरी तुम्ही कराल आणि रसद पाठवून मजरा करूं म्हणाल, त्यावरी साहेब रिझतील कीं काय? हे गोष्ट घडायाची तऱ्ही होय न कळे की हबशियांनी कांहीं देऊन आपले चाकर तुम्हांला केले असतील! त्या करितां ऐसी बुद्धी केली असेल. तरी ऐशा चाकरांस ठीके ठीक केले पाहिजेत. ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करूं पाहतो! या उपरि तऱ्ही त्याला ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंती देविला असे तो देवितील. तो खजाना रसद पावलियाहून अधिक जाणून तेणे प्रमाणें आदा करणें कीं ते तुमची फिर्याद न करीत व त्यांचे पोटास पावोन आरमार घेऊन पद्मदुर्गाचे मदतीस राहत तें करणें. या उपरि बोभाट आलिया उपरि तुमचा मुलाहिजा करणार नाहीं. गनीमाचे चाकर, गनीम जालेस, ऐसें जाणून बरा नतीजा तुम्हास पावेल. ताकीद असे. रवाना छ २ जिलकाद.'

—(राजवाडे खंड ८ वा ३१)

इ. स. १६७५ च्या जानेवारींत हबशांशी समर करीत पद्मदुर्ग बांधण्यांत येऊन सुभानजी मोहिते यांना तेथे नियुक्त करण्यांत आलें. छत्रपतींनी या सुमारास विजापूरकरांविरुद्ध चढाईचें धोरण स्वीकारलें. दत्ताजीपंत मंत्र्यांना तीन सहस्र सेनेसह कोल्हापूरवर चढाई करण्यास पाठविण्यांत आलें. मराठी सेनेचा त्या प्रदेशांत प्रवेश होतांच कोल्हापूरने १५०० होन व शेवगांवाने पांचशे होन खंडणी देऊन आपली सुटका करून घेतली. याच सुमारास कल्याण येथे मोगली सेनेला मराठी सेनेने वचक निर्माण केला.

फोंडा दुर्गावरील छत्रपतींच्या विजयाचें वर्णन मागे केलेंच आहे. फोंड्यावरील ही स्वारी मार्चच्या प्रारंभीं झाली. त्याच वेळीं मोगलांचा दक्षिणेंतील सुभेदार बहादूरखान हा मोठें सैन्य घेऊन चढाई करणार असल्याचें दिसूं लागलें. त्याच्या स्वारीचा फोंड्याच्या विजयांत अडथळा होणार असें दिसू लागतांच महाराजांनी त्याला मार्च ते मे पर्यंत राजनैतिक वाटाघाटींत गुंतवून त्याची शेवटीं इतकी फटफजिती केली की, त्याला जगांत व बादशहासमोर तोंड दाखवयाचीही सोय उरली नाही. महाराजांनी आपण होऊन बहादूरखानाशीं एकदम संधीचें बोलणें सुरू केलें. संधीच्या अटी महाराजांनीच बहादुरखानाला कळविल्या होत्या. त्या पुढील-प्रमाणे (१) स्वराज्यापैकी सतरा महत्त्वाचे गड मोगलांना देऊं. (२) मोगलांच्या दक्षिणेंतील सुभेदाराच्या आधिपत्याखालीं युव-राज संभाजी ससैन्य राहील. (३) औरंगजेब बादशहाने संभाजीला सहा सहस्री सरदार करावें व (४) भीमेच्या दक्षिणेकडचा सर्व प्रदेश महाराजांकडे असावा.

महाराजांनी हा संधि शक्य तितका लांबवीत नेला. शिवाजी-सारखा अत्यंत उपद्रवी व आजवर अजिंक्य ठरलेला शत्रु आपण होऊन संधि करावयास आला या कल्पनेनेच सुभेदार बहादूरखान हुरळून गेला. त्याने संधीच्या या अटी दिल्लीला कळविल्या. बादशहा औरंगजेब या वार्तेने बहादूरखानावर अत्यंत प्रसन्न झाला. त्याने संधीला मान्यता देऊन बहादूरखानाला एक हत्ती भेट दिला,

व महाराजांना त्यांचे मागचे सर्व अपराध क्षमा करून शाहीकृपेचें फर्मान पाठविलें. पण या वाटाघाटींच्या घोळांत तीन चार महिने उलटून गेले. मागे सांगिल्याप्रमाणे महाराजांनी फोंड्यावर विजय संपादन करून विजापुरी प्रदेशावर धाक बसविला. आता त्यांना मोगलांशीं संधि करण्याचें कोणतेंही कारण उरलें नव्हतें. तें मोगलांशीं झुंज द्यावयास पूर्णपणें सज्ज होते. अशा स्थितींत शाही फर्मानाला महाराजांनी सामोरे जावें व संधि पूर्ण करावा असें त्यांना सांगावयास बहादूरखानाकडून कांही निवडक सरदार आले. महाराजांनी त्यांना अशी अनपेक्षितपणें झणझणीत चपराक दिली की, तिची त्यांना जन्मभर आठवण रहावी. महाराजांनी त्यांना सांगितलें कीं, 'बहादूरखानाच्या कोणत्या पराक्रमाला भिऊन मी त्याच्याशीं संधि करावा असें तुम्हांला वाटतें! जा येथून लवकर, काळें करा! नाही तर तुमची धिंड काढण्यांत येईल.'

या चपराकीने लाल झालेले गाल चोळीत हे सरदार बहादूरखानाकडे गेले. त्यांच्या तोंडून सारें वृत्त कळतांच बहादूरखानाच्या डोळ्यासमोर अंधारी आली. तो आश्चर्याने थक्क झाला. राजकारणांतील या मूर्खपणाबद्दल सगळीकडे त्याची नाचक्की तर झालीच; पण औरंगजेबाने त्याची चांगलीच खरडपट्टी काढली या विटंबनेचा सूड घेण्यासाठी त्याने विजापूरचा मुख्य प्रधान खवासखान याच्याशीं तह केला, व या दोघांच्या संयुक्त सैन्याने महाराजांवर स्वारी करण्याची योजना आखली. औरंगजेबाकडून या संधीसाठी एक वर्षाची खंडणी न घेण्याचें आश्वासनही त्याने विजापूरकरांना देवविलें. परंतु त्याचें दुर्दैव त्याच्यामागे पुरतेंच हात धुवून लागलें होतें असें म्हटलें पाहिजे. दि. ११ नोव्हेंबर १६७५ ला बहलोलखानाने खवासखानाला पदच्युत करून सर्व सत्ता आपल्या हातीं घेतली, व त्यानंतर विजापूरमध्ये आपापसांत सत्तास्पर्धेसाठी इतके पक्ष व इतकीं भांडणें माजलीं की दोघांच्या संयुक्त सैन्याने शिवाजी महाराजांना चिरडून टाकण्याचा व्यूह जागच्या जागींच संपला. शेवटीं संतापून बहादूरखानाने कल्याणवर स्वारी करून महाराजांच्या सैन्याला उत्तर कोकणापर्यंत रेटीत नेलें

या सुमारास महाराज एकाएकी आजारी पडले व त्यांना तीन महिनेपर्यंत शय्येला खिळून राहावें लागलें. आजारीपणाच्या या दिवसांत ते साताऱ्याला होते. त्यांच्या मृत्यूच्याही वावड्या या वेळीं सर्वत्र उठल्या होत्या. इतकेंच नव्हे तर त्याच्या कारण परंपरेच्या एकाहून एक भयानक वावड्या या वेळीं उठल्या होत्या. इंग्रजी पत्रव्यवहारांतील कांही उतारे या दृष्टीने पाहण्यासारखे आहेत. ते असे :—

'नाना तऱ्हेच्या बातम्या येतात. शिवजी मेला असें कित्येक बोलतात; फार आजारी आहे असें दुसरे बोलतात.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. १८०५)

'शिवाजीचें मृत्युस्थान, त्याचा रोग, आणि पुरण्याची तऱ्हा आणि जागा असा संपूर्ण तपशिलासह शिवाजीचा मृत्यु व और्ध्वदेहिक विधि ह्याबद्दल गेले कित्येक दिवस बातमी ऐकू येते. शिवाजीच्या एका मुख्य ब्राह्मणाच्या मुलीशीं संभाजीने व्यभिचार केला. तिला भेटण्यासाठी रात्रीं गडाखाली जाण्याचें त्याने न सोडल्यास त्याचा कडेलोट करण्याचा हुकूम शिवाजीने दिल्याचें ऐकून संभाजीने त्याला विषप्रयोग केला असें कित्येक बोलतात. तो आजारी होता आणि त्याचा आजार मुख्यत: त्याच्या डोक्यांतील भयंकर कळांमुळे होता.(कारण त्याचा मेंदू बहुतेक कुजला होता!) इतकें आम्हांला खात्रीलायक माहीत आहे. डे. प्रेसिडेंटच्या एका नोकराला सिद्दी संबूळकडून शिवाजी मेला असें कळलें. दाभोळ कल्याण, चौल वगैरे ठिकाणचे व्यापारी तसेंच बोलतात. परंतु त्यावर फारसा विश्वास ठेवतां येत नाही. कारण मोरो पंडित माहुली खाली ससैन्य आहे. तो अद्याप तेथून हालला नाही.

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. १८११)

शिवाजीच्या मरणाची बातमी अजूनही संशयित असली तथापि प्रचलित आहे. त्याच्या न्हाव्याने त्याला विषप्रयोग केल्यामुळे बरेच दिवसांत तो बाहेर पडला नाही.

—(पत्रसारसंग्रह, पत्र क्र. १८३७)

पण आपल्या शत्रूंना निराश करून महाराज तीन महिन्यानंतर या आजारांतून खडखडीत बरे झाले व कर्नाटकांतील अथणीनगर मराठी सैन्याने धुऊन काढून त्याची साक्ष शत्रूंना पटविली. अथणीला महाराजांच्या सैन्याला तीन लक्ष होनांची लूट मिळाली. या लुटींत इंग्रजांचें सोळा सहस्र होनांचें कापडही मराठ्यांनी नेलें.

महाराजांना अथणीला यश मिळालें तर बेळगांवला अपयश आलें. बेळगांवला अनुखान या नांवाचा गडकरी होता. त्याने चाळीस सहस्र होनांची लांच घेऊन गड मराठ्यांच्या अधीन करण्याचें मान्य केलें, पण पैसे घेऊन त्याने ऐनवेळीं वंचना केली. मराठी सैन्य गडांत प्रवेश करीत असतां त्याने त्यांच्यावर अकस्मात् आक्रमण करून पांचशे मराठे कापून काढले. डच रेकॉर्डस्मध्ये म्हटलें आहे :—

'विजापूरकरांच्या स्वारींत शिवाजीने (त्याची प्रकृति आता पक्की सुधारली आहे.) अथणीहून पांच लक्ष होनांची लूट नेली. त्यांत इंग्रजांचेंही पुष्कळ नुकसान झालें. पण अनुखान नांवाच्या विजापुरी सरदाराने त्याला बेळगांवच्या किल्ल्यावर चांगलेंच चकविलें. चाळीस हजार होन घेऊन किल्ला ताब्यांत देण्याचें त्याने वचन दिलें; परंतु आपली जबाबदारी टाळण्यासाठी थोडा युद्धाचा देखावा करण्याचें त्याने ठरविलें. त्याला अर्धी रक्कम पोचल्यावर विश्वासाने शिवाजीचें सैन्य किल्ल्यांत शिरूं लागतांच मात्र त्याने असा विरोध केला की, तेथे शिवाजीचे ५०० लोक पडले आणि बाकीचे गोंधळून पळाले.'

—(शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. १८५३)

या वेळीं विजापूरच्या राज्यांत आपआपसांतील भांडणें विकोपाला गेलीं होतीं. बहलोलखान पठाणाने खवासखानास पदच्युत केल्याचा मागे उल्लेख केलाच आहे. या खवासखानाची लवकरच हत्या झाली. त्यासरशीं राज्यांत बहलोलखानाचा पठाणी पक्ष व सर्जाखानाचा दक्षिणी पक्ष असे दोन उघड पक्ष झाले, व त्यांचीं भांडणें शिगेला पोहोचलीं. या भांडणाच्या वातावरणाचा पुरेपूर

उपयोग करून घेऊन स्वराज्य अधिकाधिक बाळसेदार बनत चाललें होतें. महाराजांच्या आजाराच्या शेवटच्या दिवसांत स्वराज्याचा ध्वज हिंदी महासागराच्या तटापर्यंत नेऊन फडकाविण्याची एक उत्कृष्ट संधि प्राप्त झाली. ती म्हणजे विख्यात मुत्सद्दी रघुनाथपंत हणमंते यांचें महाराजांकडे झालेलें आगमन होय. रघुनाथपंतांच्या या भेटींत छत्रपतींच्या दक्षिण दिग्विजयाचें राजकारण शिजलें. त्याकडे वळण्यापूर्वी आणखी एका आनंददायक घटनेचा उल्लेख करणें आवश्यक आहे. ती घटना म्हणजे महाराजांचा एके काळचा सरसेनापति नेताजी पालकर याचें महाराजांच्याकडे आगमन होय.

बहादूरखानाच्या फटफजितीने व पाठविलेल्या प्रत्येक सेनानीच्या अपयशाने या वेळीं बादशहा औरंगजेब अगदी चिडून गेला होता. कोणत्याही सेनापतीचें शिवाजीपुढे कांही चालूं शकत नाही असें पाहून त्याने अफगाणिस्थानचें रणक्षेत्र गाजविणारा एक नवा सेनापति मोठें सैन्य देऊन पाठवावयाचें ठरविलें. या नव्या सेनानीचें नांव होतें महंमद कुलीखान. महंमद कुलीखान म्हणजेच नेताजी पालकर होय. आग्र्याहून शिवछत्रपति निसटून गेल्यावर त्यांचा सूड औरंगजेबाने नेताजी पालकरावर कसा उगविला याचें वर्णन मागे केलेंच आहे. त्याने नेताजीला मुसलमान करून काबूलच्या रणक्षेत्रावर पाठवून दिलें व त्याच्या महाराष्ट्रांत येण्याच्या साऱ्या वाटा बंद करून टाकल्या. या दुर्दैवी घटनेला आता ९ वर्षें लोटलीं होतीं. काबूलचें रणक्षेत्र गाजविलेला महंमद कुलीखान आपल्या जुन्या नेताजी या नांवाप्रमाणेच स्वधर्म व स्वराज्य यांना पूर्णपणें विसरला असेल या कल्पनेने औरंगजेबाने त्यालाच या वेळीं शिवाजीवर पाठविलें. पण आपल्या सावलीचाही संशय घेणाऱ्या औरंगजेबाला नेताजीविषयी पूर्ण भरंवसा वाटणें शक्य नव्हतें. त्याने बाह्यात्कारी साह्यासाठी व अंतःस्थ नेताजीवर दृष्टि ठेवण्यासाठी त्याच्याबरोबर दिलेरखानाला पाठविलें. दिलेरखान मुख्य व महंमद कुलीखान त्याचा साहाय्यक अशी ही योजना होती. पण नेताजीने दक्षिणेंत पाऊल ठेवतांच औरंगजेबाची सारी योजना

धुळीस मिळाली. महाराजांचा एके काळचा हा उजवा हात –प्रति-शिवाजी – त्यांच्याचवर खड्ग उपसणें शक्य नव्हतें. एके दिवशीं संधि साधून नेताजी दिलेरखानाच्या सेनानिवेशांतून गुप्त झाला तो रायगडला महाराजांच्या चरणाशीं प्रकट झाला. त्याला पाहतांच शिवछत्रपतींना काय वाटलें असेल? शिवरायांनी आपल्या या सर-सेनापतीला पुन्हा हिंदू करून घेतलें व आपल्या हृदयाशीं लावलें. ही वार्ता कानीं पडतांच धर्मांध औरंगजेबाचा केवढा तिळपापड झाला असेल याची कल्पनाच केलेली बरी. वाट चुकलेलें वासरूं पुन्हां कळपांत आलें. छत्रपतींनीही त्याला प्रेमाने पुन्हा आपल्या कार्यांत समाविष्ट करून घेतलें.

शिवछत्रपति साताऱ्याला आजारी असतांना रघुनाथपंत हणमंते दक्षिणेंतून त्यांना भेटावयास आले व या भेटींत दक्षिण दिग्विजयाचें राजकारण शिजलें याचा निर्देश मागे केलाच आहे. छत्रपतींच्या दक्षिण दिग्विजयाचें महत्त्व वर्णन करतांना विख्यात इतिहास-संशोधक श्री. बा. सी. बेन्द्रे लिहितात :—

‘ शिवाजीच्या सर्व मोहिमांत विशेष यशस्वी व कीर्ति वाढवि-णारी अशी मोहीम म्हटली तर ती शेवटची कर्नाटकची स्वारी होय. महाराजांनी राज्याभिषेक करवून घेऊन छत्रपतिपद मिळविलें. परंतु त्या पदाची मान्यता याच कर्नाटकाच्या राजकारणामुळे जगाला जाहीरपणें पटविण्याचें कार्य, हिंदुस्थानांतील तीन प्रमुख पातशहांतील एकाला आपण होऊन पत्करावें लागलें. सतत पंधरा वीस वर्षें झुंजूनही मोगल व आदिलशहा यांना कायमचा पायबंद, निदान जिंकलेल्या मुलखांत तरी देणें व मिळविलेलें राज्य कायमचें टिकविणें हें (मोगली सैन्याला उत्तर हिंदुस्थानांतून व विजापुरी सैन्याला दक्षिणेंतून मुबलक पैसा व लोकांची भरती मिळत राहि-ल्यामुळे) अशक्य झालें होतें. उत्तर हिंदुस्थानांतील मदत, औरंगजेब काबूल कंदाहारच्या लढाईंत गुंतल्याने, सध्या कांहीशी कमी झाली होती; व शिवाजीला मोगलांविरुद्ध लढून त्यांचा बराच मुलूख आक्रमितां आला. पण विजापूरकरांची तशी स्थिति

नव्हती. विजापूरकरांनी दक्षिणेंतील सर्व बारीक सारीक राज्यें उलथीं पालथीं केल्याने त्यांना दक्षिण कर्नाटकांत त्यांचें सर्व लक्ष वेधील असा शत्रुच राहिला नव्हता. उलट त्यांना वाटेल तसा पैसा उकळणें बरेंच सोपें जात होतें. विजापूरकरांना कायमचा पायबंद द्यावयाचा तर त्यांना कर्नाटकांत प्रबळ शत्रु उत्पन्न करणें व अशा तऱ्हेने आघाडीवरून मराठ्यांचे हल्ले व पिछाडीवरून कर्नाटकांतील हल्ले झाल्यास विजापूरकरांचा कोंडमारा होऊन आदिलशाहीच्या समाप्तीला फारसा विलंब लागणार नाही ही गोष्ट स्पष्ट दिसत होती. आदिलशहाचे कर्नाटकांतील सरदार आदिलशहाविरुद्ध सारखी बंडाळी करीतच होते. परंतु ते एका छत्राखाली जमण्यास तयार नव्हते. या सर्वांना एका अमलाखाली आणून आदिलशाही प्रथम उलथून पाडावयाची व सांप्रत मराठ्यांना जे वरून मोगल व खालून आदिलशहा यांच्या माऱ्यांत दोन्हीकडे अवधान ठेवून राजकारण साधावें लागत होतें ती अडचण दूर करण्यासाठी खालून मारा करणाऱ्या शत्रूला कायमचें लंगडें करून टाकून नंतर उत्तर हिंदुस्थानांतून येणाऱ्या मोगलांची खाली उतरण्याची वाटच बंद करावयाची हें या मोहिमेंतील राजकारण होतें.'

— (शिवचरित्र निबंधावलि, पृ. ३६७ व ३६८)

छत्रपतींच्या अंतःकरणांत हे विचार घोळत असतांनाच रघुनाथपंत हणमंते यांची व महाराजांची भेट झाली. कर्नाटकच्या या स्वारीमागे स्वराज्याचा रिता झालेला धनकोश भरून काढणें हाही एक हेतु होता, असें श्री. जदुनाथ सरकार यांचें म्हणणें आहे. श्री. सरकार म्हणतात, 'इ. स. १६७४ च्या जूनमध्ये टोलेजंग राज्याभिषेक होऊन लक्षावधि रुपयांचा दानधर्म झाल्यामुळे शिवाजीचा खजिना रिकामा झाला होता. त्यानंतर मराठी फौजा मुलुखगिरीसाठी जरी भटकत होत्या तरी म्हणण्यासारखी लूट त्यांना मिळाली नाही. सन १६७४ व १६७५ मध्ये विजापूरकर व मोगल यांच्याशीं झालेल्या युद्धांतही खर्च फार झाला. फोंड्याला वेढा घालून तो किल्ला सर केला, परंतु त्यांतही आतबट्याचाच व्यापार

झाला. सन १६७५ च्या मे मध्ये कर्नाटकावर स्वारी केली, परंतु तींतही यश आलें नाही. आणि सन १६७६ च्या आरंभीं स्वतः शिवाजीच आजारी पडल्याने कांही दिवस सगळ्याच चळवळी बंद ठेवणें भाग पडलें. अशीं एकामागून एक कारणें उद्‌भवल्यामुळे स्वराज्याचा खजिना भरण्यास संधिच सांपडली नाही. परंतु हें अधिक दिवस चालणें शक्य नव्हतें. खजिना भरण्यासाठी कोणत्या देशाकडे मोर्चा वळवावा याचा विचार शिवाजी आता करूं लागला. दोन वेळां लुटल्याने व जवळच रामपुरास मराठ्यांचें कायमचें ठाणें ठेविल्याने सुरतेची स्थिति 'रंग पिळुनि अळित जणु देति फेकुनि' अशी निःसत्त्व झाली होती. कानडी मुलूख व समुद्रकिनारा मूळचा श्रीमंत खरा, परंतु तोही लुटून मराठ्यांनी खंक करून टाकला होता. खवासखानाच्या कारकिर्दींत माजलेल्या यादवीमुळे विजापूराकडे लक्ष देणेंही शक्य नव्हतें. शिवाय मुख्य विजापुरावरच हल्ला केल्यास त्या इष्टापत्तीने कदाचित् सर्व पक्ष एक होऊन राज्यांतील अंतःस्थ यादवी आपोआपच नाहीशी होण्यास आपण कारणीभूत होऊं अशीही शिवाजीस भीति वाटणें स्वाभाविक होतें.

विजापूरच्या राज्याची व राजधानीची वरप्रमाणे स्थिति होती. तरीही त्यांच्या ताब्यांतील कर्नाटक प्रांत अद्यापि संपन्न व मराठ्यांच्या स्वाऱ्यांपासून अलिप्त असा राहिलेला होता. या प्रांताला त्या वेळीं सुवर्णभूमि असें म्हणत असत. इकडील जमीन अत्यंत सुपीक असून तेथील लोकांची राहणी फारच साधी असल्याने संपत्तीचा साठा येथे चांगलाच झाला होता. इकडील समुद्रकिनाऱ्यावरील बंदरांतून फार प्राचीन काळापासून परदेशांशीं व्यापार चालत असे, आणि येथील खाणींचेंही उत्पन्न चांगलेंच असे. सारांश, द्रव्यप्राप्तीचीं इतकीं विविध साधनें येथे होतीं, व द्रव्याचा व्यय मात्र कांही देवळें बांधण्यांत होत असे तेवढाच. बाकीची संपत्ति जमिनींत पुरून ठेवण्यांत येत असे. या भूमिगत द्रव्याचा सुगावा इतरांस लागून त्यांनी येथे येऊन किरकोळ लुटीही केल्या होत्या. समुद्रगुप्त, चालुक्य, मलिक काफूर, मीरजुमला इत्यादींनी या प्रांतांतून

अगणित संपत्ति नेली होती. तथापि तेथे असलेल्या संपत्तीच्या मानाने या लुटी म्हणजे खंडीस नवटाकही नव्हत्या. अशा या संपन्न प्रांताकडे शिवाजीची दृष्टि वळली. येथील जहागीरदार स्वतंत्रच होते. त्यामुळे हा प्रांत नांवालाच विजापूरच्या ताब्यांत होता.'

—– (शिवाजी व शिवकाल, पृ. १९८–१९९)

शिवछत्रपतींच्या मनांत आलेल्या या दक्षिणदिग्विजयाच्या कल्पनेला निमित्त कारण रघुनाथ नारायण हणमंते हे झाले. या व्यक्तीचें महत्त्व समजण्यासाठी आपल्याला शिवछत्रपतींचे सापत्न बंधु व्यंकोजीराजे यांच्याकडे वळलें पाहिजे.

शिवछत्रपतींचे वडील शहाजीराजे यांच्या पराक्रमी जीवनाचा उत्तरार्ध कर्नाटकांत नाममात्र कां होईना, पण विजापूरकरांचे सरदार या नात्याने गेला याचा उल्लेख मागे केलाच आहे. शहाजी राजांनी आपल्या कर्तृत्वाने कर्नाटकांत बंगलोरला आपलें सिंहासन निर्माण केलें व अमाप वैभव मिळविलें. शहाजी राजांचे ज्येष्ठ पुत्र शिवाजी महाराज महाराष्ट्रांत आपलें कर्तृत्व गाजवीत होते. त्यांची धाकटी राणी तुकाबाई हिच्यापासून झालेले पुत्र एकोजी अथवा व्यंकोजीराजे हे मात्र आपल्या वडिलांजवळच होते. शहाजी राजे यांच्या निधनानंतर त्यांची जहागीर व धनसंपत्ति यांचा कारभार व्यंकोजी राजांनी सर्वस्वी आपल्या हातांत घेऊन चालविला. राजे व्यंकोजी हेही शूर व कर्तृत्वसंपन्न होते. रघुनाथ नारायण हणमंते हे त्यांचे मुख्य कारभारी होते. राजे शहाजी यांचा रघुनाथपंतांवर अतिशय विश्वास असून त्यांनी एक प्रकारें व्यंकोजी राजांचे पालक या नात्याने आपल्या जहागिरीचा कारभार त्यांच्यावरच सोपविला होता.

शहाजीच्या निधनानंतर व्यंकोजीराजांनी आपलें कर्तृत्व प्रकट करून ते तंजावरच्या सिंहासनाचे अधीश्वर झाले. त्याच्या पूर्वीही त्यांच्या पराक्रमाचा शिवछत्रपतींना परिचय होताच. विजापूर-करांशीं महाराजांच्या चाललेल्या युद्धांत व्यंकोजीराजे यांनी महाराजांविरुद्ध दोनदां आपलें खड्ग परजलें होतें. व्यंकोजीही

महत्त्वाकांक्षी होते. त्यांनी इ. स. १६७६ च्या जानेवारी महिन्यांत मदुरेचा राजा चोक्कनाथ नायक याचा पराभव करून तंजावर नगरावर विजय मिळविला. थोड्याच दिवसांत त्यांनी उरलेलें तंजावरचें राज्यही जिंकून घेतलें. तंजावर ही विजयराघव राजाची राजधानी होती. विजयप्राप्तीनंतर तेथील सिंहासनावर आरोहण करून आपल्या बंधूप्रमाणेच सिंहासनाधीश्वर व्हावें असें व्यंकोजींनी ठरविलें, व दि. ५ मार्च १६७६ ला वर्षप्रतिपदेच्या सुमुहूर्तावर सिंहासनावर आरूढ होऊन व्यंकोजी हे तंजावरचे महाराज झाले. पण व्यंकोजीच्या कर्तृत्वाचा हा पूर्णचंद्र त्यांच्या विजापूरच्या सिंहासनाचे दास राहण्याच्या निश्चयाच्या लांछनाने डागळलेला होता व ही गोष्ट छत्रपतींना बरी वाटणारी नव्हती. राजे व्यंकोजी यांचे मुख्य कारभारी रघुनाथपंत हणमंते यांना शिवछत्रपतींविषयी विशेष आकर्षण असणें स्वाभाविक होतें. राजे शहाजी यांच्या मनांतील महत्त्वाकांक्षा रघुनाथपंतांना चांगल्याच परिचित होत्या व विशिष्ट परिस्थितींत जरी त्यांना विजापूकरांचें अंकितत्व उघडपणें झुगारून देतां आलें नाही तरी व्यंकोजी राजांना शिवछत्रपतींच्या कर्तृत्वाचा येवढा मोठा आधार लाभण्याची शक्यता असतांना त्यांनी विजापूरकरांचें हें नाममात्र अंकितत्व झुगारून कां देऊं नये असें पंतांसारख्या पुरुषाला वाटणें स्वाभाविक होतें. या किंवा अशाच कारणांवरून त्यांचें व राजे व्यंकोजी यांचें बिनसलें; व रघुनाथपंत शिवछत्रपतींच्याकडे आले. येतांना रघुनाथपंत नुसतेच न येतां वाटेंत कुतुबशहाचे वकील मादण्णा यांची भेट घेऊन व त्यांच्याशीं राजकीय बोलणीं करून आले. रघुनाथपंतांनी कर्नाटकचें राजकारण छत्रपतींकडून साधविण्याचा हा जो उपक्रम केला त्याला दोषदृष्टीने पाहणारे जसे कांही इतिहासलेखक आहेत, तसेच मुळांतच त्यांचें सारें कर्तृत्व नाकारणारेही कांही इतिहासलेखक आहेत. पहिल्या प्रवृत्तीचे लेखक जदुनाथ सरकार हे होत. ते लिहितात :--

'शहाजीने आपल्या पश्चात् रघुनाथ नारायण हणमंते याला व्यंकोजीचा पालक नेमून कर्नाटकांतील जहागीर त्याच्या स्वाधीन

केली होती. पुढे व्यंकोजीला चांगलें समजूं लागल्यावर रघुनाथपंताचा वरचष्मा त्याला खपेनासा झाला. शिवाय रघुनाथपंताने पुष्कळ वर्षांच्या आपल्या कारकीर्दींत बराच पैसा अन्यायाने मिळविला होता. त्याचा हिशेबही व्यंकोजी मागूं लागला. आपल्याविरुद्ध याप्रमाणे वातावरण झालेलें पाहून राजीनामा देऊन रघुनाथपंत नोकरींतून मुक्त झाला; व पुण्यस्थळांची यात्रा करण्यासाठी तंजावरहून निघाला. आपली सर्व संपत्ति, कुटुंब व बंधु जनार्दन यांसही त्याने आपल्या बरोबर घेतलें; परंतु सत्ता आणि संपत्ति यांच्यांत जन्मभर वागलेल्या रघुनाथपंतास हल्लीची अजागलस्तनासारखी स्थिति कशी मानवणार? त्याने तंजावरहून निघाल्यानंतर विजापूरची यात्रा करून आदिलशहाच्या थडग्याचें प्रथम दर्शन घेतलें. रघुनाथ मोठा मुत्सद्दी असल्याची प्रसिद्धि होती. विजापूरच्या दिवाणगिरीचीं सूत्रें हातीं घेऊन पडती बादशाही सावरावी असें त्यांस विजापुरी सरदारांनी आग्रहाने विनविलें; परंतु विजापूरचें राज्य अगदीच जर्जर झालेलें असून त्याचा नाश जवळ आला आहे हें त्या जांबुवंत मुत्सद्द्याला तेव्हाच दिसलें. शिवाजीचेंहि आमंत्रण त्याला आलेंच होतें. म्हणून मुसलमानांच्या पदरीं न राहतां शिवाजीच्या पदरीं राहण्याचें निश्चित करून तो शिवाजीकडे आला, व तेथे त्याचा आदरसत्कार उत्तमप्रकारें झाला.

व्यंकोजीचा सूड उगवावा ही रघुनाथाची तीव्र इच्छा होती. त्यामुळे त्याने शिवाजीस कर्नाटकाच्या संपत्तीची व तिकडील राज्याची अंतःस्थ माहिती तपशीलवार दिली. शहाजीने व्यंकोजीस सोपविलेल्या जहागिरींत शिवाजीने कायदेशीरपणें वाटा मागावा असा मंथरेला शोभण्यासारखा सल्लाही त्यानेच शिवाजीस दिला, आणि शिवाजीने जर कर्नाटकावर स्वारी केली तर आपलें तिकडे असलेलें सर्व वजन खर्च रून ती स्वारी यशस्वी करून दाखवूं असेंहि रघुनाथाने सांगितलें.'

—(शिवाजी व शिवकाल, पृ. २०० व २०१)

सरकारांच्या या प्रतिपादनाप्रमाणे रघुनाथपंत हणमंते हे कुटिल कारस्थानी कर्तृत्वाचे पुरुष होते असें दिसतें.

याच्या उलट श्री. वा. सी. बेन्द्रे लिहितात : 'हें राजकारण पुष्कळ दिवसांपासून शिजत होतें. मुख्यतः हें राजकारण निराजी रावजी, प्रल्हाद निराजी, व शामजी नाईक पुंडे यांनीच मादण्णा अकण्णांच्या साहाय्याने सिद्ध केलें. रघुनाथपंताचा यांच्याशीं मुळीच संबंध दिसत नाही. रघुनाथपंताची असलें राजकारण शिजविण्याइतकी पात्रता, त्याच्या इतर वागणुकीवरून मुळीच सिद्ध होत नाही. बखरींच्या भरमसाट विधानांखेरीज त्यास आधार नाही. धन्याचा पडता काळ पाहून त्याच्या विरुद्ध उठणें हा त्याचा स्वभाव दिसतो. संभाजीविरुद्धही उठून त्याने कर्नाटकाचा हिशेब देण्याचें नाकारलें. परंतु त्या जबरदस्ताने त्याला कर्नाटकांतच कैद करून ठेविलें होतें. नंतर मनधरणी करून व सर्व झडती दिल्यावर त्याला मजमु दिली, परंतु कारभार दिला नाही. सारांश, अस्सल कागदपत्रांत रघुनाथपंताच्या या मोठ्या कामगिरीचा म्हणजे राजकारण तयार केल्याचा उल्लेख येत नाही. इतरांचा येतो. यावरून रघुनाथपंतांनी हें राजकारण शिजविलें नाही यांत शंका नाही. जर मादण्णांचा व त्याचा स्नेह असता तर त्याने एकोजींचें राज्य कुतुबशाही छत्राखाली यापूर्वीच नेऊन ठेवलें असतें.'

—(शिवचरित्र निबंधावली पृ. ३६८)

तात्पर्य, श्री. बेन्द्रे यांच्या मतें रघुनाथपंत हा एक स्वामीद्रोही अकर्मण्य व नगण्य मनुष्य होता. यांपैकी खरें काय असेल याच्या संशोधनाकडे आपण पुढील प्रकरणांत वळूं.



प्रकरण सतरावें

# शिवछत्रपतींचा दक्षिणदिग्विजय

रघुनाथपंत हणमंते हे जर केवळ स्वार्थी, कुटिल कारस्थानी पुरुष असते तर दक्षिण दिग्विजयानंतर त्यांजकडेच जिंजीच्या संरक्षणाचीं सूत्रें शिवाजी महाराजांनी सोंपविलीं असतीं काय हा विचारार्ह प्रश्न आहे. महाराजांना स्वतःला मनुष्य स्वभावाची उत्कृष्ट परीक्षा होती. केवळ पैशाच्या अफरातफरीच्या संशयाने आपल्या बंधूने कांही विचारतांच त्याच्या जिवावर उठलेल्या या उपद्व्यापी गृहस्थाला दक्षिणेचा कारभार व जिंजीसारखें महत्त्वाचें ठाणें सोंपविण्याइतके महाराज कांही दुधखुळे नव्हते. हा कारभार सोंपविल्यानंतर पश्चात्ताप करण्यासारखें रघुनाथपंतांसंबंधांत महाराजांना कांहीही आढळलेलें दिसत नाही. याचाच अर्थ कै. जदुनाथसरकार यांचे रघुनाथपंतांवरील आरोप म्हणजे खोटी बालटें होत असा होतो. महाराजांनी व्यंकोजीराजांना पाठविलेल्या एका विस्तृत पत्रावरून (हें पत्र पुढे योग्य स्थळीं देऊं.) त्यांच्या राजसभेंत हलक्या यावनी अधिकाऱ्यांचें वर्चस्व वाढत चाललें होतें असें दिसतें. रघुनाथपंत राजे शहाजी यांच्या हाताखाली वावरलेले होते. राजे शहाजी यांची महत्त्वाकांक्षा व शिवछत्रपतींचें देदीप्य-मान कर्तृत्व यांनी ते अर्थातच भारावलेले होते. पराक्रमी असलेल्या आपल्या धन्याने (व्यंकोजीने) आपल्या ज्येष्ठ बंधूप्रमाणेच स्वतंत्र कर्तृत्व प्रकट करावें अशी रघुनाथपतांची इच्छा असणें स्वाभाविक होतें. मनुष्य स्वभावाचा विचार करतां ती फलद्रुप न होणारी इच्छा रघुनाथपंतांनी वडिलकीच्या नात्याने अधिक तीव्र स्वरूपांत प्रकट करणें व व्यंकोजीला त्यांत स्वतःचा अधिक्षेप घडला असें वाटणें अत्यंत स्वाभाविक आहे. त्यांच्या संबंधांत बिघाड उत्पन्न होण्याचें याहून दुसरें कारण दिसत नाही. कै. जदुनाथ सरकार म्हणतात त्या रघुनाथपंतांच्या कुटिल स्वभाव सिद्ध करणाऱ्या

गोष्टी त्यांच्या उत्तर जीवनांत शिवछत्रपतींच्या हयातीपर्यंत तरी दिसून येत नाहीत.

रघुनाथपंतांचे दुसरे आक्षेपक जे बेन्द्रे त्यांचें संभाजीप्रेम हें अशा शिगेला पोहोचलेलें आहे की, संभाजी ज्यांच्या ज्यांच्या विरुद्ध असेल अथवा त्याने ज्यांच्या ज्यांच्या विरुद्ध शस्त्र परजलें असेल तो तो दोषी व संभाजी मात्र निर्दोषी अशी त्यांची प्रतिपादनाची पद्धति आहे. त्यामुळे उत्तरायुष्यांत संभाजी रघुनाथपंतांविरुद्ध गेला म्हणून त्यापूर्वीच्या रघुनाथपंतांच्या चारित्र्यावरही ते आग पाखडतात. पण त्यासाठी त्यांनी दिलेले पुरावे कृत्रिम आहेत. बेन्द्रे म्हणतात त्याप्रमाणे कुतुबशहाचे पंतप्रधान मादण्णा व आकण्णा यांचा व रघुनाथपंतांचा फार पूर्वीपासून स्नेह होता असें कोणीही बखरकार म्हणत नाहीत. मल्हार रामराव चिटणिसांच्या बखरींत याच्या उलट वर्णन आहे. तें असें की, व्यंकोजी राजांकडून शिवाजी महाराजांकडे येत असतां वाटेंत एक कल्पना मनांत धरून रघुनाथपंत स्वतः होऊन मादण्णा व आकण्णा यांस भेटले, व आपल्या पांडित्याने त्यांस प्रभावित करून राजकीयदृष्टचा हा नवा परिचय त्यांनी जोडला. चिटणीस लिहितात : 'भागानगरानजीक आले. तेथे आकण्णा मादण्णा पंत हे कुलकारभारी वजिरी करीत होते. त्यास कसे भेटावे ? राजकारण परिस्फुट आधी न होतां सिद्धीस जावें म्हणून, त्यास थोर ब्राह्मण पंडित आले म्हणजे त्यांचे ठायी विशेष प्रेम होता हें जाणून, आपण पंडित होऊन, प्रातःकालीं स्नानसंध्यासमयीं जावेसे करून, सर्व लवाजिमा दूर दहावीस कोशी ठेवून, त्या समयीं गेले.'

'मादण्णापंत बहुत थोर, ब्राह्मणांचे ठायी निष्ठा, दानधर्मशील, नित्य लक्ष भोजन व्हावें, ते भोवती अन्नछत्र करून त्यांतून सर्वांची (भोजनें झाल्याची) बातमी आलियावरी आपण भोजन करावें, ऐसे वृत्त चालवीत होते, हें जगविख्यात आहे, त्यांची भेट घेतली. तेथे पंडित जनसमाज (यांची) सभा होऊन शिवसर्वोत्तम व विष्णुसर्वोत्तम हा विषय निघून बोलणें चाललें होतें. तेव्हा

रघुनाथपंत वैष्णव हे स्वतः असतां शिवसर्वोत्तम हाच पक्ष अंगीकार करून, शिवसर्वोत्तम हें स्थापून सर्वांचें समाधान केलें. विष्णुपक्ष निर्बळ झाला असतां पुन्हा वैष्णवपक्षी बोलणें करून विष्णुसर्वोत्तम पक्ष स्थापना केली. आणि पुन्हा द्वैतवादियास दूषण करून अद्वैत प्रतिपादन केलें. तेव्हा मादण्णापंत बहुत संतुष्ट होऊन बहुत थोर विद्वान् जाणून गौरव करून स्तुति केली. 'आपण स्वामी सत्पात्र थोर आहां असें म्हणून कोठून आला, काय अपेक्षित, आज्ञा करावी ' विचारिलें. ते समयीं याणीं उत्तर केलें की, 'आम्हांस द्रव्याची किंवा भूमिग्राम जीविकेची अपेक्षा किमपि नाही. आपण बहुत सूज्ञ, धर्मिष्ठ शास्त्रज्ञ आहां. आपणापाशीं एकांत स्थलीं कांहीएक चर्चा चार घटका करावी इतकी मात्र इच्छा आहे.'

' ऐसे बोलिल्यावरी पंत यांसी एकांती घेऊन गेले. तेव्हा यांणी 'आम्ही पंडित, याचक नव्हे, शिवाजी महाराज यांचे सेवक, रघुनाथपंत नामाभिधान होय. राजेसाहेबाकडे कर्नाटकची राजकारणें गेलीं आहेत . . . . आपण धर्मशील व राजे धर्मस्थापना करावी हा अभिमान धरितात, करितात, त्यांस आपण साहाय्य करावें . . . . या प्रकारे राजकारण सिद्ध करून पंत निघाले आणि महाराजांचे दर्शनास आले.' (मल्हार रामराव चिटणीस विरचित शककर्ते श्री शिवाजी महाराज, पृष्ठ २७७-२७८)

तात्पर्य, बखरीप्रमाणे गोवळकोंड्याच्या वजिरांचा व रघुनाथपंतांचा पूर्वीचा कांहीच संबंध नसून तो रघुनाथपंताने नवा जोडलेला होता. त्यामुळे बेन्द्रे म्हणतात त्याप्रमाणे एकोजीचें राज्य गोवळकोंडेकरांच्या ताब्यांत देण्याचा प्रश्नच उत्पन्न होण्यासारखा नाही. आधी बखरकारावर नसलेला आरोप करावयाचा व त्या अभावात्मक आधारावर विवेचनाची उभारणी करावयाची असें हें रघुनाथपंतांवरील आरोपाचें हेत्वाभासपूर्ण प्रकरण आहे. महाराजांचा विश्वास असलेल्या ह्या वृद्ध मुत्सद्द्यास अकारण धारेवर धरण्यांत हशील नाही. (प्रसिद्ध नलदमयंती स्वयंवर काव्याचा कर्ता रघुनाथ पंडित व हे रघुनाथपंत हणमंते एकच होत.)

रघुनाथपंतांशी झालेल्या बोलण्यानंतर महाराजांनी दक्षिण दिग्विजयाची कल्पना मनांत निश्चित करून कर्नाटकाकडे आपली दृष्टि वळविली. महाराजांचे वकील, प्रल्हाद निराजी, गोवळकोंड्याच्या कुतुबशहा पातशहाच्या दरबारांत होते. ते निराजी रावजी, श्यामजी नाईक पुंडे यांनी कुतुबशहाचे वजीर मादण्णा व आकण्णा यांच्या साहाय्याने शिवछत्रपति व गोवळकोंडेकर यांच्यांत सलोख्याचे संबंध उत्पन्न केले.

या कर्नाटकच्या स्वारीच्या वेळीं परिस्थितिही सर्व दृष्टींनी अनुकूल होती. मोगल व विजापूरकर हे दोघेही या वेळीं शिवछत्रपतींना विरोध करावयास पूर्णपणें असमर्थ होते. बादशहा औरंगजेब दोन वर्षें पंजाब प्रांतांत राहून इ. स. १६७६ च्या मार्च महिन्यांत दिल्लीला परत आला. पण वायव्य सरहद्द प्रांतांतील दंगे वाढत्या प्रमाणावर चालू असल्यामुळे बादशहाचें उत्तम लढाऊ सैन्य तिकडेच गुंतून पडलें होतें. ते कांही शिवछत्रपतींवर पाठविण्याची सोय नव्हती. विजापूरला अफगाण सरदार बहलोलखान याने तेथील अल्पवयी राजा शिकंदर आदिलशहा याला दि. ११ नोव्हेंबर १६७५ ला आपल्या अधीन करून घेऊन दि. १८ जाने. १६७६ ला पूर्वीचा वजीर खवासखान याची हत्या केल्याचें मागे वर्णिलें आहेच. या बहलोलखानाचा ओढा उत्तर भारतीय अफगाण लोकांकडे होता. त्यामुळे विजापूरच्या राजसभेंतील दक्षिणी सरदार हे एक होऊन बहलोलखानास विरोध करूं लागले. दक्षिणी मंडळींनी बहलोलच्या विश्वासांतील खिजरखान नांवाच्या एका सरदाराची हत्या केल्यामुळे सन १६७६ च्या फेब्रुवारींत विजापुरांतील यादवी विकोपास गेली. बहलोलखान व दक्षिणेंतील मोंगलांचा सुभेदार बहादूरखान यांचें वाकडें असल्यामुळे मोगल सुभेदाराने याच वेळीं स्वारी केली. याप्रमाणे आदिलशाही राज्यांत अशी अंदाधुंदी माजल्यामुळे तिकडून शिवछत्रपतींच्यावर स्वारी होण्याचा संभवही नव्हता. येऊन जाऊन अडथळा झालाच तर तो मोगल सुभेदार बहादूरखान याच्याकडूनच महाराजांना

होण्यासारखा होता. पण महाराजांनी आपल्या राजकीय बुद्धिमत्तेने त्याच्यावर मात करून त्याला अगदी चीत करून टाकलें. गेलीं दोन वर्षें महाराजांशीं चाललेल्या अखंड युद्धाने तो अगदी कंटाळून गेला होता. महाराजांशीं संधि करावयास तो अगदी उत्सुक होता. विजापूरकरावर केलेल्या स्वारीच्या वेळीं तर शिवाजीने आपणांस उपद्रव देऊं नये म्हणून या संधीची त्याला अतिशयच आतुरता लागली होती. महाराजांना, कर्नाटकची स्वारी एक वर्षपर्यंत तरी चालणार असल्यामुळे, त्या अवधींत असा संधि घडून येऊन मोगलांपासून स्वस्थता मिळाली तर ती हवीच होती. त्यामुळे त्यांनी बहादुरखानाला पुष्कळ लांच देऊन व उघड कांही खंडणी देऊन त्याच्याशीं एक वर्षपर्यंत अनाक्रमणाचा संधि केला, व ते निश्चित झाले. सभासद म्हणतो, 'तुंगभद्र देशापासून कावेरीपर्यंत कर्नाटक साधावें हा हेतु मनांत धरिला. त्यास लष्कर पाठवून साधावें तरी दिवस गतीवर पडते म्हणून खुद्द राजियांनी आपण जावें असें केलें. त्यास पेडगांवी बहादुरखान गनीम पाठीवर येईल म्हणून निराजीपंत न्यायाधीश पाठविले. कित्येक द्रव्य, अलंकार, भूषणें रत्नखचित पाठविलीं. त्यास अंतरंगें सख्य करून 'एक वर्षपर्यंत आपणास कर्नाटक साधावयास लागेल. तुम्ही राज्यास उपद्रव न करणें असें त्यास सांगून ठायीं ठेविलें.'

——(सभासद विरचित श्री शिवप्रभुचरित्र, गाडगीळ प्रत, पृ. १०६)

या प्रमाणे बाह्य आक्रमणाविषयीं निश्चितता करून महाराजांनी मोरोपंत पिंगळे, अण्णाजी दत्तो सुरनीस इत्यादि अधिकाऱ्यांना राज्याच्या रक्षणार्थ ठेवले, व रघुनाथपंत आणि जनार्दनपंत हणमंते यांना मार्गदर्शक म्हणून बरोबर घेऊन समवेत सरसेनापति व खंदे लढवय्ये वीर घेतले. या स्वारींत नेताजी पालकरही महाराजांसमवेत होते.

या स्वारीला द्रव्य पुष्कळच लागणार होतें. ती बाब परस्पर पार पडावी यासाठी भागानगरचा बादशहा तानाशाह कुतुबशहा याची भेट घेऊन व त्याच्याशीं संधि करून राजकारण साधावें असा

महाराजांनी विचार केला. सभासद म्हणतो : 'कर्नाटक साधावयास द्रव्य लागेल त्यास खजिन्यांतील द्रव्य वेचूं नये, नूतन मिळवावें आणि वेंच करून देश साधावा' असा विचार करितां भागानगरचें पातशाहींत द्रव्य उदंड आहे. तेथे निष्ठुरता करून द्रव्य मेळवावें, तरि वर्षास करभार भागानगरकर देतात. तेथे निष्ठुरता करूं नये. सख्य करून त्यांची भेट घ्यावी. भेटीनंतर सर्वही अनुकूळ करून देतील. असा विचार करून भागानगरीं प्रल्हादपंत हेजीब राजियाचे होते त्यांसि हे वर्तमान लिहून भेट घ्यावी हा विचार केला.'

—(सभासद, गाडगीळ प्रत पृ. १०७)

या वेळीं जो कुतुबशहा गोवळकोंड्याच्या गादीवर होता त्याचें नांव अबुलहसन असून त्याला तानाशाह असें म्हणत असत. हा कुतुबशहा स्वत: मुळीच पराक्रमी व कर्तृत्ववान् नसला तरी त्याचे पंतप्रधान माकण्णा व त्यांचे बंधु आकण्णा हे अत्यंत बुद्धिमान् व कर्तृत्वसंपन्न होते. मादण्णा हे संस्कृत, फारसी, तेलगू इत्यादि अनेक भाषांत चांगले पंडित असून त्यांचा राज्यकारभार प्रजेला कल्याणकारक झाला होता. तानाशहाचा त्यांच्यावर पूर्णपणें विश्वास होता. शेजारीं विजापूरला चाललेल्या यादवीचा लाभ घेऊन कर्नाटक जिंकावा अशी इच्छा या वेळीं गोवळकोंडेकरांच्या मनांतही उद्भवली होती. मादण्णांचा पुतण्या गोपन्ना हा वीर वैष्णव साधु असून कर्नाटक प्रांत स्वतंत्र व्हावा व त्यावरील यवन सत्तेचा डाग पुसला जावा असें त्याने मादण्णांच्या मनांत भरविलें. ही इच्छा पूर्ण करणारी श्रीशिवछत्रपतिविना दुसरी कोणतीही विभूति त्या काळीं नव्हती. या इच्छेनेच मादण्णा या वेळीं कुतुबशहा व शिवाजी महाराज यांचें सख्य जुळवून आणावयास सिद्ध झाला होता. कर्नाटक जिंकण्यास्तव या दोन सत्तांमध्ये व्हावयाच्या संधीच्या कच्च्या अटी पुढीलप्रमाणे होत्या :—

(१) शिवाजी महाराजांनी कुतुबशहास्तव ससैन्य कर्नाटकावर स्वारी करून तें जिंकावें. (२) या स्वारीला लागणारें द्रव्य व युद्धोपयोगी साहित्य कुतुबशहाने शिवाजी महाराजांना पुरवावें.

(३) लढाईत मिळालेली लूट, खंडणी, व म्हैसूर प्रांत हे स्वारी करण्यासंबंधी शिवाजी महाराजांना मिळावे.

कच्च्या अटी मान्य झाल्यावर महाराजांनी स्वतः जातीने भागानगरला कुतुबशहाच्या भेटीला येऊन तेथून दक्षिणेकडे प्रयाण करण्याची आपली मनीषा शहाला कळविली. प्रत्यक्ष भेटीची इच्छा ऐकतांच शहा अत्यंत भयभीत झाला. त्याच्या मनःश्चक्षूंसमोर अफझलखानाच्या मृत्यूचा देखावा दिसू लागला. सभासद म्हणतो :

'तानाशहा पातशाहा भागानगरकर यांनी मनांत बहुत शंका धरिली की 'जैसा अफझलखान बुडविला, की शास्ताखान बुडविला, दिल्लीस जाऊन आलमगीर पातशाहास पराक्रम दाखविला, ऐसा एखादा अनर्थ जाहाला तर काय करावें? भेट मात्र राजियाची न घ्यावी जे मागती तें देऊं असें बोलिला. मग पातशहासी व अकंणापंत व मादंणापंत कारभारी यांशीं प्रल्हादपंते आण, शपथ, क्रिया बहुत दिधल्या. अपाय नाही. स्नेहाची भेट घेऊन जातील, अशी बळकटी केली.' ––(सभासद, गाडगीळ प्रत पृ. १०७)

विजयादशमीच्या सुमुहूर्तावर महाराजांनी पंचवीस सहस्र सैन्यासह रायगडाहून प्रयाण केलें. त्यांच्या समवेत बाळाजी आवजी चिटणीस, दत्ताजीपत मंत्री, सूर्याजी मालुसरे, नेताजी पालकर, सर्जेराव जेधे, मानाजी मोरे, नागोजी जेधे, हंबीरराव मोहिते, येसाजी कंक, रघुनाथपंत हणमंते, जनार्दनपंत हणमंते, धनाजी जाधव, बाबाजी ढमढेरे, आनंदराव सोनाजी नाईक बंकी इत्यादि महत्वाचे स्वराज्यमंदिराचे शिल्पकार होते. सिंहासनाधीश्वर छत्रपतीला साजेल अशा डौलाने ही स्वारी निघाली होती.

महाराजांना मार्गांतच कर्नाटकांतील पीडितांकडे लक्ष देणें क्रमप्राप्त झालें. कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांच्या दुआबावर त्या वेळीं विजापूरकरांची सत्ता असून या दुआबांत 'दख्खनचा दरवाजा' म्हणून विख्यात असलेला कोप्पळचा गड व ठाणें होतें. या वेळीं या ठाण्याचा कारभार विजापूरकरांच्या वतीने हुसेनखान मियाना व अब्दुर्रहीमखान मियाना हे दोघे बंधु चालवीत असून त्यांचा

राक्षसी कारभार प्रजेला असह्य झाला होता. महाराज कर्नाटकांत येत आहेत अशी कुणकूण लागतांच कोप्पळच्या प्रजेने आपलें दुःख त्यांना निवेदन केलें. महाराजांनी तत्काळ मुख्य सेनापति हंबीरराव मोहिते यांना ससैन्य कोप्पळवर चालून जावयाची आज्ञा दिली. हंबीररावाच्या समवेत साहाय्यासाठी जे लोक होते त्यांत धनाजी जाधव व नागोजी जेधे हे तरुण योद्धे होते. हुसेनखान मियानाशीं झालेल्या या युद्धांत नागोजी जेधे ठार झाला; पण जय मात्र शेवटीं मराठ्यांचा झाला. सभासद म्हणतो : 'हंबीरराव लष्कर घेऊन संपगांवास गेले. इतकियांत विजापूरचा सरदार हुसेनखान मायाणा पठाण मोठा तोलदार, पांच हजार पठाण, तिरंदाज बरची-वाले, अडहत्यारी असे पंच रूस तसे बहिले, बंदुकी तोफखाना असा होता. हुसेनखान म्हणजे जैसा नबाब बेलोलखान याच्या जोडीचा सरदार तो हंबीरराव याजवर चालून आला. मराठे म्हणजे मोठे हरीफ त्यांनी शर्त करून भांडण दिधले. नीट गचडते घोडीं घालून मारा-मारी केली. हुसेनखानचे कित्येक लोक मारिले व घोडी मारिली. हत्ती रणास आणिले. मोठें युद्ध बळकट दोन प्रहर दिवसांपासून चार प्रहर रात्रपर्यंत झालें. साहाप्रहरांत कुल फौज बुडविली. हुसेनखान खासा धरिला. चार साडे चार हजार घोडी पाडाव केलीं. बारा हत्ती पाडाव केले. तसे उंट व बाजे जिन्नस, बिछाईत, खजीना व कापड बेमुहिन सांपडलें. मोठे झुंज करून फत्ते केली. रण दुतर्फा अपार पडलें. या नंतर फत्तेची खबर (लिहून) राजियाकडे जासुदा-बरोबर पत्रें पाठविलीं. त्यांनी जाऊन वर्तमान सांगितलें. त्याजवरून राजे बहुत संतोष पावून खुशाल जाले. हुसेनखानाचा भाऊ किल्ले-कोपल येथे होता. त्याशीं राजकारण मोरोपंत पेशवे यांनी केले आणि कोपल घेतलें. कोपल म्हणजे दक्षणचा दरवाजा. तक्ताची जागा, असा किल्ला घेतला. मोठें स्थळ प्राप्त जाहालें. कोपल म्हणजे तुंगभद्रेचे कांठीं. तुंगभद्रापावेंतों देश हस्तगत जाहाला.'

—(सभासद बखर, गाडगीळ प्रत पृ. १००)

हंबीररावांचें विजयी सैन्य महाराजांना येऊन मिळतांच त्या

सैन्याची संख्या पन्नास सहस्त्र झाली. हें सैन्य भागानगरला येत असतां वाटेंत कोठेही लुटालूट करूं नये; हवी असेल ती वस्तु विकत घ्यावी अशा आज्ञा होत्या. ज्यांनी या आज्ञेकडे दुर्लक्ष केलें त्यांचीं डोकीं कापण्यांत आलीं. हें कळतांच कुतुबशहाच्या मनांतली सारी भीति जाऊन त्याला अत्यंत आनंद झाला. तो महाराजांना सामोरा दोनचार गांवें यावयास निघाला. पण महाराजांनी त्याला असें सांगून पाठविलें कीं, 'तुम्ही न येणें. आपण वडील भाऊ, मी धाकटा भाऊ, आपण पुढे न यावें.' महाराजांच्या या संदेशाने कुतुबशहा किती विरघळला असेल हें सांगणें नकोच. शहाचे पेशवे मादण्णापंत व आकण्णापंत मोठ्या समारंभानिशी महाराजांना समोरे गेले. शृंगारलेल्या नगरांत महाराजांचा मोठ्या थाटाने प्रवेश झाला. 'पातशहांनी कुलनगर शृंगारिलें. चौफेरी बिदीस कुंकुम-केशराचे सडे, रंगमाळा घातल्या. गुढिया, तोरणें, पताका, निशाणें नगरांत लाविली.' (सभासद पृ. १०८)

भागानगरच्या राज्यकर्त्यांनी व स्वयंस्फूर्त नागरिकांनी केलेलें हें स्वागत पाहून महाराजांच्या सैन्याला व अधिकाऱ्यांनाही अत्यंत आनंद वाटला. महाराजांचे अधिकारी व सैन्यही या प्रसंगीं साध्या वेषांत नसून थाटाच्या वेषाने सजलें होतें. आपल्या सरदारांना छत्रपतींनी मुक्त हस्ताने मोत्यांचे तुरे, गोफ व नवीन चिलखतें वाटलीं होतीं.

पन्नास सहस्त्र सेनेसह छत्रपतींचा नगर प्रवेश होत होता. महाराजांच्या या सेनाप्रवेशाचें वर्णन करतांना सर जदुनाथ सरकार यांचीही प्रतिभा इतकी मुखरित झालेली आहे की ते लिहितात : 'ज्या मराठी सैन्याने दिल्लीपतीस दहशत बसविली व दक्षिणेंतील पातशहांना जर्जर केलें, ज्याने मोगली सरदार व विजापुरी दरबार या दोघांनाही हताश केलें तें मराठी सैन्य कुतुबशहाची प्रजा सभय अंतःकरणाने परंतु उत्सुक मनोवृत्तींनी पाहूं लागली. ज्या मराठी सैन्याने उत्तरेस दिल्लीपर्यंतचा मुलूख हादरून सोडिला व दक्षिणेस विजापूरपर्यंत स्वाऱ्या केल्या तें सैन्य या वेळीं शहरांतून मिरवत

चाललें होतें. ज्या मावळ्यांनी आपल्या तरवारीचें पाणी मोठमोठ्या मी म्हणविणाऱ्यांनाही चाखवून नामोहरम केलें, व ज्यांच्या भयंकर माऱ्यापुढे एकही किल्ला सुरक्षित राहू शकला नाही आणि ज्यांच्या शौर्याचे पोवाडे सर्वत्र गाइले जात होते ते शूर मावळे नगरींतून 'आस्ते कदम' चालत होते. विचारपूर्वक हल्ला करण्यांत कुशल असा सेनापति हंबीरराव मोहिते, त्याच्या खालोखाल आनंदराव व मानाजी मोरे हे दोन योद्धे, प्रतिभीम व प्रसंगीं हत्तीशींही झुंज खेळणारे असे सूर्याजी मालुसरे व एसाजी कंक हे दोन मावळे सरदार, द्वाररक्षक सोनाजी नायक, राजसंरक्षकांचा सरदार बाबाजी ढमढेरे या वीर पुरुषांना जनता जरी प्रत्यक्ष ओळखत नसली तरी यांच्या शौर्यामुळे यांचीं नांवें सर्वतोमुखीं झालीं असून हे योद्धेही या वेळीं शिवाजीबरोबर होते. आतापर्यंत तंजावरचे राजेच म्हणून प्रसिद्ध असलेले रघुनाथ नारायण व जनार्दन नारायण हणमंते, हैद्राबादचा शिवाजीचा वकील प्रल्हाद निराजी, शिवाजीचा वाकेनिवीस दत्ताजी त्र्यंबक, केशवपंत, निळो मोरेश्वर व गंगाधरपंत हे दोघे मुजुमदार इत्यादि ब्राह्मण मुत्सद्दीही या धारकऱ्यांच्या संमर्दामध्ये विस्तीर्ण आकाशांतील सजल मेघाप्रमाणे शोभत होते. याच मुत्सद्द्यांच्या राजकार्यकुशलतेमुळे मावळ्यांच्या विजयाला स्थैर्य प्राप्त झालें होतें हें जनता पूर्णपणे जाणत होती. त्यांच्या विशाल भुवया व तीक्ष्ण परंतु वयोमानापरत्वें निस्तेज झालेले नेत्र त्यांच्या कर्तृत्वाची साक्ष करीत होते, व त्यांच्या मस्तकावरील चंदनतिलक त्यांचें ब्राह्मण्य दर्शवीत होता. ते संख्येने थोडे होते तरी जनतेचें लक्ष आपल्याकडे हटकून वेधून घेत होते. मुद्रारक्षक शामजी नाईक पुंडे याचाही उल्लेख येथेच करणें अवश्य आहे. कारण हाही महत्त्वाची कामगिरी करणारा शिवाजीचा ब्राह्मण सेवक प्रसिद्ध होता. फारसी भाषाविशारद मुनशी नीलप्रभु व ज्याला शिवाजी सतत आपल्या संनिध ठेवीत असे तो बाळाजी आवजी हे कायस्थ याच समुदायांत मेघमालेंतील विद्युल्लतेप्रमाणे चमकत होते. यांची अत्यंत साधी राहणी व प्रयत्नपर्वक स्वीकारलेली मूक वृत्ति जनतेच्या लक्षांत आल्याशिवाय राहात नव्हती.

सैनिक, मावळे, सरनोबत, सरदार, भीमपराक्रमी वीर, ब्राह्मण मुत्सद्दी, कायस्थ लेखक हे आपापल्या परी जनतेच्या विस्मयाला कारणीभूत झाले होतेच; परंतु या सर्वांचा सूत्रधार व आत्मा राजा शिवाजी याच्याविषयी जनपदाचें कुतूहल अवर्णनीय होतें. तेजस्वी मंत्रिमंडळ व पराक्रमी सेनापति यांच्या कडयामध्ये श्री रामचंद्रा-प्रमाणे शिवाजी राजांची प्रभावती अशी ठेंगणी मूर्ति घोडयावर आरूढ झाली होती. नुकताच आजारांतून उठल्यामुळे राजा शरीराने कृश झाला होता व तीनशे मैलांच्या प्रवासाने त्याच्या चेहऱ्यावर मलिनत्व व म्लानत्व आलें होतें. तथापि त्याचा तेजस्वी व भेदक दृष्टिक्षेप सगळीकडे न्याहाळून पाहात होता. आणि मधून मधून त्याच्या लंबगोल चेहऱ्यावर स्मित विलसत होतें. लहान मूर्ति पण थोर कीर्नि अशा छत्रपतीला पाहतांच नागरिकांनी एकदम त्यांच्या नांवाचा जयजयकार केला, आणि रस्त्याच्या दुतर्फा असलेल्या घरांच्या सज्जांतून त्यांच्यावर सोन्यारुप्यांची पुष्पवृष्टि झाली. सुवासिनी वारंवार पुढे येऊन मंगलारत्या ओवाळूं लागल्या. या वेळीं शिवाजी राजानेही सोन्यारुप्यांच्या नाण्यांचा जनसमुदायावर पाऊस पाडला, आणि महाजनांस किमती पोशाख अर्पण केले. याप्रमाणे शिवाजीची स्वारी मिरवीत मिरवीत दादमहाल ऊर्फ न्याय-मंदिरांत येऊन दाखल झाली. तेथे मुख्य दरवाजापुढे सर्व सैन्य व्यवस्थेने उभे राहिलें; व फक्त पांच सरदार बरोबर घेऊन शिवाजी न्यायमंदिराचा जिना चढून ज्या दिवाणखान्यांत कुतुबशहा शिवाजीची वाट पहात बसला होता तिथे गेला. सुलतान पुढें येऊन शिवाजीस क्षेमालिंगनपूर्वक भेटला, व उभयता एकासनी बैसले. दिवाण मादण्णा यासही बसण्याचा हुकूम झाला. बाकी सगळे उभेंच होते. उभयतांचें बोलणें झालें. 'पातशहाच्या स्त्रिया झरो-कियांतून (शिवाजी) राजा पाहून बहुत थक्क जहाल्या.' (सभासद)

एक प्रहरपर्यंत शिवाजी व कुतुबशहा एके ठिकाणीं गोष्टी सांगत बसले होते. आरंभीं सलाम-रामराम व प्रकृतीविषयी विचारपूस झाल्यावर कुतुबशहा पातशहा अबूल हसन याने शिवाजीच्या

आजपर्यंतच्या पराक्रमाच्या गोष्टी श्रवण करण्याची इच्छा दर्शविल्या-वरून त्या त्याला क्रमशः कथन करण्यांत आल्या. रावणासारख्या गर्विष्ठ अफजलखानाशीं समोरासमोर लढून एकटयाने त्याचा केलेला वध, शास्ताखानावरील रात्रीचा हल्ला, भर दरबारांत औरंगजेबाविषयी व्यक्त केलेला संताप, आग्र्याच्या कैदेंतून कल्पनातीत युक्तीने करून घेतलेली सुटका, सुरतेची लूट, अनेक डोंगरी किल्ल्यांवरील लढाया यांचीं अद्‌भुत वर्णनें ऐकून कुतुबशहा तर अगदी आश्चर्यचकित होऊन गेला. या बादशहाचा सगळा जन्म जनानखान्यांतील नाचरंगांत गेलेला असून त्याने चित्रांतच फक्त तलवार पाहिलेली होती आणि सुरतयुद्धांशिवाय दुसऱ्या कोणत्याही युद्धासाठी कधीही शय्यागाराहून इतर रणभूमीवर त्याने स्वप्नांत सुद्धा प्रवेश केला नव्हता. त्यामुळे शिवाजी राजाच्या पराक्रमाच्या कथांनी तो अगदी स्तिमित होऊन गेला. शेवटीं या सर्व पाहुण्यांस रत्नजडित अलंकार, घोडे, हत्ती, पोषाख वगैरे देऊन पानसुपारी व अत्तर गुलाब दिल्यानंतर त्या दिवसाचा दरबार बरखास्त करण्यांत आला. बादशहाने शिवाजीस जिन्यापर्यंत येऊन पोंचविलें.' —(शिवाजी व शिवकाल, पृ. २०४, ५ व ६)

शिवछत्रपतींच्या भेटीने कुतुबशहाला परमानंद झाला. कोणतीही वंचना न होतां ही भेट पार पडल्यामुळे त्याने प्रल्हाद निराजीला त्याच्या प्रामाणिकपणासाठी मोठें पारितोषिक दिलें. दुसऱ्या दिवशीं मुख्य प्रधान मादण्णापंत यांनी छत्रपतींना आपल्या घरीं थाटाची मेजवानी दिली. सभासद म्हणतो : 'आपले मातोश्रीचे हाती पाक सिद्ध करून मादंण्णापंत आकंणापंत जवळ बसून राजियास भोजन घातलें, आणि अलंकार, वस्त्रें, हत्ती, घोडीं देऊन स्थळास पोहोंचविलें. पातशहांनी मादण्णापंतास बोलावून नेऊन विचारलें की, 'राजियास काय पाहिजे तें देऊन, राजियास संतुष्ट करून निरोप द्यावा. असा विचार करून सुमुहूर्त पाहून मागती राजे भेटीस आणिले. आणि जडजवाहीर, रत्नांचे अलंकार

हत्ती, घोडे अपरिमित दिधले. कुल सर कारकून व हंबीरराव व वरकड सरदार यांचे मुजरे महालावरी उभयतां छत्रपती बैसून, मुजरे घेऊन, सरदारांचे पराक्रम व नांव पाहून, सर्वांस अलंकार वस्त्रें, हत्ती, घोडे, मनुष्य पाहून दिधले आणि पातशहा बोलिले की सर्वां प्रसंगीं आपणांस तुम्ही सहाय असावे ऐशी बळकटी करून राजियाची आण शपथ घेऊन निरोप दिला ... त्या उपरि राजियास भागानगरचे मोठमोठ्या सरदारांनीं मेहमान्या केला. ऐसे एक महिनाभर भागानगरीं होते.

—(सभासद, गाडगीळ प्रत, पृ. ११०–१११)

भागानगरच्या या एक महिन्याच्या निवासांत महाराजांनी राजकारणाची एक नवी परिभाषा उच्चारून विजापूरचे सरदार फोडून मोंगल साम्राज्याविरूद्ध एक आघाडी निर्माण करण्याचा प्रयत्न केला. ही परिभाषा म्हणजे दक्षिणेची सत्ता दक्षिण्यांच्या हातीं असली पाहिजे ही होय. या वेळीं मालोजी घोरपड्यांना त्यांनी एक पत्र लिहिलें. तें महत्त्वपूर्ण पत्र छत्रपतींच्या या विशिष्ट परिभाषेवर उत्तम प्रकाश टाकणारें आहे. या पत्रांत महाराज लिहितात:—

'हाली आदिलशाही बहलोलखान पठाणांनी घेतली. पादशहा लहान लेकरूं आहे. नांव मात्र. ते आपले कैदेंत ठेविले आहेत. आणि तख्त व छत्र विजापूरचा कोट पठाणाने कबज केला आहे. कांहीं गुबारून मिळाला नाही. ऐशियास दक्षिणचे बादशाहीस पठाण जाला ही गोष्ट बरी नव्हे. पठाण बळावला म्हणजे एकाउपरी एक कुली दक्षिणियांची घरें बुडवील. कोणास तगों देणार नाही. यैसे आम्ही समजोन हजरत कुतुबशा पातशाहा यांशीं पहिलेपासून रुजुवात राखिली होती. त्यावरून सांप्रत हजरत कुतुबशहांनी मेहेरबानी करून 'हुजूर भेटीस येणें' म्हणून दस्तखत मुबारक व दस्त पंजियानिसी फर्मान सादर केला. त्यावरून आम्ही येऊन हजरत कुतुबशहाची भेट घेतली. भेटीचे समयीं पादशाही आदब आहे की शिरभोई धरावी, तसलीम करावी. परंतु आम्ही आपणावरी छत्र

धरिलें असे, ही गोष्ट कुतुबशाहास मान्य होऊन शिरभोई धरणें व तसलीम करणें हें माफ केलें. पादशहा तिकडून आले; आम्ही इकडून गेलों. पादशहांनी बहुतच इज्जती होऊन, गळचास गळा लावून भेटले. आम्हास हातीं धरून नेऊन जवळीं बैसविलें. कितीक मेहेरबानी जाहीर केली. आम्हीही जैसी रुजुवात करून ये तैसी केली आणि कुतुबशाहाचा व आपला घरी बरेपणा करून घेतला. या उपरी राजकारणाविषयीं हजरत कुतुबशाहांनी मादण्णापंतास व आम्हांस एकचित्त करून ऐसा तह केला कीं जो काय उभय मार्गी तह व्हावा तो आपण कबूल करावाच. ऐसा कुल मनसबा व मदार आम्हावरी टाकिला आहे की 'आपली पातशाही जितकी वाढवूं ये तितकी वाढविणें. पठाणाची नेस्तनाबूद करणें. दक्षणेची पादशाही आम्हां दक्षणियांच्या हातीं राहे तें करावें' म्हणून त्यास हा मनसुबा ये प्रसंगीं आमचे हाता आलियाउपरि आम्ही हाच विचार केला कीं, जे कांहीं आपले जातीचे मराठे लोक आहेती ते आपल्या कटांत घेऊन कुतुबशाहासी त्यांची रुजुवात करावी; दौलत देवावी, त्यांचे हातें पादशाही काम घेऊन बादशाहाची दराज करावी. आणि तुम्हां लोकांच्या दौलताहि चालेत, घरें राहेत तें करावें..... ऐशियास तुम्ही कदाचित् ऐसा विचार कराल कीं आदिलशाहीचे आपण दो पिढीचे वजीर आणि आतां विजापुराकडून कुतुबशाहींत राजे यांचे बोलें कसें जावें? तरी जे समयीं खवासखान धरिला, विजापुरचा कोट पठाणें घेतला, विजापूरचा पादशहा धाकटा आहे त्याला कैदेंत ठेविलें, तेंच समयीं पादशाही बुडाली. विजापूर पठाणांचे हातास गेले. आतां आदिलशाही कैची आणि उगीच तुम्ही तेथे आपली आदिलशाही आहे म्हणोन गुंतून राहिले आहां. तरी पठाणाचीच चाकरी करून राहों म्हणाल, तरी पठाण कांहीं तुम्हास थोर दौलत देणार नाही. आणि पठाणास तरी हजरती कुतुबशाहा व आम्ही तमाम दखणी मिळोन चालोन घेऊन बुडवीतच आहों. तुम्हीं मराठे लोक आपले आहां. तुमचे गोमटे व्हावें म्हणून स्पष्टच तुम्हांस लिहिलें असे.'

—(शिवचरित्रनिबंधावली, पृ. ३७७ व ३७१)

याच स्वरूपाचीं अनेक पत्रें महाराजांनी विजापूरकरांचे अंकित असलेल्या अनेक मराठे सरदारांना लिहिलीं असलीं पाहिजेत. कुतुबशहा व महाराज यांचा पुढीलप्रमाणे संधि झाला :—

(१) सुलतान अबुल हसन याने शिवाजीराजास स्वारीखर्चास म्हणून रोजीं तीन हजार होन किंवा दरमहा सव्वा चार लक्ष रुपये द्यावे, व ही रक्कम अगाऊ तसलमात म्हणून द्यावी.

(२) एक हजार स्वार व चार हजार पायदळ मिळून पांच हजार सैन्य सर लष्कर मिर्जा महंमद याच्या हाताखालीं कर्नाटकच्या स्वारीपुरतें शिवाजी राजाच्या मदतीसाठी पाठवावें.

(३) दारुगोळ्यासह तोफखाना शिवाजीराजास पुरवावा.

याच्या मोबदल्यांत कर्नाटकांतील जेवढा प्रदेश मराठे जिंकतील त्यापैकीं मूळचा शहाजीचा असलेला प्रदेश शिवाजीकडे राहून बाकीचा सुलतानास द्यावयाचा. याशिवाय मोंगलांच्या कोपापासून सुलतानाचें व त्याच्या राज्याचें संरक्षण करण्याचें महाराजांनी आश्वासन दिलें व उलट कुतुबशहानेही प्रतिवार्षिक एक लक्ष खंडणी पूर्ववत देण्याचें मान्य करून पूर्वीप्रमाणेच महाराजांचा प्रतिनिधि आपल्या राजसभेंत ठेवला.

इ. स. १६७७ च्या मार्च महिन्यांत शिवछत्रपतींनी भागानगर सोडलें व आपल्या जययात्रेला प्रारंभ केला. कृष्णेच्या काठाकाठाने जातांना वाटेंत कर्नूलपासून पांच लक्ष होन खंडणी घेऊन महाराजांनी निवृत्तिसंगम व चक्रतीर्थ या पवित्र स्थळांच्या यात्रा केल्या व तेथून महाराज श्रीशैल्य मल्लिकार्जुनाच्या दर्शनास गेले. हें मंदिर कर्नूलपासून ७० मैलांवर नल्लमाल अरण्यांत वसलेलें असून तें समुद्रसपाटीपासून १६०० फूट उंच पठारावर आहे. देवालय फारच भव्य असून त्याच्याभोवती वीस पंचवीस फूट उंचीचा भक्कम प्राकार आहे. हें द्वादश ज्योतिर्लिंगापैकीं एक असून पातालगंगा व नीलगंगा हीं पुण्यतीर्थें येथून जवळच आहेत. महाराजांच्या या यात्रेचें वर्णन करतांना सभासद म्हणतो :—

‘ मग श्रीशैल्यास आले. नीलगंगेचें स्नान करून श्रीचें दर्शन

जालें. तीर्थविधि जाला. राजियांनी स्थळ देखोन परम आनंद जाला कीं, केवळ कैलास दुसरें, असें स्थळ वाटलें. तेथे हें देह श्रीस अर्पण करावें, शिरकमल वाहावें, ऐसें योजिलें. (ते) समयीं श्रीभवानी अंगांत आविर्भवली आणि बोलिले जे, 'तुज ये गोष्टी मोक्ष नाही, हे कर्म करूं नको. पुढे कर्तव्यही उदंड तुझे हातें करणें आहे.' असें सांगून श्री गेली. हें वर्तमान सावध जाल्यावरि राजियास कारकुनांनी सांगितलें. मग श्रीस शिरकमल वाहावें हा विचार राहिला.

—(सभासद, गाडगीळ प्रत, पृ. १११)

नीलगंगेला महाराजांनी चिरेबंदी सध्यामठ बांधला, गणेश घाट व धर्मशाळाही बांधली. मल्लिकार्जुनाहून छत्रपति नंदियाल व कडाप्पावरून तिरुपतीला गेले. तेथून पूर्व किनाऱ्यावर उतरून कलहस्त्रीमधून मद्रासच्या पश्चिमेस सात मैलांवर पेडापोलम् येथे महाराज आले व तेथून दि. ९ मेला त्यांनी पांच सहस्र अश्वदळ कांजीवरमवरून जिंजी (चंदी) ला पाठविलें. या वेळी जिंजीला विजापूरकरांच्या वतीने नासिर महंमदखान या नांवाचा गडकरी होता. महाराजांच्या सेनानीने त्याच्यावर दान व भेदनीतीचा प्रयोग करून जिंजीचा अजिंक्यगड घेतला. पन्नास सहस्र रुपयांची जहागीर देण्याचें आश्वासन त्याला देण्यांत आलें होतें. महाराजांना इतक्या सहजासहजीं यश मिळाल्याचें कळतांच अत्यंत आनंद झाला. ते तडक गडावर आले व त्यांनी त्याची उत्कृष्ट व्यवस्था लाविली. 'रामाजी नलगे हवालदार ठेविले. तिमाजी केशव सबनिवीस ठेविले. इमारतीवर रुद्राजी साळवी ठेविले.' महाराजांनी जिंजी-भोवती नवीन कोट उभारून खंदक खणला व बुरूज बांधविले. आधीच बळकट असणारा हा गड याप्रमाणे अधिकच दुष्प्राप्य करण्यांत आला.

जिंजीनंतर महाराज वेलोरवर चालून गेले. तेथे अबदुल्लाखान या नांवाचा विजापूरकरांचा एक ॲबिसीनियन् गडकरी होता. हा अत्यंत स्वामिनिष्ठ असून त्याने वेलोरचा गड चौदा महिने लढविला. हा गड मूळचाच अत्यंत सुदृढ व अभेद्य होता. त्याच्या भोवताली खोल खंदक

असून त्यांत असंख्य सुसरी सोडलेल्या होत्या. 'तो कोट म्हणजे पृथ्वीवर दुसरा गड असा नाही. कोटांत पाणियाचा खंदक. पाणियास अत नाही. उदकांत दहा हजार सुसरी, कोटाचे फांजियावरून दोन गाडिया जोडून जावे ऐशी मजबुदी. पडकोटे तरी चार चार फेरियावरि फेरे. ये जातीचा कोट.' वेलोरचा वेढा, पुरेशा साधनसामग्रीअभावीं पुष्कळच दिवस रेंगाळणार असें दिसून आल्यामुळे महाराजांनी नरहरी रुद्र याच्या हाताखाली दोन सहस्र अश्वदळ व पांच सहस्र पायदळ देऊन त्याच्यावर वेढ्याचें काम सोपविलें; व १६७७ च्या २० जूनला शेरखान लोदीवर ते स्वत: चालून गेले. पुढे २१ ऑगस्ट १६७८ ला महाराजांच्या सेनानींनी वेलोरवर विजय मिळविला.

वेलोरच्या वेढ्याचें काम नरहरी रुद्रावर सोंपविल्यावर महाराजांनी तिरुवाडीवर स्वारी केली. या विभागाचा अधिकारी शेरखान लोदी या नांवाचा विजापुरी सरदार होता. शिवछत्रपतींच्या होणाऱ्या स्वारीचें वृत्त जरी त्याला कळलें तरी त्याच्या घमेंडखोर सल्लागारांनी मराठ्यांहून त्याचेंच बळ अधिक असल्याची कल्पना त्याच्या मनांत भरवून दिल्यामुळे तो त्याच भ्रमांत होता. त्याच्या पदरीं फ्रान्सिस मार्टिन या नांवाचा एक फ्रेंच मनुष्य होता. त्याने महाराजांच्या बळाची खानाला खरी कल्पना दिली; पण त्याने तिकडे दुर्लक्ष केलें. त्याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. महाराजांशी युद्ध करण्याच्या इच्छेने चार सहस्र अश्वदळ व तीन चार सहस्र पायदळासहित दि. १० जूनला शेरखान तिरुवाडी येथे येऊन थडकला. दि. २६ जूनला सहा सहस्र अश्वदळासह महाराज तिरुवाडीला येऊन पोहोंचताच शेरखानाने त्यांच्यावर चाल-केली. युद्धशास्त्राच्या दृष्टीने त्याच्या हालचाली आत्मनाशक आहेत हें ध्यानांत येतांच मराठी सेना त्या पाहात स्वस्थ उभी राहिली. शेरखानाच्या ध्यानांत बऱ्याच वेळानंतर स्वत:ची चूक येतांच त्याने आपल्या सैन्याला एकदम माघार घेण्याची आज्ञा दिली. सैन्य माघार घेतांच मराठ्यांनी त्याची लांडगेतोड करून त्याचा पूर्ण पराभव केला.

उघड्या डोळ्यांनी ही फटफजिती पाहात शेरखान तिरुवाडीच्या गडांत शिरला आणि रात्र होतांच तिवेनापट्टमच्या रोखाने पळू लागला. मराठ्यांच्या सैन्याने त्याचा पाठलाग केला. तो कालनायकाच्या अरण्यांत पळून गेला. मराठी सैन्याने तेथेही त्याचा पराभव केला. शेरखान बोनागीरपट्टमच्या किल्ल्यांत शिरला. पण त्यामुळे तो तेथे कोंडला मात्र गेला. या युद्धांत महाराजांना मिळालेल्या लुटींत पांचशे घोडे व दोन उत्कृष्ट हत्ती मिळाले. शेरखान तिरुवाडीच्या दुर्गांतून पळून गेल्यावर त्याच्या सासऱ्याने कांही दिवस तो दुर्ग लढविला. स्वतः महाराजांनी जातीने या युद्धांत भाग घेऊन बालडौल, तिवेनापट्टम व इतर अनेक किल्ले घेऊन शेरखानाची कोंडी केल्यामुळे शेवटीं तो शरण आला. महाराजांनी वीस हजार होन दंड भरून शेरखान प्रदेश सोडून जावयास सिद्ध असल्यास त्याला जीवदान देण्याचें मान्य केलें. दंडाचे पैसे मिळेपर्यंत शेरखानाचा वडील मुलगा महाराजांकडे ओलीस राहिला. यानंतर महाराजांनी त्याला किल्ल्यांतून सुरक्षित जाऊं दिले व गोंडलूरकडील त्याची जहागीर त्याला परत देण्याचें आश्वासन दिलें. शेरखानाच्या दंडाचे पैसे कांही संस्थानिकांनी महाराजांना दिले. तेव्हा कोठें त्याचा मुलगा इब्राहिमखान याची सुटका झाली. शेरखानाचा याप्रमाणे पराभव होतांच महाराजांना होणारा दक्षिणेंतील विरोध जवळजवळ संपला. दि. १२ जुलैला कोलेरून नदीच्या काठीं महाराजांचा तळ होता. येथून दक्षिणेला तंजावर दहा मैलांवर आहे. या ठिकाणीं महाराजांना मुदुरेचा नायक चोक्कनाथ ह्याच्याकडून एक वकील भेटावयास आला. महाराजांनी त्याच्याजवळ सैन्यखर्चासाठी एक कोटी रुपये मागितले. वकिलाने मदुरेच्या नायकाला राज्य परत मिळवून दिल्यास सात लक्ष रुपये देतो असें सांगितलें. याप्रमाणे वाटाघाटी चालू असतांनाच रघुनाथपंत हणमंते तेथे येऊन महाराजांना भेटले. नायकाशीं वाटाघाटी करण्यासाठी महाराजांनी त्यांनाच पाठविलें. रघुनाथपंतांनी सहा लक्ष होन खंडणी ठरवून ते प्रत्यक्षांत दीड लक्ष

होन घेऊन परत आले. याप्रमाणे सहा महिनेपर्यंत छत्रपतींचा दक्षिण दिग्विजय चालू होता. यवनांच्या दास्यांतून मुक्त झाल्याचा आनंद दक्षिण भारतांतील हिंदूंच्या अंतःकरणाला पुलकित करीत होता. पण महाराजांच्या आश्चर्यांत एक नवीनच भर पडत होती व ती म्हणजे त्यांचे धाकटे बंधु अवघ्या दहा कोसांवर असूनसुद्धा त्यांच्या भेटीला कांही आले नाहीत !

प्रत्यक्ष तंजावरच्याच आसपास महाराजांच्या विजयवार्तांनी वातावरण दुमदुमलें होतें. यवनांकित भारताची मुक्तता करणारा अवतारी पुरुष म्हणून सारें हिंदु जगत् ज्यांच्याकडे श्रद्धेने पाहात होतें तो आपल्या पित्याच्या ठिकाणीं असलेला ज्येष्ठ बंधु दाराशीं येऊन पोहोचल्यावर स्वतः होऊन सामोरे जाऊन त्यांना आग्रहाने तंजावरास घेऊन येणें हें व्यंकोजीचें कर्तव्य होतें. पण त्यांनी महाराजांच्या आगमनाची वास्तपुस्तही केली नाही. स्वाभाविकपणेंच महाराजांनीच त्याची वास्तपुस्त घ्यावयाचें ठरविलें व ही कल्पना मनांत येतांच एक राजकारणही महाराजांच्या मनांत घोळूं लागलें. एकोजीचें जें राज्य होतें तें शहाजी महाराजांचेंच होतें व त्यावर केवळ एकोजी अथवा व्यंकोजीचाच अधिकार नसून शिवाजी महाराजांचाही त्यांत अर्धा वाटा होता. या अर्ध्या वाटयाची मागणी करावयाची असें महाराजांनी ठरविलें.

आपल्या खड्गाच्या टोकावर पांच पातशाह्यांना धाकांत ठेवून ज्याने पारतंत्र्याच्या शून्यांतून स्वराज्याचें ब्रह्मांड उभारलें त्याच्या मनांत छोटयाशा राज्याचा वाटा मागण्याची बुद्धि कां उद्भवली असेल ? भावाचें येवढेंही सुख महाराजांना पाहवत नव्हतें काय ?

✦ ✦ ✦

प्रकरण अठरावें

# व्यंकोजी व शिवाजी

व्यंकोजी राजे हे स्वत:ला विजापूरचे अंकित व त्यांच्या शत्रूंचे शत्रु समजत असत. दक्षिण दिग्विजयाने महाराजांनी जें साधलें होतें त्याला विजापूरचे दास असलेले राजे व्यंकोजी हे महाराजांची पाठ वळतांच सुरुंग लावूं शकणार होते. या बंधूंची यापूर्वीही रणांगणावर गांठ पडली होती याचा उल्लेख मागे आलेलाच आहे. अशा स्थितींत उत्पन्न होणारें हें स्वराज्याचें शत्रुत्व हतबल करणें अथवा मित्रत्वांत रूपांतरित करणें हे दोनच मार्ग महाराजांसमोर होते. यांपैकी कोणताही मार्ग साधण्यासाठी व्यंकोजीशीं भेट व बोलणें होणें आवश्यक होतें. थोरले बंधु या नात्याने महाराजच मानाने वडील होते. त्यामुळे आपण दक्षिणेंत येतांच रीतीप्रमाणे आपला हा धाकटा बंधु आपल्या भेटीला येईल व त्या भेटींत सारें राजकारण साधतां येईल अशी महाराजांची कल्पना होती. पण व्यंकोजीने साधा शिष्टाचारही न पाळतां त्यांच्या कल्पनेला धक्का दिला. शेवटीं महाराजांनीच आपले दूत राजे एकोजी यांच्याकडे पाठविले. स्वत: महाराजच व्यंकोजीला पुढे पाठविलेल्या पत्रांत लिहितात की, 'आशीर्वाद उपरि कै. साहेबी कैलासवास केला, त्यास आजी तेरा वर्षें जालीं. महाराजांचे पैके व जडाव व हाती व घोडे व मुलूख आवघेंहि राजमान्य रघुनाथपंतीं तुम्हांला राज्यावरी बैसवून संपूर्ण राज्य तुमचें हातीं दिल्हें. ऐसियास आमचा अर्ध वाटा तेरा वर्षें तुम्हीच खादला. आम्ही जरी तुम्हाजवली मागावें तरी बहुत दूर होतों. बऱ्या बोले तुम्ही देणार नव्हां म्हणून तेरा वर्षें सबूरी केली. मनामध्ये ऐसा विचार केला की, बरे, महाराजांचे पुत्र तेही आहेत, खाती तोवरी खात. मालाचे धनीच आहेत. जे समयी आम्हाला फावेल ते समयी आम्ही व्येव्हार सांगोन घेऊच ऐसे मनी धरून होतो. ऐसीयास राजकारणप्रसंगे

आम्ही कुतुबशहाचे भेटीस भागानगरास गेलो. तेथून कर्नाटकांत गेलो. चंजी घेतली व येलूर तर्फेचा मुलुख घेतला, व शेरखानास झगडियांत मोडून गर्देस मेलविले. सेरखानाचे हातीं मुलुख होता, तेवढाही घेतला. त्यावरी मजल दरमजल कावेरी तीरास गेलो. तेथून तुम्हाला पत्रें लिहिलीं की, रा. गोविंदभट गोसावी व रा. काकाजीपंत व रा. निलोबा नाईक व रा. रंगोबा नाईक व तिमाजी बक्षी यार राऊत भले लोक आम्हापासी पाठवणें म्हणून तुम्हाला बहुतरीती लिहून पाठविलें. त्यावरून तुम्ही सदरहु भले लोक आम्हापासी पाठवून दिले.

——(शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. २३३२)

याप्रमाणे महाराजांनी स्वतः होऊन व्यंकोजीला पुढच्या बोलण्यासाठी आपलीं माणसें पाठवावयास लिहिलें. प्रौढप्रतापी महाराजांचें हें पत्रच येऊन थडकल्यावर राजे व्यंकोजी गडबडले. त्यानी महाराजांच्या म्हणण्याप्रमाणे आपले उपर्युक्त कारभारी महाराजांकडे पाठविले. महाराजांनी त्यांच्याशीं आपल्या अधिकाराविषयी बोलणें करून त्यांच्याबरोबर बाळंभट गोसावी, कृष्ण ज्योतिषी व कृष्णार्जी सेखजी या तीन मुत्सद्द्यांना देऊन व्यंकोजीकडे 'रीतसर अर्धा वाटा द्यावा, गृहकलह करूं नये' असा निरोप पाठविला. या सर्व मध्यस्थांनी व्यंकोजीची पुष्कळ समजूत घालण्याचा प्रयत्न केला. पण राजे व्यंकोजी यांना महाराजांना कांहीहि द्यावयाचें नव्हतें. त्यांनी एक वेगळीच युक्ति केली. आपण स्वतःच महाराजांच्या भेटीस जाऊन खूप नम्रतेचा व्यवहार करावा म्हणजे वाटा देण्याचा प्रसंगच उत्पन्न होणार नाही, अशा कल्पनेने त्यांनी स्वतःच भेटीचा निर्णय घेतला. जुलै महिन्याच्या मध्यास महाराज तिरुमलवाड्यास असतांना बरोबर दोन सहस्र स्वार घेऊन राजे व्यंकोजी महाराजांच्या भेटीला आले. त्यांच्या समवेत काकाजीपंत, जगन्नाथपंत, कान्हेरपंत हे त्यांचे कारभारी व प्रतापजी राजे, भिवजी राजे इत्यादि त्यांचे सापत्न बंधु (शहाजी राजांचे दासीपुत्र) हीं होते. महाराजांना व्यंकोजी राजे येत असल्याची वार्ता

कळतांच ते स्वत: आपल्या या धाकटचा बंधूला तिरुपतोरा या गांवीं तीन कोस सामोरे गेले. उभयता बंधूंची भेट झाली. आठ दिवसपर्यंत एकोजी राजांचा महाराजांजवळ मुक्काम होता. पण स्वत: होऊन मुद्द्याची गोष्ट ते काढीनात. भेटी, परतभेटी, नजराणे, प्रतिनजराणे, मेजवान्या, प्रतिमेजवान्या झाल्या. पण राजे व्यंकोजी मुद्द्याच्या गोष्टीवर येईचनात. शेवटीं महाराजांनी स्वत:च व्यंकोजीजवळ गोष्ट काढली. पण ते त्याला दाद देईनात. त्यावर महाराजांनी रागाने त्यांची चांगलीच खरडपट्टी काढली. व्यंकोजीने यावर उत्तर तर कांही दिलें नाही, पण एके दिवशीं रात्रीं चारपांच लोकांसह फिरण्याच्या मिषाने बाहेर पडून ते कोलेरून नदीवरून आपल्या राज्यांत पळून गेले. दुसऱ्या दिवशीं महाराजांना व्यंकोजीच्या पलायनाची ही वार्ता कळतांच खेदही झाला व क्रोधही आला. सभासद लिहितो :--

'दुसरे दिवशी राजियांस वर्तमान कळलें की, व्यंकोजी राजे पळून गेले. त्याजवरून आश्चर्य केलें की, 'काय निमित्त पळाले? आम्ही त्यांस धरीत होतो की काय? आम्हास विरदें काय करावयाचीं? आमचीं बिरुदें अष्टदिशेस लागली आहेत. समुद्रवलयांकित भूमंडळीं कीर्त आपलीच जाली आहे. तेथे बिरदें काय करावयाचीं? वडिलांची वस्त असावी म्हणून मागितली होती. पळावयाचें नव्हतें. द्यावयाची नव्हती तरी न देणें. लगेच उठून पळून गेले? अति धाकटे ते धाकटे, बुद्धिहि धाकटेपणायोग्य केली.' असें बोलिले. मग त्यांचे कारकून व सरदार पळत होते ते राजियाच्या लोकांस सापडले. त्यांस धरून आणिलें मग त्या अवघियांस वस्त्रें, भूषणें, अश्व देऊन चंदावरास बंधूसन्निध पाठविले. संताजी राजे म्हणून महाराजांचे (शहाजी) नाटकशाळेचे पुत्र होते. ते शूर पराक्रमी होते. ते राजियांच्या भेटीस आले. भेट जाली. त्यांस कर्नाटकांत हजार घोडयांची दौलत दिधली. महाल मोकाशे दिले. हत्ती, घोडे, वस्त्रें देऊन रवाना केले.'

--(सभासद बखर, गाडगीळ प्रत, पृ. ११४)

संताजी राजे हे एकच बंधु महाराजांच्या पक्षाला मिळाले. भलेपणाने वागून व हितोपदेश करूनही व्यंकोजी वळत नाही असें पाहून महाराजांनी त्याच्या प्रत्यक्ष भेटीसाठी पुन्हा प्रयत्न चालविले. शक्य तोवर भावाविरुद्ध खड्ग उपसण्याची त्यांची इच्छा नव्हती. या वेळेपर्यंत कोलेरून नदीच्या उत्तरेकडील सर्व प्रांत महाराजांनी जिंकला होता. फ्रेंचांचा वकील एम्. जर्मेन हा या वेळीं महाराजांच्या सेनानिवेशांत तीन दिवस होता. महाराजांच्या सेनानिवेशाचें वर्णन करतांना तो लिहितो, 'या शिबिरांत कोणत्याही प्रकारचा डामडौल नसून मूर्तिमंत साधेपणा दिसत होता. यांत सामानाची अडगळ बिलकूल नव्हती व एकही स्त्री या सैन्याबरोबर दिसत नव्हती. मजबूत परंतु लहानसेच असे फक्त दोनच तंबू या सगळ्या तळावर होते. त्यांपैकी एक स्वतः राजा शिवाजी साठी असून दुसरा त्याच्या प्रधानासाठी होता. फौजेंतील सर्व घोडे सरकारी पागेंतील असून बारगिरांना फक्त दरमहा दोन पागोडा पगार मिळत असे. दोन राउतांत तीन घोडे असा साधारण हिशेब असे. बातमी मिळविण्यांत शिवाजी फार दक्ष असे, किंबहुना त्याच्या सर्व विजयाचें श्रेय अचूक बातमी मिळविण्यातच असे, व त्यामुळे तो आपल्या वार्ताहरांना सढळ हाताने देणग्या व पगार देत असे.' —— (शिवाजी व शिवकाल, पृ. २१४)

व्यंकोजीच्या मनोवृत्तींत कोणताही बदल पडणें शक्य नाही हें पाहून महाराजांनी त्याचा, आदिलशाही म्हणून, सारा पूर्वज संपादित प्रदेश जिंकला. या जययात्रेंतच आपल्या सेनानींना व्यंकोजीवर पाठवून महाराजांनी वृद्धाचलम् येथील भगवान् महादेवाच्या स्थानाची यात्रा केली. त्यांच्या या जययात्रेंत तिवेनापाटम् येथे डचांचा मुख्याधिकारी त्यांना येऊन भेटला, व त्याने त्यांना नजराणे समर्पण केले. महाराजांना या वेळीं कर्नाटकांत जिंकलेल्या प्रदेशाची सुव्यवस्था करणें व तेथील दुर्गांना सुधारणा करून अधिक बळकट स्वरूप देणें आवश्यक वाटत होतें. या दृष्टीने त्यांनी या कामांत निष्णात असलेल्या इंग्लिशांचें साह्य

घेण्याचा प्रयत्न केला. वानीकंवाडीहून दि. २२ सप्टें. १६७७,ला मद्रास येथील इंग्रज गव्हर्नरला महाराजांनी असें पत्र लिहिलें की, कर्नाटकांत मी जिंकलेल्या किल्ल्यावर नवीन सामान तयार करावयाचें आहे. तरी तोफेसाठी मोठमोठे गाडे तयार करणारे व सुरुंग तयार करणारे लोक तुमच्याकडे असल्यास त्यांस आमच्याकडे ताबडतोब पाठवून द्यावे. विशेषतः सुरुंगाचीं कामें करणारीं माणसें आम्हांस अत्यंत निकडीने पाहिजे आहेत. वीस-पंचवीस निदान दहा-पांच तरी माणसें पाठवून देणें. त्यांना योग्य वेतन देऊन किल्ल्यावर त्यांची नेमणूक करण्यांत येईल.' इंग्रजांनी आपल्या नेहमीच्या पद्धतीने आम्ही व्यापारी असल्यामुळे आम्ही अशी राजकीय स्वरूपाची कामगिरी करूं शकणार नाही' असें मोठ्या नम्रतेने महाराजांना कळविलें, पण त्यांच्या साह्यावांचून प्रतिभा-संपन्न महाराजांचें कांहीही अडणार नव्हतें; याचा अनुभव त्यांना आलाच. किल्ल्यांची बांधणी व रचनाकौशल्य या संबंधांतही महाराजांची प्रतिभा कशी तल्लख होती याची कल्पना त्यांनी जिंजीच्या किल्ल्याच्या केलेल्या पुनर्रचनेसंबंधीं इंग्रजांनी आपल्या पत्रव्यवहारांत जें वर्णन केलें आहे त्यावरून येतें. उदाहरणार्थ, पुढील उतारा पहा :—

'शिवाजीने जिंजीचें राज्य घेतल्यावर आणि एक वर्ष वेढा घालून वेलोरचा किल्ला जिंकल्यावर हिंदुस्थानांतील मुसलमानांचें बळ लक्षांत घेऊन, भविष्यकाळीं त्यांच्या सर्व एकवटलेल्या साम-र्थ्याचाही प्रतिकार करतां यावा म्हणून त्याने बंदोबस्त करण्यास सुरवात केली. मुसलमानांना ह्या राज्यांतून शिवाजीने घालवून लावतांना त्यांच्या मशिदीचा अपमान आणि भ्रष्टाचार केला होता, त्यामुळे तूर्त तरी त्याला कोणाचीही भीति नव्हती; तरी पुढची तरतूद करणें आवश्यक होतें. आपला उद्देश सिद्धीस नेण्या-करितां निसर्गतःच दुर्गम असलेल्या जिंजी किल्ल्याची पुन्हा त्याने डागडुजी केली. पहिले तट पाडून नवे तट व बुरूज असें कौशल्याने बांधलें की तें काम हिंदी लोकांचें नसून युरोपियनांचेंच असावें असें

वाटतें. कांही जुने निरुपयोगी किल्ले पाडून त्याने कित्येक नवे भुईकोट व डोंगरी किल्ले बांधले. पाश्चात्यांच्या पद्धतीचें अवलंबन करून त्याने मोठे खडक फोडले, तलाव बांधले आणि युद्धोपयोगी इतर इमारती वगैरे रचना बनविल्या. या कारखान्यांवर त्याने आपल्या प्रजेकडून जमविलेली अपार संपत्ति खर्च केली.

—— (शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. १९२०)

या पत्रांत भ्रष्टाचार वगैरेचा जो उल्लेख आहे त्याला एक विशेष कारण आहे. कर्नाटकच्या स्वारींत महाराजांनी तिरुवन्न-मलई व समोत्तिरपेरुमल येथे पूर्वी ज्या दोन मंदिरांच्या मशिदी करण्यांत आल्या होत्या. त्यांचें पुन्हा मंदिरांत रूपांतर केलें. समोत्तिरपेरुमलच्या देवळासमोर त्यांनी एक भव्य गोपुर बांधविलें. तेथे शिवलिंगाची स्थापना करतांना मंदिरांत एक लक्ष गाई आण-वून त्यांची पूजा बांधली व मंदिरासमोरील टेकडीवर स्वतःच्या आज्ञेने कार्तिकांतील दीपोत्सवाला महाराजांनी प्रारंभ केला. मंदिराचें मशिदींत रूपांतर होणें ही गोष्ट अनेक वर्षांच्या संवयीने सर्वांच्या अंगवळणीं पडली होती. तो कांही तिरस्करणीय भ्रष्टाचार व अत्याचार आहे हें स्वतः हिंदूनाच जेथे वाटत नव्हतें तेथे इतरांचें काय? पण मशिदींचीं पुन्हा मंदिरें होऊं शकतात हें मात्र नवें सत्य होतें. त्याचा प्रकाश स्वतः हिंदूनाच सहन होणारा नव्हता; तर तो इतरांना कोठून सहन व्हावा? छत्रपति शिवाजी महाराज राष्ट्र जीवनाच्या सर्व दालनांतील प्रथम श्रेणीचे जे द्रष्टे होते ते हे असे.

असो. महाराजांची दक्षिणदिग्विजयांत एकसारखी प्रगतीच होत होती. त्यांना कोणाचाही विरोध होत नव्हता. दक्षिणेला येऊन व विजयाचे पडघम दक्षिण महासागराला ऐकवून महाराजांना आता दहा महिने उलटून गेले होते. आता आपल्या राज्यांत परत जाण्याची त्यांना स्वत.ला निकड वाटूं लागली होती. स्वराज्य संभाळीत असलेल्या त्यांच्या मंत्रिमंडळालाही महाराजांनी स्वराज्यांत परत यावें असें वाटत होतें. इतक्यांत त्यांच्या हेरांनी अशी बातमी आणली की, ‘ कुतुबशहाने बंडखोर शिवाजीला साह्य

केल्याचें ऐकून बादशहा औरंगजेब संतापून गेला आहे व त्याने आपल्या दक्षिणेंतील सुभेदाराला गोवळकोंडयावर स्वारी करण्याची आज्ञा केली असून त्याप्रमाणे मोगल व विजापूरकर यांच्या संयुक्त सैन्याने मालखेडजवळ गोवळकोंडयाच्या प्रांतावर स्वारी केली आहे.' ही वार्ता ऐकतांच इ. स. १६७७ च्या नोव्हेंबरच्या प्रारंभीं महाराजांनी आपलें मुख्य सैन्य जिकलेल्या प्रदेशाच्या व्यवस्थेसाठी ठेवून व लवकरच परत येण्याचें सांगून चार सहस्र अश्वदळासह महाराज स्वराज्याकडे यावयास निघाले. येतां येतां त्यांनी शहाजी राजांच्या जहागिरीपैकी कोलार, उस्कोटा, बंगलोर, बाळापूर आणि सेरा हे प्रदेश जिकून व तेथील जुलमी पाळेगारांना शिक्षा करून त्या प्रांताची व्यवस्था केली. वीस लक्ष होनांचें हें नवें राज्य महाराजांनी येथे संपादन केलें. परत येत असतां महाराजांना एक विपरीत वार्ता कळली व ती म्हणजे आपले धाकटे बंधु राजे व्यंकोजी यांनी आपल्या सैन्यावर स्वारी करून युद्धास प्रारंभ केला ही होय. कोणताही प्रांत जिकणें हें तडकाफडकीचें काम असलें तरी तेथे शांतता व सुव्यवस्था प्रस्थापित करणें हें दिरंगाईचें ठरतें. महाराजांनी जिकलेला दक्षिणेचा प्रदेशही या गोष्टीला अपवाद असण्याचें कांही कारण नव्हतें. त्यांची पाठ वळतांच व्यंकोजी राजांनी आपलीं कारस्थानें सुरू केलीं. प्रथम त्यांनी मदुरा व म्हैसूर येथील नायक राजे व पाळेगार यांना गाठून महाराजांविरुद्ध एक आघाडी उघडण्याचा प्रयत्न केला. त्यांत यश येत नाही असें पाहतांच विजापूर दरबारांतून साह्य मिळविण्याची खटपट केली. त्यांतही यश येत नाही असें पाहतांच कर्नाटकांतील मुसलमान राजांनी महाराजांविरुद्ध एकत्र यावें असेंही कारस्थान केलें. पण त्याचा कांहीएक उपयोग झाला नाही. इ.स. १६७७च्या नोव्हेंबरमध्ये महाराजांचें सैन्य कोलेरून नदी उतरून तंजावर-मध्ये प्रवेश करण्याचा प्रयत्न करीत असतां त्याला अडथळा कर-ण्याचा त्याने प्रयत्न केला. नदीच्या उभय तीरावर दोन्ही सैन्याचा कांही दिवस तळ होता. पण व्यंकोजीच्या सैन्यावरून गिधाडें

फिरत असल्यामुळे त्याने स्वारी करावयाचें धाडस केलें नाही. शेवटीं दि. १६ नोव्हेंबरला पहाटे चार सहस्र अश्वदळ व दहा सहस्र पायदळ या सैन्यानिशी राजे व्यंकोजी अहेरीजवळ महाराजांच्या पक्षाला मिळालेले आपले बंधु संताजी भोसले व सेनापति हंबीरराव मोहिते यांच्या बारा सहस्र सैन्यावर चालून गेले. संध्याकाळपर्यंत मोठें घनघोर युद्ध झालें, व संध्याकाळीं संताजीचा पराभव होऊन ते पाव कोसपर्यंत व्यंकोजीने केलेल्या पाठलागामुळे पाऊणकोस मागे हटले. शिबिरांत पोहोचल्यावर या पराजयाचे दूरगामी परिणाम व आपली होणारी अपकीर्ति यांचा दूरवर विचार करून त्याच रात्रीं तें अपयश धुवून काढण्याचा संताजीने निश्चय केला. लगेच निराळ्या मार्गाने जाऊन त्याने व्यंकोजीच्या शिबिरावर रात्रींच छापा घातला. या वेळीं व्यंकोजीचें सैन्य दिवस भराच्या परिश्रमाने थकून विजयाच्या उन्मादांत घोरत पडलें होतें. या असावध सैन्याचा भयंकर संहार करण्यांत आला. या छाप्यांत एकसहस्र अश्व व लूट घेऊन व्यंकोजीचे तीन सेनानी संताजीने बंदी केले.

महाराजांना हें वृत्त कळतांच अत्यंत वाईट वाटलें. संताजीने केलेल्या या दाणादाणीनंतर व्यंकोजी पराभूत होऊन तंजावरकडे पळून गेला होता. आता तरी त्याने सावध व्हावें म्हणून महाराजांनी त्याच्याकडे पहिल्यापासून भांडणाची त्याची वृत्ति कशी आहे व तिच्यांत त्याचा सर्वनाश कसा ओढवेल हें स्पष्ट सांगणारें पत्र पाठविलें. त्यांतील पूर्वार्ध मागे उद्धृत केलाच आहे. उत्तरार्ध असा:

'त्यावरी मजल दरमजल कावेरीतीरास गेलो, तेथून तुम्हाला पत्रें लिहिली की, रा. गोविंदभट व रा. काकाजीपंत व रा. निलोबा नाईक व रा. रंगोबा नाईक व तिमाजी यक्षीयार राऊ ऐसे भले लोक आम्हापासी पाठवणें म्हणून तुम्हाला बहुता रीतीं लिहून पाठविले. त्यावरून तुम्ही सदरहू भले लोक आम्हापासी पाठवून दिल्हे. त्या भलें लोकासी बहुता रीती घरोबियाचा व्येव्हार सांगोन आमचा अर्धा वाटा आम्हांला बऱ्या बोले द्या म्हणोन सांगोन

पाठविलें. त्या बराबरी रा. बालंभट गोसावी व रा. कृष्ण ज्योतिसी व कृष्णाजी सेखजी ऐसे आपले तर्फेने भले लोक दिल्हे. हे भले लोक तुम्हाजवळी जाऊन बहुता रीती बोलिले की, गृहकलह करूं नये; आपला अर्धा वाटा मागतात तो द्यावा ऐसे बोलले. परंतु कपटबुद्धि तुम्ही यैसी मनी धरिली की, या समयांत आम्ही बहुत थोर राजे झालो आहो. आम्हासी आपण खासा भेटीस येऊन हलभल नरमी बहुत दाखवावी, आणि आमचा वाटा बुडवावा. तेरा वर्षे सारें राज्य आपणच खादलें; पुढेहि सारें राज्य आपणच खावें; ऐसी बुद्धि मनीं धरून वाटियाचा निवाडियाची तह न करितां आपण खासाच आमचे भेटीस आलेस. आमची व तुमची भेट जाली. याउपरि आम्ही बहुतां रीती तुम्हासी बोलिलो की, आमचा वाटा अरधा द्यावा. परंतु तुम्ही वाटा द्यावा हा विचार मनी धराच ना. मग जरूर जाले की तुम्ही धाकटे भाऊ आपण होऊन आमचे भेटीस आलेस आणि तुम्हाला धरावे आणि वाटा मागावा हे गोष्टी थोरपणाचे इज्जतीमध्यें ल्याख नव्हे. यानिमित्त तुम्हाला चंजाउरास जावयाचा निरोप दिधला. तुम्हीं चंजाउरास गेलेसी याउपरी गृहकलह वाढवूं नये. वाढलियाने पहिले युगी पांडवकौरव बहुत बहुत कस्टी जाले तें सारी भारताची कथा मनांत आणून गृहकलह वाढविलीयांत उभयपक्षी कस्टी होयेजेत. ऐसे जाणून रा. शामजी नाईक व कोनेरीपंत व शिवाजी शंकर या हातीं मागते बहुता रीती सांगोन पाठविलें की, तुम्ही व आम्ही वाटे करून घेऊन परस्परे समाधाने राहोन. परंतु, तुम्ही दुर्योधनासारिखी दुस्ट बुद्धी करून संधी न कराच. युद्ध करावें ऐसेच मनी धरिलें. ऐसियांस आम्हाला रायेगड प्रांते बहुत कांही कार्य होतें या निमित्य चि. संताजी राजे व रा. रघुनाथपंत व रा. हंबीरराऊ यैसे ते प्रांते ठेवून आम्ही स्वार होऊन तोरगल प्रांतास आलों. तेथे यैसी खबर आइकिली, की, तुम्ही तुरुक लोकांच्या बुधीस लागोन आमच्या लोकांसी झगडा करावा ऐसे मनी धरून आपली सारे जमेत येकवट करून आमच्या लोकांवरी पाठवून दिल्हेत. ते

वालगोडपुरास आले. तुमचे लोक चालोन आल्यावरीं तुमच्या आमच्या लोकांत थोर झगडा जाला. तुमचे लोक पराजय पावले. प्रतापजी राजे व भिवजी राजे व शिवाजी दबीर यैसे तिघे धरिले व कितिएक लोक मारिले; कितियेक लोक पलोन दाणादाण होऊन गेले. ऐसा समाचार आइकिला. हें ऐकोन बहुत नवल यैसें वाटलें की, कै. महाराज त्याचे तुम्ही पुत्र, बहुत थोर लोक, यैसे असोन कांहो विचार करीत नाही, व धर्माधर्म विचारीत नाही. ऐसे असता कस्टी व्हाल याचें नवल काये? तुम्ही म्हणाल की, काये विचार करावा? तरी यैसा विचार करावा होता की, अधर्मेकरून तेरा वष आपण सारें राज्य खादलें तें खादलें. आता अर्धा वाटा मागतात तो त्यांचा त्यांला द्यावा आणि आपण सुखी रहावे ऐसा विचार करावा होता. दुसरा विचार करावा होता की, श्रीदेवाची व श्रीची कृपा त्यावरी पूर्ण जाली आहे. दुस्ट तुर्काला ते मारतात. आपल्या सैन्यांतहि तुरुक लोकच असतां जय कैसा होतो? आणि तुरुक लोक कैसे वाचो पाहतात, हा विचार करावा होता आणि युद्धाचा प्रसंग पाडावा नव्हता. परंतु दुर्योधनासारखी बुधि धरून युद्ध केलें आणि लोक मारविले. जे जाले ते जाले. पुढे तरी हट न करणें. तेरा वर्षे तुम्ही सारें राज्य खादलें ते खादले या उपरि कितेक आमचे आम्ही घेतले असे. अरणी, बेगलूर, कोल्हार, होसकोट, सिरलकटे व किरकोल जागे व चंजाऊर यैसे जे जागे तुमचे हातीं उरले आहेती ते आमचे लोकांचे हातीं देणें. आणि नकद पैसे व जडाव व हाती व घोडे यांचा अरधा वाटा देणें ऐसा विचार करोन आम्हासी संधि करणें. तुम्ही ऐसा संधि निर्मलपणें केलिया आम्ही आपणापासोन तुम्हाला तुंगभद्रे आलाड पनालेप्रांते तिन्ही लक्ष होनांची दौलत देऊन अथवा आम्हाजवळील दौलत तुम्हाला मानेना तरी कुतुबशहास अर्ज करून त्यापासून तुम्हाला ३ तीन लक्षांची दौलत देवऊनु. यैसे दोन्ही विचार तुम्हाला लिहिले आहेत. या दोन्ही मधील येक मनी धरून मान्य करणें. हटाचे हातीं न देणें. आपल्यांत आपण गृहकलक करावा आणि

कस्टी व्हावे याचें कांही प्रयोजन नाही. याउपरी तऱ्ही आमचा आपला संधि व्हावा ऐसी बुधी मनी धरून वांटियाचा वेव्हार निर्गमून टाकणें. आणि सुखे असणें. गृहकलह बरा नव्हे. आम्ही तरी वडीलपणें आजीवरी तुम्हांला सांगितलें; आताहि सांगतो ऐकाल तरी बरे. तुम्हीच सुख पावाल. नाइकाल तरी तुम्हीच कस्टी व्हाल. आमचे काये चालते? बहुत काय लिहिणें. 'मर्यादेयं विराजते.' —(शिवकालीन पत्रसारसंग्रह, पत्र क्र. १९२०)

परंतु महाराजांच्या या पत्राचा व्हावा तसा उपयोग झाला नाही. तेव्हा सेनापति हंबीरराव मोहिते यांनी व्यंकोजीचा पाठलाग सुरू केला. हंबीररावांनी एकोजीची तीन सहस्र घोडीं व तीन हत्ती पाडाव केल्यावर या बंधूना संधीची गोष्ट पटली. सभासद लिहितो :—

'यावरि रघुनाथपंत व हंबीरराव चालोन चंदावराकडे गेले. मग व्यंकोजी राजे यांनी सभ्य मनुष्य मध्यस्त घालून सख्य करावें असें जालें. त्याजवर रघुनाथपंती व हंबीररावांनी राजियाकडे जासूद पत्रें देऊन पाठविलें, मग राजियास कळोन या उभयतांस उत्तर पाठविलें की, 'व्यंकाजी राजे आपले धाकटे बंधू आहेत. मूल बुद्धी केली. त्यास तांही आपला भाऊ त्यास रक्षणें. त्याचें राज्य बुडवूं नका.' अशीं उत्तरें आलियावरी उभयतांनी व्यंकाजी राजे यांशीं सला केला. आणि द्रव्यही उदंड घेतले.'

—(सभासदी बखर, गाडगीळ प्रत, पृ. ११६)

या भांडणाच्या खर्चासाठी व्यंकोजीला तीन लक्ष होन खंडणी द्यावी लागली. महाराजांनी रघुनाथपंत हणमंते यांच्या मध्यस्थीने आपल्या या धाकटचा बंधूला जिंजीजवळचा सात लक्षांचा प्रदेश दूधभातासाठी देऊन व बेंगळूर, होराकोटे आणि सिरे हे प्रदेश धाकटी भावजय दीपाबाईसाहेब हिला चोळी बांगडी म्हणून देऊन व वडिलार्जित संपत्तीपैकी कांही किल्ले व प्रदेश स्वतःकडे ठेवून आपल्या बंधूशीं संधि केला. या कायमच्या संधीनंतर सेनापति हंबीरराव मोहिते याला महाराजांनी परत बोलाविलें. रघुनाथपंत

हणमंते यांच्या हाताखाली नवीन दहा सहस्र सेना देऊन जिंजीच्या दुर्गाच्या सदाच्या संरक्षणाची व्यवस्था महाराजांनी केली.

शिवछत्रपति दक्षिणेंत येतांच तेथील युरोपियन व्यापाऱ्यांच्या अंतःकरणांत धाक उत्पन्न होऊन ते प्रथमच त्यांना जाऊन भेटले व नजराणे त्यांच्या चरणीं समर्पण करून आपल्या वखारीकडे कृपादृष्टीने पहावयास त्यांनी त्यांना विनविलें. महाराजांचा या स्वारीच्या वेळीं विषावर उतारा ठरणाऱ्या औषधांचा शोध चालू होता असें दिसतें. महदाजीपंताबरोबर हीं औषधें मागविणारें एक पत्र त्यांनी मद्रासच्या इंग्रज गव्हर्नरला पाठविलें होतें. गव्हर्नरने तदनुसार औषधें तर महाराजांस पाठविलींच पण त्याबरोबर मालदिवचे नारळ आणि साठ होन किमतीचा नजराणाही पाठविला. महाराजांनी त्याचें उत्तर म्हणून गव्हर्नरला पोशाख पाठवून पुनश्च अशा औषधांची मागणी केली. गव्हर्नरनेही औषधें तर पाठविलींच पण पुन्हा बावन होनांचा नजराणा पाठवून कृपादृष्टीची याचना केली. इंग्रजांनी महाराजांशीं हे सारे व्यवहार संभाळले पण तोफांचे गाडे तयार करणाऱ्या व सुरंग तयार करणाऱ्या वीस पंचवीस कारागिरांची मागणी मात्र आपण व्यापारी आहोत या सबबीवर धूर्ततेने नाकारून स्वतःला त्यांच्या राजकारणापासून अलिप्त राखलें.

इंग्रजांप्रमाणेच फ्रेंचाचाही दक्षिणेंत व्यापार होता. महाराज दक्षिणेंत आले त्या वेळीं पाँदेचरी येथे असलेला फ्रेंचांचा गव्हर्नर फ्रान्सिस मार्टिन याने आपला एक ब्राह्मण वकील महाराजांच्याकडे पाठवून महाराजांना अशी प्रार्थना केली की, आपल्या राज्यांत आपण फ्रेंचांच्या वखारीचें जसें संरक्षण करतां तसेंच तें येथेही करावें. महाराजांनी शेरखान लोदीशीं झालेल्या युद्धांत फ्रेंचांनी आपल्याला साह्य करावें असें सुचविलें; व आपण फ्रेंचांच्या वखारीचें संरक्षण केल्यास फ्रेंच आपल्याला काय साह्य देतील असें विचारलें. द्रव्याचा प्रश्न उत्पन्न होतांच फ्रेंचांनी असें सांगितलें की, आमचा व्यापार अजिबात बुडाला असून नुकत्याच डचांशीं

झालेल्या युद्धांत झालेली हानि फार मोठी असल्यामुळे महाराजांनी पैसे मागूं नयेत. फ्रेंचांचें ढोंग महाराजांनी ओळखलें. त्यावर त्यांच्या-जवळ उतारा होताच. त्यानी पाँदेचरी येथील फ्रेंच वखारीच्या संरक्षणाची आज्ञा देऊन फ्रेंचाकडे वकिलाला रवाना केलें व स्थानिक मराठी अधिकाऱ्यांनी फ्रेंचांजवळून योग्य पद्धतीने पैसे काढलेच. त्यावर महाराजांच्याकडे फ्रेंचांनी कागाळ्यामागून कागाळ्या केल्या; पण त्यांचा कांही एक उपयोग झाला नाही.

डचांचाही व्यापार दक्षिणेंत होता. महाराजांचा निवास तुदुमगुर्ती येथे असतांना डचांचा तिवेनापटम् येथील वखारीचा मुख्य महाराजांना भेटला. त्याने रेशीम, चंदन, गुलाबपाणी, मालदिवचे नारळ, लवंगा आणि तलवारीचीं पातीं यांचा नजराणा महाराजांना दिला. महाराजांनीही त्यांना परत पोशाख दिले. पुढे डचांची वखार श्रीमंत आहे हें पाहून मराठ्यांनी ती लुटली. लुटलेल्या मालाची किंमत मिळावी म्हणून महाराजांना त्यांनी पुष्कळ पत्रें पाठविलीं पण त्याचा कांही एक उपयोग झाला नाही. कर्नाटकच्या स्वारींत अद्‌भुत यश मिळवून व म्हैसूरचा पूर्व आणि मध्य भाग जिंकून इ. स. १६७८ च्या एप्रिलमध्ये महाराज धारवाड बेलवाडी या मार्गाने स्वराज्यांत येऊन पोहोचले. जानेवारी महिन्यांतच म्हैसूर सोडून तुंगभद्रा ओलांडून कोपळ-गदग मार्गाने धारवाड जिल्ह्यांतील लक्ष्मीश्वराला येऊन ते पोहोचले. तेथे खानगवडा हा देसाई होता. त्याने मराठ्यांच्या भयाने तत्काळ गड खाली करून दिला. तेथून बंकापूरला जाऊन महाराजांची स्वारी संपगांवी आली. महाराजांचा तळ येथे पडला असतां (गदग प्रांत) तेथे जवळच बेलवाडी नांवाचें एक गांव होतें. या गावांत एक गढी होती. त्या गढीचें स्वामित्व एका अत्यंत धाडसी स्त्रीकडे होतें. या बाईचें नांव सावित्रीबाई देसाई. तिने मराठी सैन्याचे कांही सामानवाहू बैलच पळवून नेले. महाराजांनी बेलवाडीच्या गढीला वेढा देण्यासाठी सैन्य पाठविलें. ती गढी केवढी व त्या बाईचें बळ किती? पण या पराक्रमी स्त्रीने सत्तावीस दिवस पर्यंत गढी लढवून मराठी सैन्याची अब्रू पणाला लावली. शेवटीं

तिच्याजवळचा दारूगोळा संपल्याने मराठ्यांना गढी सर करतां आली. त्या वेळीं जी हातघाईची लढाई सुरू झाली तींत सावित्रीबाईने स्वत: तलवार चालवून एक दिवस मराठ्यांना थोपवून धरलें. शेवटीं तिचा पराभव झाला. तिला जिवंत पकडण्यांत आलें. मराठा सेनानी सकूजी गायकवाड याने तिची विटंबना करून तिला महाराजांकडे पाठविलें. महाराजांनी तिला मुक्त करून तिचा आदर केला व सकूजी गायकवाडाचे डोळे काढून त्याला जन्मभर कैदेंत ठेवलें. म्हणूनच शिवछत्रपति हे मर्यादापुरुषोत्तम होत!

श्री. बा. मो. पुरंदरे लिहितात :— 'या बाईला एक अगदी लहान पुत्र असावा. तो महाराजांच्या मांडीवर ठेवून त्याला अभय व कायमच्या संरक्षणमदतीचें आश्वासन तिनें मागितलें असावें व महाराजांनी तें दिलेंही असावें. कशावरून? धारवाड जिल्ह्यांत यादवाड नांवाचें एक गांव आहे. तेथे शनीच्या किंवा मारूतीच्या मंदिरांत एक शिल्प बसविलेलें आहे. त्या शिल्पांत शिवाजी महाराजांच्या मांडीवर एक मूल व महाराजांच्या एका हातांत दुधाचा पेला दाखविलेला असून समोर ही देसाईण स्त्री उभी आहे असें दाखविलें आहे. हें आणि अशीं अनेक शिल्पें या देसाईणीने तयार करवून अनेक स्थळीं बसविलीं होतीं असें म्हणतात. —(राजा शिवछत्रपति, भाग १०, पृ. ९१)

गदग प्रांतांतील अनेक स्थळें घेऊन महाराज महाराष्ट्रांत परत आले व १६७८ च्या जूनमध्ये त्यांनी रायगडावर पदन्यास केला. थोड्याच दिवसांत वेलोरचा गड रघुनाथपंत हणमंते आणि आनंदराव मकाजी यांनी १४ महिनेपर्यंत तुमुल युद्ध करून जिंकल्याची वार्ता त्यांना कळली. महाराजांनी जो मुलुख जिंकला होता तेथील जे लोक त्यांना मिळाले त्यांनाच त्यांनी तेथील अधिकार दिले. शहाजी राजांच्या वेळचीं जीं माणसें त्यांच्या साह्यार्थ आलीं त्यांत रघुनाथपंत हणमंते यांनी सगळें आयुष्यच तिकडे घालविलें असल्यामुळे त्यांच्याविषयीं लोकांना स्वाभाविकपणेंच आपलेपणा वाटत होता. रघुनाथपंत व त्यांचे बंधु जनार्दनपंत हणमंते यांच्या

स्वाधीन दक्षिणेंतील प्रांताचा कारभार करून महाराजांनी आपले सेनापति हंबीरराव मोहिते यांना दक्षिणेंतून बोलाविलें.

उत्तर भारतांत असलेल्या मोगलशाहीशीं झुंज देण्यापूर्वी आपल्या धाकट्या बंधूने मृत्युपंथी लागलेल्या विजापूरकराचें दास्य सोडून आपल्याप्रमाणेंच स्वतंत्र कर्तृत्व प्रकट करावें व याचि देहि याची डोळा आपलें स्वप्न साकार व्हावें अशी महाराजांची प्रथमपासूनच इच्छा होती. नुकतेच महाराजांचें या त्यांच्या उद्दिष्टांवर प्रकाश टाकणारें एक पत्र उपलब्ध झालें आहे. तें पत्र दक्षिणदिग्विजयाला निघण्यापूर्वी महाराजांनी व्यंकोजी राजे यांना इ. स. १६७६ मध्ये लिहिलें. या पत्रांत आपल्या दहा बारा वर्षांच्या राजकीय जीवनाचा आढावा घेऊन व्यंकोजी राजांना कर्नाटक व दक्षिण भागांत एक स्वतंत्र राज्य निर्माण करण्याची व स्वराज्य मंदिराचे शिल्पकार बनण्याची प्रेरणा देण्याचा प्रयत्न केला आहे. या पत्रावरून व्यंकोजीचें व महाराजांचें भांडण वाटयासाठी कसें नव्हतें व स्वराज्यमंदिराच्या या प्रयत्नांत व्यंकोजीचा उपयोग होण्यासारखा नाही हें दिसून आल्यावरच त्याच्या संबंधांतलीं पुढचीं पावलें उचलणें महाराजांना कां आवश्यक वाटलें हें स्पष्ट होतें. प्रस्तुत पत्र महाराजांनी रघुनाथपंत हणमंते यांच्याशीं विचारविनिमय करूनच लिहिलें असलें पाहिजे. त्यामुळे रघुनाथपंतांवरील जदुनाथ सरकारांचे आक्षेप व व्यंकोजीचें त्यांनी केलेलें समर्थन ह्या दोन्ही गोष्टी निर्मूल ठरतात. पत्रांत महाराजांनी सूचित केल्याप्रमाणे राजे व्यंकोजी जर आपलें राजकीय जीवन उभारते तर दक्षिणदिग्विजयाची कामगिरी करावयास महाराजांना स्वतः यातायात करण्याचें कारण उरलें नसतें. महाराजांचा दक्षिण दिग्विजयांतील ध्येयवाद या पत्राने स्पष्ट होणारा आहे. महाराजांच्या स्वराज्य प्रयत्नांतल्या सूत्रावरही त्यांच्या स्वतःच्याच स्फूर्तिदायक शब्दांत यांतून योग्य तो प्रकाश पडतो. तें पत्र समग्र पुढील प्रकरणांत उद्धृत करून श्रीमहाराजांच्या दक्षिण दिग्विजयाच्या फलिताची चर्चा करूं.



प्रकरण एकोणिसावें

# शिवाजीचें व्यंकोजीस पत्र

शिवछत्रपतींच्या अंत:करणांत दक्षिण दिग्विजयार्थ निघतांना जें उद्दिष्ट होतें त्यासंबंधी अनेकांचीं अनेक मतें आहेत. बेंद्रे सारख्यांच्याही मतें दक्षिण दक्षिणी लोकांकडे राहिली पाहिजे व मोगलांचें अथवा पठाणांचें साम्राज्य दक्षिणेंत नको हें छत्रपतींचें उद्दिष्ट दक्षिण दिग्विजयाच्या वेळीं होतें. यासाठी बेंद्रे, काळे प्रभृति संशोधक शिवछत्रपतींनी मालोजी घोरपडे यांना लिहिलेल्या पत्रांतील युक्तिवादाचा उपयोग करीत असतात; पण महाराजांचें ध्येय प्रांतवादाचें नसून हिंदूंचें धर्मराज्य स्थापन करणें हें असल्यामुळे दक्षिणेंतील व उत्तरेंतील मुसलमानी सत्ता त्यांना सारख्याच नको होत्या हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. स्वत: दक्षिणदिग्विजयाला निघण्यापूर्वी आपल्या बंधूकरवी हें कार्य पूर्ण करावें म्हणून त्यांनी १६७६ मध्ये व्यंकोजीला एक पत्र पाठविलें. तें भारत इतिहास संशोधक मंडळाला नुकतेंच उपलब्ध झालेलें असून तें अपूर्व पत्र पुढीलप्रमाणे :—

'श्री सहश्राये चिरजीवित अख [ डित लक्ष्मी आलंकृत रा. ] जमान्ये ता राजश्री येकोजी राजें प्रती [ शिवाजी राजे आशीर्वाद ] विनंति उपरि येथील कुशल जाणून स्वकीये तु [ म्ही ] आपले कुशल लेखन करीत असिले पाहिजे. येकोजी बा [ वा तु ] म्हास आम्ही कागद लिहितो तो अक्षेराचे अक्षेर मन [ न करूं ] न अर्थासहित समजणे. महाराज वडील होते त्यांही वेगरूल प्रांत पांचा लक्षां होनाची विलायेत मेलवून तुम्हास बेगरुलास ठेविले. आपण अदलशा पाछा सु [ बेदा ] रा बराबर माहाराज चाकरी करून असतां आम्हीं पुणें सुपें सिरवल इंदापूर बारा मावले चालिसां हजारा होनाचा मुळुक व गड होते तेथें ठेविलें. सेवट जेव्हा मोगल बेदरावरी चालोन आले त्या सलियामधें येखलासखान निजामशाही मुमळुक तमाम मोगलाईस दिल्हा त्या मधें आमचे पुणें सुपें सिरवल

इदापूर बारा माउले व गड यैसी निजामशाई म्हणोन लेहून दिल्हें यैसीयास मोगलास भेऊन द्यावें आणि माहाराजाचें वृधपण ते त्याजवल त्या पाचा लक्षामध्यैं मागावयास तोंड घेऊन जावें हे ख्यानती गोस्ट यैसे समजोन गडास माहालास मिठी मारून श्री देव-दयेणे आज आपले इजतीने पोट भरून आहों यैसीयास कितेक वर्शे गेले याउपर माहाराजाणे कैलासवास केला ते समई वांटेयाचे हटका-वया [ब] दल राजश्री निराजीपंतांस बोलाऊन आणिले. आपले जागा अैसा विचार केला कीं माहाराज थोरले राजे होते त्याणी बहूतां कस्टी करनाटकामधे पावा लक्षाचे वतन मेलऊन अैसीयास आम्ही भाऊ भाऊ निकरें भांडोन म्हणोन येकोजी बावा तुम्ही नेणते आम्ही वडिल ऐसे करार होऊन मेलविले वतन मुसलमानाचे हातास गेलें तुम्ही वाईट दिसले तेहि ख्या न ती (ख्या न) तुम्हास क अैसा दुरंदेसी विचार करून तुम्हामधे व आपणामधे झगडा वाडो दिल्हा नाहीं तुमचे जे समई जासूध येत गेले ते समई तुम्हाला हलभले दोन हातरोखे लेहून पाठविले माहाराजाणे कैलासवास केला याउपर बारा वरुसें जाहाली बारा वरुशांमधे तुमचा आमचा घटरम बरेपणाचा राखोन आहु. अैसीयास बारा वरुशामधे काबू पडिल्यां जें राज्ये पांचा लाखां होनाचें होतें तें राज्ये विसां लाखां होनाचें करावें आणि माहाराजाच्या करनटकांमधें हिलाल रोशन करावा अैसीयास काबूचे काबूस तुम्हास आम्ही त्या हावें तरी महाराज आम्हाला पिते होते परंतु आम्ही मातुश्री जिजाई आवाचें पोटीं जाहालो माहाराज तुम्हाला पिते होते परतु मातुश्री तुकाई आवाचे पोटी येण्हे करून तुम्हामधे व आम्हामधे सापत्न भाऊपणाचा पडदा अैसीयास तुम्हास आम्ही कागद ल्याहावा परंतु तुम्हामधे व आपणामधे घटबरेपण राखे अैसा थोर माणूस तुम्हाजवल नाहीं च्यार बेअकलें लाहान माणसें ब्राम्हणे असती असतां आम्ही येथून वडीलपणें थोर राजकारण ल्याहावे जे बरुशाचे मसलतीमधे चहूं पाचां लाखां होनाचा मुळुक तुमचे हातास येई॥ परंतु आम्ही कागद लिहिला म्हणजे च्यार बेअकले लाहाण माणसे ब्राम्हणे म्हणतील कीं तुम्ही ते सापत्नभाऊ

तुमचा त्यांचा गोत्रजपणाचा दावा आहे याकरितां सिवाजी राजे यांहीं भलतेच लिहिले आहे येकोजी माहाराजा हे गेस्ट फटकाल सिवाजी राजे याला वडिलपण आहे. याकारणें दाजीसाहेबी जैसा कागद लिहिला आहे तैसाच काबु पाहोन हातभर बेगदादी कागद लेहून जासूद चालऊन द्याल आम्ही लेहून हळुवार पडिलो तुमचा तर साता पांचा लाखाचां फायेदा तुम्हाला कलेना अैसीयास येकोजी बावा तुम्हा जवल सात पांच वेडी ब्राम्हणे ब्रा म्हणत असती अैसीयास कागद आईकोण कंटालाल आणि म्हणाल कीं नाही ते दाजीने उगंच सिव्या देऊन कागद लिहिला आहे आम्ही अैसें थोरे राजकारण काये चुकलों तर अतां राजकारणाच्या चुकी लिहितों येक अलि आदलशाहा होता ते समई सारे वजीर दलभारें करून पोट भरून होतों अवघ्या बराबर गोरगरीबं अकलेनी माहाराजाची मेलविली दौलत तोफा देऊन साजीस करून अलिअदलशाहा होता तों वरी दौलत राखिली बरें केले दाहा वजीरांबराबर अकल जाहाली याऊपर अदलशाहा पडिला वेडें खवासखान पेशवें जाहाले खोजा अबदुल महमद अदलशाहातं आपण गर्देस मिलाला[१] येक बहलोलखान खिजरखान हे दोघे आमचे तोंडावरी येऊन बैसले आम्ही दूरंदेसी शेर्ती करून अदलशाहाचें तख्त किलेपनाला खुंदळून घेतला व दुसरा किला सातारा घेतला[२] आणिखी तीन गड धाकटे घेतले आणखी कोकनांतील फोंडे पा(या)चं कोट घेतला बिजापूर बांकापूरपावेतों रगडून निमे खंडनिया घेतल्या यैसे आम्हाकडील राजकारण खवासखानाचे सिरी तीन वरुसें कारभार हो होतो बहलोलखान फिजरखान सातां आठां हजारा घोडीयानंसी मिरजे प्रांते फिरतात यैसा इकडे राजकारणाचा धिगडस[चा]लला आहे विजापुरी तुमचे हेजीब हरामखोर आहेती ते तुम्हाला खबर लिहितात की नाही की ते लिहितात व येकोजीबावा तुम्ही नेणतेपणे आईकत नसाल अैसीयास

---

१. खवासखानाचा खून पसासं १९०१, १९०२, इ. १६७६. २. पासासं १५६३ सातारा घेतला इ. १६७३.

तुम्ही आपले पाचा लाखाचें मुलकांत ठांणी बैसऊन वेडी ब्राम्हणे दोन टके जमा करावयासी लाविलीं आहेत रसदेस बेरीज आइकिता आणि खुसी होता कीं माहाराजापरिस पैके मेलविले हा कारभार तुम्हाला थेर येऊन पडिला आहे आणि बेगरुलाहून उठोन जाऊन मदुरेचे राज्याचे चंदावर घेतलें[1] आहे त्यासी करकर करीत बैसले आहा आणि आपले जागां आपले शाहाणपणास मानवितात कीं वेडें खवासखान कैसें आम्ही ठकितों आपला मुलुक चौकस करून ठाणी बैसऊन कमावीस करितों आणि खवासखान वेडियास समजाविलें आहे कीं आम्ही येकच वजीर चंदावरावरी गेलों आहों आणि त्यासी भांडतो यैसे समजावितां आणि चंदावरावरील ळूटलवाडी करून आपलें कटकाचें पोट भरून रोजगार चालविता दोहो तिही लाखाचा चंदावराखाली मुळुक कबज केला आहे पहिली पांचा लाखा होनाची दौलत हाली तीन लाखांची यैसी आठा लाखाची होनाचे दस्त घडलें अैसे बापडे वडे शाहाणे अैसे म्हणोन चंदावराजवल जाऊन बैसले आहा परंतु तुम्ही येकाजी बावा भलें राजकारण घडमोडी खेटाखेटी तुम्हाला कलल्या नाही ते तुम्हा जवल उदंड ब्राम्हणें पैके खाणारें आहेत त्यामधे येक तरी शाहाणां तुमचे हितावरी नांही जे तुम्हाला कैसे सागांवे की अलि अदलशाहा मेला शिवाजी राजे यानी तिकडे धुर्धा केली आहे खवासखान बहलोलखाना खिजरखान ते तिकडे गुतले वरकड अदलशाहाही बुडोन राहिली तुम्ही माहाराजाचे लेंक आहा हिमत करावी आणि महमद नासरखान खवासखानाचा भाऊ चंदीसारिखा जागा वेडें आहे त्याला येक भलतें हुनर करून दाहावीस हजार होन घेऊन देऊन भेटीजवल करावा आणि पछ्याकडून कापून टाकावा त्याचे सें दोनसें लोक असतील ते ठोकून लिढालिन पाडावे बहुत तरद्द तलास करून वेढा घालोन बहलोलखानाचा मुळुक आहे त्याचे हजार दोन हजार पठाण आहेत त्यास मारून गर्दस मेलऊन बहलोलखानाचा

१. पसासं १९०६ व्यंकोजी तंजावर घेतो इ. १६७६.

मुळुक तीन लाखाचा आहे तोही कबज करावा मथुरेचा राजा आपले चदावर खाऊन सुखी असोन आपला सेरीख व्हावा आणि आपण तरतूद तलास करून येळूरचा कोट व रायेलाचें तख्त हाताखाले घालावें पुढे तैसेच घाटावरी चढोन श्रीरंगपटनकरांसी आपले यामधे सरीख करून आपणही काही स्वार संगीनाथ मेलऊन बेंगरुळाचा देवदार थोरला कोट बहलोलखानाचे लेंकापासोन रगडून घ्यावा येकोजीबावा जरी तुम्हांला अकल सागोन अदलशाहा पडोन तीन वरसें जाहाली या मधे सदरहु मसलद हातीं धरिली असती तरी आज इतकी फते जाहाली असती. अैसीयास गेले गोस्टीस काही चालत नाहीं तुम्ही चंदावराची ळूट खादली तेच फार मानिलीत त्याला आम्ही काये करावें अैसीयास येकोजीबावा तुम्ही धाकुट पणीहून बालेराजे येकोजी माहाराजा इजतीचा फार येसियास सदरहु अकलेचें लिहिणे आइकोन कंटालाल आणि म्हणाल की अजीवरी दाजीणे आम्हास काहीच लिहिलें नाही तुम्हास जैसे कलेल तैसे आम्ही आपले अदृस्टे आजीवरी पोट भरिले अैसेच पुढेही भरून पाहारे कारकून हे दाजीने कितीक लांबच लांब भागड कथा लिहिलीं आहे ते आमचे जे कारकून आहेत ते आमचे पोठा पुरतें शाहाणें आहेत इतकें बोलोन आम्ही इतका लांब कागद लिहिला आहे त्याची टवाली करून टाकाल तरी येकोजीबावा काटाला टाकून हुशार होणें आणि बैसोन कागद आइकणे. आतां आमचें बाप माहाराज होते त्या पांचा लाखां होनाची दौलत तुज परोपरी बोलोन अडीच लाखाचा आपला वाटां तुजजवळ मागावा त्या कामाचा कागद नव्हे माहाराज आमचे बाप होते त्यांचे पुण्येकरून मी त्याचा लेक सिवाजी हाली माझे दस्त—

| | |
|---|---|
| गोकर्ण माहाबलेस्वरापासून | येकसे असी १८० किले |
| बागलान सालेरी पावेतों | महाराजाची भगवी निशाणे |
| पनास लाखा होनांचा मुळुक | चढली आहेत |
| कबज जाहाला असे | येक लाख च्यालीस हजार |
| बतीस हजार ३२००० घोडा | १४०००० प्यारा हशम चाकरी |
| घरची पागा यानिराले सिलेदार | आहे |

यैसे माहाराजाचे पुणे करून वर्तते माहारास्टामध्ये छत्र धरवितो

बऱ्हानपूर म्हणजे खानदेश वीस लाखा होनाचा मुळुक २००००००

श्री कृपेकरून घडले या खेरीज खडणीचा आणवितो. सुरत म्हणजे गुजराथेची सेवट व बागलाण म्हणजे वऱ्हाड च्यालीस लाखा होनाचा मुळुक ४००००००

दौलताबाद म्हणजे निजामशाई च्यालीस लाखा होनाचा मुळुक ४००००००

सदरहु मुलकांत घा (धा) व निया करून खडणीया घेत आहो येण्हेकरून औरंगशाहासारिखा बादशा घाबिरा जाहाला टक होऊन राहिला आहे. येकोजी माहाराजा तुझा सिवाजी भाऊ त्याचा ऐसा प्रताप आहे ह्या खबरा तुम्हाजवळ कोण्हीतरी सांगतात की नाही हे मज कलले ना. येकोजी बावा घा (धा) कुटपणीहून बहुत राजविलासी इजतीचा थेर बहुत खेस तुज आम्ही कागद ल्यांहावा याची गरज नव्हती परंतु हाली विजापुरी थोरला बादशाही बदा येखलास खान होता त्याचा पोर वेडा खवासखान याणी अली अदलशाहाचे साता वरुशाचे मूल मोहोरे घालून अली अदलशाहा पडिला पासून आजिवरी वेडे खवासखानास पातशाही चालऊन विजापूरचे कोटांत बहलोलखान व खिजरखान हे दोघे बेइमान पठान आमचे झगडियाचे तोडावरी मिरजेस थोपली होती असे यास येकोजीबावा वेडे खवासखानाने वेडे राजकारण करून मोगलाचा सुभेदार बाहादुरखान याकडे वेड्या खवासखाणे विजापुरीहून निघोन भिवरेचे काठी बाहादुरखानास भेटले आणि सल्याचा विचार ऐसा केला की अ (द) लशाहा पडिल्यापासोंन आजतागाईत मोगलाचा तोफा राहिला आहे तो माफ करून आम्हाला बलकट कौल द्या ऐसे बोलोन पंच्यासी लाख रुपये तोफा माफ करून बलकट कौल बाहादुरखाने मुसाफेवर शेकत करून

घेतला आणि वेडा खवासखान याणे इनाम दिल्हे की पंचवीस हजार स्वार व ह (श) म ऐसा जमाव करून सिवाजी राजे यावरी पनालियावरी व सातारियावरी जाऊन निकरे भांडोन हिमत मर्दानगी करून कोकनांत उतरोन कोकण लुटोन जाळून ऐसा बाहादुरखानासी बंद करून वेडे खवासखाण फिरोन विजापुरास आले तो तिकडे बादुरखाने पेडगांवांस गेले आमचें घोडा राऊन सुभेदार हबीरराऊ वांई पुण्यांतून धाविला तो दौलताबादेजवल लासूर पेठ आहे तेथे कितेक पेठेचा माल आमचे लोकीं लुटिला इतुकियामधें बाहादुरखान तडका धावणी करून लासुरास गेला तेथे त्यामधे व आमचे (ल) स्करांत झगडा झाला खस्त फार जाहाली त्याचे लोक पडिले व आपले पडिले. आपले लोकी इतकी अधिकाई केली की बाहादुरखानाचे च्यार हत्ती पाडाव केले ते मोहोरे घालोन बाहादुरखानासी थोपून बलेच राखोन मजील दरमजी (ल) आपले मुलकांत कोकणांत अ (ले) इततुका बाहादुरखानाचे जमीतीचा व आपले जमेतीचा तमासा जाहाला इकडे विजापुराकडे ऐसे जाहाले की वेडे खवासखाणे तिकडे बाहादुरखान झगडतो आपण इकडे सिवाजी राजे झगडावया जाऊन ऐसा विचार करून विजापूरचे कोटांतून च्यालीस पंनास स्वारानसी बाहीर निघोन पंठान बहलोलखान बेइमान याचे हवेलीस आले. त्यास म्हणो लागले की सिताबी करा तुम्ही आम्ही सिवाजी राजे यावरी झगडायास जाऊन बाहादुरखानासी बोल खरा करून बसलो. खान बोलिला की बहुत बरे रजा तुमची चला खिजर खानासीं आधीच इशारत होती बहलोलखान वेडे खवासवासखान आला म्हणितले खजरखानही या विचाराबद्दल बोलाविला आहे तोही बाहीर आला आहे त्यास पेस वाज जाऊन घेऊन येतो हुकमत पऱ्हा आम्हा दोघास जैसा हुकुम करितील तैसा अमल करून यावरी खिजरखान पेस वाज गेला द्यानत राऊ बेइमान ब्राम्हण बहलोलखानाचे बेइमानीत मिलाला होता तो पाणी द्यावयास म्हणोन त्याचे मागे गेला बहलोलखाने आपले लोक

वाडियांत लपविले त्याणी येऊन वेडे खवासखानासी धरिले होते ऐसा त्याचा समाचार जाहाला खिजरतखान हजाराका श्वारांनसी वाडियासी म्हणून मुस्तेद होऊन आला होता तो सिताबी करून विजापूरचे थोरल्या कोटावरीचे येक दरवाजे या वाटे दोहो हजारां घोडियांनसी विजापूरचे थोरले कोटांत गेला मागोन बहलोलखानाची चहुका हजारांची रेल जाहाली पठाणांही बेइमानी करून थोरला हु कोट घेतला खवासखानाचे निसवतेने सेख मिनाज आतील दिवाणाचा कोट जाऊन बलकाविला ते बेइमान हरामखोर द्यानतराऊ त्या सेवेची सेख मिनाजवल जाऊन भेडसाऊन तमाम घेऊन राजी करून आतील कोटांतून बाहेर काढिला बहलोलखानाचे लोकास आतील दिवाणाचा कोट कबज जाहाला अदलशाचे तख्त व छत्र व साता वरुशाचे पोर बहलोलखान बेइमान पठान याचे हातास लागले. येकोजीबावा विजापूरची पातशाही पठानाचे हातास गेली ऐसियास येकोजीबावा तुम्ही ऐसा विचार कराल की आम्हास बहलोलखान काये आणि खवासखान काये फारसा दाब तुंम्हा करितील तरी लाख दोन लाख होन तोफा देऊन आजीवरी राहिले तैसे पुढेही राहोन ऐसा विचार कराल तो राहिला अदलशाई होती ते आता पठाणाची बादशाई विजापूरची जाली आहे ऐसियास आतां येकोजीबावा येक वेडा कारकून जातो बहलोलखानासी हलभल रुजुवाता चाकरीनेत आपले पहिलेपासोन चालले तैसेच चालावे म्हणोन अदलशाचे मुलाचा तुर्मान व बहलोलखानाचे इमानाचा कागद घेऊन येतो मग येकोजीबावा माहाराज चंदावराकडे अगर हरकोण्हीकडे मोहिमास मागोन घेतो आम्हास कांही विजापुरा जावे लागत नाही इकडे जैसी इतकी वरसे ढकलली तैसीच पुढेही ढकलोन यैसा मनी विचार कराल आणि घोरपडीचे आधारे करून घर बुडवाल बेंलागरू कोकण व ऐरण आणखी गड पांचा लक्षा होनाची विलायेत बेइमान पठान तुम्हाला खाऊ देणार ना ज्या पादशाहाचे पठानी अजीवर जिवर निमक खादला त्यांही बेइमानी

करून पातशाही घेतली तेथे तुम्हाला मुळुक जिरो देतील ह्या गोस्टी राहिल्या ऐसे येकोजीबावा बरे समजोन बहलोलखान विजापुरीवर जो गुतला आहे इतका तमासा साडोन त्याच्याने सारी जमेत घेऊन तुम्हाकडे येवत नाही उगेच तुम्ही नसते भये मनांत धरून काये येकोजीबावा तुम्ही माहाराजा म्हणवितोस हिमत बाध आम्ही तरी येक वेडे बहलोलखानासी वरजादर झगडा लाविला आहे सारी जमेती याची आम्हावर गुतली आहे येक हुसेनखान बागणुरा हजाराका स्वा (रा) नसी आहे येक सेरखान वालगुपुरी आहे चंदीकडे पडलील तीन लक्षाचा मुलुक बहलोलखानासी आहे ऐसीयास जरी आम्ही तुम्हाला ऐसी अकल त्याहावी की चंदीमधे खवासखानाचा भाऊ महमद नासीरखान आहे तो तुम्ही मिलोन पठानाची विलायेत घ्यावी तरी महमदनासीरखान वेडे आहेत त्याच्याने पुढे राजकारण दुनियाप चालवत नाही या कारणे तुम्हाला हजुरून लिहितो की बहलोलखाने विजापुरीतून तुम्हाला लिहिले असेल की सेरखान तुम्ही मिलोन खिलाबज सेरखानाचे हवाला करणें तरी येकोजी बावा तुम्ही पैकीयावर न पाहाणे जरी बहलोलखानाचा तिकडे सेरखान आहे तो लस्करी यास दोन होन देई तरी आपण तीन होन द्यावे आणि लस्कर हशम जमेती करावी लोक कोणाकडे चाकरी न करीत येकोजी माहाराजा पैके फार देतो त्याचेकडे जाऊन चाकरी राहून म्हणे असे करून आपणाकडे जमेत करून बलकट होणे बहलोलखानाचा कागद तरी चंदी घ्यावी म्हणौन आले असतील त्यामिसे सरखानास बलऊन आणून ते तुम्ही मिलोन चंदी घ्यावी महमद नासीरखान मासू (न) गर्देस मेलवावा आणि सेरखान सहजेच आपण होऊन तेथे कमजोर असेल तो भेटीस म्हणोन बोलाऊन आणून तेथेच जबे करावा त्याची जमेत कांही असलीं त्यावरही हला करावा म्हणजे चंदी आपणास चालोन आला तरी सद (र) हुप्रमाणे वर्तणुक केली तरी येहणेप्रमाणे फते होतच आहे म्हणजे येकोजी (बा) वा तुम्हा ऐसा कर्नाटकामधे जोरावर कोण्ही नाही जरी मसल (त)

हाती धरिता तरी फते ऐसीच होऊन येई हे तजवीज माणली की न माणे आम्ही तुम्हास ल्याहावे हे उचित काये म्हणोन की तुम्हीच उद्या म्हणाल की दाजीन्हेब वडी(ल)होते त्याणी आम्हास ल्याहावें मग आमच्याने होते अगर नाही होत परतु वडीलपणे पध्दत लेहून पाचवावी होती ऐसेही बोल लावाल म्हणून लिहिले असे तुम्ही बे अकल कारभारी याचे बुधीने लागोन हे तजवीज रद कराल तरी आम्ही जे लिहिले आहे हे केलियानी तुमचा नामुस आहे माहाराजाचे पोटी जाहाले याचे सार्थक कैले ऐसे होईल विषशे काये लिहिणे प्रतिउतर पाठव हे आशीर्वाद' छ छ छ.

या पत्राचा व्यंकोजीवर कांहीही परिणाम झाला नाही. तंजावरच्या नायक राजाविरुद्ध खड्ग उपसणाऱ्या या वीराला महाराजांचा हिंदुस्वातंत्र्याचा ध्येयवादही समजू शकला नाही. तो प्रत्यक्षांत आणण्यासाठी महाराजांनी आपल्या आत्मचरित्राच्या द्वारें लिहिलेली व केवळ साहसी लोकांनाच आचरण करतां येणारी राजनीति आचरण्याची व्यंकोजीची हिंमत झाली नाही, इतकेंच नव्हे तर त्यांच्याशीं संबंध ठेवणेंही त्याला संकटाचें वाटूं लागलें. म्हणून शेवटीं महाराजांनी प्रस्तुत पत्रांत जी गोष्ट टाळण्याचें उल्लेखिलेलें आहे ती अर्ध्या वाटयाची गोष्ट त्यांना काढावी लागली. तंजावरपासून अवघ्या दहा कोसांवर येऊनही आपली भेट टाळणाऱ्या या बंधूपासूनच कदाचित् स्वराज्याचें शत्रुत्व निर्माण होईल असें त्यांना वाटलें असावें. त्यांनी शेवटीं सामर्थ्याच्या उपयोगाने दक्षिणेंत हिंदुसत्ता स्थिर केली व सापासारख्या उलटलेल्या व्यंकोजीचेंही नियंत्रण केलें पण शहाजी राजांच्या या बीजाकडे त्यांनी दयाबुद्धीने पाहून त्याचें कल्याणही साधून दिलें. यानंतर तरी राजे व्यंकोजी आपले साहाय्यक होतील असें त्यांना वाटलें. पण 'धाकटें ते धाकटे, बुद्धीहि धाकटीच' या त्यांच्या अभिप्रायाचाच प्रत्यय त्यांना आला. पराभूत झाल्यामुळे व्यंकोजी खिन्न झाले. आपला न्यायाचा हक्क महाराजांनी राजकारणीपणाने बजावल्यामुळे ते उदास झाले व वैराग्य धारण करून कशांतही लक्ष घालीनासे

झाले. महाराजांना रघुनाथपंताकडून ह्या वार्ता कळतांच त्यांना खेद झाला. महाराजांनी पुन्हा त्यांना कर्तृत्वाची प्रेरणा देणारें एक पत्र बदलत्या परिस्थितीच्या जाणिवेने पाठविलें. तें पत्र असें :—

'श्रियासह चिरंजीव अखंडित लक्ष्मी अलंकृत राजश्रिया विराजित राजमान्य राजेश्री महाराज व्यंकोजी राजेप्रति राजश्री शिवाजी राजे आशीर्वाद. येथील क्षेम जाणोन स्वकीय कुशल लेखन करणें विशेष. कितेक दिवस जाले तुमचें पत्र येत नाही. याकरिता समाधान वाटत नाही. सांप्रत राजश्री रघुनाथपंती लिहिलें की, 'तुम्ही आपले ठायी उदास वृत्ति धरून पहिलेसारखें आपलें शरीर संरक्षण करीत नाही. सणवार, उत्सवादिक हेंहि कांही करीत नाही. सेना बहुत आहे. परंतु उद्योग करून कार्य प्रयोजन करवावें हेंहि कांही करीत नाही. वैराग्य धरिलें आहे. एखादे तीर्थीचे बसून कालक्रमणा करूं ऐसे गोष्टी सांगतात'. म्हणोन विस्तारे लिहिले होते. तरी या गोष्टी आम्हास बहुत अपूर्व वाटल्या की, कै. स्वामींनी कसे प्रसंग पडले ते निर्वाह करून यवनांच्या सेवा करून आपल्या पुरुषार्थे बाजी संवारून उत्कर्ष करून घेतला. शेवट बरा निर्वाह केला. ते सर्व तुम्ही जाणतां. त्यांच्या साह्यतेस त्यांच्या बुद्धि युक्ति सर्वहि तुम्हास उपतिष्ठोन त्यापासून शहाणे जाले आहां. त्याउपरि आम्हीहि जे जे प्रसंग पडले ते निर्वाह करून राज्य मिळविलें हें जाणतां व देखत आहा. असें असोन तुम्हांला ऐसा कोणता प्रसंग पडला जे इतक्याचमध्यें आपल्या संसाराची कृतकृत्यता मानून, नसतें वैराग्य मनावरी आणून, कार्यप्रयोजनाचा उद्योग सोडोन, लोकाहातीं रिकामेपणीं द्रव्य खावून नाश करवणें व आपल्या शरीराची उपेक्षा करणें. हें कोण शहाणपण व कोणती नीति ? व आम्ही तुम्हास वडील मस्तकी असतां चिंता कोणे गोष्टीची आहे ? या उपरी सहसा वैराग्य न धरिता मनांतून विषण्णता काढून कालक्रमणा करीत जाणें, सणवार उत्साह पूर्ववत् करीत जाऊन तुम्ही आपलें शरीर संरक्षण बरें करीत

जाणें. जमेती सेवक लोकांना रिकामे न ठेऊन कार्यप्रयोजनाचा उद्योग करून त्यापासून सेवा करून पुरुषार्थ व कीर्ति अर्जणें. तुम्ही त्या प्रांते पुरुषार्थ करून संतोषरूप असलिया आम्हास समाधान व श्लाघ्य आहे की, कनिष्ठ बंधु असे पुरुषार्थी आहेती. पुरुषार्थ व कीर्ति अर्जणें. रिकामे बसोन लोकांहातीं नाचीज खाववून काल व्यर्थ न गमावणें. कार्यप्रयोजनाचे दिवस हे आहेती. वैराग्य उत्तरवयी कराल तें थोडें. आज उद्योग करून आम्हासहि तमासे दाखविणें. बहुत काय लिहिणें, सूज्ञ असा. मोर्तब सूद. मर्यादेयं विराजते.'

दक्षिण दिग्विजयाने महाराजांनी दक्षिणेंत हिंदुसत्ता इतकी प्रबळ केली की, कोणत्याही मुसलमानी सत्तेला ती मोडून काढतां येणें अशक्य ठरलें. छत्रपतींच्या या दक्षिण दिग्विजयाच्या आरंभीं त्यांनी कुतुबशहाशीं राजनैतिक संधि केला होता याचा उल्लेख मागे आलाच आहे. महाराजांनी हा संधि पुढे पाळला नाही इतकेंच नव्हे, तर त्यांना द्याव्या लागणाऱ्या अमाप पैशामुळे कुतुबशहाला पश्चात्ताप होऊन त्यांच्यांत परस्परांत वैर निर्माण झालें अशी इंग्रजी पत्रव्यवहारावरील कांही उल्लेखांवरून पुष्कळांनी आपली समजूत करून घेतलेली आहे. परंतु ती बरोबर नाही. मार्टिनने आपल्या आठवणींत असें लिहिलें आहे की, मद्रासच्या इंग्रज गव्हर्नरला जुलै १६७७ मध्ये कुतुबशहाकडून एक पत्र आलें. त्या पत्रांत कुतुबशहाने असें लिहिलें होतें की, 'इंग्रजाने शिवाजीला कोणत्याही प्रकारची मदत न देतां त्याच्या सैन्यांत फितुरी करावी व डोळ्यांत तेल घालून त्याच्या हालचालीवर दृष्टि ठेवावी. कारण की, दक्षिणेंत शिवाजीने जिंकलेल्या कोणत्याही प्रदेशापैकी बादशहाला कांहीही न देऊन शिवाजीने त्याची फसवणूक केली आहे. जिंजीचा किल्ला कुतुबशहाला न देण्यांत तर ही फसवणूक अधिकच स्पष्ट झालेली आहे.'

पण हें म्हणणें चूक असल्याचा भरपूर पुरावा उपलब्ध आहे. शिवाजीच्या भरंवशावरच दक्षिणेच्या या मोहिमेची उभारणी

करतांना कुतुबशहाला मोगल व विजापूरकर यांच्या संयुक्त आक्रमणाच्या विपत्तीशीं तोंड द्यावें लागलें तरी कुतुबशहाने शिवाजी बरोबर दिलेलें आपलें सैन्य परत बोलाविलें नाही. महाराजां-बरोबर कुतुबशहाचा सेनापति महम्मद अमीन हा ससैन्य फेब्रुवारी १६७८ पर्यंत होता. कुतुबशहाचा सेनापति महाराजांच्या हाता-खाली काम करीत असल्यामुळेच महाराजांनाच कुतुबशहाचे सेनापति समजण्यांत येत होतें. १६७७ च्या आक्टोबरमध्ये महाराज ससैन्य कुतुबशहाच्या साह्यार्थ जावयास निघाले होते. फेब्रु. १६७८ मध्ये मराठी सैन्य सर्वत्र विजयी झालें असतांनासुद्धा त्यांनी गोवळकोंडयाच्या प्रदेशाला यत्किंचितही उपद्रव दिलेला नाही. राजे व्यंकोजी यांना पाठविलेल्या पत्रांत कुतुबशहाकडून तीन लक्षांची जहागीर देवविण्याची हमी महाराजांनी घेतलेली आहे. कुतुबशहाशीं त्यांचे संबंध बिघडले असते तर ही गोष्ट कधी तरी शक्य कोटींत येण्यासारखी होती काय? चिटणिसांच्या बखरींत दक्षिण दिग्विजयावरून परत आल्यावर महाराजांनी कुतुबशहाला वृत्तनिवेदनपर पाठविलेल्या पत्राचा व कुतुबशहाने खास दूताकडून त्यांच्याकडे आनंदप्रदर्शनार्थ पाठविलेल्या भेटींचा उल्लेख आहे. तात्पर्य, छत्रपतींनी पठाणी आदिलशाहींतील प्रदेश घ्यावा व तो स्वतःकडेच ठेवावा आणि गोवळकोंडेकरांनी कारो-मांडेल किनाऱ्यावरील प्रदेश आपल्या राज्याला जोडावा असा त्यांचा संधि होता व त्याचा भंग कोणीही कधीच केला नाही.

श्रीशिवछत्रपतींच्या दक्षिण दिग्विजयाचा कालादर्श पुढीलप्रमाणे आहे :—

| | |
|---|---|
| जानेवारी १६७७ | रायगडाहून प्रस्थान. |
| मार्चचा पहिला आठवडा | भागानगरला पोहोचले. |
| ४ मार्च | कुतुबशहाची भेट. |
| एप्रिल | भागानगराहून मद्रासकडे प्रयाण. |
| ८ मे | पेदापोलमला निवास. |

| | |
|---|---|
| १४ मे | महाराजांचें मद्रासच्या गव्हर्नरला पत्र. |
| ९ मे ते १३ मे | जिंजीवर स्वारी. |
| १८ मे ते २१ मे | जिंजीवर विजय. |
| २५ मे पर्यंत | जिंजीहून वेलोरवर स्वारी. २५ मेला मद्रासच्या गव्हर्नरला दुसरें पत्र. |
| २६ जून | तिरुवाडीचें युद्ध. |
| २७ जून | शेरखानाचें पलायन व मराठ्यांनी चालविलेली त्याची पारध. तिरुवाडीच्या किल्ल्यावर कांहीं दिवस शेरखानाच्या सासऱ्याचें आधिपत्य. |
| २८ जून | भुवागिरीला शेरखानानें आश्रय घेतल्यामुळे त्याच्या मागावर महाराजाचे तिवेन्नापट्टम् व पुन्नामल्लाई या मार्गानें प्रयाण. |
| १ जुलै | वालडोर, तेगानापट्टम् व इतर किल्ले महाराजांनी जिंकले. |
| ३ जुलै | भुवांगिरीहून शेरखानाला हुसकून लावून त्या किल्ल्याचा विध्वंस करण्यांत आला. |
| ५ जुलै | शेरखान महाराजांना शरण आला. फ्रेंचाचा वकीलही भेटावयास आला. |
| ६ जुलै | महाराज तिरुमलवाडीला आले व तेथे त्यांनी कांहीं दिवस मुक्काम केला. हे कोलेरून नदीच्या तीरावर वसलेलें गाव आहे. येथेच राजे व्यंकोजी याच्याशीं त्यांनी वाटाघाटी केल्या. मदुरेचा राजा चोक्कनाथ याचा राजदूत येथे महाराजांना भेटावयास आला. त्याच्याबरोबर आपला राजदूत म्हणून महाराजांनी रघुनाथपंत हणमंते यांना मदुरेच्या राजाकडे पाठविलें. |
| १७ जुलै | रघुनाथपंत हणमंते यांच्याबरोबर मदुरेच्या राजदूतानें येऊन महाराजांना दीड लक्ष होन नजराणा समर्पण केला. व्यंकोजी राजे महाराजांच्या भेटीला |

| | |
|---|---|
| | आले. व रीतीप्रमाणे महाराजांचा निरोप न घेतांच त्यांनी तंजावरला प्रयाण केलें. |
| २ ऑगस्ट पर्यंत | महाराजांनी तिरुमलवाडीचा मुक्काम उठवून आपलें सैन्य येलावन्सरला पाठविलें, व स्वत: आपल्या मुख्याधिकारी वर्गासह वृद्धाचलमला प्रस्थान केलें. २ ऑगस्टपर्यंत ते तेथेच राहिले. |
| २ ऑगस्ट | डचांच्या वकिलाने येऊन महाराजांना नजराणा समर्पण केला. व्यंकोजीचा एक गड महाराजांनी जिंकला. |
| २४ ऑगस्टपर्यंत | कोलेरून नदीच्या तीरापर्यंतचा व्यंकोजीचा प्रदेश महाराजांनी जिंकला. व्यंकोजीने महाराजांच्या विरुद्ध मोठी आघाडी निर्माण करण्याचा प्रयत्न चालविला. |
| २२ सप्टेंबर | शिवछत्रपतींनी मुंबईच्या इंग्रज गव्हर्नरला पत्र लिहून किल्ल्यांच्या बांधणीसाठी तज्ज्ञ कारागिरांची मागणी केली. |
| ऑक्टोबर | शिवछत्रपतींच्या सैन्याने बांकापूर व कोप्पळ जिंकून गदग व लखमेश्वर लुटलें. |
| नोव्हेंबर | व्यंकोजीने संतोजी भोसले यांच्यावर आक्रमण करण्यासाठी कोलेरून नदी पार केली. |
| ६ नोव्हेंबर | अहेरीजवळ मोठें युद्ध होऊन त्यांत व्यंकोजीचा संपूर्ण पराभव झाला. |
| २८ फेब्रुवारी १६७८ | वेलवाडीचें युद्ध. |
| ४ एप्रिल १६७८ | महाराज पन्हाळ्याला येऊन पोहोचले. |
| मे-जून | महाराजांनी गदगवर विजय मिळविला व ते रायगडला पोहोचले. |

दक्षिण दिग्विजयाने महाराजांच्या स्वराज्याला बळकटी आली. छत्रपति राजारामाच्या काळीं औरंगजेबाच्या स्वारीच्या विपत्तींतून

महाराष्ट्र व स्वराज केवळ जिजीच्या भरंवशावरच वाचूं शकलें आहे हें ध्यानांत घेतलें म्हणजे दक्षिणदिग्विजयाच्या महत्तेची खरी कल्पना येते. यापूर्वी महाराजांना लुटारू व बंडखोर म्हणणाऱ्या परकीयांना या दक्षिणादिग्विजयानंतर महाराजांच्या व्यक्तिमत्त्वांत 'जगज्जेता' होणाऱ्या महापुरुषाचें विभूतिमत्त्व प्रतिबिंबित झालेलें दिसूं लागलें. तत्कालीन पाश्चात्यांच्या पत्रव्यवहारांतील कांही उतारे या दृष्टीने पाहण्यासारखे आहेत.

'Sevagee Raja carried on by an ambitious desire to be famed a mighty conqueror, left Rairi, his strongest hold in the kingdom of Cuncan ( Konkan ), at the latter end of the last faire Montzoone ( Monsoon ) and marched with his army consisting of 20,000 Horse and 40,000 foote into cannaticke, where the feting as have two of the strongest holds in these parts, called Chindi ( Jinji ), Chindawar ( Tanjore ) where many merchants are considerable inhabitants, and with a successe as happy as Caesars in Spaine, he came, saw, and overcame, and reported so vast a treasure in Gold, Diamonds, Emeralds, Rubies and wrought Corall, that have strengthened his armes with very able sinews to prosecute his further victorious designs.

He is at present before Bancapore, two other very strong Ghurrs ( Gads ) or Rocks, which soe soon as he hath taken in ( being noe lesse dexterous thereat, than Alexander the Great was, ) for the agility of his winged men ( himselfe terming them birds ) he took in lesse than 8 months time from the Mogull, which he had delivered up to his then Generall Rajah Jessing 23 inaccessible ones ) resolves against Vijapore, the metropolis of the kingdome of Deccan propinque to them; and being become master thereof, has vowed to his pagod ( i. e., Goddess Bhavani ) never to

sheathe his sword till he has reached Dilly, and shutt up Orangsha in it. Mora pant, one of his Generalls, hath alsoe of late plundered Trumbeck Nasserk, and other considerable places within the Mogalls Territorys which hath added much to his Treasure.

Sevagee is a second Sertorius and comes not short of Hanibal for stratagems. )

—( Shivaji the Great, By Dr. Balkrishna Vol. II—Part 1 P. 253, 254, 255, )

(आपली जगज्जेता म्हणून प्रसिद्धी व्हावी अशा महत्त्वाकांक्षेने प्रेरित होऊन, शिवाजी कोकणांतील अत्यंत दुर्गम किल्ला जो रायरी तेथून निघून गेल्या पावसाळ्यानंतर २० हजार स्वार व ४० हजार पदाति घेऊन कर्नाटकावर गेला. त्या बाजूला तेलंगणांतील जिंजी व तंजावर हे दोन मोठे किल्ले आहेत. तेथील व्यापारी बहुत सधन आहेत. स्पेनमध्ये सीझर ज्याप्रमाणे आला, त्याने पाहिलें आणि जिंकलें, तद्वत् तेथे शिवाजीचा पराक्रम होऊन तेथून त्याला अमर्याद संपत्ति मिळाली; आणि त्यामुळे पुढील युद्धाचा यशस्वी कार्यक्रम पुरा करण्यास त्याला साधनें प्राप्त झालीं. तो हल्ली बंका व पूर या दुसऱ्या दोन किल्ल्यांवर हल्ले करीत आहे. (अलेक्झांडर धि ग्रेट इतकाच त्याचा या बाबतींत हातखंडा आहे.) कारण पूर्वी जयसिंगाला दिलेले २३ दुर्गम किल्ले त्याने आपल्या पक्ष्यांप्रमाणे चपल स्वारांच्या साहाय्याने (त्यांना तो आपले पक्षी पांखरें असेंच म्हणतो), मोगलापासून आठ महिन्यांच्या आंत परत घेतले. बंका व पूर घेतल्यावर त्यांच्या नजीकच असलेली दख्खनच्या राजाची राजधानी विजापूर ह्या किल्ल्यावर तो स्वारी करणार आहे. तो घेतल्यावर मग थेट दिल्लीवर चाल करून जाऊन औरंगजेबाला तेथे कोंडून टाकीपर्यंत तलवार म्यानांत न घालण्याची त्याने देवी-जवळ प्रतिज्ञा केली आहे असें म्हणतात. मोरोपंताने नुकतीच त्रिंबक

नाशिक व मोगलाईंतील इतर शहरें लुटलीं. त्यामुळे त्याच्या खजिन्यांत पुष्कळच भर पडली.)

दक्षिण विजयाचें फलित सांगतांना सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रांत म्हटलें आहे; 'महाराज यांणीं दक्षिण प्रांतांत सर्व एक राज्य पश्चिम समुद्रापासून श्रीरामेश्वरापर्यंत दक्षिणचें, एक आज्ञा (चाले) ऐसें केलें.' (पृ. २९५)

पुण्यश्लोक श्रीशिवछत्रपतींच्या दक्षिण दिग्विजयाच्या दुंदुभिघोषांत त्यांच्या पावन चरित्राचा हा तिसरा भाग आम्ही संपवितों. शिवछत्रपतींच्या उर्वरित जीवनाचें समालोचन व त्यांच्या चरित्राशीं संबद्ध असा (१) छत्रपतींची सागरी सत्ता, (२) स्वराज्याची सेना, (३) स्वराज्यांतील दुर्ग, (४) स्वराज्याची अमात्यसंस्था, (५) स्वराज्याचे सुहृद्, (६) शिवसमर्थांचे राजकीय व आध्यामिक सबंध, (७) राजर्षींची राज्यपद्धति, (८) परराष्ट्रसंबंध, (९) कोशबल, (१०) अर्थव्यवस्था, (११) राष्ट्रजीवनाच्या सर्व क्षेत्रांतील द्रष्टेपणा, (१२) जागतिक महापुरुषांत छत्रपतींचें स्थान, या विषयांची मीमांसा प्रस्तुत ग्रंथाच्या चतुर्थ भागावर सोपविणें भाग आहे.



## सूची

